ज्यांच्या तीव्र प्रेरणेमुळे साधनांच्या अभावींहि
प्रस्तुत ग्रन्थ लिहिण्यास मी प्रवृत्त झालों
आणि
ज्यांच्या निरन्तर प्रोत्साहनामुळे अनेक अडचणींतून
मार्ग काढीत मी तो यथाशक्ति पूर्ण करूं शकलों त्या
मान्यवर
श्री. उमाकान्त केशव (बाबासाहेब) आपटे
यांना
अत्यंत आदरपूर्वक समर्पण

—श्रीधर भास्कर वर्णेकर

# प्रस्तावना

साहित्याचा इतिहास हा इतिहासलेखनाचा एक विशेष अवघड विभाग समजला जातो; कारण वाङ्मयाचीं प्रमाणें साधारण इतिहासनिर्णायक प्रमाणांपेक्षा अधिक परिवर्तनशील असतात. साहित्यमूल्यमापनाच्या निकषावर आजचें शंभर नंबरी सोनें उद्या हिणकस निघू शकेल. किंवा आज जें सोन्यांत गणण्याजोगें वाटत नसेल तें उद्या अभिरुचींत पालट झाल्यामुळें उच्च प्रकारचें सोनें भासूं लागेल. शिवाय, कीर्ति माळेंत कोणच्या लेखकमणीस गोवावें व कोणास तोडून वगळावें हे प्रश्न नेहमी वादग्रस्तच असतात. साहित्याच्या विशाल विश्वाच्या मानानें कोणत्याहि व्यावहारिक दृष्टीनें लिहिलेला इतिहासग्रंथ अपुराच पडतो व अभाव किंवा अतर्भाव गुणमापनाच्या दृष्टीनें खटकल्यावाचून राहत नाहीत.

जिवंत भाषेतील साहित्येतिहासाची ही दशा तर संस्कृतसारख्या षड्दर्शनीं मृत भासणाऱ्या भाषेच्या साहित्याचा इतिहास लिहिणें किती अवघड असावें हें स्वानुभवाशिवाय कळणें शक्य नाही. पुरातन वाङ्मय असेल तर त्याला अर्वाचीन मूल्यमापनाचीं साधनें नियोजून कसाला लावणें अन्यायाचें ठरतें; अर्वाचीन निर्मिति असेल तर सभोवतालचें साहित्यविषयक वातावरण संस्कृतेतर असल्यामुळें ते कसास उतरतें किंवा नाही याची लौकिक प्रचीति मिळू शकत नाहीं. विद्वानांनी विद्वानांकरिता लिहिलेल्या साहित्याचीं मूल्यमापनें कृत्रिम व साधारण जनांच्या अभिरुचीशी असंबद्ध असल्याचाच असण्याचा भास असतो, तेव्हा अर्वाचीन संस्कृत साहित्याचा इतिहास लिहिणें म्हणजे दिव्यांतून पार पडणें असें मानलें तरी चालेल. परंतु हा धाडसीपणा नागपूर विश्वविद्यालयाच्या स्नातकोत्तर शिक्षाविभागाचे प्राध्यापक श्री. श्रीधर भास्कर वर्णेकर यांनी ह्या ग्रंथाच्या द्वारा केलेला आहे व माझ्या मतें ते दिव्यांतून सुखेन पार पडले आहेत—साहसे श्री प्रतिवसति।

सानुबंध साहित्य-निर्मितीच्या दृष्टीने संस्कृत ही केव्हाहि मृतभाषा न्हती व आजहि नाही. परंतु संस्कृत साहित्याची अव्याहत निर्मिती होत असता सुद्धा पर्यालोचन ग्रंथाचा अभाव व पंडितराज जगन्नाथ यांच्या कालानंतर—म्हणजे सोळाव्या शतकापुढे संस्कृत साहित्य नाहीच ही समजूत, या कारणामुळे गेल्या तीन शतकातील संस्कृत साहित्याची पद्धतशीर दखल क्वचितच व त्रोटकच घेतली गेल्यामुळे ही साहित्य संपदा किती समृद्ध आहे याची बहुतेकांना कल्पनाच नसते.

या गेल्या तीन शतकांत संस्कृतमधे विविध प्रकारचे साहित्य निर्माण झालेलें आहे. कल्पकता, प्रतिभा, प्रगाढ, रसरुता इत्यादि गुणांचा विलास त्या साहित्यात झालेला आढळतो, एवढच नव्हे तर आधुनिक—विशेषत पाश्चात्य—संस्कृतीच्या संपर्काने त्या साहित्यात नवलाईची भर घातलेली आहे. या सर्व गोष्टींचा परिचय प्रस्तुत ग्रंथ लिहून श्री. वर्णेकर यानी करून दिलेला आहे.

हा ग्रंथ अत्यंत परिश्रम करून तयार केलेला आहे, हे वाचकास नुसत्या दृष्टिक्षेपाने कळून येण्यासारखे आहे. पण समीक्षामुसळाने घुसळलेला साहित्यार्णवहि अफाट आहे, व त्यातील अनेक रत्नें अप्रकाशित असल्यामुळे शिंपल्यातील मोत्या सारखीं पारखेकरिता दुर्मिळ आहेत. अर्थात् ग्रंथकर्त्यांनें अमुक तमुक वगळलें असा आरोप करण्याचा अविचारी वाचकांना मोह पडण्याचा संभव आहे. परंतु 'विखुर लेल्या व दुर्मिळ साहित्याचें व्यवस्थित संकलन करून देश, काळ इत्यादि विभागाच्या अनुरोधानें त्याचें समीक्षण' केल्याबद्दल उलट श्री. वर्णेकर याचे सकौतुक आभार मानिले पाहिजेत.

ग्रंथातील विषयाची मांडणी पूर्वार्धात सत्तावीस प्रकरणें व उत्तरार्धातील तीन व्यापक प्रकरणे मिळून जवळ जवळ सव्वा पाचशे पानात केलेली आहे व या सीमेत आधुनिक साहित्यिकांच्या प्रयोजनाचें विद्वत्तापूर्ण विवेचन करून महाकाव्यापासून नियतकालिक साहित्यापर्यंत सर्व साहित्यप्रकाराची दखल लेखकाने घेतलेली आहे. या वर्णनात्मक प्रकरणात सढळ हाताने उतारे दिलेले आहेत, ते वाचकांची संभाव्य अपरिचितता लक्षात घेतली तर मर्यादेबाहेर आहेत असा आक्षेप घेणे योग्य ठरणार नाही. आधुनिक साहित्यातील हास्यरस हें नावीन्यपूर्ण प्रकरण मनोरंजक आहे व संस्कृत साहित्यातील राष्ट्रवाद हें त्याच्यापुढचें प्रकरण वर्तमान परिस्थितींत विशेष आस्थेने वाचण्यालायक आहे. काही थोर लेखक, अर्वाचीन शास्त्रीय लेखक व उपसंहार, अशा तीन प्रकरणानी व्याप्त उत्तरार्ध तर ग्रंथाचें सारच आहे.

प्राचीन व अर्वाचीन संस्कृत साहित्यामधील सेतुभूत जगन्नाथ पंडित यास अग्र पूजेचा मान देऊन, अप्पय्य दीक्षित, तंजावरचे विद्याप्रेमी नृपति व त्याचे आश्रित कवि, गोविन्द दीक्षित, श्रीनिवास दीक्षित, घनश्याम कवि, नारायण भट्टपाद, समीक्षाचक्रवर्ती

पंडित मधुसूदनजी ओझा, काव्यकंठ वासिष्ठ गणपतिमुनि, ब्रह्मर्षि क्षमाशास्त्री, पंडिता क्षमादेवी राव, महामहोपाध्याय कृष्णशास्त्री घुले, श्री. वासुदेवानंद सरस्वती, श्रीशैलम्मदांड रामराय, प्रज्ञाचक्षु श्रीगुलाबराव महाराज, पंडित हृषीकेश भट्टाचार्य, विद्यावाचस्पति श्री. आप्पाशास्त्री राशिवडेकर, महामहोपाध्याय श्री. नारायणशास्त्री खिस्ते, पंडित तेजोभानु व श्री. व्ही. रामानुजाचार्य या प्रतिभाशाली लेखकांच्या निर्माणकार्याचा परामर्श श्री. वर्णेकर यांनी मार्मिकतेने घेतलेला आहे. श्री. वर्णेकर हे स्वतः संस्कृतामध्ये प्रसाद, कल्पनावैचित्र्य व पदलालित्य अशा गुणांनी मंडित काव्यनिर्मिति करतात, हे काही प्रकरणांत दिलेल्या उताऱ्यावरून वाचकांस कळून येईल.

एकूण अर्वाचीन संस्कृत साहित्य हा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ लिहून व प्रकाशित करून श्री. वर्णेकर यांनी मराठी जाणणाऱ्या संस्कृत भाषेच्या उपासकांना ऋणी करून ठेविले आहे.

नवी दिल्ली
२५-१२-१९६२

चिं. द्वा. देशमुख

# निवेदन

संस्कृत भाषेच्या अत्यंत प्रतिकूल काळात, इतर भाषेत लेखन केलें असतां सहज मिळू शकणाऱ्या धन, मान, कीर्ति इत्यादि वैयक्तिक लाभाचा विचार न करतां, ज्या महाभागांनी अत्यंत श्रद्धेने संस्कृत भाषेत लेखन करून, शारदादेवीच्या मंदिरांत वाल्मीकि–व्यासादिकांनी प्रज्वलित केलेला, संस्कृत साहित्याचा नंदादीप अखंड तेवत ठेवला, त्यांचा महिमा वर्णन करण्यास अत्यंत सुसमृद्ध अशा संस्कृत भाषेतसुद्धा शब्द सुचत नाहीत. त्यांच्या वाङ्मयीन कर्मयोगामुळेच या ग्रंथाला विषय मिळाला. नाही तर "ग्रामो नास्ति कुत सीमा ?" अशी अवस्था झाली असती. ग्रन्थारंभीच 'मङ्गलाचरण' म्हणून त्या सर्वांना आम्ही अत्यंत श्रद्धापूर्वक प्रणामाञ्जली समर्पण करतों !

'अर्वाचीन संस्कृत साहित्य' हें नांव प्रस्तुत ग्रन्थाला दिलें आहे. त्यांतील 'अर्वाचीन' शब्दाची व्याप्ति १७ व्या शतकापासून १९६०–६१ पर्यंत सहेतुकपणे गृहीत धरलेली आहे. (तो हेतु ग्रन्थारम्भीं सांगितला आहे.) पण या अर्वाचीन कालखण्डाचे इ. स. १८५७ पूर्वीचा व त्यानंतरचा असे दोन कालखण्ड (संस्कृत वाङ्मयांत झालेली क्रांति लक्षात घेतां) उघड उघड पडतात. गेल्या चार शतकांच्या काळाचा सामान्यतः संकल्पाने निर्देश करण्यासाठी व इ. स. १८५७ पूर्वीच्या प्रथम कालखंडाचा विशेषतः निर्देश करण्यासाठी 'अर्वाचीन' हा शब्द आम्ही वापरला, असून इ. स. १८५७ नंतरच्या कालाचा निर्देश 'आधुनिक' या शब्दाने केला आहे. प्रस्तुत ग्रन्थापुरती या शब्दांच्या अर्थांची व्याप्ति वाचकांनी लक्षांत ठेवावी.

संस्कृत साहित्याची परम्परा फारच प्राचीन आहे. पाश्चात्य साहित्याचा परिचय होण्यापूर्वी तीच प्राचीन परम्परा इतर प्रादेशिक साहित्याच्या बरोबरीने अव्याहत चालू होती. त्या परम्परेचें सुगम आकलन होण्यासाठी प्राचीन संस्कृत साहित्याच्या इतिहासाचे अवांतर साहित्यग्रन्थ वाचण्याची आवश्यकता पडू नये म्हणून आम्ही बहुतेक नवीन प्रकरणांच्या आरंभीं त्या वाङ्मयप्रकाराची पूर्वपरम्परा अत्यंत संक्षेपाने सांगितली आहे. ज्यांनी संस्कृत साहित्य इतिहास विषयक अवांतर कोणताहि एखादा ग्रन्थ वाचला नसेल त्यांना सुद्धा आम्ही दिलेल्या परम्परेवरून विषयाचे सूत्र कोठून सुरू होतें याची कल्पना येईल अशी अपेक्षा आहे. त्याचबरोबर ग्रन्थामुळे

किंवा अनास्थेमुळे भारताच्या साहित्यक्षेत्रातील एक मोठा विषय कसा उपेक्षिला गेला याचीहि कल्पना येईल. ज्याना दिला एवढा प्राचीन साहित्याचा संक्षिप्त परिचय अल्प वाटून प्रकरणातील विषयप्रतिपादन आकस्मिक वाटेल, त्यानी हा ग्रंथ वाचण्या पूर्वी एखाद्या प्राचीन संस्कृत साहित्याचा इतिहास वाचल्यास तसं वाटणार नाही.

प्राचीन संस्कृत साहित्याच्या इतिहासात किंवा संस्कृत साहित्याच समीक्षण करणाऱ्या अवांतर ग्रंथात, लेखकाचा कालनिर्णय हा एक महत्त्वाचा भाग मानण्यात येतो. त्याचे कारण प्राचीन साहित्यिकाच्या कालाची अनिश्चिति व त्या संबंधीचे विद्वानाचे मतभेद हे होय. प्रस्तुत ग्रन्थात ज्यांच्या नावाचे उल्लेख आले आहेत त्यापैकी कुणाच्याहि स्थलकालाविषयीं विवाद नाही. अनेकांचे पुत्र, पौत्र, दौहित्र इत्यादि वंशज आज ठिकठिकाणीं हयात आहेत त्यांच्या नामवंत विद्वान् पूर्वजा विषयीं त्या त्या गावातील लोकाना पूर्ण माहिती आहे. अशा पाचपन्नास लोकाशी आम्ही पत्रव्यवहार केला आहे व संस्कृतविश्वपरिषदेच्या कार्यानिमित्त भारतात सर्वत्र प्रवास करताना, अनेकांच्या प्रत्यक्ष भेटी होण्याचा सुयोगहि आम्हाला लाभला. जुन्या साहित्यिकाचा निर्देश वर्षानुसार न देता शतकानुसार दिला आहे. जे एका शतकाच्या उत्तरार्धात जन्मले व त्यापुढील शतकाच्या पूर्वार्धात निधन पावले अशा काही साहित्यिकाचा कालनिर्देश दोन्ही शतकाच आकडे करून देऊन केला आहे. १६ व्या शतकात न वावरणारे आलेल्या पण १७ व्या शतकाच्या पूर्वार्धात हयात असलेल्या काहींचा उल्लेख १७ व्या शतकातील साहित्यिक म्हणून त्यांच्या लेखन कार्याचे वैशिष्ट्य जाणून बुद्धिपूर्वक केला आहे

प्रस्तुत प्रबन्धातील प्रकरणाची विभागणी व विषयाची माडणी प्राधान्याने वाङ्मयप्रकार व तदन्तर्गत ग्रन्थ या स्वरूपाची आहे. लेखकापेक्षा त्यांच्या ग्रन्थाना प्राधान्य देण्यात आले आहे, त्यामुळे ज्या लेखकानी निरनिराळ्या विषयावर, निरनिराळ्या वाङ्मयप्रकारानुसार ग्रन्थलेखन केलें आहे, त्याचा उल्लेख त्या त्या निमित्ताने वेगवेगळ्या प्रकरणात आढळेल अशा प्रकारें ज्याचे उल्लेख अनेकदा आले आहेत त्याचा निर्देश पुनरुक्त करताना त्याच्या पूर्वी उल्लेखिलेल्या ग्रन्थाची वाचकास आठवण देण्यासाठी, अमुक ग्रन्थकार किंवा अमुक ग्रन्थाचे लेखक, असे विशेषण लेखकाच्या नावामागे अनेक ठिकाणीं जोडले आहे. काही लेखकाचा उल्लेख त्यानी लिहिलेल्या प्रमुख ग्रंथाच्याच संदर्भात आला असून त्याच ओघात त्यांच्या अवांतर स्फुट पुस्तकांचीं नावें शक्यतोवर दिलेलीं आहेत

प्रस्तुत प्रबंधात सहस्रावधि लेखकाचा आणि त्यांच्या विविध ग्रन्थाचा यथोचित विषयानुरोधाने उल्लेख आला आहे अनेकाचा संदर्भानुरोधाने पुष्कळ ठिकाणीं उल्लेख आला आहे उल्लिखित लेखकान्यतिरिक्त अनुल्लिखिताची संख्या बरीच असणें शक्य आहे. त्यांच्या अनुल्लेखाच मुख्य कारण अधिकृत माहितीचा

अभाव ! सर्व संस्कृतोपासकांविषयीं आमच्या मनात नितान्त आदर आहे. केवळ अनादरामुळे, माहिती असूनहि आम्ही कोणाचा उल्लेख टाळलेला नाही. अनवधानामुळे अनेकदा अतिपरिचिताचा विसर पडतो हा सर्वांचाच अनुभव आहे. अनवधान हें अनुल्लेखाचें दुसरें कारण गृहीत धरून, ज्या विद्यमान संस्कृतज्ञाचा उल्लेख उचित संदर्भात गळला असेल त्यांनी व अविद्यमान लेखकांच्या आप्तज्ञांनी आम्हास क्षमा करावी ही नम्र विनती आहे.

लेखकांचा निर्देश करताना सर्वत्र एकवचनी शब्दप्रयोग केले आहेत. कालिदास, भवभूति, भास, हर्ष, बाण यासारख्या प्राचीन महाकवींचा निर्देश सर्वत्र एकवचनी शब्दातच होतो याचा अर्थ त्यांच्याविषयीं लेखकाच्या मनात अनादर आहे असें समजण्याचें कारण नाही. अनेकांचा निर्देश आदरार्थी बहुवचनातहि केलेला आहे.

सर्वत्र अनेक ग्रंथांचा ( लेखकाच्या नावासह ) उल्लेख आलेला आहे. त्यांचे संदर्भ, मुद्रणस्थान, प्राप्तिस्थान, मूल्य इत्यादींचा यावच्छक्य निर्देश त्या त्या पानात तळटीपेंत दिलेला आहे. ज्यांचा निर्देश तळटीपात कांही पानावर आढळणार नाही त्यांचा इतर पानावर आला असल्याने वगळलेला आहे या उपर कांहींचा निर्देश अजिबात सुटलाच असेल तर पुढील आवृत्तींत ती उणीव भरून काढण्याचा प्रयत्न होईल. संदर्भांसाठी मुख्यत: श्री एम्. कृष्णम्माचारियर यांच्या ग्रंथातील परिच्छेदांचे ( पृष्ठाचे नव्हेत ) क्रमांक ‘ कृ० ’ या अक्षरासहित प्रयत्नपूर्वक दिलेले आहेत. श्री. कृष्णम्माचारियर यांनी या दिशेने प्रथम केलेल्या असामान्य कर्तृत्वाचा गौरव व त्यांचा ऋणनिर्देश यापेक्षा अधिक चांगल्या प्रकारें करणें सुचलें नाही

प्रस्तुत विषयाच्या अभ्यासासाठी ज्या ग्रन्थसूचींचा ( catalogues ) व संस्कृत नियतकालिकांचा उपयोग करण्याची आवश्यकता आहे त्यांची सविस्तर माहिती प्रस्तुत ग्रन्थात प्र. २४ व प्र. २५ मध्ये पाहावी. त्यांची परिशिष्टात्मक वेगळी सूची दिली नाही.

इ. स. १९५५–५६ मध्ये संस्कृत विश्वपरिषदेचा अखिल भारतीय संघटन मंत्री म्हणून भारताच्या निरनिराळ्या प्रातांत प्रवास करण्याचा, त्या निमित्त ठिकठिकाणच्या अनेक संस्कृत लेखकांना व संस्थांना प्रत्यक्ष भेटण्याचा व कांही ठिकाणीं अनेक नवीन ग्रन्थ पाहण्याचा योग आला. त्यामुळे प्रस्तुत ग्रंथासाठीं आवश्यक असलेली भरपूर माहिती आम्हास अनायासें गोळा करता आली. हा केवळ योगायोग असला तरी तो, संस्कृत विश्वपरिषदेचे कार्याध्यक्ष व त्यावेळचे उत्तरप्रदेशाचे राज्यपाल श्री. कन्हैयालाल मुन्शी यांनी तें दायित्व आमच्यावर सोपविण्यात जी विशेष आत्मीयता प्रकट केली, त्यामुळेच आला. श्री. मुन्शीजींचे त्यानिमित्त आभार मानणें

आम्ही आमचे कर्तव्य समजतो. त्या प्रवासात अनेक संस्कृत साहित्यिकांच्या भेटी झाल्या. त्यापैकी कित्येकांनी आपले प्रकाशित ग्रंथ, जुनी संस्कृत वृत्तपत्रांची कात्रणें किंवा वृत्तपत्राचे दुर्लभ अंक आम्हास आमच्या कामासाठी आत्मीयतेने दिले. त्या सर्वांचा नामोल्लेखपूर्वक ऋणनिर्देश करणे अशक्य असलें, तरी वेदमूर्ति प. श्री. दा. सातवळेकर, विद्यामार्तण्ड आचार्य द्विजेन्द्रनाथशास्त्री ( मेरठ ), प. कालीप्रसाद त्रिपाठी (अयोध्या), गुरुवर्य सरस्वतीप्रसाद चतुर्वेदी ( सध्या वास्तव्य प्रयाग ), डॉ. वे. राघवन् ( मद्रास ), प. गिरिराजजी शर्मा ( जयपूर ), स्वामी भगवदाचार्य ( अहमदाबाद ), गुरुदेवांच्या भारतीय विद्याभवनाचें व नागपूर येथील रा. स्व. संघाचें ग्रन्थालय, कविता सुब्रह्मण्य शास्त्री ( विजयवाडा ), गोस्वामी दीक्षित महाराज ( मुंबई ), डॉ. वासुदेव मूर्ति, इत्यादींचे नामनिर्देशपूर्वक आभार मानणे आवश्यक आहे.

प्रस्तुत ग्रन्थ आम्ही मुळात संस्कृतात लिहिला. पण त्याला प्रकाशक लाभण्याचं लक्षण दिसेना म्हणून दोन तीन महिन्यांच्या अवधींत मुळातील संस्कृत ग्रंथात थोडे परिवर्तन करून व काही भर टाकून आम्ही त्याचें मराठींत पुनर्लेखन केलें. प्रस्तुत मराठी ग्रन्थ तीन चार वर्षांपूर्वीच लिहून झाला होता. ' मॉडर्न बुक स्टोअर्स ( आकोला, नागपूर ) या संस्थेचे संचालक व ' विदर्भ पेपर मिल्स ' या उद्योन्मुख कारखान्याचे मॅनेजिंग डायरेक्टर व आमचे परममित्र श्री. रतनलालजी अगरवाल यांनी अत्यंत आत्मीयतेने व निरपेक्षबुद्धीने हा मराठी ग्रन्थ प्रकाशनास स्वीकारल्यामुळे आता तो प्रकाशात येत आहे. मूळ संस्कृत ग्रंथ लवकरच प्रकाशात यावा अशी तीव्र इच्छा तर आहे. ती पूर्ण करणे दयावत परमेश्वराच्या हातीं आहे. श्री. अगरवालांचे व आमचे मित्रसंबंध सर्वस्वी अकृत्रिम आहेत, त्यामुळे त्यांना धन्यवाद देणे किंवा त्यांचे आभार मानणे वास्तविक कृत्रिमपणाचे असलें तरी कर्तव्य म्हणून आम्ही त्यांचे अन्तःकरणपूर्वक आभार मानतों व त्यांना शतशः धन्यवाद देतों. त्यांनी कृपया त्याचा स्वीकार करावा ही विनती.

तीन वर्षांपूर्वी ग्रन्थलेखन संपल्यानंतर मुद्रणसंस्कार सुरू होईपर्यंतच्या काळात ' शिवराज्योदयम् ' हें संस्कृत महाकाव्य व अवान्तर खण्डकाव्यादि स्फुट लेखन करण्यात व्यग्र झाल्यामुळे या विषयाकडे आमचं विशेष लक्ष नव्हतें. त्यामुळे तेवढ्या अवधींत ग्रन्थात अधिक माहितीची भर पडली नाही. तथापि मुद्रण करण्याचें ठरल्यानंतर पुनश्च या विषयाकडे चित्त केन्द्रित करून थोडी अधिक भर टाकली मुद्रणास विलंब झाला हें एका अर्थी बरेंच झाले.

उत्कृष्ट ग्रन्थमुद्रणासाठी महाराष्ट्र मुद्रण परिषदेने ज्याचा प्रथम पारितोषिक देऊन लागोपाठ दोन वर्षे गौरव केला असे आमच्या नागपूरचें नारायण मुद्रणालय व त्याचे व्यवस्थापक श्री. पा. ना. कनहट्टी यांनी जी सर्वतोपरी तत्परता दाखविली त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करणें हें आमचं कर्तव्य आहे.

या ग्रन्थासाठी भारतमातेचे महान् सत्पुत्र डॉ. चिं. द्वा. देशमुख यानी प्रस्तावना लिहिली हे आमचे भाग्य आहे ! प्रत्यक्ष आमच्या लेखनाला विशेष महत्त्व नसल तरी ते या प्रस्तावनेमुळे प्राप्त झाले असे आम्ही समजतो.

एक परब्रह्म सोडले तर जगात निर्दोष असे काहीच नाही. लेखक व मुद्रक यानी आपापल्या परीने ग्रन्थ निर्दोष करण्याचा सर्वतोपरी प्रयत्न केला आहे. पण तो किती झाले तरी मानवी प्रयत्न ! त्यामुळे निरनिराळ्या विचक्षण वाचकाना त्यांच्या वैयक्तिक धारणेनुसार व योग्यतेनुसार निरनिराळ्या प्रकारचे दोष संपूर्ण ग्रन्थ पाहिल्यावर आढळणे स्वाभाविक आहे. त्याचबरोबर हेहि शक्य आहे की एकाच्या मते जो गुण असेल तो दुसऱ्याच्या मते दोष ठरेल. (प्रस्तुत प्रबंधातील संस्कृत अवतरणाच्या संबधात हा अनुभव आम्हाला आला. आमचे हस्तलिखित पाहणाना एका हितचिंतकाने अभिप्राय दिला की, "संस्कृत अवतरणे यापेक्षा अधिक टाकली असती तर बरे झाले असते" दुसऱ्याच दिवशी, "संस्कृत अवतरणे थोडी गाळता आली तर बरा" असे दुसऱ्या हितचिंतकाचे मत ऐकायास मिळाले). मनुष्याच्या शक्तीची मर्यादा व स्वच्छंदशीलता लक्षात घेऊन असेल त्या सदोषतेबद्दल उदार वाचकानी क्षमा करावी ही नम्र विनंती आहे

न यस्य करुणां विना स्फुरति दिव्यधाम्ना निधि
र्न यति स गिरा पतिर्न च महागतिर्गच्छति ।
प्रबन्ध-परिपूरणे विकलशेमुषीकस्य मे
स एव करुणाघन सकलकारण कारणम् ॥

—श्रीधर भास्कर वर्णेकर

या ग्रन्थांत शुद्धलेखनासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने सम्मत केलेल्या शुद्धलेखनांच्या नियमांचें प्रामुख्याने पालन केले आहे. मराठी शुद्धलेखनाच्या संबंधांत साम्प्रत निर्माण झालेल्या अराजकतेकडे लक्ष देतां ही सूचना देणें आवश्यक वाटतें.

—मुद्रक

# अनुक्रमणिका


प्रस्तावना । डॉ. चिंतामण द्वारकानाथ देशमुख (५)

निवेदन (९)

शुद्धिपत्रक (२१)

प्रकरण १ : प्रास्ताविक—प्रस्तुत विषयाची उपेक्षा पृष्ठें १-६

प्रकरण २ : आधुनिक साहित्यिकांचीं प्रयोजनें पृष्ठें ६-१७

प्राचीन साहित्यशास्त्रज्ञांनी 'काव्यं यशसेऽर्थकृते' इत्यादि शब्दांत सांगितलेल्या प्रयोजनांपेक्षा निराळ्याच प्रयोजनांनी प्रेरित होऊन आधुनिक काळात संस्कृत साहित्यिकांनी वाङ्मय-सेवा केली. तीं प्रयोजनें अशीं—संस्कृतश्रद्धा, लोकजागृति, अन्यभाषीय साहित्याचा परिचय, समाजहित, छात्रहित, स्वाध्याय, धनाशा, परप्रेरणा, संस्कृतचें अखिल-भारतीयत्व, नवीन पद्धतींचें प्रवर्तन, प्राचीन लेखकांचें अनुसरण. हीं प्रयोजनें बहुधा त्या साहित्यिकांच्या शब्दांतच दिलेलीं आहेत.

प्रकरण ३ महाकाव्यात्मक चरित्रग्रंथ पृष्ठें १८-३८

प्राचीन काळापासून चरित्रग्रन्थ काव्यात्मक पद्धतीनें संस्कृतात लिहिण्यात येत आहेत. ती परम्परा अर्वाचीन संस्कृत साहित्यिकांनी तशीच चालू ठेवली. दैवतचरित्रात्मक महाकाव्यें श्रीरामचन्द्र व श्रीकृष्ण या दैवततुल्य विभूतींचीं गेल्या ४ शतकांतील चरित्रें. शैव व वैष्णव पुराणांतील कथांवर आधारलेलीं महाकाव्यें, महाभारतीय कथा यें.

प्रकरण ४ : साधुजनांचीं चरित्रें पृष्ठें ३९-४७

श्रीशंकराचार्य, वल्लभाचार्य इत्यादि अनेक प्राचीन व गुरु नानक, दयानन्द सरस्वती इत्यादि अर्वाचीन साधुपुरुषांच्या चरित्रांवर आधारलेल्या विविध संस्कृत काव्यांचा संक्षिप्त परिचय.

प्रकरण ५ : राजपुरुषांचीं चरित्रें पृष्ठें ४८-५५

भारतांतील श्रीशिवाजी प्रभृति निरनिराळ्या राजपुरुषांच्या चरित्रांवर आधारलेल्या विविध काव्यांचा संक्षिप्त परिचय.

**प्रकरण ६ : परकीय राजस्तुति** पृष्ठे ५६-६७

राजपुरुषांच्या चरित्रावर काव्ये लिहिण्याच्या परंपरेची ही एक विकृति होय. भारतावर राज्य करणाऱ्या म्लेच्छ ( मुसलमान व इंग्रजी ) राजांची स्तुति करण्यासाठी लिहिलेल्या सरासरी ५० ग्रंथांचा अनेक वेचक अवतरणांसह संक्षिप्त परिचय.

**प्रकरण ७ : श्लिष्ट काव्ये** पृष्ठे ६८-७२

नवव्या शतकातील कविराज या महाकवीने राघवपाण्डवीयम् या काव्याने द्व्यर्थी महाकाव्याची परंपरा सुरू झाली. या श्लेषक्लिष्ट काव्यांची परंपरा अर्वाचीन कालात अखंड राखण्यात आली, एवढेच नव्हे तर एका श्लोकातून १२८ अर्थ निघतील अशी काव्ये अर्वाचीन कालात लिहिली गेली. अशा प्रकारच्या सरासरी १५ काव्यांचा उदाहरणांसहित संक्षिप्त परिचय.

**प्रकरण ८ : शास्त्रनिष्ठ काव्ये** पृष्ठे ७३-७६

पाचव्या शतकात भट्टी कवीने शास्त्रनिष्ठ काव्यांची परंपरा संस्कृत साहित्यात सुरू केली. या परंपरेतील व्याकरण, अलंकार इत्यादि शास्त्रांच्या उदाहरणार्थ लिहिलेल्या सरासरी दहा अर्वाचीन काव्यांचा संक्षिप्त परिचय.

**प्रकरण ९ : चम्पू वाङ्मय** पृष्ठे ७७-९१

दहाव्या शतकातील त्रिविक्रमभट्ट कवीने नलचम्पू लिहून गद्यपद्यमिश्र चम्पू काव्यांची परंपरा सुरू केली. या परंपरेतील वेङ्कटाध्वरिकृत विश्वगुणादर्श चम्पूच्या पद्धतीच्या, तसेच रामायण, महाभारत, भागवतादि पुराणातील विविध कथांवर व ऐतिहासिक चरित्रावर आधारलेल्या अनेक अर्वाचीन चम्पू ग्रंथांचा संक्षिप्त परिचय.

**प्रकरण १० संस्कृत साहित्यांतील इतिहास** पृष्ठ ९२-९८

अर्वाचीन साहित्यात असे अनेक काव्यात्मक ग्रंथ निर्माण झाले आहेत की, त्यांचे इतिहास संशोधनासाठी विशेष महत्त्व आहे. सतराव्या शतकातील कवीन्द्र परमानन्द यांचा शिवभारतम् हा ग्रंथ याचे ठळक उदाहरण आहे. अशा प्रकारच्या सरासरी ३० ग्रंथांचा संक्षिप्त परिचय.

**प्रकरण ११ शिवाजी महाराजांची संस्कृतनिष्ठता** पृष्ठे ९९-१०२

संस्कृत भाषेच्या प्रतिकूल काळात अनेक राजांनी प्रोत्साहन देऊन संस्कृत साहित्याची परम्परा अक्षुण्ण राखण्याचा प्रयत्न केला. अशा विद्याप्रेमी

नृपतींमध्ये पुण्य–श्लोक शिवाजी महाराजाचें स्थान फार श्रेष्ठ आहे. शिवाजी महाराजाच्या प्रत्यक्षाप्रत्यक्ष प्रेरणेने निर्माण झालेल्या काही महत्त्वपूर्ण ग्रथाचा सविस्तर परिचय.

**प्रकरण १२ : अवांतर कार्व्ये** पृष्ठे १०३–११५

शृगार, निसर्गवर्णन, टीकाग्रन्थ इत्यादि विविध विषयावर लिहिलेल्या शभरपेक्षा अधिक ग्रन्थाचा सक्षिप्त परिचय.

**प्रकरण १३ : शतककाव्यें**

भर्तृहरीच्या शतकत्रयाचें अनुसरण करणाऱ्या विविध विषयावरील सरासरी नव्वद शतकाचा परिचय.

**प्रकरण १४ : स्तोत्रसाहित्य** पृष्ठे १२५–१३६

अनेक देवदेवता व महनीय पुरुषासबधीच्या ल्हान मोठ्या शभरापेक्षा अधिक स्तोत्राचा परिचय.

**प्रकरण १५ : दूतकाव्यें** पृष्ठे १३७–१४४

मेघदूताचा आदर्श पुढे ठेवून लिहिण्यात आलेल्या विविध विषयावरील सरासरी ७० दूतकाव्याचा परिचय.

**प्रकरण १६ : सुभाषितसंग्रह** पृष्ठे १४५–१६७

साधारणत १० व्या शतकापासून सुभाषितसग्रहात्मक ग्रथाना आरभ झाला. अर्वाचीन काळात या सग्रहात चारसी भर पडत गेली. या प्रकारच्या सरासरी ४० ग्रथाचा सक्षिप्त परिचय व काही कवींच्या सरासरी २०० सुभाषित श्लोकाचा सग्रह.

**प्रकरण १७ : धार्मिक आश्रमांची संस्कृतसेवा** पृष्ठे १६८–१७५

रामानुज, वल्लभ, माध्व, अहोबिल, वीर शैव, चैतन्य, गोस्वामी, परकाल, जैन, इत्यादि प्राचीन व आर्य समाज, अरविन्दाश्रम इत्यादि अर्वाचीन धर्मसम्प्रदायाच्या आश्रमाच्या प्रेरणेने निर्माण झालेल्या धर्मनिष्ठ वाङ्मयाचा परिचय.

**प्रकरण १८ : नाट्यवाङ्मय** पृष्ठे १७६–१८९

पौराणिक, ऐतिहासिक व सामाजिक विषयावरील विविध प्रकारच्या सरासरी १४० नाटकांचा परिचय.

प्रकरण १९ : लाक्षणिक नाटकें पृष्ठें १९०–१९४

१२ व्या शतकात कृष्णमिश्र नावाच्या यतीने "प्रबोधचन्द्रोदयम्" नाटक लिहून हा प्रकार सुरू केला. या स्वरूपाच्या सरासरी ३० नाटकाचा परिचय.

प्रकरण २० : गेय काव्यें पृष्ठें १९५–२०५

१२ व्या शतकात जयदेवाच्या गीतगोविंद काव्यापासून हा काव्यप्रकार लोकप्रिय झाला. या प्रकारच्या सरासरी ३५ ग्रन्थाचा परिचय. उदाहरणार्थ रामजोशी, भट्टमथुरानाथ, मूलशंकर याज्ञिक, वेंकटरमणाचार्य, वारवूर कृष्ण मेनन इत्यादि कवींची विविध प्रकारचीं गेयकाव्यें उद्धृत केलीं आहेत.

प्रकरण २१ : गद्यसाहित्य पृष्ठें २०६–२३०

गद्यसाहित्याची परम्परा वेदकाळादतकी प्राचीन आहे. सुबन्धु, बाणभट्ट यानी अलंकारप्रचुर "ओज समासभूयिष्ठ" गद्यशैलीला चालना दिली. गद्याचें मुक्तक, वृत्तगंधि, चूर्णक, दण्डक इत्यादि अनेक प्रकार उत्पन्न झाले. अर्वाचीन काळात पाश्चात्य पद्धतीच्या कथा, कादम्बऱ्या व निबंध लिहिण्यात येऊ लागले. विविध प्रकारच्या सरासरी ७० ग्रन्थाचा परिचय व उत्तम गद्यशैलीची काहीं उदाहरणें.

प्रकरण २२ : भाषान्तरित संस्कृत साहित्य पृष्ठें २३१–२६०

१८ व्या शतकापर्यंत संस्कृत ग्रन्थाची इतर भाषात भाषान्तरें झालीं. १९ व्या शतकाच्या उत्तरार्धापासून संस्कृतात इतर भाषातील उत्तमोत्तम ग्रन्थाचीं भाषान्तरें होऊ लागलीं. संस्कृत भाषान्तरात्मक सरासरी, शभर ग्रन्थाचा परिचय.

प्रकरण २३ : अन्यभाषीय शास्त्रांचें संस्कृतीकरण पृष्ठें २६१–२७०

भाषान्तरात्मक संस्कृत साहित्य लिहिणाऱ्यांनी अनेक विचित्र प्रकारचे नवीन शब्द आपल्या लिखाणात वापरले. त्यांचीं उदाहरणें, त्यामुळे निर्माण झालेली समस्या व विचारार्ह सूचना.

प्रकरण २४ : ग्रन्थसूची व शब्दकोश पृष्ठें २७१–२८३

संस्कृत साहित्यक्षेत्रात या दिशेने विशेष महत्त्वाचें कार्य पाश्चात्य पण्डितांच्या सक्रिय प्रेरणेने १९ व्या शतकात सुरू झाले. आजपर्यंत झालेल्या अनेक सर्व ग्रन्थसूचींचा व सरासरी ५० कोशाचा परिचय.

प्रकरण २५ : नियतकालिक साहित्य पृष्ठ २८३-३१४

संस्कृतातील प्राय सर्व नियतकालिकांचा परिचय. त्यातील विषयांचे वैशिष्ट्य व आधुनिकत्व. संस्कृतभवितव्यम्, मधुरवाणी, संस्कृतरत्नाकर, भारती, सारस्वती सुषमा, मञ्जूषा इ. नियतकालिकांतील अनेकविध लेख व लेखकांची सूची. संस्कृत नियतकालिकांची भाषाशैली.

प्रकरण २६ : संस्कृत साहित्यांतील हास्यरस पृष्ठ ३१५-३३४

हास्यरसाची उपेक्षा प्राचीन साहित्यिकांनी ( लोक समजतात तशी ) केली नव्हती. आधुनिक काळात हास्यरसात्मक साहित्याची विशेष आवड. उदाहरणासह अनेक विनोदी ग्रंथांचा परिचय.

प्रकरण २७ . संस्कृत साहित्यांतील राष्ट्रवाद पृष्ठ ३३५-३७६

१९ व्या शतकात राष्ट्रवादी साहित्यास भारतातील सर्व प्रादेशिक साहित्यात विशेष चालना मिळाली. संस्कृत साहित्यिक त्या विषयी उदासीन नव्हते. त्यांनी निर्माण केलेल्या व इतस्तत विखुरलेल्या उत्तम राष्ट्रीय काव्यांचा परिचय. आन्ध्र, माळवा, पंजाब, महाराष्ट्र इत्यादि प्रदेशांची राष्ट्रवादी वर्णन. शवटी स्वत लेखकाने लिहिलेल्या "मातृभूलहरी" या शतककाव्यातील भारतभूस्तवन व पूर्वार्ध समाप्ति.

## उत्तरार्ध

प्रकरण २८ कांही थोर लेखक पृष्ठ ३७७-४३०

पूर्वार्धामध्ये बहुतेक लेखकांचा केवळ नामोल्लेख व त्याबरोबर त्यांच्या ग्रंथांचा उल्लेख आहे. या लेखकांपैकी अनेकांची व्यक्तिगत योग्यता फार मोठी असून त्यांची चरित्रे अत्यंत स्फूर्तिप्रद आहेत. अशा सहस्रावधि थोर लेखकांपैकी काही लेखकांचा जीवनवृत्तांत व संस्कृत साहित्यातील कर्तृत्व यांचा निर्देश.

प्रकरण २९ अर्वाचीन शास्त्रीय लेखक पृष्ठ ४३१-४५८

व्याकरण, साहित्य, ज्योतिष, संगीत, आयुर्वेद, न्याय, वेदान्त, धर्मशास्त्र या शास्त्रांवर १७ व्या शतकापासून अद्ययावत् लिहिण्यात आलेले अनेक महत्त्वपूर्ण ग्रंथ व त्यांचे लेखक याविषयीं सविस्तर निवेदन

प्रकरण ३० : कांही महत्त्वाचे ग्रन्थ पृष्ठें ४५९–४७२

पूर्वार्धात उल्लेखिलेले शेकडो ग्रंथ असे आहेत की ज्यावर समीक्षणात्मक स्वतंत्र प्रबंध लिहितां येतील. या प्रकरणांत त्या दृष्टीने मार्गदर्शन म्हणून शिवभारतम्, धर्मादर्शः व संस्कृतसाहित्यविमर्शः या केवळ तीन श्रेष्ठ ग्रंथाचें परिचयात्मक परीक्षण केलें आहे.

प्रकरण ३१ : उपसंहार पृष्ठें ४७३–५३०

* * *

सन्दर्भग्रन्थांची सूची पृष्ठें ५३१–५३४

नामसूची पृष्ठें ५३५–५६०

# शुद्धिपत्र

| पृ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
| --- | --- | --- | --- |
| ८ | १५ | की | कि |
| १० | ११ | पूवतनाना | पूर्व ... |
| ११ | २२ | झार्ले | झालें |
| १३ | १२ | सन्मानै | सम्मानै |
| १४ | १४ | वांस्वन | वास्वन |
| ८० | ६ | भूमीसुरान् | भूमीश्वरान् |
| ९१ | २८ | लाक्षा णाः | लाक्षारुणाः |
| ९५ | ३ | सुभाषिनीचे | सुभाषितांचें |
| ९६ | २० | चोक्कनाथने | चोक्कनाथ याने |
| ९६ | २० | याने | — |
| १०० | २३ | जोतिषा | ज्योतिषा |
| १०० | २७ | प्रंचाग | पंचाग |
| १०९ | १७ | मातृभूमे | मातृभूमे |
| ११४ | १४ | प्रशंशनीय | प्रशंसनीय |
| १२७ | ५ | बमुव | बभूव |
| १२८ | १० | ह्यत | हुयुत |
| १२८ | १४ | तथ | तथा |
| १२८ | २१ | कर्तरित व्य | कर्तरि तव्य |
| १२८ | २३ | चव | चक्र |
| १४८ | २४ | रुद्रमर्मी | रुद्रमर्म्नि |
| १२८ | ३१ | हिनस्तीवि | हिनस्तीति |
| १२९ | ३ | इत्यादि ः | इत्यादि |
| १५० | ३ | यीग | योग |
| १५३ | १० | सन्त र्ण | सन्तर्पण |
| १५४ | २४ | ' महामाष्यं ' ग्रन्थ | ' महामाष्य ' ग्रन्थ |
| १५८ | ३२ | माल्निता | मल्निता |
| १५९ | २० | निग्रह न्थो | निवहग्रन्थो |

| पृ. | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १७१ | ११ | सम्प्रदाय | सम्प्रदाय |
| १७६ | ९, २२ | नाटय | नाट्य |
| २५४ | २६ | Shakesplare | Shakespeare |
| २५५ | २१ | अपसिद्ध | अप्रसिद्ध |
| २५८ | १२ | Vrses | Verses |
| २६३ | ८ | अर्कवरः अकबर | अर्कवरः = अकबर |
| २८० | १४ | Whole | Whole |
| २९१ | ८ | लेसक | लेसन |
| २९९ | १ | मानवबिन्दवः | मानबिन्दवः |
| ३१७ | १४ | पूर्वजाची | पूर्वजाची |
| ३२१ | ३ | लिङ्गरामर्ष | लिङ्गपरामर्ष |
| ३२१ | ११ | कातदूतम् | काकदूतम् |
| ३२३ | २८ | ब्रुवन्त्यय | ब्रुवन्त्येव |
| ३४५ | ८ | शत्रु | शत्रु |
| ३६७ | २८ | सिन्धुसागरः उद्र्मि | सिन्धुसागर उद्र्मि |
| ३८० | २० | अनेक | अनेक |
| ३८७ | ५ | ग्रथ | ग्रन्थ |
| ३९७ | ७ | सहाय | साहाय्य |
| ४५३ | ७ | उत्कुष्ठ | उत्कृष्ट |
| ४५७ | २० | अभिषेक | अभिषेक |
| ४७२ | ३ | पाण्ड्येय | पाण्डेय |
| ४७४ | २७ | सतकाव्याच्या | ...काव्याचा |
| ४८० | ५ | बन्दीपाध्याय | बन्द्योपाध्याय |
| ४८० | १५ | बर्मा | वर्मा |
| ४९२ | १ | भक्सिान्द्र | भक्तिसान्द्र |
| ४९३ | ३० | परप्रत्यनेय | परप्रत्ययनेय |
| ४९८ | ३० | इच्छिणाप्याना | इच्छिणान्याना |

---

मॉडर्न बुक स्टोअर्स—सांस्कृतिक प्रकाशन

# अर्वाचीन संस्कृत साहित्य

( १७ व्या शतकापासून १९६० पर्यंतच्या संस्कृत साहित्याचें पर्यालोचन )

॥ श्री ॥

# अर्वाचीन संस्कृत साहित्य

## प्रकरण १ लें

## प्रास्ताविक

वेदकाळापासून संस्कृत भाषेत साहित्याची निर्मिति अव्याहत होत आहे, पण १९ व्या शतकापर्यंत या समग्र संस्कृत साहित्याचें विमर्शात्मक आलोडन कोणीहि केलेलें नव्हतें. पाश्चात्य पंडितांना १९ व्या शतकांत संस्कृत साहित्याचा प्रथम परिचय झाला. तेव्हापासून त्यांनी आपल्या पद्धतीनुसार संस्कृत साहित्याचें विवेचनात्मक समीक्षण आरंभिलें. इ. स. १८६० मध्ये मॅक्समुल्लरने 'Ancient Indian Literature' हा ग्रंथ लिहिला. इ. १८७८ मध्ये वेबरचा 'इंडियन लिटरेचर' हा ग्रंथ प्रकाशित झाला. इ. १९०० मध्ये मॅकडोनेल्चा 'History of Sanskrit Literature' हा ग्रंथ तयार झाला. त्याच वर्षी 'Classical Sanskrit Literature' हा कीथचा सुप्रसिद्ध ग्रंथहि प्रकाशांत आला. इ. १९०३ मध्ये थडरचा 'Indian Literature and kulture' व ओल्डनबर्गचा 'Die Literature des alten Indian' नामक ग्रंथ प्रकाशांत आले. इ. १९०४ मध्ये विंटरनिट्झचा 'Der Indeschen Literature या ग्रंथाचे दोन खंड व व्ही हेन्री याचा Les 'Literature des Linds', हा फ्रेंच ग्रंथ प्रकाशित झाला. अशा प्रकारे युरोपीय भाषांमध्ये समग्र संस्कृत साहित्याचा परामर्श घेणारे मौल्यवान ग्रंथ १९ व्या शतकाच्या मध्यापासून विसाव्या शतकाच्या आरंभापर्यंत लिहिले गेले. त्याच ग्रंथांच्या आधारें श्रीकृष्णमाचारीयर, दासगुप्त, डे, व्ही. वरदाचारी इत्यादि भारतीय पंडितांनी वरील ग्रंथांच्या वाढविलेल्या किंवा सुधारलेल्या आवृत्तीप्रमाणें कांही ग्रंथ इंग्रजी भाषेमध्ये लिहिले. त्यापासून स्फूर्ति घेऊन उपाध्याय, अगरवाल, पांडे, रामबिहारीलाल इ. संस्कृत

पंडितांनी हिंदी भाषेमध्ये संस्कृत साहित्याच्या इतिहासाचे ग्रंथ लिहिले. याच काळात मराठी, बंगाली, गुजराथी, तामिळ, तेलगु इत्यादि भारतातल्या प्रादेशिक भाषांमध्ये संस्कृत साहित्य विमर्शात्मक अनेक ग्रंथ प्रकाशात आले. इ. १९५१ साली श्री. हंसराज अगरवाल यांनी संस्कृत साहित्याचा इतिहास संस्कृत भाषेत दोन भागात प्रकाशित केला. त्यानंतर इ. १९६६ साली वृन्दावन गुरुकुलाचे भूतपूर्व कुलपति प. द्विजेन्द्रनाथ शास्त्री यांचा 'संस्कृतसाहित्यविमर्श' नामक संस्कृत ग्रंथ प्रसिद्ध झाला. अशा प्रकारे गल्या १०० वर्षांत संस्कृत साहित्याचे पर्यालोचन करणारे अनेक ग्रंथ प्रकाशात आले. अनेक दुर्मिळ हस्तलिखित ग्रंथ या काळात मुद्रितहि झाले. परंतु या सर्व संस्कृत साहित्य विमर्शकारांनी १६व्या शतकानंतर (विशेषत पंडितराज जगन्नाथानंतर) झालेल्या संस्कृत साहित्याचे अस्तित्व सुद्धा जमेस धरलेले दिसत नाही. संस्कृत साहित्याचा इतिहास म्हणजे १६व्या शतकापर्यंत झालेल्या साहित्याचा इतिहास असा समज रुढ झाला. अपवाद म्हणून काही ग्रंथात १६व्या शतकानंतर झालेल्या काही कवींचा संक्षिप्त परिचय आढळतो. काही नवनिर्मित संस्कृत ग्रंथांची परीक्षणे हिन्दु (मद्रास), केसरी (पुणे), अमृत बझार पत्रिका (कलकत्ता), यासारख्या वृत्तपत्रांतून तुरळक प्रकाशित होत होती. पण वृत्तपत्राचे जीवन क्षणिक असल्याने संस्कृत ग्रंथांची ती परीक्षणे फारच थोड्या संस्कृतज्ञांच्या दृष्टीस पडली. विशेष म्हणजे एका प्रांतातील लेखकाचा दुसऱ्या प्रांतातील वृत्तपत्राशी फारच थोडा संबंध येत असल्याने, भारताच्या निरनिराळ्या प्रांतात प्रकाशित झालेल्या नवीन संस्कृत ग्रंथांचा सर्वत्र वृत्तपत्रांतून परिचय होऊ शकला नाही. महाराष्ट्रात प्रकाशित झालेल्या संस्कृत ग्रंथांचा परिचय महाराष्ट्रातील वृत्तपत्रातच पहावयास मिळतो. महाराष्ट्राबाहेरील संस्कृतज्ञांना त्या ग्रंथांचे नाव देखील कळण्याची शक्यता नसते. हीच अवस्था इतर सर्व प्रांतात प्रकाशित झालेल्या ग्रंथांसंबंधी अनुभवास येते.

भारतातील सर्वत्र ग्रंथालयामध्ये संस्कृत ग्रंथांचा विभाग बहुधा असतो. पण त्यातील संस्कृत विभागात, रामायण, महाभारत, पुराण, उपनिषदे, कालिदास, भवभूति, माघ, भारवि, हर्ष, बाण, दण्डी, जगन्नाथ इत्यादि जुन्या कवींचे प्रसिद्ध ग्रंथ, त्यांच्या विविध आवृत्तिसहित आढळतात. एकाहि ग्रंथालयाच्या संचालकांनी अर्वाचीन काळात लिहिण्यात आलेल्या संस्कृत ग्रंथांचा साक्षेपीपणाने संग्रह केलेला आढळत नाही. संपूर्ण भारतवर्षात अर्वाचीन संस्कृत साहित्याचा सुव्यवस्थित संग्रह अद्यापि कोठेहि झालेला नाही. संस्कृत विद्येच्या अध्ययनाचा क्रमशः ऱ्हास होत असल्याने संस्कृत ग्रंथांच्या वाचकांची संख्या सुद्धा क्रमशः घटत आहे. त्यातहि जे काही संस्कृतचे विशेषज्ञ आहेत ते अहंकारामुळे म्हणा किंवा परंपरा निष्ठेमुळे म्हणा, प्राचीन संस्कृत ग्रंथांचेच तत्परतेने वाचन करतात. अर्वाचीन संस्कृत

ग्रंथांचे अवलोकन करण्याइतके कुतूहलहि त्यांच्या ठिकाणी आढळत नाही. अशा प्रकारें ग्राहकांच्या व वाचकांच्या अभावी प्रकाशात येणाऱ्या संस्कृत ग्रंथांच्या प्रतीहि फारच थोड्या निघतात.* अनेक ग्रंथांच्या केवळ पहिल्या आवृत्तीच प्रकाशित झाल्या. त्यांच्या द्वितीय आवृत्तीच्या मुद्रणाची कधी वेळच आली नाही. अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद ( All India Oriental Conference ) संस्कृत विश्व परिषद, अखिल भारतीय संस्कृत साहित्य संमेलन यासारख्या संस्कृत निष्ठ संस्थांनी आधुनिक संस्कृत ग्रंथांचा साकल्याने संग्रह करण्याच्या दृष्टीने काहीहि प्रयत्न केलेला नाही, त्यामुळे नवप्रकाशित आधुनिक संस्कृतसाहित्य तुरळक कोठे तरी, कधीतरी दृष्टीस पडतें.

अशा परिस्थितींत आधुनिक संस्कृत साहित्याचा अभाव सर्वत्र जाणवल्यामुळे संस्कृतानभिज्ञ व संस्कृत-पराङ्मुख असलेले नवशिक्षित लोक संस्कृत भाषेचे मृतत्व गृहीत धरत असतील तर त्यात त्यांचा विशेष अपराध नाही. "अमराणां भाषा मृता इति वदतोव्याघात एव" यासारख्या शब्दच्छलात्मक युक्तिवादाने संस्कृतचें सजीवत्व सिद्ध होणार नाही. गेल्या ३०० वर्षांत लिहिण्यात आलेल्या संस्कृत साहित्याचा अभाव जाणवल्यानेच संस्कृत भाषेचे मृतत्व प्रतिपादन करण्याचे धार्ष्ट्य हे लोक करीत असतात. त्यांच्या मताचें खंडन, प्रत्यक्ष प्रमाणाच्या आधारें करणेच उचित होईल. त्यासाठी १६व्या शतकानंतर निर्माण झालेल्या ग्रंथांचा व त्यांच्या लेखकांचा योग्य परिचय देण्याची आवश्यकता आहे. या काळामध्ये लिहिलेल्या इतर प्रादेशिक भाषांतील ग्रंथांमध्ये जीं वैशिष्ट्यें, जे प्रकार किंवा जे विचार आढळतात ते संस्कृत भाषेतील साहित्यातहि आहेत किंवा नाहीत हें दाखविण्याचीहि आवश्यकता आहे.

कालिदास, भवभूती, जयदेव, चक्रपाणि, इत्यादि लेखकांनी जे विविध काव्य प्रकार संस्कृत साहित्यसृष्टींत प्रवर्तित केले, ते या आधुनिक कालखंडात खंडित झाले की अखंडित राहिले हा मुद्दा सप्रमाण दाखविला गेले पाहिजे. आंग्ल साहित्याच्या संपर्काने जे नवीन प्रकार व वाद आधुनिक साहित्यक्षेत्रात इतर भाषांतून आढळतात ते संस्कृत साहित्यामध्ये उत्पन्न झाले किंवा नाही हें मुद्दा सप्रमाण दाखविता आला पाहिजे. संस्कृतानभिज्ञ लोकांनी संस्कृत भाषेवर जो मृतत्वाचा आरोप करून ठेवला आहे त्याचें खंडन करण्यासाठी एवढा उद्योग करण्याची आवश्यकता आहे. नाहीतर केवळ शब्दच्छल करून त्यांच्या आरोपाचें खंडन करण्याचा प्रयत्न कोणी केल्यास, त्यातून त्याची दुरभिमानमूलक संस्कृतभक्ति व्यक्त होईल,

* न्यायजीवितरत्नावली, ले. महालिंगशास्त्री—Printed Copies 300 only

संस्कृतच सजीवत्व काही सिद्ध होणार नाही, असा विचार करूनच आम्ही प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याचा उद्योग आरंभिला. वस्तुत गेल्या तीनशे वर्षांत आसेतु हिमाचल भारतवर्षामध्ये असंख्य संस्कृत ग्रंथ लिहिले गेले, कारण संस्कृत ही एकाद्या प्रांताची भाषा नसून संपूर्ण भारताची भाषा आहे. यातील काही ग्रंथ प्रकाशित झाले तर बरेच अप्रकाशित आहेत. प्रकाशित झालेल्या ग्रंथांच्या प्रतीहि वर सांगितल्याप्रमाणे फार थोड्या उपलब्ध आहेत. अशा प्रकारे सर्वत्र विखुरलेल्या व दुर्मिळ साहित्याचे व्यवस्थित संकलन करून देश, काळ इत्यादि विभागाच्या अनुरोधाने त्यांचे समीक्षण करणे आवश्यक आहे. एवढ्या मोठ्या कार्याच्या सिद्धीसाठी केंद्रीय शासनानेच एखादी "अभिनव संस्कृतसाहित्य विमर्श समिति" नियुक्त करावयास हवी. नाहीतर कोणत्याहि एकाकी मनुष्याला हें एवढें मोठें कार्य एका जन्मात पूर्ण करणे सर्वथा अशक्य आहे.

स्वत च्या असमर्थतेची पूर्णपणे जाणीव असून देखील आम्ही या उद्योगास लागलों. त्या वेळीं,

तितीर्षुर्दुस्तरं मोहादुडुपेनास्मि सागरम् ॥ "

ही कालिदासाची उक्ति आम्हास सहजच आठवली. आधुनिक संस्कृत साहित्याचा परामर्श घेणे वर सांगितल्याप्रमाणे दुष्कर असले तरी सर्वथा अशक्य नाही. हस्तलिखित संस्कृत ग्रंथांच्या सूची करणाऱ्या विद्वानांनी हा मार्ग काहीसा मोकळा करून ठेवला आहे. त्यानंतर दक्षिणेतले विख्यात संस्कृत पंडित माडभूषि कृष्णमाचारीयर[१] यांनी दुष्कर प्रयास करून हा मार्ग अधिक स्वच्छ केला. अशा प्रकारे पूर्वसूरींनी चोखाळलेल्या या मार्गाने गेल्यास अवश्य ध्येयसिद्धि लाभेल या श्रद्धेने आम्ही या दुष्कर कार्यास प्रवृत्त झालों. आमच्या या प्रस्तुत विषयास अनुलक्षून मद्रास विश्वविद्यालयाच्या संस्कृत विभागाचे अध्यक्ष डॉ. व्ही राघवन् यांनी १९५६ व १९५७ या सालीं ३ पत्रक[२] क्रमश प्रकाशित केलीं. अशा प्रकार या दुर्गम मार्गामध्ये

"मणौ वज्रसमुत्कीर्णे सूत्रस्येवास्ति मे गति ।"

---

१. M Krishnammachariar, M.A , M.L , Ph D , M R A S Author of the History of classical Sanskrit Literature Printed at Imamalai Tirupathy Deosthan Press, 1937

२ (i) Modern Sanskrit Writings (The Adyar Library & Research Centre) (ii) Modern Sanskrit Literature (Sahitya Akademi New Delhi, 1957) (iii) Sanskrit Literature (1700 to 1900)

या न्यायाने आमचा आत्मविश्वास वाढला. अर्वाचीन संस्कृत साहित्यासंबंधी ज्या ज्या ठिकाणाहून काही माहिती मिळण्याची शक्यता असल्याने आम्हास कोठून तरी कळत असे अशा अनेक ठिकाणीं आम्ही शेकडों पत्रें टाकलीं पण तीं बहुतेक वाया गेलीं.

या ग्रंथात सर्वत्र तळटीपामध्ये मद्रासचे कृष्णम्माचारिअर यानी लिहिलेल्या सदर्भ ग्रंथाचा निर्देश 'कृ.' या अक्षराने, त्याच्या ग्रंथातील परिच्छेदाच्या क्रमांकासहित प्रामुख्याने केलेला आहे. उपलब्ध झालेल्या मुद्रित ग्रंथाच्या मुद्रणालयाचा, प्राप्तिस्थानाचा व मूल्याचाहि शक्य तोवर उल्लेख करण्याचा प्रयत्न केला आहे. अनेक मुद्रित ग्रंथासंबंधी कोठे कोठे उल्लेख आढळले, पण मूळ ग्रंथ दुर्मिळ झाल्याने प्रत्यक्ष पहावयास मिळू शकले नाहीत. असल्या ग्रंथाच संकलन किंवा पुनर्मुद्रण करण्याच सामर्थ्य फक्त सरकारच्याच ठिकाणीं आहे. तें करण्याची सुबुद्धि सरकारला व्हावी हीच प्रार्थना आहे.

---

प्रकरण २ रे

# आधुनिक साहित्यिकांचीं प्रयोजनें

काव्यं यशसेऽर्थकृते व्यवहारविदे शिवेतर-क्षतये ।
सद्यः पर-निर्वृतये कान्ता-सम्मिततयोपदेश-युजे ॥

का. प्र. १–२

या सुप्रसिद्ध कारिकेंत मम्मटाचार्यांनी प्राचीन साहित्योपासकाच्या साहित्याचीं प्रयोजनें सांगितलीं आहेत. परंतु यांव्यतिरिक्तहि कांही साहित्याचीं प्रयोजनें असून त्यासाठी अनेक कवि साहित्यनिर्मितिकरण्यासाठी प्रवृत्त झालेले आढळतात. काव्य हें यश-प्राप्तीस व अर्थप्राप्तीस कारणीभूत होतें, असें श्रीमम्मटाचार्य म्हणतात; पण संस्कृत भाषेच्या आजच्या ऱ्हासकाळीं संस्कृत साहित्य निर्माण करण्यास प्रवृत्त झालेल्या साहित्यिकांना यश व अर्थ या दोघांचीहि प्राप्ति होणें अशक्यच. त्यामुळे मम्मटाचार्यांनी सांगितलेलीं प्रयोजनें त्यांच्या साहित्यनिर्मिति मागे नव्हतीं हें उघड आहे. एखाद्या लोकप्रिय विषयावर प्रादेशिक भाषेंत किंवा विशेषतः इंग्रजी भाषेंत साहित्यनिर्मिति करणाऱ्यांना यश व अर्थ यांची प्राप्ति झाली असेल, तर त्यांत आश्चर्य नाहीं. प्रादेशिक भाषांमध्ये सहस्रावधि साहित्यिकांनी स्वातंत्र्याची आकांक्षा व पारतंत्र्याचा द्वेष लोकांमध्ये उद्दीपित करण्यासाठी साहित्याची निर्मिति केली. संस्कृत साहित्यिकाच्या संबंधांत असल्या प्रयोजनाची शक्यता दिसत नाहीं. अशा परिस्थितींत साहित्यसेवा करणाऱ्या संस्कृत साहित्यसेवकाची अन्तःप्रेरणा कशा प्रकारची होती, हें विचारांत घेणें आवश्यक आहे. या संबंधांत अनेक संस्कृत लेखकांनी स्वतःचे विचार ठिकठिकाणीं व्यक्त केलेले आहेत. ते पाहिले म्हणजे आधुनिक संस्कृत साहित्यिकांच्या साहित्यसेवेचीं प्रयोजनें ध्यानांत येतात.

### संस्कृतश्रद्धा

"यथा चीनदेशस्य राष्ट्रभाषा चीनी, इंग्लण्ड-देशस्य आङ्ग्ली तथा हि भारतस्य भाषा अवश्यमेव भारती (संस्कृत) भवति । अधुना हिन्दी विशेषकारणा-नुसारेण राष्ट्रभाषापदं नीता । तथापि अचिरात् गीर्वाणभाषा अखिलभारतस्य

राष्ट्रभाषापद प्राप्स्यति ' इति अनेकेषा विदुषा दृढो विश्वासः। प्राचीनत्वादनेकभाषाणा जननीभूता गीर्वाणभाषा भारतस्य राष्ट्रभाषा भूत्वा अस्मद्भारतगौरवम् अक्षय्यम् लोके वर्धयिष्यति। गीर्वाणभाषा मृतभाषा इति प्रतिपादन नून परिहासनिजाल्पितमेव . ."

"भाषेषा अतिक्लिष्टा, मृता चेत्यादि भारतीमधिकृत्य कृतदूषणाना प्रष्न्यताभारः प्रायशोऽस्माक सुरभारतीनिष्णातपण्डितै बोद्धव्य। एते विद्वासः सस्कृतभाषाया लिखितग्रन्थेषु लेखनेषु वा सुबोधभाषासरणि विहाय श्रेष्ठभाषासरणिम् उपयोजयन्ति। अत' सुरभारती अतीव दुर्बोधभाषा इति कल्पना सार्वलौकिकी कार्याकार्यिकाविषयिकी वर्तते। तस्मादस्माक पण्डितवरै सुरभारत्या सुबोधसरण्या ग्रथलेखनादीन् रचयित्वा एतल्लोकरूढमतस्य निराकरणे प्रयत्नो विधेय:। । "गीर्वाणभाषाया स्नीयज्ञान वर्धिष्णुना मया एतत् साध्यलेखनसाहस कृतम्।" ... 'शिवकैवल्यचरितम्' या स्वलिखित सस्कृत ग्रन्थाच्या प्रस्तावनेमध्य सुरतेचे प्रख्यात विद्वान डॉ. व्यकट मजुनाथ कैकिणी (B. A., M. B B.S, F. R. C. S. Edin.) यानी आपले ग्रन्थनिर्मितीचे प्रयोजन वरील शब्दात सागून, तदनुसार आपल लेखन केलें आहे. डॉक्टरीच्या व्यवसायात व्यग्र असताना सुद्धा श्री कैकिणी हे सस्कृत लेखन करण्यास प्रवृत्त झाले, याच कारण त्याच्या अत करणातील संस्कृतश्रद्धा हेच होय. याच कारणास्तव प्रेरित होऊन वेगवेगळ्या व्यवसायामध्ये व्यग्र असणाऱ्या विद्वानानी सस्कृत भाषेत साहित्यनिर्मिति केली असल्याचे आढळून यत

'भारतपारिजातम्' नामक महात्मा गांधींच्या चरित्रावर आधारलेले महाकाव्य, अहमदाबादनिवासी स्वामी भगवदाचार्य यानी लिहिले.[1] प्रस्तुत ग्रथाच्या प्रस्तावनत स्वामीजींनी आपला अभिप्राय हिंदी भाषत निवेदन केला तो असा—

"संस्कृतका मोह—

इस ग्रथको मैंने सस्कृत में लिखा है। बहुत से मनुष्यों को यह आश्चर्य है कि इस प्रकारका ग्रथ आज इ० २० वीं शताब्दी मे क्यों लिखा जा रहा है!..... ऐसे (महात्मा गाधी जैसे) सर्वव्यापक महापुरुषका चरित्र ऐसी भाषा में क्यों लिखा जा रहा है जो मृत है, एकदेशीय है और अतीव अल्प लोगों की प्रिय वस्तु है!

मेरा उत्तर—भारत वर्ष मे सस्कृत के विद्वानो की बहुत बडी सख्या है। . प्रतिवर्ष अन्तिम सन परिक्षाओं में उत्तीर्ण होनेवाले विद्वानों की सख्या बहुत बडी

१. भारतपारिजातम्—ले० स्वामी श्री. भगवदाचार्य, सरस्वती प्रिंटिंग प्रेस, उमरेठ (जि खेडा, गुजरात); मूल्य ३॥ रु, पृ सं. ५३२ हिन्दी अनुवादके सहित (प्रथम आवृत्ति)

होती है। संस्कृत के लाखो विद्वान ऐसे हैं जो संस्कृत सिवाय अपनी मातृभाषा को भी सर्वांश में शुद्ध नहीं बोल सकते।... इन विद्वानो मे संस्कृत भाषा के अतिरिक्त अन्य भाषा में लिखे गये हुए ग्रथों को पढने की श्रद्धा बहुत कम रहती है।.. आप आस्चर्य के साथ सुनेंगे की संस्कृत भाषा के विद्वानों को अभी महात्माजी के संबध मे इतना अल्प ज्ञान है, जिसे नहीं के बराबर माना जा सकता है। इसका कारण केवल यही है कि उन्हें उनकी प्रिय भाषा में श्री महात्माजी के संबध मे पढने के लिए कुछ भी नहीं मिला है।[२]"

'इस पवित्र चरित्र को पवित्र भाषा (संस्कृत) मे लिखने का बहुत हि उचित और योग्य साहस हुआ है।[३]

"यह संस्कृत भाषा मेरी प्रियतम भाषा है। इस मे मैं अपने पूर्वजों का चित्रपट देखता हू। इस भाषा मे मेरी जीवन का सारा इतिहास चित्रित है। यह मेरे लिए अमृत है। उससे भी बढ कर वस्तु है। म अपनी प्रिय से प्रिय वस्तु में इस प्रियतम महान् आत्मा का अवतार चरित लिखने मे समर्थ हो सका हू इस के लिए मैं स्वय अपनी भाग्य की प्रशसा करता हू। इस भाषा मे इस ग्रथ को लिखकर मैं समझता हू की मैंने अपनी प्रिय से प्रिय वस्तु का सुदर से सुदर उपयोग किया है।"[४]

स्वामी भगवदाचार्यांच्या प्रस्तुत विधानात किंचित् अवास्तवता असली तरी त्यातून त्यांच्या ग्रंथलेखनाचे प्रयोजन म्हणजे संस्कृत भाषेवरील आत्यंतिक श्रद्धा हे उत्कृष्टपणे व्यक्त होते.[५]

## लोकजागृति—

इंदूरचे विख्यात संस्कृत पंडित व संस्कृत महाविद्यालयाचे माजी प्राचार्य श्रीपादशास्त्री हसूरकर 'यानी भारतवीररत्नमाला' नामक ग्रन्थमालेत पृथ्वीराज, शिवाजी, प्रतापसिंह इत्यादि अनेक थोर पुरुषांची चरित्रें उत्कृष्ट संस्कृत भाषेत लिहिलीं आहेत. त्यामध्ये 'श्रीशिखगुरु-चरितामृतम्' या ग्रंथाच्या संस्कृत प्रस्तावनेमध्ये त्यानी आपल्या लेखनाचे प्रयोजन सांगितले ते असें—

"...व्यपदिशन्ति च तादृशदैन्यस्य कारणं परममान्यैः महर्षिभिः सर्वदा स्वीकृतां सात्त्विकीं वृत्तिम्। ..अस्मदीयाः अपि केचन परकीयैश्वर्य-दर्शन-मोहितान्तः-

---

२. प्रस्तावना, पृ. २०। ३. पृ. २१। ४. पृ. २५।

५ ब्रह्मसूत्र-वैदिकभाष्यम्, सामवेदभाष्यम्, रामानंददिग्विजयः इत्यादि स्वामी भगवदाचार्यांचे मौलिक ग्रथ प्रकाशित झाले आहेत.

करणत्वय' तत् सर्वं सत्य मन्यन्ते । तेन साधारणा जना' राज्ञीं वृत्तिं श्रेयस्करीं मन्वते । अस्य भ्रमस्य निरासार्थं मया लिखितोऽयं प्रन्थ ।"[६]

प्रस्तुत हेतूने उद्दीपित होऊन संस्कृतात लेखन करणाऱ्याची संख्या फार थोडी आहे. लोकजागृतीसाठी संस्कृतऐवजी लोकपरिचित भाषेचा अवलंब बहुसंख्य संस्कृतज्ञांनी सुद्धा केलेला आहे. त्या दृष्टीनें प. श्रीपादशास्त्रींचा उद्योग काहीसा अपवादात्मकच समजला पाहिजे.

## अन्यभाषीय साहित्याचा परिचय

आन्ध्रचे संस्कृत पंडित मेडपल्ली व्यकटरमणाचार्य यांनी 'Tales from Shakespeare' या मेरी लॅम्ब-कृत प्रसिद्ध पुस्तकाचा 'षेक्सपीयर-नाटक कथावली' या नावानें संस्कृतांत अनुवाद केला आहे. त्याच्या प्रस्तावनेत शेक्सपीयर कवीचें असाधारण श्रेष्ठत्व सविस्तरपणें संस्कृतांत निवेदन करून लेखक महाशय म्हणतात—"मनो-विनोदन-करी एता कथा आङ्ग्लेय भाषानभिज्ञा केवलं गीर्वाण भाषाविशारदा पण्डिता अपि पठित्वा नन्दन्तु इति मनीषया अहं १८९९-१९०० वत्सरयो यथावकाशं गीर्वाणभाषाया यथाज्ञानम् अनुवादम् अकरवम्।" व्यकटरमणाचार्यांच्या लेखनाचें प्रस्तुत प्रयोजन त्यांच्या सुलिष्ट भाषाशैलीमुळें बऱ्याच अंशीं सफल झालें आहे. असलेंच प्रयोजन मनांत बाळगून जळगावचे (खानदेश) प्रसिद्ध वकील श्री प्रभाकर दामोदर पंडित यांनी Times of India या इंग्रजी दैनिकामध्ये प्रतिदिन अग्रलेखाच्या शिरोभागीं प्रकाशित होणाऱ्या इंग्रजी सुभाषितांपैकीं १०० सुभाषितांचा श्लोकबद्ध अनुवाद 'सूक्तिरत्नावलि' या नावानें प्रसिद्ध केला आहे.

भारताचे माजी अर्थमंत्री सर चिं द्वा. देशमुख यांनीहि श्री पंडितांप्रमाणेच महात्मा गांधींच्या शंभर इंग्रजी सुभाषितांचा पद्यानुवाद केलेला आहे. हा अनुवाद "गान्धिसूक्तिमुक्तावली" या नावानें National Book Trust of India या संस्थेतर्फे इ० १९५७ सालीं प्रसिद्ध झाला आहे.

## समाजहित

विदर्भांतील विख्यात समाजकार्यकर्ते श्री. शंकररावजी सरनाईक (रा० पुसद) यांनी, मूळ श्लोकांचें व्यवस्थित संकलन करून महाभारताचें सार तीन खण्डांत प्रकाशित केलें. त्यांतील प्रथम खंडाच्या प्रस्तावनेंत संपादक मंडळानें आपलें हृद्गत सांगितलें तें असें की,

---

६ श्रीशीखगुरुचरितामृतम् । ले० श्रीपादशास्त्री हसूरकर, कार्ओपरेटिव्ह प्रिंटिंग प्रेस, इंदूर, मुद्रण वर्ष १९३३। मूल्य १ रु १२ आ प्रस्तावना पृ १ पहा।

"अद्य भारतीयसमाजस्य स्थितिः अतीव विचित्रा दृश्यते। ...कुत्रापि सनातनसंस्कृतेर्दर्शनमपि न भवति। शिक्षणस्य वार्ता तु दूरापेता एव। ...अनेन कारणेन समाजस्य वृद्धिः संस्कारविहीने रूक्षवातावरणे अनाथशिशोरिव केवलं निसर्गाश्रया जायते। ...अस्याः दुरवस्थायाः परिवर्तनस्य, पुनः सुस्थितिसंस्थापनस्य च पूर्वाचार्यनिर्मित-वाङ्मयाभ्यास एव मूलकारणं विद्यते। महाभारतस्य वाचन-मननाभ्यासः समाजमनसि इष्टपरिवर्तनम् अवश्यं करिष्यति इति दृढं श्रद्दध्मः। अनेनैव विचारेण प्रकाशकस्य सूचनामनुसृत्य महाभारतस्य विस्तरं परिहृत्य तस्य उत्तमांशः अस्मिन् संक्षेपे संगृहीतोऽस्ति।"[7]

"महाभारतस्य अतीव विस्तृतत्वं गीर्वाणवाणीमयत्वं च अनभ्यासस्य कारणं सञ्जातम्। एतादृशस्य विस्तृत ग्रन्थस्य संपूर्णमध्ययनं तु सहस्रेष्वेव। .....अपि च तस्मिन् ग्रन्थे स्थाने स्थाने या पुनरावृत्तिः अतिशयोक्तिः पूर्वतनाना विचाराणाम् आचाराणाम् अद्भुतता अनाकलनीयता च दृश्यते तेनापि कारणेन सुशिक्षित-समाजेन तस्य उपेक्षा कृता।......अतः परं संस्कृताभ्यासः यथाप्रमाणं वृद्धिं गमिष्यति इति आशासे। छात्रगणाः संस्कृतस्य संस्कृतेश्च उत्साहवन्तः प्रेमिकाः इतरे जनाश्च अस्य पुरातननिधेः सम्मुखीनाः भविष्यन्ति इति तर्कयामि। केन्द्रशासनं प्रदेशशासनं च अस्मिन् विषये अवधानम् दास्यति इत्यपि अपेक्षे। एतादृशे अनुकूल समये महाभारताभ्यास-वृद्ध्यपेक्षया चतुरशीति-सहस्रश्लोकत्वद्रस्य अस्य ग्रन्थस्य संक्षेपः यदि १२ सहस्रैः श्लोकैः कृतः स सर्वेषां मान्यः स्वीकार्यश्च भवेत् इत्याशया महा-भारतस्य संक्षेपः कृतः अस्ति। महाभारतस्य पठनं विद्यालयेषु, महाविद्यालयेषु, गुरु कुलेषु पाठशालासु च निरन्तरं भवितुम् अर्हति। विशेषतः तदर्थमेव अस्य संक्षेपस्य प्रयासः।"[8]

समाजामध्ये सुविचाराचा प्रचार रामायण महाभारतसारख्या संस्कृत ग्रंथांच्या अभ्यासानेच वाढू शकेल अशी श्रद्धा अनेक सज्जनांच्या अंतःकरणात तेवत आहे. व त्या श्रद्धेमुळेच महाभारत प्रकाशनासारखे उद्योग आजच्या काळात लोकांनी केलेले आहेत, ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. बाणभट्टाची कादंबरी, हर्षचरित, श्रीहर्षाचे नैषध यासारख्या विस्तृत संस्कृत ग्रंथाच्या संक्षिप्त आवृत्ति काढण्याचे उद्योग काहींनी केले. त्यामागेहि संस्कृत भाषेचा जनतेत अभ्यास वाढावा, *रसिकांनी त्या उत्कृष्ट ग्रंथांचा अल्पाशाने का होईना आस्वाद घ्यावा, यासारखे* प्रयोजन होतें.

७. म. भा सा. खण्ड १, संपादक मण्डलस्य हृद्गत, पृ ३९।

८. महाभारतसार.-(प्रथम खंड) प्रकाशकनिवेदनम् (समर्थ भारत मुद्रणालय, पुणें)

श्री. एम्. एस्. आपटे यांनी केलेल्या कादम्बरीसार या संक्षेपग्रंथाच्या प्रस्तावनेमध्ये आपलें प्रयोजन सांगितलें तें असें की, "In short I have made a short narrative out of the whole, fit to be placed in the hands of the school-boys and even those who may wish to enjoy the beauty of the work with little labour and not for those who may have patience, time and even opportunities to wade through the *host of similies and mataphors in some* cases long to a fault."[9]

श्रीव्यङ्कटरमणाचार्य यांनी कृष्णस्वामीकृत 'Uma's Mirror' या इंग्रजी ग्रंथाचा "उमादर्शः" नामक संस्कृत पद्यानुवाद केला. त्याचें प्रयोजन सांगताना श्री. व्यङ्कटरमणाचार्य म्हणतात.[10]

"तत्वज्ञानेन स्वरूपसाक्षात्कारे सति दुःखनिवृत्तिः सुखाविर्भूतिश्च भवति इति वेदशास्त्राणां समुद्घोषः खलु। एतमेव अर्थम् सामान्यजनानां सुखबोधाय कथारूपेण कृष्णस्वाम्यार्येण आङ्ग्लभाषया उमादर्शाख्यो ग्रन्थः विरचितः। तदभिप्रायमनुसृत्य उमादर्शाख्योऽयं ग्रन्थः काव्यरूपेण व्यङ्कटरमणाचार्येण रचितः।

स्वात्मानन्दसमं नास्ति सुखं वैषयिकं परम्।
इति बोधयितुं तस्व कथाभङ्ग्या जगाद स॥

तात्पर्य लोककल्याणाची किंवा लोकजागृतीची आकांक्षा पूर्ण करण्याच्या उद्देशानें अनेक संस्कृत पंडितांनी आधुनिक काळांत साहित्यसेवा केलेली आहे. त्यांच्या ग्रंथांचा प्रचार अत्यंत अल्प प्रमाणांत झाल्यामुळें त्यांचें उद्दिष्ट कितपत फलद्रूप झालें हें सांगणें कठीण आहे. तरी पण त्यांच्या संस्कृत साहित्यसेवेचें प्रयोजन दृष्टिआड करण्यासारखें नाही.

### छात्रहित

इंदूरचे संस्कृत कवि श्री. करमरकर यांनी "लोकमान्यालङ्कारः"[11] या नांवाचें आलंकारिक खण्डकाव्य लिहिलें. तें लिहिण्याचें मुख्य प्रयोजन विद्यार्थ्यांचें कल्याण हेंच होतें असें त्यांनी स्पष्ट सांगितलें आहे. ते म्हणतात.

---

९. कादम्बरीसारः, बॉम्बे वैभव प्रेस, गिरगांव मुंबई.

१०. उमादर्शः, विजय लक्ष्मी विलास प्रेस, बंगलोर सिटी, मु. वर्ष इ. १९३७.

११. श्रीनाथ प्रेस, इंदूर; मूल्य १२ आणे

दृष्टान्ता प्रायशो ग्रन्थे दृष्टा शृङ्गारसेविन ।
असंस्कृतां बाल्बुद्धिं विकुर्युरिति चिन्तया ॥
शृङ्गाररसवर्ज्या ये राष्ट्रभक्तिप्रबोधका
हितावहा मया प्रोक्ता लोकमान्या विशेषत ॥

' हृद्य चरित्र तिलकस्य नित्य
बोद्धु तयालङ्कृतिसत्सरण्यम् ।
एक प्रयत्नो विहितो मया हि
एका क्रिया द्व्यर्थकरी प्रसिद्धा ॥

## स्वाध्याय

मुबईच्या विल्सन कॉलेजातील फारसी भाषेचे प्राध्यापक म अहमद यानी 'अलर ज्वादयिद' नावाच्या अल्मामनीकृत अरेबिक कथासंग्रहाचा 'दु खोत्तर सुखम्' या नावाने संस्कृत अनुवाद केला त्याच प्रयोजन सागताना प्राध्यापक अहमद लिहितात—" संस्कृतभाषाया मनोगत–निवेदन–सामर्थ्य–सपादनाकाक्षया काश्चित् कथा क्वचित् वाल्मीक्यादीनाम् उक्ती उपयोज्य, क्वचित् पारसिक कल्पना संस्कृतसरण्या परिवर्त्य विपरिणमिताश्च ।" [१२] संस्कृतचा स्वाध्याय वाढविणे हेंच त्याच्या लेखनाच प्रयोजन होत

## धनाशा

विजयवाड्याचे प्रसिद्ध धनिक व्यापारी श्री चडुरी वकटरेड्डी याच्याकडून धन मिळण्याच्या आशने प्रेरित होऊन आधाचे संस्कृत कवि श्री पुल्य उमामहेश्वर शास्त्री यानी 'दुर्गानुग्रहम्' या नावाचें एक संस्कृत काव्य लिहिलें.[१३]

## परप्रेरणा

कोल्हापूरचे संस्कृत पडित श्री सखारामशास्त्री भागवत यानी 'अहल्याचरित महाकाव्यम्' लिहिले त्याच प्रयोजन सागताना प्रस्तावनालेखक श्री गोविंद रामचद्र राजोपाध्ये (पडितराव) लिहितात—" सत्सु नैकविधेष्वपि चरितान्तर विषयेषु अहल्याचरितरत्नग्रथने एव लेखकमहोदयस्य यद् बुद्धे प्रयोजनमभूत् तत्र

---

१२ 'दु खोत्तर सुख' विरजानन्द प्रेस, मोहनलाल रोड, लाहोर (प्रस्तुत पुस्तकाला सर चिंतामणराव देशमुख याची प्रस्तावना आहे)

१३ दुर्गानुग्रहमहाकाव्यम्—कवितिलकग्रथमाला, विजयवाडा, मु व. इ १९५०

इदमेव प्रथमं निदानं यत् अहल्यानिर्मितधर्मशाला पथिनिवास-विष्णुपदमन्दिर-दर्शनादिभिः कारणैः शास्त्रिचरणानां परमादरबुद्धिः पूर्वमेव सञ्जाता अहल्यायाम्। सैव अहल्यादेव्याः चरितमाविश्य सुनिपुणमनश्चित्त्य अतिशयितां समासाद्य भक्त्यात्मना परिणता।...कथाप्रसङ्गेषु इतस्ततः प्रचलितेषु सत्सु सौपर्णिकप्राप्या अहल्यायाः साध्व्याः चरिताभावः सम्भाषणविषयोऽभूत्। तदानीं तत्रभवान् मणूरकरो अभ्यचयत् किल (सखारामशास्त्री भागवत) शास्त्रिवरेण्यान् यद् भवद्भिः तद्वाण्या तत् चरितम् प्रणेयमिति। तदान्ते तैरपि तत्सूचना स्वीकृता, अनुष्ठातु प्रक्रमिता च।"[14]

अशाप्रकारें परप्रेरणेने प्रवृत्त होऊन संस्कृत लेखन करणाऱ्यामध्ये १७ व्या शतकातील 'चित्रभारतकार' कवीन्द्र परमानन्द व 'पर्णालपर्वतग्रहणाख्यान'कार जयराम पिण्ड्ये यासारखे प्रसिद्ध लेखक आहेत. पर्णालपर्वतग्रहणाख्यानाच्या प्रस्तावनेत कवि जयराम पिण्ड्ये लिहितात—

"प्रत्युत्थानादिसम्मानैर्नमस्कृत्य ततः कविम्।
पप्रच्छ कुशलं श्रीमदग्रजस्य महीभुजः ॥ १-१६

स्वामिनो रामचन्द्रस्य विनीतो भरतो यथा।
कविर्निवेदयाचक्रे सर्वं कुशलपूर्वकम् ॥ १-१७

स्वामीने पृच्छा केली म्हणून जयराम कवि निवेदन करण्यास प्रवृत्त झाला. परमानंदाने शिवाजी महाराजाच्या प्रेरणेनेच आपले महाकाव्य लिहिलें आहे.

## संस्कृतचे अखिलभारतीयत्व

कुरुक्षेत्र विश्वविद्यालयाचे प्राध्यापक श्री इन्द्र यानी धम्मपदाचा संस्कृत अनुवाद करण्याचें प्रयोजन सांगितलें तें असें—

"भारतमें बौद्धधर्मके लोप के साथ पाली भाषा का भी लोप हो गया। अब वह भाषा केवल बौद्ध आगमों में ही सीमित रह गयी है। जिसे भारतके बौद्धधर्म तथा बौद्धदर्शन में रुचि रखनेवाले विद्वान ही जानते हैं। ..इसके विपरीत संस्कृत आज भी समूचे देश ..उत्तरसे दक्षिण तक की सांस्कृतिक भाषा है। और इसके अध्यापन का प्रबंध भारत के प्रत्येक विश्वविद्यालयमें किया जाता है। यही एक सांस्कृतिक एकता आज तक सुदृढ रूप में स्थित है। अतः भगवान् बुद्ध की परमपावन जयंति पर पाली धम्मपद का संस्कृत रूपान्तर उपस्थित करना सर्वसाधारण

---

१४ अहल्याचरितमहाकाव्यम्—पृ २। सिद्धेश्वर मुद्रणालय, कोल्हापूर, मु व १९३७.

जनता के लिए उपयोगी माना गया और भगवान के अमर उपदेशों को भारत की अमर वाणीमें प्रस्तुत किया गया।"[१५]

## नवीन पद्धतीचें प्रवर्तन

पंजाबचे संस्कृत पंडित प्राध्यापक श्री. हंसराज अगरवाल यांनी आधुनिक पद्धतीच्या निबंधाचा आदर्श संस्कृत लेखकापुढे ठेवण्यासाठी 'संस्कृतनिबन्धप्रदीप.[१६]' या नावाचा एक शालेपयोगी ग्रंथ लिहिला. त्यांत संस्कृत लेखकांनी नवीन रचनाशैली अंगीकारली पाहिजे ही सूचना केली असून ती काही लेखकांनी पाळलेली दिसते. श्री. अगरवाल लिहितात.—

"एकोनविंशतितमाद् वैक्रमशतकाद्यावधि वर्तमानकाले व्यवहृतः। असौ विरामकालः संस्कृतनाटकानाम्। उत्तरकाले यद्यपि मध्यकालवत् उत्कृष्टानि नारच्यन्त नाटकानि तथापि तत्र नाटकानां सृजनं न रुद्धम्। परःशतानि तदानीतनानि नाटकानि मुद्रितानि, अमुद्रितानि नष्टप्रायाणि च। किञ्च अस्मिन् द्विशतस्मिते काले यथा संस्कृतसाहित्यस्य अन्येषाम् अङ्गानां सृजनगतिर्निरुद्धा, तथा नाटकानामपि। अद्यापि विदुषामपि सन्ति कास्चन नाटकरचनाः। स्तोकाश्च इमाः। एतासु ठाकरलालशास्त्रिणः 'श्रीकृष्णाभ्युदयः' 'गोपालचिन्तामणिश्च', रामचन्द्रकवेः 'सत्यहरिश्चन्द्रः' 'सकलसूर्योदयश्च', शेषकृष्णस्य 'कंसवधनाटकम्', पण्डित जगन्नाथस्य 'रतिमन्मथनाटकम्', मथुराप्रसाददीक्षितस्य 'प्रतापविजय.' इति वर्णनार्हाणि सन्ति। संस्कृतसाहित्यस्य सुधीभिः संस्कृतभारतीम् उन्निनीषुभिः नाटकानि नवीनया शैल्या रचनीयानि। साम्प्रतं समाजराजनीतिविषयाः जननायकानां चरितानि, इत्येतानुपाश्रित्यपि नाटकानां रचनाऽपेक्ष्यते। आङ्ग्लनाटकानां संस्कृतेऽनुवादोऽपि अपेक्षणीयः एव। एतेन अक्षुण्णः स्यास्यति संस्कृतनाटकानां ख्यातिः साहित्यं च परिबृंहितं स्यात्।"

श्री. अग्रवाल महाशयांच्या सूचनेनुसार काही आधुनिक पद्धतीची नाटकें संस्कृतांत लिहिण्यांत आलीं आहेत. काहीतरी नवीन निर्माण करण्याच्या प्रेरणेनेच या लेखकांनी आपलीं नाटकें लिहिलीं आहेत. श्री. वेंकटरमणाचार्य यांनी टेनिसन कवीच्या The Cup नामक नाटकाचा 'चषक' नामक संस्कृतनाट्यानुवाद केला आहे.

---

१५. धम्मपदस्य संस्कृतानुवाद.—New India Press, नई दिल्ली, मु. व. १९५६, मू. ३ रु.

१६. शक्तिप्रकाशन, मॉडेल टाऊन, लुधियाना, मूल्य ५ रु. (युगान्तर प्रेस, दिल्ली).

म्हैसूरराजकवि अहोबिलनरसिंह[२२] यांनी तर आपल्या त्रिमूर्तिकल्याणम् नामक ग्रंथाला बाणभट्टाच्या कादंबरीची स्मृति देणारें **"अभिनव कादम्बरी"** हें नाव दिलें.

"मायावादि-मतङ्गज-कण्ठीरवाचार्य" ही लांबलचक उपाधि धारण करणाऱ्या व 'श्रीनिवासगुणाकरः' या १७ सर्गांच्या काव्याच्या लेखकाला **'अभिनव-रामानुजाचार्य'** ही उपाधि लाभली होती.[२३] (प्रस्तुत श्रीनिवासगुणाकर काव्याच्या प्रारंभींच्या ७ सर्गांची टीका स्वतः लेखकानेच लिहिली व उरलेल्या १० सर्गांची टीका त्याचा पुतण्या वरदराज याने लिहिली.)

श्री. पेरुसूरी याने **'नवीन-पतञ्जलि'** ही उपाधि धारण केली होती. पंजाबचे पंडित तेजोभानु (हे सध्या हयात आहेत) यानी भर्तृहरिप्रमाणेच शृङ्गार-नीति व वैराग्य यासबंधीं ३ शतककाव्यें लिहिलीं असून ते स्वतःचा **'अभिनव-भर्तृहरि'** म्हणून उल्लेख करतात. वर उल्लेखिलेले पुल्य उमामहेश्वर शास्त्री यांनी **'अभिनव-पण्डितराज'** ही उपाधि धारण केली आहे.

तंजौरच्या भोसले वंशांतील एकोजीराजाचा पुत्र शहाजी हा धारानरेश भोज राजाप्रमाणें विद्वान व विद्यारसिक असल्यामुळें त्याला **'अभिनवभोज'** ही उपाधि लाभली होती.

नरसप्पमंत्री[२४] यानी आपल्या ग्रंथाला **'अभिनवभारतम्'** असें नांव दिलें आहे.

श्रीकण्ठकवीने[२५] पूर्वीच्या भारतचंपूप्रमाणेच एक ग्रंथ लिहून त्याला **'अभिनव-भारतचम्पू'** हें नाव दिलें.

'कोसलभोसलीयम्' या द्व्यर्थी काव्याचा लेखक शेषाचलपति हा स्वतःला **'आंध्रपाणिनि'** म्हणवितो !

'शाहविलासगीतकाव्यम्' हें गेय काव्य लिहिल्यामुळें त्याचा लेखक दुंढिराज याला **'अभिनव-जयदेव'** म्हणविण्यात अभिमान वाटत असे.

'वीरनारायणचरितम्' व 'वेमभूपालचरितम्' लिहिणारा वामन हा स्वतःला गर्वाने बाणापेक्षाहि श्रेष्ठ म्हणतो.[२६]

---

२२. पृ १६३, ४५६, ४८६ । २४. पृ. २५० ।

२३. श्रीनिवासगुणाकरः । २५. पृ ५२१.

२६. वाणकवीन्द्रादन्ये काणाः खलु सरसगद्यसरणीषु ।
इति जगति रूढ यशसो वत्सकुलो वामनोऽधुना मार्ष्टि ॥

अशाप्रकारे अभिनवगीतगोविंदम् । अभिनवरामायणचम्पू । अभिनव-चम्पूरामायणम्[२७] । अभिनवभागवतम्[२८] । अभिनववासवदत्ता[२९], अभिनव-हितोपदेशः याप्रकारचे प्राचीन ग्रंथाच्या नावाची आठवण देणारे बरेच ग्रंथ अर्वाचीन संस्कृत साहित्यांत आढळतात.

इ. १७४० साली श्रीलक्ष्मणशास्त्री यानी कालिदासाच्या रघुवंश नावाच्या काव्याची स्मृति देणारे 'गुरुवंशम्'[३०] नामक महाकाव्य लिहिलें असून त्यामध्ये, कालिदासाने ज्याप्रमाणे रघुवंशनृपतींचीं चरित्रें वर्णिलीं, त्याप्रमाणे शृंगेरीमठाच्या परंपरेतील गुरुवर्यांचीं चरित्रें क्रमशः वर्णिलीं आहेत. ऐतिहासिक दृष्टीने या काव्याला बरेच महत्त्व आहे.

रघुवंशाचे अनुकरण करण्याच्या प्रवृत्तीने युवराजकवीने 'भटवंशम्' (पेशवे वंशाचे वर्णन करणारें); अप्पास्वामी अय्यर यानी 'जॉर्जवंशम्', लखनौच्या ऊर्वीदत्त शास्त्रींनी 'एडवर्डवंशम्' यासारखीं वंशानुचरितात्मक काव्य संस्कृतात लिहिलीं.

माघाच्या शिशुपालवधाचे अनुकरण करण्याच्या प्रेरणेने वंशीधरशर्मा याने 'दुर्योधनवधम्'[३१] महाकाव्य लिहिलं.

तात्पर्य, मम्मटाने आपल्या काव्यप्रकाशात यश प्राप्ति, अर्थप्राप्ति इत्यादि जीं काव्याचीं प्रयोजनें सांगितलीं त्याहून निराळ्याच काही प्रयोजनानी प्रेरित होऊन अर्वाचीन संस्कृत साहित्यिकानी संस्कृत साहित्याची सेवा केली ही गोष्ट ध्यानात ठेवण्यासारखी आहे. त्याचीं तीं अभिनव प्रयोजनें शक्यतोवर त्यांच्याच शब्दात आम्ही प्रस्तुत प्रकरणात निर्दिष्ट केलेलीं आहेत.

---

२७ पृ २५४ । २८. पृ १५६ । २९ पृ ४८५ ।

३० प्राप्तिस्थान, चौखम्बा पुस्तकालय, वाराणसी, मूल्य १ रु. १० आणे ।

३१. प्राप्तिस्थान, चौखम्बा, वाराणसी । मूल्य १ रु.

## प्रकरण ३ रे

# महाकाव्यात्मक चरित्रग्रंथ

प्राचीन संस्कृत साहित्य शास्त्रज्ञानी विविध प्रकाराच्या काव्याचीं व महाकाव्याचीं लक्षणें वेगवेगळ्या प्रकारें सांगितलेली आहेत. श्रीमम्मटाचार्यांनी काव्याचें लक्षण "सकलप्रयोजनभूत समनन्तरमेव रसास्वादनसमुद्भूत विगलित वेद्यान्तरम् आनन्द प्रभुसमित शब्दप्रमाणवेदादिशास्त्रेभ्यः सुहृत्समितार्थतात्पर्यवत् पुराणादि इतिहासेभ्यश्च शब्दार्थयो गुणभावेन रसाङ्गभूतव्यापारप्रवणतया विलक्षण यत् काव्य लोकोत्तरवर्णनानिनिपुणकविकर्म" अशा प्रकारें सांगितलें आहे. ही काव्याची व्याख्या अनेक दृष्टीने सर्वंकष स्वरूपाची आहे. पण यावरुन महाकाव्याची कल्पना येत नाही. साहित्यदर्पणकार विश्वनाथानी आपल्या ग्रंथात—काव्याचे श्रव्य आणि दृश्य असे दोन भेद सांगून त्यापैकी श्रव्यकाव्याचे, "श्रव्य श्रोतव्यमात्र तद् गद्यपद्यमय द्विधा।" असे दोन भेद केलेले असून पद्य काव्याचेहि खण्डकाव्य व महाकाव्य असे भेद त्यानी सांगितलेले आहेत. महाकाव्याचे लक्षण दहा कारिकामध्ये सविस्तरपणे त्याने विशद केलें आहे, ते असेः—

१) सर्गबन्धो महाकाव्य तत्रैको नायक. सुर'।
सद्वशः क्षत्रियो वापि धीरोदात्तगुणान्वितः ॥
एकवंशभवा भूपा कुलजा बहवोऽपि वा।
शृङ्गारवीरशान्तानामेकोऽङ्गी रस इष्यते ॥
अङ्गानि सर्वेऽपि रसा सर्वे नाटकसन्धय.।
इतिहासोद्भव वृत्तमन्यद् वा सज्जनाश्रयम् ॥
चत्वारस्तस्य वर्गा स्युस्तेष्वेक च फल भवेत्।
आदौ नमस्क्रियाशीर्वा वस्तुनिर्देश एव वा ॥
क्वाचिन्निन्दा खलादीना सतां च गुणकीर्तनम्।
एकवृत्तमयैं पद्यैरवसानेऽन्यवृत्तकैः ॥
नातिस्वल्पा नातिदीर्घा सर्गा अष्टाधिका इह।
नानावृत्तमयः क्वापि सर्गः कश्चन दृश्यते ॥

सर्गान्ते भाविसर्गस्य कथायाः सूचनं भवेत् ।
सन्ध्या सूर्येन्दु-रजनी प्रदोष ध्वान्त वासरा. ।।
प्रातर्मध्याह्न मृगया शैलर्तु वन सागरा. ।
सम्भोग विप्रलम्भौ च मुनि स्वर्ग पुराध्वराः ।।
रणप्रयाणोपयम मन्त्र पुत्रोदयादय ।
वर्णनीया यथायोग साङ्गोपाङ्गा अमी इह ।।
कवेर्वृत्तस्य वा नाम्ना नायकस्येतरस्य वा ।
नामास्य सर्गोपादेयकथया सर्गनाम तु ।।
(सा द ४।३१५-३२५)

दण्डीच्या काव्यादर्शातहि याच प्रकारचे महाकाव्याचे लक्षण थोड्या सविस्तराने प्रथम परिच्छेदात दिलेले आहे. ते असे—

सर्गबन्धो महाकाव्यमुच्यते तस्य लक्षणम् ।
आशीर्नमस्क्रिया वस्तुनिर्देशो वापि तन्मुखम् ।।१४।।
इतिहासकथोद्भूतमितरद् वा सदाश्रयम् ।
चतुर्वर्गफलोपेत चतुरोदात्तनायकम् ।।१५।।
नगरार्णव शैलर्तु चन्द्रार्कोदय वर्णनैः ।
उद्यान सलिलक्रीडा मधुपान रतोत्सवैः ।।१६।।
विप्रलम्भैर्विवाहैश्च कुमारोदयवर्णनैः ।
मन्त्र-दूतप्रयाणाजि-नायकाभ्युदयैरपि ।।१७।।
अलङ्कृतमसंक्षिप्त रस भाव निरन्तरम् ।
सर्गैरनतिविस्तीर्णः श्रव्यवृत्तैः सुसन्धिभिः ।।१८।।
सर्वत्र भिन्नवृत्तान्तैरुपेत लोकरञ्जकम् ।
काव्य कल्पान्तरस्थायि जायेत सदलकृति ।।१९।।

साहित्यशास्त्रज्ञानी महाकाव्याचे हे लक्षण वाल्मीकि, कालिदास, माघ, भारवि वगैरेंच्या प्राचीन महाकाव्यांची सर्वांगे दृष्टीपुढे ठेऊन सांगितले आहे, हे उघड आहे. या लक्षणानुसार लिहिल्या गेलेल्या प्राचीन महाकाव्यांची परंपरा १६ व्या शतकानंतरच्या काळात आजपर्यंत ही खंडित झालेली नाही. संस्कृत साहित्याच्या युरोपीय चिकित्सकांनी लिहिलेल्या ग्रंथात या अर्वाचीनकालीन (गेल्या ३ शतकातील) असल्या महाकाव्यांचे पर्यालोचन मुळीच केलेले आढळत नाही.

प्राचीन व अर्वाचीन काळातील सर्वच महाकाव्ये कोणत्या तरी पौराणिक किंवा ऐतिहासिक महापुरुषाच्या चरित्राला अनुलक्षून लिहिलेली आहेत. त्यातहि भगवान् रामचंद्र व श्रीकृष्ण यासारख्या अवतारी पुरुषांच्या दिव्य चरित्रावर आधारलेली महाकाव्य लिहिल्यास साहित्यशास्त्रज्ञानी सांगितलेली विविध प्रयोजन फलद्रूप होऊ शकतात, असे आढळून आल्यामुळे म्हणा किंवा रामायण, महाभारत व भागवत या तीन आर्ष ग्रंथाविषयी अन्तःकरणात नितान्त श्रद्धा असल्यामुळे म्हणा, रामायणभारतादि ग्रंथातील विषय घेऊनच लिहिलेली महाकाव्ये संस्कृत साहित्यात अत्यधिक प्रमाणात आढळतात.

## चरित्रवाङ्मय

संस्कृत साहित्याचा प्रारंभ एका लोकोत्तर विभूतीच्या चरित्रग्रंथानेच झालेला आहे. केवळ संस्कृत साहित्याचच नव्हे तर जागतिक साहित्याचे आद्य काव्य जे वाल्मीकिरामायण ते म्हणजे श्रीरामचंद्राचे चरित्रच आहे. या लोकोत्तर चरित्राच्या अनुषंगानेच आदिकवीची प्रतिभा पल्लवित झाली. इतिहास किंवा काव्य या दोन्ही दृष्टींनी पाहण्यात येणारं भगवान् व्यासाचं महाभारत सुद्धा पाण्डवाचं चरित्रच आहे. याच महान् परंपरेत निर्माण झालेले अश्वघोषाचं बुद्धचरितम्, कालिदासाचं रघुवंशम् व कुमारसम्भवम्, जिनसेनाचे हरिवंशम्, बाणभट्टाचें हर्षचरितम् व श्रीहर्षाचें नैषधीयचरितम् यासारखे संस्कृत साहित्यसृष्टीत ख्याति पावलेले बहुतेक सर्व काव्यग्रंथ चरित्रात्मकच आहेत. किंबहुना संस्कृत साहित्यामध्ये चरित्रातिरिक्त असे महाकाव्य नाहीच असें म्हटल्यास चूक होणार नाही. धीरोदात्त गुणसंपन्न महापुरुषाच्या जीवनातील अद्भुतरम्य घटना चित्रित करीतच संस्कृत महाकवींनी आपलें सरस व रमणीय अर्थ प्रतिपादन करण्याचे कौशल्य अभिव्यक्त केलें आहे. तात्पर्य, संस्कृत साहित्य सृष्टीतील सर्व महाकाव्याच्या मुळाशी चरित्रें आहेत किंवा चरित्रग्रन्थ महाकाव्याच्या रूपानें अलंकृत होऊन संस्कृत साहित्यसृष्टींत प्रकट झालेले आहेत. साहित्यशास्त्रकारांपैकी महाकाव्याचे लक्षण सांगणाऱ्या दंडीने, महाकाव्य हें 'इतिहासकथोद्भूत, इतरद् वा सदाश्रयम्।'[1] असें आपलें मत दिले असून, विश्वनाथानेहि

" .... ... .... तत्रैको नायकः सुरः ।
सद्वंशः क्षत्रियो वापि धीरोदात्त गुणान्वितः ॥"[2]

या शब्दात दण्डीच्या मताला अनुमोदन दिले आहे. अशा प्रकारें साहित्यशास्त्रज्ञांच्या मतानुसारहि महाकाव्याचा अन्तर्भाव चरित्रात्मक ग्रंथात किंवा चरित्रग्रंथाचा

१. काव्यादर्श १ १५। २. साहित्यदर्पण ६ ३१५।

अन्तर्भाव महाकाव्यात होतो. चम्पूकाव्यात व नाटकात सुद्धा सत्पुरुषांचींच चरित्रें त्या त्या वाङ्मयप्रकाराच्या लक्षणानुसार चित्रित केलेलीं आढळतात. फार काय स्तोत्रवाङ्मयात सुद्धा उपास्य देवताप्रमाणें, देवताचे अवतार मानण्यात आलेल्या दिव्य पुरुषाच्या चरित्राचा महिमाच गायिलेला असतो. काय ? कवि काव्यात्मक चरित्रग्रंथ लिहिण्यासच प्रवृत्त का होतात व वाचकाना तरी असले चरित्रग्रंथ का आवडतात, हा प्रश्न चरित्रवाङ्मयासंबंधी विचार करीत असता प्रथमच उपस्थित होतो. या प्रश्नाचे उत्तर महाकवि कालिदासाने,

रघूणामन्वयं वक्ष्ये तनुवाग्विभवोऽपि सन् ।
तद्गुणैः कर्णमागत्य चापलाय प्रचोदित: ॥[१]

या श्लोकात फारच सुंदर रीतीने दिलेले आहे. कालिदासाच्या म्हणण्या-प्रमाणे लोकोत्तर महापुरुषाचे अत्योदात्त गुणच प्रतिभाशाली कवींना त्यांची चरित्रें गावयास मुरवरित करीत असतात. त्याचप्रमाणे त्यांचे ते गुण वाचकाना सुद्धा चरित्रग्रंथ वाचण्यास प्रेरित करीत असतात.

अशा प्रकार सर्वच प्रकारचे चरित्रग्रंथ लिहिण्याचे किंवा त्याच वाचन होण्याचे प्रवृत्तिनिमित्त एकसारखेच असताहि सर्व चरित्रग्रंथ सारख्या प्रमाणात लोकप्रिय होत नाहीत. संस्कृत साहित्यात प्रभुरामचंद्राच्या चरित्रावर असंख्य काव्य लेखन चालू आहे. त्यातील रामचरित्र हा सर्वांचाच श्रद्धेचा किंवा आवडीचा विषय असला तरी, तीं सर्व रामचरित्रें वाल्मीकीच्या रामायणाप्रमाणे सकललोकप्रिय झालीं नाहीत. आजवर शतावधि रामायण झालीं व सहस्रावधि यापुढे होतील, पण वाल्मीकीचें रामायण सर्वथा अग्रगण्यच राहील. वाल्मीकीचा यश पुसून टाकण्यासाठीं आजवर कोणीहि रामचरित्रपर ग्रंथ लिहिला नाही, किंवा वाल्मीकीच्या रामायणाचें आजवर अबाधित राहिलेले अनन्यसाधारणत्व पाहून कोणीहि रामचरित्रलेखनापासून परावृत्त झाला नाही. रामचंद्राच्या दिव्य गुणानी आजवर असंख्य कवींना महाकाव्ये लिहिण्यास प्रेरणा दिली व यापुढेहि युगानुयुग ते गुण जातिवंत कवींना काव्यनिर्मितीची प्रेरणा देत राहतील. तात्पर्य, श्रद्धेय महापुरुषाच्या चरित्राच्या आधारेच महाकाव्य निर्माण होत असतात. श्रद्धा नसेल तर केवळ प्रतिभेच्या बळावर महाकाव्य निर्माण होणार नाहीत. ती श्रद्धा काही कवींच्या अंतःकरणात उपास्य दैवतासंबधी, काहींच्या अंतःकरणात धीरोदात्त राजासंबंधीं तर आणखी कोणाच्या अंतःकरणात ऋषि-मुनी-साधु-संतासंबधीं असते. देवताच्या किंवा साधूच्या चरित्रवर्णनाने पाप, ताप किंवा दैन्य विलय पावते, अशी श्रद्धा आमच्या भारतीय समाजात अनादि कालापासून तेवत आहे. तक्षकाच्या दंशाने सात दिवसाच्या

---

१. रघु १-९

आत ओढवणार, परीक्षिति राजाच्या अकाल मृत्यूचे भय निवारण्यासाठीच शुकाचार्यांनी भागवत सांगितले, ही गोष्ट सर्वांना ठाऊक आहे. ऋषींच्या शापप्रभावाने सर्प झालेला काश्मीरचा राजा दामोदर हा एक दिनसभर संपूर्ण रामायण श्रवण केल्यामुळे शापातून मुक्त झाला अशी आख्यायिका कल्हणाने राजतरंगिणींत सांगितलेली आहे. दैवतचरित्राचे माहात्म्य लोकांच्या अंत करणावर ठसविण्यासाठीच या कथा प्रसृत करण्यात आल्या असे म्हणणे चुकीचे होणार नाही. दैवतचरित्राच्या या माहात्म्यावर श्रद्धा ठेवणारे अनेक संस्कृत लेखक राम, कृष्ण, शिव, गणेश इत्यादि उपास्य दैवतांचीं पुराणांतरीं वर्णिलेलीं चरितें महाकाव्यरूपाने लिहिण्यास प्रवृत्त झाले, यात शंका नाही.

'धन राजप्रसादत' या न्यायाने राजानुग्रह संपादन करून, तद्द्वारा धन व मान प्राप्त करण्याच्या इच्छेने प्रेरित झालेल्या कित्येक लेखकांनी समकालीन राजपुरुषांची चरितें काव्यात्मक पद्धतीने गायिलेलीं आढळतात.[४] या राजचरित्रात्मक महाकाव्यामध्ये मुसलमानी सत्तेच्या काळात मुसलमान सुलतानाच्या चरित्रावर रचलेलीं कित्येक महाकाव्ये आढळतात.[५] त्याचप्रमाणे इंग्रजी सत्तेच्या काळात आंग्लनृपतींचीं चरितें संस्कृत कवींनी वर्णिलेलीं आहेत.[६]

पारतंत्र्याच्या काळात अशा प्रकारे परकीय सत्ताधाऱ्यांचे गुणवर्णन करणारीं काव्ये लिहिणाऱ्या कवींना समाजात प्रतिष्ठा मिळणे सर्वतोपरी अशक्यच. काव्यविषय झालेल्या परकीय राजाने प्रसन्न होऊन त्यांना धनमानाचा काहीसा लाभ कदाचित् करून दिला असेल, पण समाजाच्या दृष्टीने त्यांची ही साहित्यसेवा

---

४. "रघुनाथभूपालीयम्"—ले कृष्णकवि १७ वे शतक (मुद्रित)। 'शरभविलासकाव्यम्'—ले अक्कानारायणसुत जगन्नाथ कवि। १८ वे शतक। 'नायकवाडयन्वयकाव्यम्'—ले वर्मूति रामशास्त्री। १९ व शतक (मुद्रित)। 'जयनगरपञ्चरङ्गम्'—ले मल्लभट्ट हरिवल्लभ (मुद्रित) या काव्यात जयपूर राज्याचा इतिहास वर्णिलेला आहे.

५. 'राजविनोदकाव्यम्'—(ले रामदासशिष्य, प्रयागदत्तपुत्र, एवढाच लेखकाच्या नावाचा उल्लेख आढळतो.) सात सर्गांच्या या काव्यात सुलतान महंमद नावाच्या गुर्जर यवननृपतीचे चरित्र कवीने वर्णिलेले आहे 'विरुदावलि.' लेखक अज्ञात जहांगिर बादशहाचे चरित्र हा या काव्याचा वर्ण्यविषय आहे.

६. 'विजयिनीकाव्यम्'—(मुद्रित) ले श्रीधरभट्टाचार्य. व्हिक्टोरिया राणीचे चरित्र या काव्यात वर्णिलेले आहे 'जॉर्जचरितम्' (मुद्रित) ले श्री. जी पद्मनाभ कवि पंचम जॉर्ज बादशहाचे चरित्र हा या काव्याचा विषय. 'देहलीमहोत्सवकाव्यम्' (मुद्रित)—ले श्रीनिवास विद्यालंकार।

कर्णीमोल्याची ठरली असेल तर त्यात आश्चर्य नाही. त्याचा ग्रंथाच अध्ययन तर दूरच राध वाचनसुद्धा कोणी जिज्ञासापूर्तीसाठी केले असेल तर नवल. मुसल्मानी पारतंत्र्याच्या काळात ज्या शूरवीरांनी स्वातंत्र्यप्राप्तीसाठी लोकोत्तर अद्भुत पराक्रम गाजविला, त्यांची चरित्रें स्वयंप्रेरणेने लिहिणारे तत्कालीन संस्कृत साहित्यिक दुर्दैवाने फारसे आढळत नाहीत. याला उज्ज्वल अपवाद एकच व तो म्हणजे शिवभारतकार कवींद्र परमानंद. पण हाहि ग्रंथ कवीन्द्राने शिवाजी महाराजांच्या प्रेरणेवरून लिहिला, असे त्याच्याच उल्लेखावरून दिसते. एवढ्या मोठ्या पहिलवान जगन्नाथाला "असफविलास" रचविता आला, पण प्रतापसिंहाच्या पराक्रमावर एक श्लोक देखील लिहिण्याची बुद्धि त्याला झालेली दिसत नाही. इंग्रजी सत्तेच्या काळात व्हिक्टोरिया, पंचमजॉर्ज यासारख्या सत्ताधाऱ्यांचे चरित्र गाणाऱ्या कवींना त्याच काळात भारताच्या स्वातंत्र्यासाठी संग्राम करणाऱ्या अनेक देशभक्तांपैकी एखाद्याचेहि चरित्र संस्कृत काव्याच्या रूपात लिहिण्याची बुद्धि होऊ नये, हे आश्चर्य नव्हे काय ? पारतंत्र्याच्या प्रदीर्घ काळात रामकृष्णादिक दैवतांच्या चरित्रावर आधारलेली महाकाव्ये लिहिणाऱ्या संस्कृत कवींच्या अंतःकरणावर रामायण, भारत, भागवताचा प्रभाव फारच मोठा होता, असे फार तर म्हणता येईल. पण त्या काळात त्यांच्या उपास्य दैवतांसारखेच लोकोत्तर गुण प्रकट करणारे महापुरुष डोळ्यांपुढे असताना त्यांच्या चरित्रावर त्यांनी काव्यलेखन करू नये ही वस्तुस्थिति त्या कवींच परिस्थिति–पराङ्मुखत्व दाखविते. तरी पण थोडा सहानुभूतीने विचार केल्यास या दैवत चरित्रात्मक काव्य लिहिणाऱ्या कवींचे समर्थन करता येईल. आजच्या काळात महापुरुषांच्या चरित्राची साधने जितक्या अधिक प्रमाणात उपलब्ध होतात, त्या प्रमाणात त्यांच्या काळात ती उपलब्ध नव्हती, म्हणून चरित्रसाधनांच्या अभावी अत्यंत प्रसिद्ध पुरुषांची चरित्रे देखील त्यांच्या प्रतिभेला रचविता आली नाहीत व म्हणूनच त्यांनी तीच ती प्राचीन दैवतचरित्रे आपल्या प्रतिभेच्या आविष्कारासाठी अवलंबिली असे म्हणता येईल.

## दैवतचरित्रात्मक महाकाव्यें

सांगितल्याप्रमाणे रामायण, भारत व भागवत या तीन लोकोत्तर ग्रंथांच्या दृढ संस्कारामुळे अर्वाचीन काळातील बहुसंख्य साहित्यिकांनी प्राचीन काळच्या कालिदास, भारवि, माघ, हर्ष या महाकवींच्या पावलावर पाऊल टाकून रामायण, भारतातील विभूतींच्या चरित्रावर आधारलेली बहुसंख्य महाकाव्ये निर्माण केली. कालिदासादिकांसारखे महाकाव्य न लिहिले तर आपली प्रतिभा व पांडित्य व्यर्थ असेच जणु त्यांची धारणा झाली होती. त्यामुळे रामकृष्णादिक दैवतांच्या चरित्रावर आधारलेली

कितीतरी महाकाव्ये (प्रकाशित व अप्रकाशित) आजवर संस्कृतात लिहिली गेली. त्या सर्वांची परिगणना करणे सुद्धा अशक्य आहे. प्रस्तुत प्रबंधात सर्व ग्रंथांचा उल्लेख करणे शक्यहि नाही व तो आमचा उद्देशहि नाही. तथापि या अत्यंत लोकप्रिय विषयावर लिहिण्यात आलेल्या काही ग्रंथांचा संक्षिप्त परिचय देणे आवश्यक आहे. तेवढ्यावरून अर्वाचीन संस्कृत साहित्यमंदिरातील या दालनाची काहीशी कल्पना येऊ शकेल.

## १७ व्या शतकांतील कांही रामचरित्रें

**रामायणसारसंग्रह**.—१७ व्या शतकाच्या आरंभकाळी अप्पय्य दीक्षित या नावाचे एक महान् संस्कृत पण्डित दक्षिण भारतात होऊन गेले. वेलोरच्या चिन्नबोम्म नामक राजाच्या आश्रयास अनेक वर्षे राहून, तेथे भरपूर धनमानाची प्राप्ति झाल्यानंतर अप्पय्य दीक्षित इ. स. १५८६ ते १६१३ या काळात पेनुकुंड नगरामध्ये वेंकटदेव राजाच्या (हा विजयनगरचा राजा होता) आश्रयास राहिले. त्यानंतर तिरुमल नायकाने विनंती केल्यावरून ते पाण्ड्य देशात रहावयास गेले. शेवटी इ. १६१६ साली चिदम्बरम् येथे त्यांचे देहावसान झाले.[1]

अप्पय्य दीक्षितांनी आपल्या ७२ वर्षांच्या आयुष्यात विविध विषयांवर एकूण एकशेचार ग्रंथ लिहिले. त्यांपैकी चित्रमीमांसा व कुवलयानंद हे दोन साहित्यशास्त्रविषयक ग्रंथ सर्वत्र विशेष प्रसिद्ध आहेत. जगन्नाथ पंडित व अप्पय्य दीक्षित यांच्या पारस्परिक संबंधात काही दंतकथाहि प्रसिद्ध आहेत. श्रीरामचंद्राच्या चरित्रावर **रामायणसारसंग्रह**, **रामायणतात्पर्यनिर्णय**, **रामायणतात्पर्यसंग्रह**, **रामायणसारस्तवः** हे प्रमुख ग्रंथ अप्पय्य दीक्षितांनी लिहिलेले आहेत.

तंजावरचा नायकवंशीय अधिपति रघुनाथ (१७ वे शतक) हा एक श्रेष्ठ प्रतीचा संस्कृत पंडित होता. त्याने लिहिलेल्या ग्रंथामध्येहि 'रामायणसारसंग्रह' याच नावाचा आणखी एक ग्रंथ आढळतो.[2]

**'रामायणकाव्यम्'**—वर उल्लेखिलेल्या रघुनाथ नायक राजाच्या आश्रयास 'मधुरवाणी' या नावाची एक कवयित्री होती. राजाच्या आदेशानुसार तिने "रामायणकाव्यम्" नामक एक १४ सर्गांचे महाकाव्य लिहिले.[3]

**मञ्जुभाषिणी**—'रत्नखेट' या नावाने प्रसिद्ध असलेल्या श्रीनिवास दीक्षित यांच्या राजचूडामणि नामक पुत्राने "मञ्जुभाषिणी" या नावाची रामकथा एका दिवसात लिहिली. यातील प्रत्येक अक्षर श्लेषगर्भ आहे हे या ग्रंथाचे वैशिष्ट्य.[4]

---

१. पृ. १४२–१४३ ३. पृ. १४७।

२ पृ. १४६। ४. पृ. १५२।

**रामयमकार्णव** व **रामचंद्रोदयम्**—कान्चीवरम् जवळ आरसालई नावाचे एक गाव आहे. तेथे श्रीनिवासमुत वेंकटेश नामक एक महाकवि झाला. त्याने इ० स० १६५६ साली यमकमय प्रस्तुत काव्य लिहिलें. याच कवीने **रामचन्द्रोदयम्** या नावाचें ३० सर्गाचे दुसरें एक रामचरितात्मक महाकाव्य लिहिलेलें आहे[5], १९व्या शतकात चिदम्बरनिवासी वेंकटकृष्ण नामक एका कवीने 'रामचन्द्रोदयम्' याच नावाचे एक महाकाव्य लिहिलेले आहे.

**रामविलासकाव्यम्**—१७ व्या शतकाच्या शेवटी रामचन्द्रतर्कवागीश-याने प्रस्तुत काव्य लिहिले असून त्या व्यतिरिक्त साहित्यदर्पणावर वृत्ति लिहिली आहे. श्रीनिवासमुत वरदादेशिक यानेहि **गद्यरामायणम्**, **रघुवीरविजयम्**, **रामायण संग्रहः** हीं रामचरितविषयक काव्यें लिहिलीं आहेत.[6]

## १८ वें शतक

**राघवचरितम्**—तंजोरच्या सरफोजी भोसल्याच्या आश्रयास असलेल्या आनन्दनारायण नावाच्या कवीने प्रस्तुत १२ सर्गाचे काव्य लिहिलें आहे. हा आनन्दनारायण कवि 'पद्यरत्नकवि' या नावाने प्रसिद्ध होता. कवीने आपलें हें काव्य आश्रयदात्याच्या नावाने प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न केला. म्हणून सरफोजी भोसले हेच या काव्याचे लेखक होते, असा कित्येकांचा ग्रह आहे. एवढें काव्य लिहिण्याइतकी विद्वत्ता सरफोजीजवळ निश्चित होती, म्हणूनच हा समज रूढ झाला होता.

**राघवीयम्**—अठराव्या शतकात केरळमध्ये रामपाणिवाद या नावाचा विख्यात संस्कृत साहित्यिक झाला. त्याने प्रस्तुत 'राघवीयम्' हें २० सर्गाचे महाकाव्य लिहिलें आहे. याच कवीने 'उषानिरुद्धम्' व 'कंसवहो' हीं दोन उल्लेखनीय प्राकृतकाव्यहि केलीं आहेत.[7] '**रामचरितम्**'—त्रावणकोरचा युवराज रामवर्मा ( १८ १९ शतक ) याने हें १२ सर्गाचे महाकाव्य लिहिले आहे.[8]

## १९ व २० वें शतक

**रामायणसंग्रह**—मद्रासच्या पचयप्पा संस्कृत कॉलेजचे प्राध्यापक महामहोपाध्याय लक्ष्मण सूरि यांनी हा ग्रंथ लिहिला.

**सीतारामाभ्युदयम्**—विजगापट्टण जिल्ह्यातले रहिवासी गोपालशास्त्री यांनी प्रस्तुत काव्य लिहिले. वाराणसीच्या हिंदुविश्वविद्यालयाचे प्राध्यापक काली

५ पृ १५६। ६ पृ २४२।
७. रामपाणिवादाचे सर्वच ग्रंथ मुद्रित आहत ८. पुण्यात मुद्रित.

किंवर ठाकुर याचे पुत्र श्रीअन्नदाचरण ठाकुर यानी **रामाभ्युदयम्** हें काव्य लिहिले. नागपुरचे गंगाधरकवि यानी गीतगोविंदाप्रमाणे **संगीतराघवम्** हें काव्य लिहिले. जयपुर राज्यातल्या लक्ष्मणगड येथील ऋषीकुलामध्ये राहणारे कवीन्द्र परमानन्द शर्मा यानी संपूर्ण रामचरित्र, **मंथरादुर्विलसितम्, दशरथ-विलाप**, **मारीचवधम्, मेघनादवधम्, रावणवधम्** इत्यादि निरनिराळ्या काव्यामध्ये विभागून लिहिलेले आहे. सूर्यनारायणाध्वरी यांचे **सीता परिणयम्** कामराजकवींचे **सीतास्वयंवरम्** व काशीनाथकवींचे **वैदेही-परिणयम्**' हीं काव्ये सुद्धा रामचरित्रपरच आहेत. शिवरामकृत **हनुमत्काव्यम्** **हनुमद्विजयम्**, **रावणपुरवधम्**, या काव्याचा विषयहि पर्यायाने रामायणपरच आहे. **सुरेन्द्रचरितम्** या काव्यात रामचरित्रातील अहिल्यो द्धाराची कथा वर्णिलेली आहे." माडभाषि कृष्णमाचार्यांनी आपल्या 'हिस्टरी ऑफ संस्कृत लिटरेचर' या महाप्रबंधात शेकडो रामचरित्रपर काव्यांचा उल्लेख केलेला आहे. त्यातील काही काव्यांची नामावली पहा. या यादीवरून रामचरित्र हा संस्कृत कवींचा किती आवडता विषय होता याची कल्पना येईल.

| रामचरित्रात्मक काव्य | लेखक |
|---|---|
| चित्रबन्धरामायणम् | —वेंकटमखी (१७ वे शतक) |
| जानकीपरिणयः (८ सर्ग मुद्रित) | —चक्रकवि, (१७ वें शतक) |
| सीतादिव्यचरितम् | —श्रीनिवास, ( वरदवल्लीनराज, श्रीमुष्णग्राम वासी ।) (१७ वे शतक) |
| गद्यरामायणम् | —श्रीनिवासपुत्र वरदादेशिक (१७ वें शतक.) |
| रघुवीरविजयम् | —श्रीनिवासपुत्र वरदादेशिक (१७ वें शतक.) |
| रामायणसंग्रहः | —श्रीनिवासपुत्र वरदादेशिक (१७ वें शतक.) |
| रामकुतूहलम् | —गोविंदसुत रामेश्वर ( १७ वे शतक ) |
| रामचरित्रम् | —रघुनाथ. |
| उदारराघवम् | —चण्डीसूर्य कवि. |
| कल्याणरामायणम् | —शेषकवि. |
| भद्रादिरामायणम् | —वीरराघव. |
| रामकथासुधोदयम् | —शैल श्रीनिवास |
| रामामृतम् | —वेंकटेश. |
| यादवराघवीयम् ( द्वर्थी काव्य ) | —नरहरि. |

९. मद्रास युनिव्हर्सिटी जर्नल पृ. १८९। १०. पृ. ३०४।
११. पृ. २५३।

| | |
|---|---|
| रघुवीरचर्यचरितम् | —तिरुमलकोणाचार्य. |
| दशाननवधम् (मुद्रित) | — योगीन्द्रनाथ. |
| रघुवीरचरितम् | —सुकुमार. |
| सीतारामविहारः | —लक्ष्मणसोमयाजी (ओरगटी शंकरसुत.) |
| रामगुणाकरः | — रामदेव. |
| रामचरितकाव्यम् | —पद्मनाभ (१९ वे शतक.) |
| रामविलासः | —रामचंद्र. |
| रामविलासः | —हरिनाथ. |
| रामचंद्रकाव्यम् | —शम्भुदासशिष्य. |
| प्रसन्नरामायणम् | —श्रीपादपुत्र देवदीक्षित. |
| रामचंद्रोदयम् | —कविवल्लभ |
| रामचरितम् | —विश्वक्सेन. |
| रामोल्लासः | —अद्वैतरामभिक्षु. |
| रामोल्लासः | —पूज्यपाद देवानंद. |
| बालराघवीयम् | —शठगोपाचार्य. |
| रमणीयराघवम् | —ब्रह्मदत्त. |
| अभिरामकाव्यम् | —रामनाथ. |
| रामकुतूहलम् | —गोविंदसुतरामेश्वर (१७ वे शतक.) |
| रामकौतुकम् | —रामकृष्णसुत कमलाकर. |
| रामकथामृतम् | —गिरिधरदास. |
| रामगुणाकरः | —रामदेव न्यायालंकार. |
| रामविलासकाव्यम् | —रामचंद्रतर्कवागीश (साहित्यदर्पणवृत्तिकार.) |
| रामविलासकाव्यम् | —हरिनाथ. |
| रामचरितम् | — काशीनाथ. |
| रामचरितम् | —मोहनस्वामी |
| रामलीलोद्योत. | —प्राणेश्वरसुत रमानाथ. |
| रामाभिषेकम् | —केशव. |
| रामकाव्यम् | — रामानंदतीर्थ. |
| रामाभ्युदयम् | —वेंकटेश. |
| शितिकण्ठरामायणम् | —शितिकण्ठ. |
| रघुवीरविलासम् | —दामोदरसुत लक्ष्मण |
| रघुपतिविजयम् | —गोपीनाथ. |
| रामचन्द्रोदयम् | —पुरुषोत्तम मिश्र. |
| रामचन्द्रोदयम् | —रामदास |

| | |
|---|---|
| रामचन्द्रमहोदय | —सच्चिदानंद. |
| रामकाव्यम् | —बालकृष्ण. |
| रामरत्नाकरः | —मधुव्रत. |
| रामरसामृतम् | — श्रीधर. |
| रामचन्द्रोदयम् | —कविवल्लभ. |
| रघुनंदनविलासम् | —वेंकटाचार्य. |
| रघुनंदनविलासम् | —पानाचार्य. |
| विक्रमराघवीय | —नूतनकालिदास. |
| पौलस्त्यराघवीयम् | —रामचन्द्र (पुल्लेलवंशीय.) |
| श्रीरामविजयम् | —अरुणाचलनाथ-शिष्य. |
| बालरामरसायनम् | —कृष्णशास्त्री. |
| रामायणसारसंग्रहः | —ईश्वर दीक्षित. |
| ललितराघवम् | —श्रीनिवास रथ. |
| जानक्यानंदबोधः | —श्रीपति गोविंद. |
| सीतारामाभ्युदयम् | —गोपालशास्त्री (विजागापट्टण) १८५३-१९२८ |

आधुनिक काळांतील संस्कृत साहित्यिकांनी केलेला हा रामचरित्राचा प्रचण्ड विस्तार पाहून कोणालाहि आश्चर्य वाटल्यावाचून राहणार नाही. "चरितं रघुनाथस्य शतकोटिप्रविस्तरम्" हें वचन असल्या प्रकारच्या रामचरित्राचा आश्रय झालेला विस्तार पाहून खरें वाटू लागते व या पुढील काळांतहि युगानुयुगें रामचरित्र असेंच गायिलें जाईल, याची खात्री वाटू लागते.

## श्रीकृष्णचरित्रें

रामचरित्राप्रमाणेच श्रीकृष्णचरित्राचाहि प्रभाव संस्कृत साहित्यांत अखण्डितपणे दिसून येतो. जितक्या विविध प्रकारांनी रामचरित्र संस्कृत साहित्यिकांनी गायिलेलें आहे. तितक्याच प्रकारांनी त्यांनी श्रीकृष्णचरित्रदेखील गायिलें आहे. त्यांतहि विशेष गोष्ट आढळते ती ही की प्रायः ज्या कवींनी रामचरित्रें लिहिलीं त्याच कवींनी कृष्णचरित्रात्मक काव्येंहि लिहिलेलीं आहेत. तंजावरनरेश रघुनाथ नायकानें "रामायणसारसंग्रहः" हें काव्य लिहिलें त्याचप्रमाणे कृष्णचरित्रावर **पारिजातहरणम्, अच्युतेन्द्राभ्युदयम्, रुक्मिणीकृष्णविवाहम्** हीं कृष्णचरित्रपर महाकाव्येंहि लिहिलीं आहेत.[१२] राजचूडामणीनें प्रत्येकी १० सर्गांचे

१२. पृ. १४६। १३. १५२।

**रुक्मिणीकल्याणम्** व **कंसवधम्** ही दोन काव्ये लिहिली" अठराव्या शतका तल्या रामपाणिवादाने केरळच्या रामवर्म नृपतीच्या आदेशानुसार **मुकुंदस्तवः** नावाचे काव्य लिहिले. महामहोपाध्याय लक्ष्मणसूरींनी (१९ वे शतक) **कृष्णलीलामृत** लिहिले या व्यतिरिक्त गोपालदासाचा पुत्र गंगादास या वैश्य कवींने **अच्युतचरित्रम्** हे १६ सर्गांचे महाकाव्य लिहिले. जीवगोस्वामींनी **माधवमहोत्सवम्** मानदेवाने **कृष्णचरितम्** सदानन्दाने **व्रजेन्द्रचरितम्** पद्मनाभभट्टाने **गोपालचरितम्** इत्यादि कृष्णचरित्रपर काव्य लिहिलेली आढळतात.

कृष्णचरित्रातील विविध घटनांपैकी रुक्मिणीस्वयंवर, रासक्रीडा, गोपासंगे विलासपूर्ण विषय संस्कृत कवींनी प्रामुख्याने काव्यासाठी निवडलेले दिसतात. श्रीकृष्णाच्या जीवनात विलासाप्रमाणेच शौर्याचे व राजनीतिकुशलतेचे अनेक प्रसंग आहेत, पण त्यावर काव्यरचना करण्याचा प्रयत्न संस्कृत कवींनी केल्याचे फारसे दिसत नाही. संस्कृत कवींच्या शृंगारनिष्ठेमुळे त्यांनी आपल्या उपास्य दैवताच्या चरित्रातूनहि शृंगारिक प्रसंग निवडूनच काव्यरचना केलेली दिसते"

रामचरित्राप्रमाणेच कृष्णचरित्राला वाहिलेल्या महाकाव्यांची नामावली पुढीलप्रमाणे आहे—

| कृष्णचरित्रात्मक काव्य | लेखक |
|---|---|
| रुक्मिणीशविजयम् | —वादिराज (कर्नाटकवासी) (हा कवि विजयानगरच्या विनाशकाली झाला.) |
| यादवविजयम् | —कुन्जुकुथानतांपिरन् । (१८ वे शतक) |
| रुक्मिणीस्वयंवरप्रबंधः | —वेंकटाथिकोडमानीय नम्बुद्रिपाद |
| सन्तानगोपालकाव्यम् | —कडथानतयेड्वालात (१९ वे शतक) |
| श्रीरासमहाकाव्यम् माथुरम् | —गुरुप्रसन्नभट्टाचार्य (ढाका वि. विद्यालय व हिंदु वि. वि. येथे संस्कृत प्राध्यापक) |
| राधाविनोदम् | —जनार्दनसुत रामचन्द्र (या काव्यावर त्रिलोकीनाथ व भट्टनारायण यांच्या टीका आहेत.) |
| कृष्णाभ्युदयम् | —वरदाचार्यसुत येल्यवल्ली श्रीनिवासाचार्य |
| कृष्णाभ्युदयम् | —अप्पादीक्षसुत वरदादेशिक |
| कृष्णभक्तिचंद्रिका | —अनंतदेव |

१४. रुक्मिणीपरिणयम् ले—लक्ष्मण गोविंद "रुक्मिणीपाणिग्रहणम्" ले—गोविंदास्वरवाणी (मुद्रित), 'सत्यभामापरिणयम्" ले— रामाचार्य पृ. २५३।

कृष्णचरितम्, कृष्णविनोदम् —मोतीराम
कृष्णक्रीडा, कृष्णभावनामृतम् —केशवार्क
कृष्णचरितम् —मानवेद
कृष्णलीला —मदन
कृष्णविलासः —प्रभाकर
कृष्णविलासः —शेषदीक्षित
कृष्णचन्द्रोदयः —श्रीनिवाससुत गोविंद
गोविंदलीला (मुद्रित) —रामचद्र
ऐश्वर्यकादम्बिनी —विद्याभूषण
विलापकुसुमाञ्जली —यदुनन्दनदास।
कृष्णभक्तिकाव्यम् —अनंतदेव।
भागवतोद्योत —चित्रभानु
कृष्णभूषणम् —दत्तात्रेय
कृष्णविलास —पुण्यकोटी
कृष्णाभ्युदय —तिम्मयज्वा
कृष्णाभ्युदयः —वरदराजयज्वा
मुकुंदविलासः —नीलकण्ठ
प्रेमेन्दुसागर —रूपगोस्वामी
राधामानतरङ्गिणी —नन्दकुमारशर्मा
श्रीकृष्णचरितम् —शिवदत्तत्रिपाठी (प्रस्तुत लेखकासंबंधी अधिक माहिती या प्रकरणात इतरत्र दिलेली आहे.)
राधारसमञ्जरी —चैतन्यचन्द्र
राधारससुधानिधिः —हितहरिवंश गोस्वामी
राधारहस्यम् —कृष्णदत्त
राधाविनोदम् —दिनेश
राधासौन्दर्यमञ्जरी —गुमालचन्द्राचार्य
कृष्णविजयः —रामचद्र
गोपाललीला —रामचन्द्र
वृन्दावनमञ्जरी —मानसिंह
वृन्दावनविनोद —न्यायवाचस्पति रुद्र
म[illegible]विहारः (मुद्रित) —श्रीधरस्वामी
[illegible]चरितम् —[illegible]
मुकुंदविलास —रघुनाथतीर्थ
हरिलीला —बोपदेव

| | |
|---|---|
| हरिकेलिलीलावती | —कविकेसरी |
| हरिविलासः | —यशोदाचंद्रसुत कविशेखर |
| कृष्णलीला | —कृष्णमिश्र |
| कृष्णलीला | —कृष्णसुत मदन |
| कृष्णलीलातरङ्गिणी | —नारायणतीर्थ |
| गोपालचरितम् | —पद्मनाभभट्ट |
| मधुकेलिवल्ली | —गोवर्धन |
| चमत्कारचन्द्रिका | —कविकृष्णरूप |
| रासकल्पलता | —मोहनानन्द |
| रासकल्पसारतत्त्वम् | —वृन्दावनदास |
| रासकृष्णमाधुरी | —अनन्यदासस्वामी |
| वासुदेवचरितम् | —वेणीदत्त |
| बालहरिचरम् | —शंकरनारायण |
| कंसनिधनम् | —राम |
| कृष्णामृततरङ्गिका (मुद्रित) | —वेंकटेश |
| गोपालविजयः | —गिरिसुंदरदास |
| कृष्णोदन्तः | —भास्कर |
| सुन्दरदामोदरम् | —लोलम्बराज |
| कृष्णभावनामृतम् (मुद्रित) | —विश्वनाथ |
| कृष्णविजयः | —शंकराचार्य |
| कृष्णायनम् (सात सर्ग) | —भारद्वाज |
| कृष्णकथारहस्यम् | —शिंग्रेशंगार ( या कवीने श्रीकृष्णराजचम्पू, यदुशैलचम्पू, चित्रकूटोद्यान यमककाव्य इ० अवांतर काव्ये लिहिली आहेत. )[15] |
| द्रौपदीवस्त्रहरणम् | —गोवर्धन |
| नरकासुरविजयम् | —माधवामात्य |
| गोवर्धनधृत्-कृष्णचरितम् | —जयकान्त |
| सुदामचरितम् | —श्रीनिवास |
| कुचेलवृत्तम् | —भट्टनारायण |

संस्कृत कवींची रामभक्ति व कृष्णभक्ति किती अपार होती याची कल्पना येण्यास वरील काव्यांच्या नामावली पुरेशा आहेत. या व्यतिरिक्त याच विषयावर लिहिलेले बरेच काव्यग्रंथ उपलब्ध आहेत, पण त्यांच्या लेखकांची नावे आढळत

१५. कृ. २५४

नाहीत. आपल्या कृतींत नामोल्लेख न करता निर्माण करण्याच्या परंपरेला अनुसरूनच त्या लेखकांनी आपल्या नावाचा उल्लेख केला नसावा असे दिसत. असल्या प्रथाची यादी पुढीलप्रमाणे आहे.

रामचरित्रें—रामविलास, आश्चर्यरामायणम्, सीताराघवीयम्, रामाभ्युदय तिलकम्, सीतारामविनयम्, सीतापतिविजयम्, उत्तरराघवीयम् इत्यादि.

कृष्णचरित—कृष्णार्जुनीयम्, यदुनाथचरितम्, कृष्णलीलाभूषणम्, कृष्ण लीलासार, कृष्णविलासचरितमहार्णव, कृष्णचरितामृतम्, कृष्णभावनामृतम्, कृष्णामृतमहार्णव, मञ्जविलास, बालभागवतम्, भागवतामृतम्, गोविन्दचरितम्, राधासुधाकर, गोपालविवेक, रासरसोत्य, हरिवंशकाव्यम्, श्रीकृष्णचरितम् व गोविन्दोन्माद इत्यादि.

## शैव काव्यें

धार्मिक श्रद्धेचा साहित्यावर परिणाम होतो याचे प्रत्यंतर वैष्णव आणि शैव *या सम्प्रदायाच्या लेखकांनी आपापल्या श्रद्धेय विषयावर सम्प्रदायानुकूल अशी* जी विविध काव्य लिहिलीं त्यावरून येतं. साधारणपणे वैष्णव कवींनी आपल्या काव्यासाठी विष्णूचे अवतार असलेले राम व कृष्ण हे नायक व त्यांच्या चरित्रातील प्रसंग निवडले, तर शैव कवींनी भगवान शंकराचा शैव पुराणातून वर्णिलेले श्रीशंकराचे चरित्र व त्यातील प्रसंग निवडले असे म्हणता येईल या शिवचरित्रपर महाकाव्याची परंपरा कालिदास व भारवि यानी सुरू केली कालिदासाचे ' कुमार सम्भवम्' व भारवीचे " किरातार्जुनीयम्" हीं काव्यें आदर्श ठेऊन अनेक शिवभक्तांनी काव्य लिहिलीं आहेत त्यातील काहींचा संक्षिप्त परिचय पुढीलप्रमाणे आहे

**शितिकण्ठविजयकाव्यम्**—१७ व्या शतकातील 'अभिनवभवभूति' म्हणून प्रसिद्धीस आलेल्या 'रत्नखेट' श्रीनिवास दीक्षिताने प्रस्तुत महाकाव्य लिहिले आहे.

**शिवलीलार्णव**—१७ व्या शतकातील नीलकण्ठ दीक्षित कवीने २२ सर्गांच्या *या महाकाव्यात मदुरेच्या हालास्यनाथाचें आख्यान वर्णिलेले आहे. हा नीलकण्ठ दीक्षित, अप्पय्या दीक्षित म्हणून प्रसिद्ध होता.*

**नटेशविजयकाव्यम्**—१७ व्या शतकातील वेंकटाद्रिसुत वेंकटकृष्ण यज्वा याने हें ७ सर्गांचें काव्य लिहिलें असून त्यामध्ये चिदम्बरच्या नटेशाचे विलास वर्णिलेले आहेत "

---

१६ इ २४१ |

**चन्द्रशेखरचरितम्**--वाराणसीच्या दुर्गमदत्त नावाच्या कवीने (१८ वे शतक) हें काव्य लिहिलें आहे.[17]

भगवान् शंकराच्या कथेतील शंकरपार्वतीविवाह हा अनेक कवींचा विशेष आवडता विषय दिसतो. कालिदासाच्या कुमारसम्भवामुळे त्या विषयावरच काव्य करण्याची प्रेरणा मिळाली असण्याची विशेष शक्यता आहे.

शिवपार्वती-विवाहविषयक काही काव्यांचा परिचय पुढीलप्रमाणे आहे.

**पार्वतीपरिणयम्**—ईश्वरसुमति नावाच्या कवीने कुमारसम्भवासारखेंच ८ सर्गांचे प्रस्तुत काव्य लिहिलें आहे.[18]

**उमापरिणयम्**—'मित्रगोष्ठी' नामक संस्कृत मासिक पत्रिकेचे संपादक विधुशेखर भट्टाचार्य (१९-२० शतक) यांनी हें काव्य लिहिलें असून तें मुद्रित आहे. या व्यतिरिक्त चंद्रकांत तर्कालंकारविरचित **सतीपरिणयम्** (मुद्रित) गोविन्दनाथविरचित **गौरीकल्याणम्**, कवि चन्द्रशेखर-कृत 'शिवचरितम्',[19] राजानक गोपालकृत 'शिवमाला',[19] महालिंगकवि-कृत 'लिङ्गलीलाविलास चरितम्', उमापतिधर-कृत—'चन्द्रचूडचरितम्', वृन्दावनशुक्ल-कृत—'शाम्ब चरितम्' आणि 'गौरीचरितम्', बकटसुब्बाकृत-'गंगाधरविजयम्' इत्यादि शिवकथात्मक काव्यांतून शैव कवींची प्रतिभा पल्लवित झालेली आहे.

शैवपुराणांतून भगवान् शंकराविषयीं ज्या विविध अद्भुतरम्य कथा आढळतात, त्यांच्या आधारें लिहिण्यात आलेल्या काही काव्यांची संक्षिप्त नामावली पुढीलप्रमाणे आहे—

| काव्य | कवि |
|---|---|
| गंगावतरणम् (८ सर्ग) | —अय्या दीक्षित (नीलकण्ठ दीक्षित) |
| मीनाक्षीपरिणयम् (१८ सर्ग) | — रामनाथसुत मल्यकवि |
| कामाक्षिविलासम् | — ,, |
| तारकासुरवधम् | — ,, |
| कुमारीविलसितम् (कन्याकुमारीची कथा) | —सुन्दरसेन |
| कुमारविजयम् | —रामसूरि |
| बाणविजयम् | —शिवराम |
| नन्दिचरितम् | —कृष्णकवि |

१७ कृ ३५१। १८ कृ २५३। १९ कृ २५४

| | |
|---|---|
| प्रजापतिचरितम् | — ,, |
| गौरीचरितम् | —वृन्दावन शुक्ल ('सुदामचरितम्' चा लेखक) |
| गंगावतरणम् | —शंकरकवि |
| मार्कण्डेयोदयम् | —वेंकटसूरि |
| कार्तिकेयविजयम् | —गीर्वाणेन्द्रयज्वा |
| कुमारविजयम् | —शिवचरणरेणु |
| सतीविलासकाव्यम् (मुद्रित) | —कृष्णमूर्ति |
| शंकरीगीतम् | —कृष्णचन्द्रसुत जयनारायण |

## वैष्णवकाव्यें

भगवान् विष्णूच्या दशावतारांपैकी राम आणि कृष्ण हे दोन अवतार अत्यंत लोकप्रिय व कविप्रिय आहेत, हें त्यांच्या चरित्रांवर लिहिलेल्या महाकाव्यांच्या (पृ. २९, ३०, ३१ व ३२ वर दिलेल्या) प्रदीर्घ नामावलीकडे पाहून सहज लक्षांत येते. विष्णूच्या इतर अवतारांसंबंधीं लिहिलेल्या काव्यांची संख्या फारशी मोठी नाही, तरी पण विषयपूर्तीच्या दृष्टीने त्यांचा परिचय देणें आवश्यक आहे. वैष्णव पुराणांतील विष्णुसंबंधीं वेगवेगळ्या अद्भुतरम्य कथांवर लिहिलेलीं कांहीं काव्यें पुढीलप्रमाणे आहेत—

| काव्यें | लेखक |
|---|---|
| लक्ष्मीनारायणचरितम् | —श्रीनिवासपुत्र वरदादेशिक (१७ वे शतक)[20] |
| भू-वराहविजयम (८ सर्ग) वराहविजयम् | —श्रीनिवासकवि (मुष्णग्रामवासी वरदवल्ली कुलोत्पन्न–वरदपुत्र) |
| विष्णुविलसितम् ८ सर्ग | —कुन्जुनी नम्बियार रामपाणिवाद. प्रस्तुत काव्यांत विष्णूच्या दहाहि अवतारांच्या कथा वर्णिल्या आहेत. |
| वेंकटेशचरितम् | —तंजावरचे नृपति तुकोजी भोसले यांचा मंत्री घनश्याम (१८ वें श०) याने प्रस्तुत महाकाव्य लिहिले असून, त्यामध्ये तिरुपतीच्या वेंकटेश्वराची कथा वर्णिलेली आहे. हा घनश्याम कवि 'आर्यक' या नांवाने प्रसिद्ध असून त्याने एकूण ६४ ग्रंथ लिहिले आहेत.[21] |

---

२०. कृ. २५४। २१. कृ. १५४।

श्रीनिवासगुणाकरकाव्यम् —कासंद निवासी वाग्भास्कर वंशातल्या वेंकटरायाचा पुत्र 'अभिनव-रामानुजाचार्य' याने हें १७ सर्गांचें महाकाव्य लिहिलें आहे. हा कवि 'मायावादि मतङ्गज-कण्ठीरवाचार्य' म्हणून प्रसिद्ध होता.[22] प्रस्तुत महाकाव्याच्या पहिल्या ८ सर्गांची टीका स्वतः कवीनेंच लिहिली असून उरलेल्या सर्गांची टीका त्याचा बंधु वरदराज याने लिहिली.

यांव्यतिरिक्त राघवाचार्यकृत व रघुनाथकृत **इंदिराभ्युदयम्** या एकाच नावाचीं दोन काव्यें, लक्ष्मीधरकृत **चक्रपाणिकाव्यम्**, रुद्रभट्टकृत **जगन्नाथविजयम्**, श्रीधरपुत्र त्र्यम्बककृत **श्रीनिवासकाव्यम्**[23] हीं भगवान् विष्णुविषयक काव्यें उल्लेख करण्यासारखीं आहेत. काही विष्णुभक्तांचीं चरित्रेंहि वैष्णवकवींनी वर्णिलीं आहेत. त्यांपैकी कृष्णनाथाचें **प्रह्लादविजयम्**, जयकान्ताचें **ध्रुवचरितम्**, **प्रह्लादचरितम्** व **अजामिलोपाख्यानम्** यांसारखीं काही काव्यें उल्लेखनीय आहेत.

## महाभारतीय काव्यें

भगवान् व्यासांचें महाभारत म्हणजे पाचवा वेदच. अशा प्रकारचा अलौकिक ग्रंथ जगात कोठेहि आढळत नाही. एकूण महाभारताचा संस्कार अखिल भारतीय जनतेच्या अंतःकरणात फार खोलवर रुजला आहे. "इदं कविवरैः सर्वैराख्यानमुपजीव्यते", या व्यासवचनानुसार प्रायः सर्वच संस्कृत कवींनी महाभारताचा व्यासंग आपल्या प्रतिभासाधनासाठी केला असला तरी रामायण व भागवत यांपासून स्फूर्ति घेऊन जितक्या मोठ्या प्रमाणात काव्यलेखन झालें, तसें महाभारताच्या आधारें झालेलें दिसत नाही. राम व कृष्ण यांचें चरित्रगायन केल्याने पुण्यप्राप्ति होते, अशी श्रद्धा दृढमूल झालेली आहे. महाभारतातल्या धर्म, भीम, अर्जुन या आदर्श सत्पुरुषांचें चरित्रगायन केल्यास तशा प्रकारची पुण्यप्राप्ति होते, अशी श्रद्धा समाजात नसल्याने त्यांच्या संबंधी काव्यें लिहिण्यात आलीं नसावींत, असें आम्हास वाटतें. महाभारतातील उपाख्यानांवर आधारलेल्या काव्यांची संख्या सुद्धा म्हणावी तितकी मोठी नाही. महाभारतासंबंधी अर्वाचीन काळात लिहिण्यात आलेलीं काही काव्यें पुढीलप्रमाणे आहेत.

**एकदिनप्रबन्ध** अष्टूरिकुलोत्पन्न गंगाम्बा व यज्ञेश्वर यांचा पुत्र सूर्यनारायण याने हें ४ सर्गांचें काव्य लिहिलें व त्याने एका दिवसात संपूर्ण केलें म्हणून त्याला

---

२२ कृ २४४। २३ कृ २५४।

'एकदिनप्रबन्ध' हें नाव मिळालें.[२४]

'प्रासभारतम्'–ले. विश्वनाथपुत्र सूर्यनारायण.[२५]

✓ 'कर्णार्जुनीयम्'–ले. कवीन्द्र परमानन्द (२० वें शतक) स्थान–लक्ष्मण गड ऋषिकुल.

'महाभारतसंग्रहः' व 'भीष्मचरितम्', (गद्यप्रबन्ध)–ले. म. म. लक्ष्मणसूरि (प्रा. पचय्यप्पा संस्कृत कॉलेज, मद्रास).

'विक्रमभारतम्' (कलकत्ता येथें मुद्रित)—ले. श्रीधर विद्यालंकार.

'अभिनवभारतम्'—ले. नरसप्पा मनी.

'पाण्डवविजयम्' (मुद्रित)—ले. कविभूषण हेमचन्द्राचार्य.

'पाण्डवचरितम्'—ले. लक्ष्मीदत्त.

याव्यतिरिक्त चित्रभानुविरचित **भारतोद्योत, पाण्डवाभ्युदयम्** व **तरुणभारतम्**[२६] हीं तीन काव्यें विशेष उल्लेखनीय आहेत.

महाभारताच्या अनेक उपाख्यानांपैकीं नलोपाख्यानावर आधारलेलीं काव्यें अधिक दिसतात. याला कारण "कर्कोटकस्य नागस्य दमयन्त्या नलस्य च। ऋतुपर्णस्य राजर्षेः कीर्तनं कलिनाशनम्" या प्रातःस्मरणीय श्लोकांत सांगितल्याप्रमाणें नलचरित्र हें राम कृष्णाच्या चरित्राप्रमाणेंच 'कलिताप हारक' आहे, अशी श्रद्धा. दुसरें कारण म्हणजे श्रीहर्षाचें विख्यात नैषधीय चरितम्, हें महाकाव्य साहित्यिकांच्या अध्ययनांत असल्यामुळें त्यापासून स्फूर्ति घेऊनहि अनेक कवि नलोपाख्यानविषयक काव्यें लिहिण्यास उद्युक्त झाले असावेत. नलोपाख्यानविषयक कांहीं प्रसिद्ध काव्य पुढीलप्रमाणें आहेत.

**नलाभ्युदयम्**—१७व्या शतकांतील तंजावरचा राजा रघुनाथनायक यानें प्रस्तुत महाकाव्य लिहिलें.[२७]

**प्रतिनैषधम्**–१७व्या शतकांतील विद्याधर व लक्ष्मण या दोन कवींनी मिळून हें महाकाव्य लिहिलें.[२८] प्रस्तुत महाकाव्याच्या नावावरून कवींना कोठून प्रेरणा मिळाली, तें स्पष्ट लक्षांत येतें.

**उत्तरनैषधम्**–१९व्या शतकाच्या पूर्वार्धात कोचीन नरेशाच्या आश्रयास राहणाऱ्या, श्रीदेवी व नीलकण्ठ यांचा पुत्र वन्दारुभट्ट, यानें श्रीहर्षाच्या नैषध

२४. पृ १५६। २५ पृ १५६। २६. पृ २५०।

२७ पृ १४५। रघुनाथ नायकाच्या इतर काव्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. २८. पृ. ८१।

चरिताचें अनुकरण करण्याच्या उद्देशानेच हे १६ सर्गांचें महाकाव्य लिहिलें. कवीनें श्रीहर्षाचें अनुकरण करताना त्याचें क्लिष्टत्व टाळले, हे उल्लेख करण्यासारखे आहे."

**सारशतकम्**–जयपुरचे सभापण्डित कृष्णराम यांनी केलेला श्रीहर्षाच्या नैषधकाव्याचा सक्षेप, हें या काव्याचें स्वरूप आहे.[30]

**आर्यानैषधम्**—मद्रासचे पण्डित नरसिंहाचार्य (२० वे शतक) यांनी केलेला नैषधकाव्याचा आर्यात्मक संक्षेप म्हणजे प्रस्तुत काव्य होय.

महाभारतातील उपाख्यानांपैकी सावित्रीच्या उपाख्यानावर जामनगरचे शीघ्रकवि शंकरलाल (इ. स. १८४४ ते १९१६) यांनी **सावित्रीचरितम्** हें काव्य लिहिलें असून त्या व्यतिरिक्त चन्द्रप्रभाचरितम्, ध्रुवाभ्युदयनाटकम्, गोपाल चिन्तामणि., अनसूयाभ्युदयम् इत्यादिक अवान्तर संस्कृत ग्रंथ लिहिले आहेत. श्रीशंकरलाल हे काठियावाड राज्यातील रावजीराज संस्कृत पाठशाळेत अध्यापक होते."

संपूर्ण संस्कृत साहित्यावर अतिप्राचीन काळापासून वैदिक वाङ्मयाचा व विचारसरणीचा सखोल संस्कार झालेला आहे. वैदिक मतानुयायी सर्वच महाकवींनी आपल्या साहित्यातून 'श्रुतिस्मृतिपुराणोक्त' धर्मविचाराचा परिष्कार केलेला आहे. शृंगारिक कवींच्या संस्कृत काव्यातून रंगविलेला शृंगारसुद्धा 'धर्माविरुद्ध' (धर्माला अनुकूल) आढळतो. युद्धवर्णनातून सुद्धा धर्मयुद्धाचे नियम काटेकोरपणे पाळलेले आढळतात. नायकादिकांच्या जीवनातील जातकर्म, विवाह इत्यादि संस्कारांचीं वर्णनेंसुद्धा 'श्रुतिस्मृतिपुराणोक्त' धर्मानुसारच आढळतात. म्हणून असें म्हणावेसें वाटतें की या संस्कृत महाकवींनी साहित्यनिर्मिति करताना आपल्या असामान्य प्रतिभेचा जसा आविष्कार केला, तसाच त्यातून 'श्रुतिस्मृतिपुराणोक्त' धर्माचा पुरस्कारहि केलेला आहे. संस्कृत कवींच्या या धर्मनिष्ठतेमुळेच धर्माचरणी नृपति व साधुसंत त्यांच्या काव्याचे विषय झाले. पुराणातली सर्वच आख्यानें व उपाख्यानें सनातन-धर्माचे विविध सिद्धान्त प्रस्फुट करण्यासाठीच लिहिलीं आहेत. म्हणून त्या आख्यानावर

---

२९. कृ. ८०।

३०. या कृष्णरामानें आर्यालंकारशतकम्, चन्द्रचरितमण्डनम्, कच्छवंशम् व जयपुरविलासम् हीं अवांतर काव्यें लिहिलीं आहेत

३१. कृ. ३५४।

किंवा राम, कृष्ण, विष्णु, शिव, हरिश्चन्द्र, प्रह्लाद, ध्रुव, मार्कण्डेय, अंबरीष, नल, युधिष्ठिर, सावित्री, अनसूया यांसारख्या अनेक पौराणिक विभूतींच्या चरित्रांवर आधारलेलीं महाकाव्यें अतिप्राचीन काळापासून संस्कृत कवींनी लिहिलीं व त्यांचा मार्ग चोखाळणाऱ्या आधुनिक काळांतील अनेक कवींनीहि त्याच धर्तीचीं महाकाव्यें आजवर अव्याहतपणे लिहिलेलीं आहेत. त्यांतील विषयाची निवड प्रत्येक कवीनें आपापल्या श्रद्धेनुसार केली, हें उघडच आहे. तथापि सर्वांच्या श्रद्धेचें मूळ स्वरूप एकच व ते म्हणजे, राम, कृष्ण इ० परमेश्वराच्या अवतारांचीं चरित्रें गायिल्याने जशी पुण्यप्राप्ति होते, तशीच पौराणिक व ऐतिहासिक पुण्य पुरुषांचीं चरित्रें गायिल्यानेहि होते हें होय. याच श्रद्धेने संस्कृत साहित्य क्षेत्रांतील हा पवित्र प्रवाह आजवर अखण्डित राहिला आहे व यापुढेहि तो तसाच अखण्डित राहील, अशी आशा करूं या.

---

## प्रकरण ४ थें

# साधुजनांचीं चरित्रें

संस्कृत साहित्यिकांना देवतांच्या चरित्राइतकींच साधुपुरुषांचीं चरित्रें प्रिय आहेत. भगवान बुद्धाचें चरित्र महाकाव्यरूपानें लिहून महाकवि अश्वघोषानें साधुपुरुषांचीं चरित्रें काव्यबद्ध करण्याचा मार्ग प्रथम प्रवर्तित केला. आपल्या भारत-वर्षांत भक्ति-ज्ञान-कर्म मार्गानुसार आत्मोद्धार व लोकोद्धार साधणारे असंख्य सत्पुरुष होऊन गेले. त्यांपैकीं कित्येकांचीं चरित्रें त्यांच्या प्रतिभावंत भक्तांनी व वंशजांनी लिहिलेलीं आहेत.[1] तीं सर्व सत्पुरुषांचीं चरित्र महाकाव्यांच्या पद्धतीस अनुसरून अलंकारप्रचुर भाषेमध्ये लिहिलीं आहेत. त्यांतून चरित्रनायकाच्या जीवनांतील घटनांपेक्षा लेखकाचें काव्यनिर्माणसामर्थ्यच प्रामुख्यानें अभिव्यक्त होतें. पाश्चात्य साहित्याच्या संपर्कानें प्रचलित झालेली आधुनिक चरित्र लेखन पद्धति संस्कृत साहित्यिकांना (इतर प्रादेशिक भाषांतील साहित्यिकांप्रमाणेच) अपरिचित होती. त्यामुळे अर्वाचीन संस्कृत साहित्यांत उपलब्ध होणारे आरंभीचे ग्रंथ महाकाव्यांच्या परंपरेंत अंतर्भूत होतात. मुख्यतः ते सर्व काव्यग्रंथच असून त्यांतून चरित्राचा बोध आनुषंगिकपणें होतो. नगर, प्रासाद, उद्यानें, वनें, उपवनें, ऋतु, समुद्र, सरिता इत्यादिकांच्या वर्णनांतून भरपूर अतिशयोक्ति आढळून येते. चरित्रवर्णनामध्ये मुद्दा नायकाच्या बाललीला, विवाह, क्वचित् तीर्थाटन व विशेषतः चमत्कार यांच घटनांचा उपयोग बहुतेक सर्व चरित्रग्रंथांत रसपरिपोषासाठी केलेला आढळतो. त्यांच्या वास्तवतेकडे कवींचें लक्ष असल्याचें दिसत नाही. बहुतेक सर्व कवि या

---

[1] शंकराभ्युदयम्—ले. रत्नखेट-श्रीनिवास-कविपुत्र राजचूडामणि, १७ वे शतक. जगद्गुरु शंकराचार्यांचे चरित्र ६ सर्गांच्या या काव्यात वर्णिलेले आहे.

सुमतीन्द्रजयघोषणा—तंजावरचे अधिपति शहाजि राजे यांच्या सभेंत सुमतीन्द्र भिक्षु नावाचे एक विद्वान जैन साधु होते त्यांचा शिष्य वेंकटनारायण याने आपल्या गुरूंचे चरित्र प्रस्तुत काव्यात वर्णिलेले आहे

सत्यनाथाभ्युदयम्—माध्वसम्प्रदायातील द्वैत सिद्धान्तवादी सत्यनाथ तीर्थ यांचे चरित्र. ले० संकर्षणसुत-शेषाचार्य

इत्यादिक साऱ्यांच्या वर्णनातून आपलें असाधारण भाषाप्रभुत्व किंवा कल्पनाकौशल्य प्रदर्शित करण्याच्या ईर्षेस पेटलेले दिसतात.

वस्तुत सत्पुरुषांचीं चरित्र हीं "रामादिवत् वर्तितव्यम् न रावणादिवत्" या मम्मटोक्तीस अनुसरून लोकांवर सच्चारित्र्याचे संस्कार व्हावयाशाठी लिहावयाचीं असतात. रामकृष्णादिक वीरांच्या चरित्राच अवगाहन करणाऱ्या सामान्य मनुष्याच्या अंतःकरणात सुद्धा शौर्यधैर्यादि श्रेष्ठ भाव उद्दीपित होतात, त्याप्रमाणे साधुपुरुषांच्या चरित्राच परिशीलन करणाऱ्या नीरस व नास्तिक वाचकाच्या हृदयात भगवद्भक्ति अंकुरित होते व अनीतिमान् लोकाना सुद्धा त्याच्या संस्कारामुळे नीतिमार्गानुसार जीवन जगण्याची प्रेरणा मिळते. चरित्रवाङ्मयाच हे सामर्थ्य स्वत सिद्ध आहे. पण जुन्या काळीं मुद्रणकलेच्या अभावीं, काव्यात्मक चरित्रग्रथ लिहिणारे पारपरिक साहित्यिक आपले चरित्रग्रथ बहुधा 'स्वान्त सुखाय' लिहीत असत. लोकजागृति किंवा तत्त्वोपदेश यासारखें उद्दिष्ट त्याच्या काव्यात्मक चरित्रलेखनामागे असल्याच बहुधा दिसत नाही. मुद्रण कलेच्या प्रचारानतर निर्माण झालेल आधुनिक संस्कृत साहित्यिकाचें चरित्रवाङ्मय हें बहुधा लोकजागृतिपर असल्याचें दिसत. जुन्या लेखकानी मात्र प्राधान्यकरून चरित्रनायका विषयीची आपली भक्ति–भावना व्यक्त करण्याकरीताच लेखन केलेल दिसून येत. इदूरचे श्रीपादशास्त्री हसूरकर यानी विसाव्या शतकाच्या पूर्वार्धात जीं पृथ्वीराज, प्रतापसिंह, शिवाजी, रामदास, नानक, गोविंदसिंह इत्यादिकाचीं गद्यचरित्र लिहिलीं[२] त्यामध्ये हा लोकजागृतीचा आपला हेतू त्यानी स्पष्ट शब्दात लिहिला आहे.[३] त्याच काळात प्रकाशित झालेल्या स्वामी भगवदाचार्यकृत 'भारतपारिजातम्' (२६ सर्ग) अखिलानन्दशर्मकृत 'दयानन्ददिग्विजयम्' (२१ सर्ग प्रकाशित), आचार्य मेधाव्रतकृत 'दयानन्ददिग्विजयम्' (२७ सर्ग, प्रकाशित), यासारख्या पद्यकाव्यात्मक चरित्रग्रथामध्ये लोकजागृति हाच आपला हेतू आहे, हे त्या लेखकानी स्पष्ट शब्दात सागितलेल आहे मुद्रणकलेच्या प्रचारामुळे साहित्यिकाच्या अन्तःकरणात आपल्या साहित्याच्या द्वारा लोकजागृति करण्याची प्रेरणा प्रामुख्याने उद्दीपित झाली. मुद्रणकलेच्या अभावीं तशी शक्यता नसल्यामुळे, त्या काळातले लेखक केवळ 'स्वान्त सुखाय' किंवा पाण्डित्यप्रदर्शन किंवा चरित्र नायकविषयक श्रद्धा, यासारख्या प्रेरणेने लेखन करीत असतील तर त्याबद्दल त्याच्यावर दोषारोप करणें योग्य नाही. जुन्या परपरेंतील अर्वाचीन संस्कृत चरित्रग्रथात जे गुण किंवा दोष आपणास दिसतात तेच या काळातील प्रादेशिक भाषातल्या चरित्रग्रथांतहि आढळतात. अठराव्या शतकातील महिपती या मराठी लेखकाने भक्तविजय, संतविजय, संतलीलामृत यासारखे जे चरित्रग्रथ लिहिले, त्यामध्ये, संस्कृत चरित्र

२. 'भारतनररत्नमाला' सरस्वती निवास, रामबाग, इदूर.

३ याच ग्रथातील प्रकरण १, पृ ८–९ पाहा

लेखकामध्ये आढळणारी भाविकता किंवा सत्पुरुष-गुण-गायनाची प्रवृत्ति प्रकट झालेली दिसते. गेल्या शतकातल्या अनेक मराठी लेखकांनी पिटर धी ग्रेट, ड्यूक ऑफ वेलिंग्टन्, कॅप्टन कुक यासारख्या परकीय थोर पुरुषांचीं चरित्रें लिहिलीं पण त्यामध्ये उपरिनिर्दिष्ट लेखकांची भाविकता किंवा भाषा, अलंकार इत्यादिकांचें सौंदर्य मुळीच आढळत नाही. १९व्या शतकाच्या उत्तरार्धांत (इ. स. १८७० ते ७५) श्री. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी आपल्या तेजस्वी लेखणीने अखिल महाराष्ट्रांत स्वत्वाभिमान उद्दीपित केला. त्यांच्या प्रभावामुळे शिवाजी, बाजीराव, रामदास, एकनाथ, नाना फडणवीस, महादजी शिंदे, ब्रह्मेंद्र स्वामी यासारख्या महाराष्ट्राला ललामभूत झालेल्या ऐतिहासिक वीरांचीं व साधूंचीं चरित्रें ग्रन्थाच मोठ्या प्रमाणांत मराठींत लिहिलीं गेलीं. पण त्या ऐतिहासिक सत्पुरुषाच्या समकालीन मराठी विद्वानांनी त्यांचीं चरित्रें लिहिल्याच कोठे दिसत नाही. लोकमान्य टिळकांच्या निधनानंतरच्या काळांत (गांधीयुगांत) आत्मगौरवाच्या भावनेने उद्दीपित झालेल्या अनेक प्रांतिक भाषांतल्या लेखकांनी समकालीन थोर पुरुषांचीं चरित्रें लिहिलीं. त्यांतील सर्वच चरित्र साहित्यिकदृष्ट्या प्रशंसनीय नाहीत. तरी पण त्या चरित्र ग्रंथांनी प्रादेशिक भाषांतील चरित्रवाङ्मय एकदम मोठ्या प्रमाणांत समृद्ध झालें. या चरित्रग्रंथांनी तत्कालीन इतिहासाचा फार मोठा गूढ भाग प्रकाशांत आला आहे.

## आत्मचरित्रें

चरित्रवाङ्मयामध्ये आत्मचरित्रात्मक ग्रंथ लिहिण्याची प्रवृत्ति ही सर्वथा आधुनिक आहे. प्राचीन महाकवींनी सर्गांच्या किंवा ग्रंथाच्या शेवटीं केवळ आपल्या नांवाचा निर्देश कलावसा केलेला आढळतो. वेद, उपनिषदांसारखे जगातले आद्यग्रंथ हे त्यामध्ये लेखकाचा नामनिर्देश नसल्यामुळे अपौरुषेयच गणले जातात. भास, कालिदास, भवभूति यासारख्या श्रेष्ठ साहित्यिकासंबंधीं त्यांच्या नावाव्यतिरिक्त कोणतीहि अविकृत चरित्रात्मक माहिती उपलब्ध होत नाही. त्या महाकवींनी स्वान्तसुखासाठी किंवा पुण्यप्राप्तीसाठी उपास्य दैवतांचीं, श्रद्धेय साधुपुरुषांचीं किंवा राजे महाराजे यांचीं चरित्रें महाकाव्याच्या पद्धतीने लिहिलीं, त्यांनी आपल्या चरित्राविषयी स्वतःच्या ग्रंथामध्ये २–४ तुरळक वाक्य कोठेतरी लिहून ठेवलीं आहेत. आज लोकप्रिय झालेली आत्मचरित्र लेखनाची पद्धति भास–कालिदासादिकांच्या काळापासून आमच्या देशात प्रचलित असती तर, प्राचीन भारताच्या संस्कृतीची किंवा भारताच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक इतिहासाची केवढी तरी उद्बोधक माहिती आजवर उपलब्ध झाली असती !

आत्मचरित्रलेखनामध्ये आत्मस्तुतीचा दोष असतो, असा लोकांचा आरोप आहे. "कोणताहि साधारण किंवा असाधारण लेखक स्वतःच्या "दोषांचें

प्रामाणिक चित्रण किंवा चिकित्सा करू शकत नाही. स्वत चे गुण प्रकाशात आणणे व दोषावर पांघरुण घालणें ही मानवाची नैसर्गिक प्रवृत्ति आहे त्यामुळे कोणतेंहि - आत्मचरित्रपर लिखाण स्वगुणवर्णनपर व स्वदोषविवर्जित असें होईल व त्यामुळे तें सदोष गणलें जाईल. महात्मा गांधींनीं 'माझे सत्याचे प्रयोग' या नावाचे स्वत च्या गुणदोषाचे यथावत् निवेदन करणारें उत्कृष्ट आत्मचरित्र लिहिले आहे. अशा प्रकारचें प्रामाणिक आत्मचरित्र सहसा आढळून येत नाही. मराठी भाषेत लक्ष्मीबाई टिळक, रमाबाई रानडे, दादोबा पांडुरंग, विठ्ठल रामजी शिंदे, स्वातंत्र्यवीर सावरकर, धर्मानंद कोसंबी, न. चिं. केळकर यासारख्या थोर पुरुषांनी लिहिलेलीं आत्मचरित्रें फारच चित्तवेधक आहेत. पण मराठींतहि आत्मचरित्र लेखनाचा हा प्रकार अगदींच आधुनिक आहे. १८व्या शतकापर्यंत किंबहुना १९व्या शतकाच्या मध्यापर्यंत साहित्यसेवकांनी किंवा इतरांनी भारतामध्यें आत्मचरित्र लिहिल्याचें फारसें आढळत नाही. अशा प्रकारें प्रादेशिक भाषामध्यें देखील जो वाङ्मयप्रकार अत्यल्प प्रमाणात आढळतो, तो परंपरानिष्ठ संस्कृत साहित्यात न आढळला तर त्यात आश्चर्य नाही. इ० १९५० साली मलबारच्या तपोवन स्वामींनी लिहिलेलें व त्रिचूर येथे प्रकाशित झालेलें **ईश्वरदर्शनम्** किंवा **तपोवनदर्शनम्** या नावाचें एक उल्लेखनीय आत्मचरित्र आढळतें. आंध्रनिवासी कोरड रामचंद्र कवि यानी आत्मचरित्रपर **स्वोदयकाव्यम्** लिहिलें असें कळतें पण तें प्रकाशित झाल्याचें कळलें नाही.

दैवतचरित्रें व राजचरित्र या विषयावर प्राचीन परम्परेस अनुसरून उत्तरकालीन संस्कृतकवींनी जें विविध प्रकारचे काव्यलेखन केलें, त्याची कल्पना मागील प्रकरणातील उल्लेखावरून सहज येईल. उपास्य दैवताप्रमाणेच ज्याच्या ठिकाणी जनतेची दृढश्रद्धा असते, अशा साधुसंताच्या चरित्रावर काव्य लिहिण्याची परंपरा विख्यात बौद्ध कवि अश्वघोष याने बुद्धचरितम् हें महाकाव्य लिहून सुरू केलेली दिसते. अशा प्रकारची सत्पुरुषाच्या चरित्रावर काव्य लिहिण्याची परम्परा जैन, शाङ्कर, माध्व इत्यादि विविध सम्प्रदायातील विद्वान कवींनी आपापल्या सम्प्रदायाच्या आचार्यांचीं व इतरहि सत्पुरुषाचीं चरित्रे लिहून अव्याहतपणे चालविलेली दिसते. या परम्परेतील ग्रंथाची संख्या बरीच मोठी आहे. त्यातील प्रमुख ग्रंथाचा परिचय पुढीलप्रमाणे आहे —

**शङ्कराभ्युदयम्**—१७ व्या शतकांतील रघुनाथभूपविजयम् इ. काव्यांचा प्रसिद्ध लेखक राजचूडामणि यांच्या संबंधींची थोडी माहिती मागील प्रकरणांत आलीच आहे. 'शङ्कराभ्युदयम्' या महाकाव्यांत जगद्गुरु आद्यशंकराचार्य यांचे चरित्र राजचूडामणीने वर्णिलेलें आहे. त्यातील आरंभीचे ६ सर्ग 'सहृदया'

नामक संस्कृत मासिक पत्रिकेंत क्रमशः प्रसिद्ध झालें आहेत. याच राजचूडामणीनें **रत्नखेटविजयम्** या नांवानें आपल्या पित्याचें चरित्र लिहिलेलें आहे. राजचूडामणीचा[5] पिता श्रीनिवास दीक्षित हा १७व्या शतकामध्यें 'अद्वैताचार्य', 'षड्भाषाचतुर', 'अभिनवभवभूति' इ० उपाधींनी प्रसिद्धीस आला होता. त्याला आश्रय देणाऱ्या चोलवंशीय राजानें त्याला 'रत्नखेट' अशी पदवी दिली होती. राजचूडामणिप्रमाणेच आपल्या पित्यांचीं किंवा पूर्वजांचीं चरित्रें बऱ्याच कवींनी भक्तिभावानें लिहिलेलीं आहेत. त्यांचा परिचय प्रस्तुत प्रकरणांत यथाक्रम येईलच. श्रीनिवास दीक्षितासंबंधीं सविस्तर माहिती पुढील एका प्रकरणांत येईल.

श्रीशंकराचार्यांच्या चरित्रासंबधीं उपलब्ध असलेले प्राचीन व अर्वाचीन ग्रंथ पुढीलप्रमाणे आहेतः—*

बृहत्शंकरविजयः—ले. चित्सुखाचार्य.

शंकरविजयः—ले. आनंदगिरी (अनन्तानन्दगिरी)

शंकरविजयः—ले. विद्याशंकर किंवा शंकरानन्द.

संक्षेपशंकरविजयः—ले. माधवाचार्य (विद्यारण्य).

शंकराचार्यचरितम्—ले. गोविंदनाथ.

शंकरविजयविलासः—(चिद्विलासयती व विज्ञानकण्ठतपोधन यांचा संवाद).

शंकराचार्यदिग्विजयः—ले. वल्लीसहाय.

शंकरदिग्विजयसारः—ले. सदानन्द.

**गुरुपरम्पराप्रभावः**—तिरुपति देवस्थानचे शिलालेखाधिकारी विजयराघवाचार्य यांनी लिहिलें.

**शङ्करगुरुचरितसङ्ग्रहः**—कुम्भकोणंच्या शंकरमठांतील अध्यापक पंचपागेश शास्त्री यांनी लिहिलें.

**वाल्मीकिचरितम्**—वाल्मीकीच्या चरित्रावर लिहिलेलें एवढें एकच काव्य संस्कृत साहित्यांत उपलब्ध असून त्याचा लेखक तंजावरचा विद्वान् लेखक रघुनाथ नायक हा होय.[6]

**तातार्यवैभवप्रकाशम्**[7]—ले० रामानुजदास आणि **लक्ष्मीकुमारोदयम्** (मुद्रित) लेखक रंगनाथकवि, या दोघांनी आपापल्या काव्यामध्यें कुम्भकोणच्या लक्ष्मीकुमारताताचार्य नामक सत्पुरुषाचें चरित्र वर्णिलेलें आहे.

काञ्चीवरम् पीठाचे आचार्य पञ्चमतभञ्जन तातादेशिक हे लक्ष्मीकुमार ताताचार्यांचे गुरु होते (१६-१७ शतक). विजयानगरचे श्रीरंग व वेंकटपति

५. कृ. १५२। ६. कृ. १४६। ७. कुम्भकोणं येथे मुद्रित। * कृ. २७०-२७१।

यांच्या कारकीर्दीत हे लक्ष्मीकुमार ताताचार्य, त्यांचे मन्त्री व गुरु होते लक्ष्मीकुमारांना 'कोटिकन्यादान' ही पदवी असंख्यकन्यांचें दान केल्यामुळे मिळाली होती असें म्हणतात. लक्ष्मीकुमारोदय काव्याचा लेखक रंगनाथ हा चरित्रनायकाचा वंशज होता.

**वादिराजवृत्तरत्नसंग्रह**—ले०—रघुनाथ.[८] प्रस्तुत काव्याचा नायक वादिराज हा विजयानगर साम्राज्याच्या विनाशकाली कर्नाटकातील एक महाकवि होता. त्याने 'रुक्मिणीशविजयम्', 'सरसभारतीविलासम्' (मुद्रित), 'तीर्थप्रबन्ध' (मुद्रित) 'एकीभावस्तोत्रम्' 'दशावतारस्तुति' इत्यादि काव्य लिहिलीं असून तीं सर्व मुद्रित झालेलीं आहेत. रघुनाथकवीने अशा या कवीचे चरित्र प्रस्तुत काव्यात वर्णिलेले आहे.

**सत्यनाथमाहात्म्यरत्नाकर**—लेखक अज्ञात, **सत्यनाथाभ्युदयम्**—ले० सवर्णगुरु शेषाचार्य, **सत्यनाथविलसितम्**—ले. श्रीनिवास. या तीन्ही काव्यामध्ये माध्वसम्प्रदायी व द्वैतसिद्धांतवादी श्रीसत्यनाथतीर्थ यांचें चरित्र कवींनी वर्णिलेलें आहे श्रीसत्यनाथतीर्थ हे इ. स. १६७४ मध्ये दिवंगत झाले.[९]

विद्याप्रियगुणविलासम्—ले० सेतुमाधव

राघवेन्द्रविजयम्—ले० नारायणकवि

सत्यनिधिविलासम्—ले० श्रीनिवासकवि.

सत्यबोधविजयम्—ले० कृष्णकवि.

सेतुराजविजयम्—ले० अज्ञात.

या पाच काव्यामध्ये माध्वसम्प्रदायाच्या वेगवेगळ्या आचार्यांचीं चरित्र वर्णिलेलीं आहेत.[१०]

श्रीवल्लभाचार्यांच्या चरित्रावर गोपालदासाचे **वल्लभाख्यानम्**[११] नाथू सीताराम शास्त्री यांचे **वल्लभदिग्विजयम्**[१२] आणि मागे उल्लेखिलेल्या श्रीपाद शास्त्री हसूरकरांचें गद्यात्मक **श्रीवल्लभाचार्यचरितम्**[१३], हे तीन ग्रंथ उपलब्ध आहेत.

**विजयोदयमाहात्म्यम्**—१७व्या शतकांतील तापगच्छनिवासी श्रीवल्लभ पाठक या कवीने प्रस्तुत २१ सर्गांच्या महाकाव्यामध्ये जैन साधु विजयदेवसूरि यांचें चरित्र वर्णिलेलें आहे. त्याचप्रमाणे जैनाचार्य सकलकीर्ति यांनी **सुदर्शनचरितम्**, **महावीरपुराणम्**, **श्रीपादचरितम्** व **वृषभानुचरितम्** हीं चार जैन साधुचीं चरित्र लिहिलेलीं असून तीं सर्व मुद्रित आहेत.

---

८. इ. २७१। ९ इ २१७। १० इ २१७।
११ मुद्रित। १२ मुद्रित। १३ मुद्रित।

**श्रीपूर्णानन्दचरितम्**—१९ व्या शतकातील निदर्भोतले, एक प्रसिद्ध साधु श्रीपूर्णानन्दस्वामी याचे प्रस्तुत ५० अध्यायांत चरित्र श्री. शेषाळकर शास्त्री यांनी लिहिले असून त्याचा मराठी अनुवादहि स्वतः लेखकाने केलेला आहे.[14]

**पतञ्जलिचरितम्**—आठ सर्गांच्या प्रस्तुत महाकाव्यात रामभद्र दीक्षित याने व्याकरण-महाभाष्यकार पतञ्जलीचे चरित्र वर्णिलेले आहे. हा कवि अठराव्या शतकातील तंजावरचे अधिपति सरफोजी भोसले, यांचा आश्रित होता तिरुवन्नुलर हें त्याच्या राहण्याचें ठिकाण होतें.[15]

**गुरुकल्याणम्**—ले.-नेल्लोरनिवासी वेदमूर्ति श्रीरामशास्त्री (१९-२० शतक)

प्रसिद्ध संस्कृत कवयित्री क्षमादेवी राव हिने **तुकारामचरितम्, रामदासचरितम्, ज्ञानेश्वरचरितम्** व **मीरालहरी** हीं संतचरित्रें लिहिलीं असून **शंकरजीवनाख्यानम्** या प्रथात लेखिकेने आपले विद्वान वडील श्री. शंकर पाण्डुरंग पंडित यांचे चरित्र वर्णिलेले आहे क्षमादेवीने लिहिलेली हीं सर्व चरित्रें स्वतः केलेल्या इंग्रजी अनुवादासह प्रकाशित झालीं आहेत.[16]

**शिववैत्यचरितम्**[17]—मुंबईचे विख्यात डॉ. श्री. व्यंकटराव मन्जुनाथ शेणिणी (B. A., M. B. B. S., F. R. C. S., Edin. साहित्यभूषण) यानी आपले पूर्वज साधु शिववैत्य, याचे चरित्र ६ उल्लासामध्ये प्रस्तुत काव्यात वर्णिलेले आहे. हे शिववैत्य साधु कारवार जिल्ह्यातील शेणिणी या गावीं राहत होते.

**दिव्यसूरिचरितम्**—गरुडवाहन पण्डित यानी या काव्यामध्ये अलवार सम्प्रदायातील १२ वैष्णव साधूंची चरित्र वर्णिलेलीं आहेत. श्रीअनंताचार्य यानींहि **प्रपन्नामृतम्** या काव्यात काही अलवार सम्प्रदायी वैष्णव साधूंची चरित्रें लिहिलीं आहेत.

**श्रीदीक्षितेचन्द्रचरितम्-महाकाव्यम्**—मद्रास विद्यापीठाच्या संस्कृत विभागाध्यक्ष डॉ. वे. राघवन् यांनी प्रस्तुत महाकाव्यात श्री. मुत्तुस्वामी दीक्षित यांचे चरित्र आधुनिक पद्धतीने वर्णिलेलें आहे श्री मुत्तुस्वामी दीक्षित हे मोठे योगी असून त्यानी कर्नाटकी सम्प्रदायानुसार संस्कृत भाषेमध्ये शेकडो संगीत ' गीत ' लिहिल्या होत्या इ. स. १९५५ सालीं मद्रासमध्ये श्रीकान्ची कामकोटी

---

१४ संस्कृत भवितव्यम् ३४३। १५. पृ १६०।

१६ प्राप्तिस्थान-जे सी चॅटर्जी अँण्ड को, ८ भूपेन्द्र बोस अँव्हेन्यू, कलकत्ता

१७ प्राप्तिस्थान-पॉप्युलर बुकडेपो, लॅमिंग्टन रोड, मुंबई ७

पीठाच्या शंकराचार्यांच्या अध्यक्षतेखाली प्रस्तुत काव्याचे प्रकाशन झालें, त्यावेळीं जगद्गुरूंनी डॉ. राघवन् याना 'कविकोकिल' ही पदवी समर्पण केली.

**विद्वच्चरित्रपञ्चकम्**—वाराणसीच्या सरस्वतीभवन ग्रथालयाचे भूतपूर्व अध्यक्ष, साहित्याचार्य नारायणशास्त्री खिस्ते यानी काशीच्या पाच पण्डितांचीं चरित्रें प्रस्तुत प्रबन्धात लिहिलेलीं आहेत.

**सत्यध्याननिजयम्**—श्रीनिवासाचार्यसुत केशवकवीने ५ सर्गांच्या प्रस्तुत काव्यात सत्यध्यानस्वामींचें चरित्र लिहिलें असून, सत्यध्यानाष्टकम् नावाचें एक स्तोत्रहि लिहिलें आहे.[१८]

शंकराचार्य व वल्लभाचार्यांप्रमाणेच रामानुजाचार्यांचा सम्प्रदायहि भारतात सर्वत्र पसरलेला आहे. श्रीरामानुजाचार्यांच्या चरित्रासबधीं पुढील ग्रथ आढळतात [१९]

'रामानुजचरितचुलकम्'—ले. रामानुजदास. 'यतीन्द्रचम्पू'—ले. शठगोपसुत वकुलाभरण. 'रामानुजविजयम्'—ले. अन्नैयाचार्य. श्रीभाष्यकारचरितम्—ले. कौशिकवेंकटेश. 'श्रीशैलकुलवैभवम्'—ले. नृसिंहसूरि. याव्यतिरिक्त 'रामानुज-दिव्यचरितम्' रामानुजीयम् व "रामानुजचरितम्" ही काव्य उपलब्ध आहेत, पण त्यांच्या लेखकांचीं नावें अज्ञात आहेत.

**'धान्यकुमारचरितम्'**— ले. सकलकीर्ति. उज्जयिनीच्या धनपालनामक शीलसपन्न व्यापाऱ्याचा पुत्र धान्यकुमार याचे चरित्र प्रस्तुत काव्यात वर्णिलेलें आहे.

**'दुर्गानुग्रह-महाकाव्यम्'**[२०]— ले. पुल्य उमामहेश्वर शास्त्री. प्रस्तुत काव्यात पहिल्या ६ सर्गांमध्ये काशीच्या तुलाधार श्रेष्ठीचें चरित्र, ७-८-९ या तीन सर्गांत पुष्कर क्षेत्रातील समाधि नामक वैश्याचें चरित्र व ९ व्या सर्गापासून पुढे विजयवाड्याचे धनाढ्य व्यापारी गुण्टूरी वेकटरेड्डी याचें चरित्र लिहिलें आहे श्री. रेड्डींचें चरित्र 'मी धनलाभाच्या आशेने लिहीत आहे,' असें कवीने स्पष्ट सांगितलें आहे. याच उमामहेश्वर शास्त्रीने आध्रातील विद्वान् साधु कवीन्द्र वेल्लमकोण्ड रामराय याचे चरित्र १०८ श्लोकात (अस्रधारी छद) लिहिलें आहे.[२१]

---

१८. शारदा मुद्रणालय, बेळगाव येथे मुद्रित १९. पृ २१६

२० प्राप्तिस्थान—कवि तिलक ग्रथमाला विजयवाडा, आध्र

२१. वेल्लमकोण्ड रामरायाचे चरित्र प्रस्तुत प्रबधांत पुढे सविस्तर दिले आहे

'नानकचन्द्रोदयम्'—ले. देवराज व गंगाराव[११] आणि श्रीगुरुचरितामृतम् (इ. १९३३ मध्ये मुद्रित) हीं दोन श्रीगुरुसंबंधीं पुस्तकें संस्कृतांत उपलब्ध आहेत.

अशाच प्रकारचीं अनेक श्रद्धेय सत्पुरुषांचीं ल्हान मोठीं काव्यात्मक चरित्रें अर्वाचीन संस्कृत साहित्यांत आढळतात.

श्री. वासुदेव आत्माराम लाटकर, काव्यतीर्थ, यांनीं मुनर्दचे अनंत दिनाजी देसाई टोपीवाले यांच्या चरित्रावर **'अनंतचरितम्'** हा पद्यग्रंथ लिहिला असून, कोल्हापूरचे शाहु छत्रपति यांच्या चरित्रावर **'श्रीशाहु-चरितम्'** हा छात्रोपयोगी गद्यग्रंथ लिहिला आहे. यात्यतिरिक्त "अहिमहि-हननम्" "अर्थसरामर्षः" "पार्वती" "बलिदानम्", (श्री. न. चिं. केळकर यांच्या एका कादंबरीचा अनुवाद) व "राष्ट्रपतिचरितम्" हीं पुस्तकें सुबोध शैलींत त्यांनी लिहिलेलीं आहेत. श्री. लाटकरशास्त्री यांचीं सर्व पुस्तकें मुद्रित झालेलीं आहेत.

---

२२. इ. २२६

## प्रकरण ५ वें

# राजपुरुषांचीं चरित्रें

मागील प्रकरणांतून देवदेवता व पौराणिक विभूतींच्या संबंधी संस्कृत कवींनी लिहिलेल्या विविध महाकाव्यांचे स्वरूप कसें होतें, ते आपण पहिलें. उपास्य दैवतें व पौराणिक विभूति यांच्याप्रमाणेच साधुसन्त व राजपुरुष हेहि संस्कृत कवींच्या काव्यांचे विषय होते. ज्या महाकवींना त्यांच्या प्रतिभा, पाण्डित्य इत्यादि गुणांमुळे राजकवीचें किंवा सभापण्डिताचें स्थान प्राप्त झालें, त्यांनी आपल्या आश्रयदात्यांविषयीं कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी त्यांच्या चरित्रांवर महाकाव्यें लिहिलेलीं आढळतात. ज्यांना राजकृपा प्राप्त झाली नव्हती, अशा कित्येक कवींनी राजाचा कृपाकटाक्ष आपल्याकडे वळावा यासाठी काव्यरचना केली असेल, हेंहि संभवते. राजेमहाराजांप्रमाणे अनेक श्रेष्ठ राज्याधिकाऱ्यांच्या स्तुतिप्रीत्यर्थ अनेक महाकाव्यें व खण्डकाव्ये लिहिलेलीं आढळतात. राजघराण्यांतील कन्यापुत्रांच्या विवाहानिमित्त लिहिण्यात आलेल्या काव्यांची संख्याहि थोडी नाही. समाजातील उदार धनिकांच्या जीवनावर आधारलेलींहि काही काव्ये संस्कृतांत प्राचीन काळापासून आढळतात. राजपुरुषांच्या चरित्रावर लिहिण्यात आलेल्या अनेक काव्यांचे नायक ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाचे आहेत. समकालीन राजेमहाराजांच्या चरित्रावर काव्ये लिहिणाऱ्या कवींवर जसा लोभीपणाचा आरोप करतां येईल, तसा आरोप मृतकालीन विभूतींच्या चरित्रावर काव्ये लिहिणाऱ्या कवींवर करतां येणे शक्य नाही. "तद्गुणैः कर्णमागत्य चापलाय प्रचोदितः" या कालिदासाच्या उक्तिनुसार भूतकालीन महापुरुषांच्या शौर्यधैर्यादि लोकोत्तर गुणांमुळेच कालिदासाप्रमाणेच त्यांची प्रतिभा स्फुरित झाली. समकालीन आश्रयदात्या राजपुरुषावर काव्यग्रंथ लिहिण्याची परम्परा 'हर्षचरितम्' हे गद्यकाव्य लिहून बाणभट्टाने सुरू केली असें दिसते. बाणभट्टाच्या कादम्बरीतील विलक्षण भाषाशैलीमुळे जसा सम्पूर्ण संस्कृत साहित्यावर ठसा उमटला, तसा हर्षचरिताचा ठसा उमटल्याचें विशेष दिसत नाही. नाहीतर समकालीन राजपुरुषावर लिहिलेले संस्कृत ग्रंथ फार मोठ्या प्रमाणांत संस्कृत साहित्यांत उपलब्ध झाले असते, व त्यामुळे इतिहाससंशोधकांचें कार्य बऱ्याच मोठ्या प्रमाणांत सुकर झालें असतें. मागील प्रकरणात म्हटल्याप्रमाणे हे सर्वच (देवता व महापुरुषविषयक) चरित्र-

ग्रंथ महाकाव्यांच्या प्राचीन परंपरेस अनुसरून लिहिलेले आहेत. त्यामुळे अर्वाचीन काळीं पाश्चात्य चरित्रवाङ्मयाच्या पद्धतीने लिहिलेल्या चरित्रग्रंथात नायकाच्या जीवनाशी संबद्ध असलेला जसाचा तसा समकालीन इतिहास जसा उपलब्ध होतो, तसा या प्राचीन महाकाव्यात्मक (किंवा पुढे एका प्रकरणात दाखविल्या-प्रमाणे व्याकरण व अलंकारशास्त्रात्मक) ग्रंथांतून उपलब्ध होत नाही. तथापि त्या काव्यांचा विषयच ऐतिहासिक व लौकिक असल्यामुळे त्यांतून इतिहासदृष्ट्या महत्त्वाच्या अनेक घटनासंदर्भांची माहिती प्रत्यक्षाप्रत्यक्ष रीतीने उपलब्ध होतेच. म्हणून रामायण महाभारतावर आधारलेल्या ग्रंथापेक्षा या प्रकारच्या ग्रंथांना ऐतिहासिक दृष्ट्या थोडे आगळेच महत्त्व आहे. कवीन्द्र परमानन्दाने (१७ वें शतक) लिहिलेले 'शिवभारतम्' हे छत्रपति शिवाजी महाराजांचे चरित्र मुख्यतः काव्यनिष्ठ असले तरी ते एक समकालीन कवीने लिहिलेले असल्याने त्यातून शिवाजी महाराजांच्या चरित्रातील काही अज्ञात व संशयास्पद घटनांवर लख्ख प्रकाश पडतो. भारताचा जसाचा प्राचीन इतिहास ऐतिहासिक महापुरुषांच्या चरित्रावर आधारलेल्या काव्यग्रंथांतूनच मुख्यतः प्रकाशात आलेला आहे, म्हणून या प्रकारच्या काव्यांना दुप्पट महत्त्व आहे. बाणभट्टापासून सुरू झालेली अशा प्रकारच्या महाकाव्यांची परंपरा अर्वाचीन संस्कृत कवींनीहि अव्याहत चालू ठेवलेली आहे. त्यांतील काही प्रमुख काव्यांचा व कवींचा परिचय संक्षेपतः पुढे दिलेला आहे.

## तंजावरनरेश रघुनाथ नायकाचीं चरित्रें

**रघुनाथाभ्युदयम्**—तंजावरच्या रघुनाथ नायकाची धर्मपत्नी रामभद्राम्बा ही एक श्रेष्ठ संस्कृत कवयित्री होती. आपला पति हा साक्षात् रघुनाथाचाच अवतार आहे, या श्रद्धेने तिने प्रस्तुत काव्य लिहिलेले असून त्यामध्ये रघुनाथ नायकाचें चरित्र वर्णिलेले आहे.[1] रघुनाथाचा आश्रित कवि कृष्ण याने आपल्या आश्रय-दात्याच्या स्तवनार्थ **रघुनाथभूपालीयम्** नामक अलंकारनिष्ठ काव्य लिहिले आहे.[2]

**साहित्यसुधा**—रघुनाथ नायकाचा मन्त्री गोविंद दीक्षित हा वेदान्तादि विविध शास्त्रांमध्ये निष्णात असून एक श्रेष्ठ कवीहि होता. प्रस्तुत महाकाव्यांत त्याने अच्युत व रघुनाथ या आपल्या नायकवंशीय आश्रयदात्यांचे चरित्र वर्णिलें आहे.[3]

**रघुनाथभूपविजयम्**—उपरिनिर्दिष्ट गोविन्द दीक्षिताचा पुत्र यज्ञनारायण हाहि एक श्रेष्ठ कवि होता. त्याने प्रस्तुत काव्यामध्ये तंजावरच्या नायक वंशाचें श्रेष्ठत्व व रघुनाथ नायकाचा विजय वर्णिला आहे.[4]

---

१ पृ. १४९। २ पृ. १४६। ३ पृ. १५०। ४ पृ. १४८.

**रघुनाथभूपविजयम्**—रत्नखेट कवीचा पुत्र राजचूडामणि याने रघुनाथ नायकाचें चरित्र प्रस्तुत काव्यात वर्णिलें आहे.[५]

**जामविजयम्**—कच्छच्या जामवंशाचे वर्णन प्रस्तुत ७ सर्गांच्या काव्यात वाणीनाथपुत्र कवितार्किक (१७ वे शतक) यांनी लिहिलें आहे.[६] या कवितार्किकाने 'कौतुकरत्नाकरम्' नावाचें एक प्रहसनहि लिहिलेलें आहे.

**ताराचन्द्रोदयम्**—जगन्नाथ नावाच्या (१७ वें शतक) एका मैथिल कवीने २० सर्गांच्या प्रस्तुत महाकाव्यात ताराचन्द्र नावाच्या एका सामान्य राजाचें चरित्र रंगविलेलें आहे.

✓शिवाजी महाराजांच्या चरित्रावर काही उल्लेखनीय संस्कृत महाकाव्यें आढळतात. त्यापैकी '**शिवभारतम्**'[७] या कवीन्द्र परमानन्द नामक महाराजांच्या आश्रित कवीने लिहिलेलें महाकाव्य विशेष उल्लेखनीय आहे. प्रस्तुत महाकाव्याचा सविस्तर परिचय पुढे एका प्रकरणात आम्ही दिलेला आहे

• **पर्णालपर्वतग्रहणाख्यानम्**—शिवाजी महाराजांचा समकालीन पण्डित जयराम पिण्ड्ये याने महाराजांनी पन्हाळा किल्ल्यावर गाजविलेल्या पराक्रमाला अनुलक्षून ५ अध्यायांचें प्रस्तुत काव्य लिहिलें. तें लहान असलें तरी महाराजांच्या समकालीन कवीने लिहिलेलें असल्यामुळे त्याला ऐतिहासिक दृष्टया विशेष महत्त्व आहे. हा जयराम कवि १२ भाषांचा तज्ज्ञ असून त्या सर्व भाषांमध्ये तो काव्यें करूं शकत असे, हे "मया द्वादशभाषाभिः कविकर्म विरच्यते ।[८]" या त्याच्या वचनावरून दिसते हे काव्य पुण्याच्या भारत इतिहास संशोधक मण्डळाचे प्रसिद्ध संशोधक सदाशिव महादेव दिवेकर यांनी अभ्यासपूर्ण प्रस्तावना व मराठी भाषान्तरासहित प्रसिद्ध केलें आहे.[९]

• **शिवाजीचरितम्**—बंगालचे संस्कृत कवि कालिदास विद्याविनोद यांनी प्रस्तुत काव्य लिहिलें व तें कलकत्त्याच्या संस्कृत साहित्य परिषदेच्या ११ व्या अंकात प्रकाशित केलें.[१०]

• **शिवराजविजयम्**—१९ व्या शतकातील बाणभट्ट म्हणून आपल्या असाधारण गद्य लेखनशैलीमुळे ख्याति पावलेले महाकवि अम्बिकादत्त व्यास यांनी प्रौढ, प्रगल्भ व "समासभूयिष्ठ" गद्य शैलीमध्ये प्रस्तुत गद्य चरित्र लिहिलें. त्याचें

---

५. इ. १५२।
६. इ. १९९ (प्राप्तिस्थान,चौखम्बा, वाराणसी, मूल्य ५ रु.)।
७. मुद्रित इ. १५८।　　८. 'पर्णालपर्वत ग्रहणाख्यानम् १-२७;।
९. जगद्धितेच्छु प्रेस, पुणें.　　१०. इ. १९६.

संशोधन व मुद्रण करण्याचें कार्य पं. श्रीजितेन्द्रियाचार्य यांनी केलें.[11] आजपर्यंत शिवराजविजयम् या गद्यकाव्याच्या ६ आवृत्ति प्रसिद्ध झाल्या आहेत. पं. अम्बिकादत्त व्यास आपल्या असाधारण पाण्डित्यपूर्ण प्रतिभेमुळें समकालीन विद्वत्समाजामध्ये भारतभास्कर, साहित्याचार्य, व्यास इ० उपाधींनी प्रसिद्धि पावलेले होते. त्यांचा जन्म इ. स. १८५९ मध्ये व मृत्यू १९०१ मध्ये झाला. भागलपुरमध्ये संस्कृताध्यापकाचें काम त्यांनी बरींच वर्षे केलें. रत्नाष्टकम्, प्रस्तारदीपिका, गणेशशतकम्, शिवविवाहम् हीं त्यांचीं काव्ये व गुप्ताशुद्धिप्रदर्शनम् हें व्याकरणपर पुस्तक प्रसिद्ध आहे.

• **शिवावतारप्रबन्धः**—व्यंकटेश वामन सोवनी (इ. स. १८८२ ते १९२५) यांनी शिवाजीमहाराजांच्या चरित्रावर प्रस्तुत प्रबन्ध लिहिला. सोवनी हे मेरट व प्रयाग येथे संस्कृताध्यापक होते. त्यांचे इन्द्रद्युम्नाभ्युदयम् हे अध्यात्मिक काव्य व दिव्यप्रबन्धः, ईशलहरी, रामचन्द्रोदयम् (४ सर्ग) हीं काव्येंहि प्रसिद्ध आहेत.[12]

• **शिवकाव्यम्**—पुरुषोत्तम नामक कवीने प्रस्तुत काव्यामध्ये शिवाजीपासून दुसऱ्या बाजीरावापर्यंतचा मराठी साम्राज्याचा इतिहास वर्णन केला आहे.

**राजारामचरितम्**—शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर औरंगजेबाचें आक्रमण महाराष्ट्रांत चालू असतां राजाराम महाराजांनी कर्नाटकांत राहून महाराष्ट्र स्वातंत्र्याच्या संरक्षणासाठी जो महान् उद्योग केला त्याचें वर्णन केशवपण्डित नामक कवीनें प्रस्तुत काव्यांत केलेलें आहे.

• **छत्रपति शिवाजीमहाराज चरितम्**—इंदूरचे श्रीपादशास्त्री हसूरकर यांनी लिहिलेल्या भारतरत्नमालेचा उल्लेख मागील प्रकरणांत आलेलाच आहे. छत्रपति शिवाजीमहाराजचरितम् हें त्या मालेंतील दुसरें पुस्तक होय. या मालेंत महाराणा-प्रतापसिंह-चरितम् (१॥ रुपया); श्रीमद्वल्लभाचार्य-चरितम् ( २ रु. ); श्रीरामदासस्वामीचरितम् (१ रु.); पृथ्वीराजचव्हाणचरितम् (१॥ रु.); इत्यादि ६ पुस्तकें प्रसिद्ध झालेलीं आहेत.[13] श्रीशीखगुरुचरितामृतम् हें त्या मालेंतील सहावें पुस्तक असून त्यामध्ये नानक, अंगद, अमरदास, रामदास, अर्जुनसिंह, हरगोविंद, हरराय, हरकिशन, तेगबहादुर व गुरुगोविंदसिंह यांचीं संक्षिप्त चरित्रें उत्कृष्ट भाषाशैलींत लिहिलेलीं आहेत.

पं. श्रीपादशास्त्री हसूरकरांचीं कांहीं अमुद्रित पुस्तकें पुढीलप्रमाणे आहेत. श्रीरघंगानस्वामिचरितम्, श्रीबुद्धदेवचरितम् राजस्थानसतीनवरत्नहारः, महाराष्ट्र-

---

११. संस्कृतसाहित्यभाण्डागार येथे मुद्रित. पृ. सं. ६४० ।
१२. पृ० ३५५ (प्रस्तुत लेखकाचीं सर्व पुस्तकें मुद्रित झालीं आहेत.)
१३ प्राप्तिस्थान—सरस्वती निवास, रामबाग, इंदूर.

सतीनवरत्नहार, महाराष्ट्रनियन्तार नमञ्जुषा, सौराष्ट्रवीररत्नावलि, महाराष्ट्रवीररत्नमञ्जूषा, श्रीशङ्कराचार्यचरितम् व विन्यानगरसाम्राज्यम्,

श्री. हसूरकरानी प्रस्तुत चरित्रात्मक साहित्यातिरिक्त मोक्षमन्दिरस्य द्वादशदर्शनसोपानावलि, या नावाना २८७ पृष्ठाचा एक उत्कृष्ट प्रबंध लिहिला असून[१४] त्यामध्ये चार्वाक, बौद्ध (वैभाषिक, सौत्रांतिक, योगाचार, माध्यमिक) जैन, नैय्यायिक, वैशेषिक, साख्य, योग, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या १२ दर्शनांचा संक्षेपानेच पण सर्वंकष रीतीने परिचय दिलेला आहे भारतीय दर्शनाचा परिचय इतक्या चांगल्या रीतीने करून देणारा दुसरा पुस्तक संस्कृतात नाही.

व हसूरकराच्या "प्रतापसिंहचरितम्" या पुस्तकावर विश्वकवि रवीन्द्रनाथ टागोर यानी पुढील अभिप्राय दिला आहे.

"प्राय सस्कृते गद्यआख्यानि न सन्ति एव। यानि च सन्ति तानि समास प्रचुराणि दुर्बोधवाक्यव्याप्तानि बालानाम् अनुपकारीणि। इद नूतन हसूरकरोपाह्व श्रीपादशास्त्रिणा लिखित श्रीमहाराणाप्रतापसिंहचरित तु पूर्वोक्त दोषवर्जित विशेषतो मातृभूसेवनाय सन्नद्धाना विद्यार्थिनाम् उपयोगि। अतएव मया अस्य पठनाय मदीये शान्तिनिकेतननाम्नि विद्यालये समाज्ञप्ता दीक्षा। इच्छामि च पुनरेतादृशानि नूतनानि संस्कृतपुस्तकानि प्रादुर्भवन्तु इति।"

**शाहेन्द्रविलासकाव्यम्**—तजावरच्या भोसले घराण्यातील शहाजी राजाच चरित्र, त्याचा आश्रित कवि श्रीधर वेंकटेश याने ६ सर्गाच्या प्रस्तुत महाकाव्यात वर्णिलेले आहे.[१५] याच कवीने दयाशतकम्, मातृभूशतकम्, तारावलीशतकम् आर्तिहरस्तोत्रम् इत्यादि लघुकाव्ये लिहिली असून ती सर्व वैद्य प्रेस कुम्भकोणम् यथे छापण्यात आली.

• **शाहविलासम्**—याच वर उल्लेखिलेल्या शहाजी भोसल्याच चरित्र ढुण्ढिराज व्यास यज्वा नामक पण्डिताने सगीतप्रधान प्रस्तुत काव्यामध्ये वर्णिलेले आहे. याच ढुण्ढिराजाने 'अभिनवकादम्बरी' या नावाचे एक काव्य लिहिले आहे. विशाखदत्ताच्या मुद्राराक्षस नाटकावरील त्याची टीका विद्वत्समाजात सर्वत्र अत्यत मान्यता पावली आहे.[१६]

**शरभविलासकाव्यम्**—तजावरचे गीर्वाणविद्यारसिक व सरस्वती महाल या विख्यात संस्कृत ग्रथालयाचे संस्थापक सरफोजी भोसले याच चरित्र प्रस्तुत काव्यामध्ये अक्का-नारायणपुत्र जगन्नाथ कवि याने वर्णिलेले आहे

---

१४ सहकारी मुद्रणालय, इदूर

१५ क्र १६२। १६ क्र १६३

**राजसुर्जनचरितम्**—जनमित्राचा पुत्र चंद्रशेखर चांप उर्फ गौडमित्र याने आपल्या आश्रयदाता सुर्जनराज याचे चरित्र प्रस्तुत २० सर्गांच्या महाकाव्यात वर्णिलेले आहे.

**जगत्प्रकाशकाव्यम्**—विश्वनाथ नारायण वैद्य याने आपला आश्रयदाता जगत्प्रकाश या रावळवंशीय नृपतीचे चरित्र प्रस्तुत १४ सर्गांच्या काव्यात लिहिलेले आहे. विश्वनाथ कवीने **शत्रुशल्यकाव्यम्** व **कोशकल्पतरू** हे दोन अवांतर ग्रंथहि लिहिलेले आहेत.

**वंशलता**—ले. उदयनाचार्य.-प्रस्तुत महाकाव्यात काही पौराणिक व ऐतिहासिक राजवंशांचे वर्णन केलेले आहे.[१०]

**रत्नसेनकुलप्रशस्ति** —लेखक भानुदत्त. बंगालच्या सेन वंशाचा इतिवृत्त हा या काव्याचा विषय आहे.

**यादवप्रबन्ध** —ले. त्रिपुरान्तक कवि. देवगिरीच्या यादववंशीय नृपतींचे इतिवृत्त यात वर्णिलेले आहे.

**रामचन्द्रयशप्रबन्ध** —ले. गोविन्द भट्ट. विजयनगरच्या रामचंद्र राजाचे यश या काव्यात गायिलेले आहे.

**जयपूरविलासम्**—जयपूरचे आयुर्वेदाचार्य कृष्णराम (१९ वे शतक) यांनी जयपुरच्या अनेक राजांची चरित्रे प्रस्तुत काव्यात वर्णिलेली आहेत.[१८] "**कच्छवंशम्**"—नावाच्या आणखी एका काव्यामध्येहि कृष्णराम कवीने जयपूर-नरेशांची चरित्रे वर्णिलेली आहेत. आर्यालंकारशतकम्, पलाण्डुराजशतकम्, मुक्तकम्, मुक्तावली, होलीमहोत्सवम्, सारशतकम्, छन्दोऽलंकारमर्दनम्, इत्यादि आणखीहि इतर काव्ये या कृष्णराम कवीने केलेली आहेत.

**जयनगरपञ्चरङ्गम्**—या नावाचे जयपूरच्या नृपतींची चरित्रे वर्णन करणारे काव्य [illegible] याने लिहिले असून त्याचे मुद्रण नुकतेच झाले आहे.

**हैहयविजयम्**—वीरेन्द्रसत्यभरवाराजा यदुनन्दनरायाचा पुत्र हेमचन्द्रराय (जन्म इ. स. १८८२) याने प्रस्तुत ऐतिहासिक महाकाव्य लिहिले आहे.[१९] हा कवि [illegible] अध्यापक होता. सत्यभामापरिणयम्, सुभद्राहरणम्, पाण्डवविजयम्, परशुरामचरितम्, ही त्याची अवान्तर काव्ये प्रसिद्ध झाली आहेत.

---

१०. पृ १९९। १८ पृ २४५। १९. पृ ४४२।

म्हैसूर नरेश कृष्णराज वोडियार महाराज याचीं संस्कृत चरित्रे—

| काव्य | लेखक |
| --- | --- |
| कृष्णराजाभ्युदयम्— | भागवतरत्नकवि |
| कृष्णराजप्रभावोदयम्— | श्रीनिवासकवि |
| कृष्णराजगुणालोक — | त्रिविक्रमशास्त्री |
| कृष्णराजोदयचम्पू — | गीताचार्य. |

हीं चारहि चरित्रे मुद्रित झालीं आहेत.

**वेल्लापुरीविषयगद्यम्**—वेल्लोर प्रदेश व तेथील राजा केशवेश याचें वर्णन प्रस्तुत गद्यप्रबन्धात एका अप्रसिद्ध कवीने केलेलें आहे.[२०]

**मैथिलेशचरितम्**—दरभङ्ग्याच्या राजवशाचे चरित्र रत्नपाणि नामक कवीने या काव्यात वर्णिलेल आहे.[२१]

**देशावलिविवृति**—चौहानवशातील वैजल राजाच्या आदेशावरून जगन्मोहन नामक कवीने (१७ वें शतक) प्रस्तुत काव्य लिहिले आहे. या काव्यात कवीने आपल्या समकालीन ५६ राजांची चरित्रे थोडया इतिहासासहित वर्णिलेलीं असल्याने १७ व्या शतकाचा इतिहास जाणण्याच्या दृष्टीने प्रस्तुत काव्याचा बराच उपयोग होण्यासारखा आहे.[२२]

**यशोधरचरित्रम्**—वादिराजसूरि नावाच्या एका जैन साधून, यशोधर नामक एका जैन महाराजाचे चरित्र प्रस्तुत काव्यात वर्णिलेले आहे. हा वादिराजसूरि "द्वादशविद्याधिपति" म्हणून प्रसिद्ध होता.[२३] क्षमाकल्याण नावाच्या १८ व्या शतकातील कवीने याच यशोधराचे चरित्र "यशोधरचरित्रम्" नामक आणखी एका काव्यात वर्णिलेलें आहे.

**श्रीमूलचरितम्**—त्रावणकोरच्या राजवशाचे वर्णन प्रस्तुत काव्यात महामहोपाध्याय गणपतिशास्त्री यानी केलेलें असून 'अर्थचिन्तामणिमाला' नामक आणखी एका अलकारनिष्ठ काव्यामध्ये त्यानी त्रावणकोरच्या विशाखराम राजाचें स्तवन केलेलें आहे. हे म. म गणपतिशास्त्री त्रिवेन्द्रममध्ये दीर्घकालपर्यंत सस्कृताध्यापक होते. त्यानतर त्याची 'क्युरेटर'च्या कामावर नेमणूक झाली होती. याच कामावर असताना भासनाटक-चक्राच्या प्रकाशनामुळे त्याची कीर्ति सर्वत्र पसरली.

**सर्वदेशवृत्तान्तसंग्रह**—अकबर बादशहाच्या आश्रयास असलेल्या महेश ठक्कुर[२४] या विद्वानाने हा ग्रथ लिहिला. तो 'अकबरनामा' या नावाने विशेष

---

२०. क्र. ९०१। २१ क्र ४४२। २२ क्र ४०५।
२३. क्र. २३३। २४ क्र ४०६

प्रसिद्ध आहे. हा महेश ठक्कुर न्यायशास्त्रामध्ये विशेष होता. त्याचा शिष्य रघुनंदनदास हाहि मोठा निष्णात नैय्यायिक होता त्याच्या विद्वत्तेवर प्रसन्न होऊन अकबर बादशहानें त्याला दरभंगा प्रान्त भेट म्हणून दिला. पण रघुनंदनदासानें तो प्रांत आपल्या गुरूला दक्षिणा म्हणून समर्पण केला. आजपर्यंत या महेश ठक्कुराचे वंशजच दरभंग्याच्या गादीवर होते.

लक्ष्मीश्वरप्रतापम्—कांचीचे शिवकुमारशास्त्री (जन्म इ.१८४८ मृत्यू १९१९) यांनी दरभंग्याच्या राजघराण्याचे समग्र चरित्र वर उल्लेखिलेल्या महेश ठक्कुरापासून आरंभ करून वर्णिलें आहे. कवीच्या आईचें नाव मतिराणी व वडिलांचें नाव रामसेवक मिश्र असें होतें. यतीन्द्रजीवनचरितम् या नावाचा भास्करानन्द नामक योग्याच्या चरित्रावर लिहिलेला त्यांचा आणखी एक ग्रंथ उपलब्ध आहे.[२५]

लक्ष्मणाभ्युदयम्--झालावाड (राजस्थान)च्या राजेन्द्र कॉलेजचे संस्कृत प्राध्यापक गणेशराम शर्मा यांनी डुंगरपूरचा राजा लक्ष्मणसिंह याचें चरित्र प्रस्तुत काव्यांत वर्णिलें आहे. गणेशराम शर्मांचे बरेच स्फुट लेख आजकाल संस्कृत वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होत असतात.

---

२५ वृ. ४९६ IV।

## प्रकरण ६ वे

# परकीय राजस्तुति

धन आणि मान यांच्या अभिलाषेने राजे महाराजांच्या स्तुतीला वाहिलेलीं काव्य लिहिण्यास अनेक कवि आणि महाकवि उद्युक्त झाले होते. त्याचप्रमाणे काही स्तुतिप्रिय राजेमहाराजांनी प्रतिभासंपन्न कवींना आपलीं स्तुतिकाव्य लिहावयास उद्युक्त केल असहि मागील प्रकरणात उल्लेखिलेल्या काही ग्रंथांचे स्वरूप पाहता आढळून येते. या रांजेलेखात दुर्दैवाने परधर्मीय राजांची संख्या दीर्घकालीन पारतंत्र्यामुळे बरीच मोठी आहे. या परकीय सत्ताधाऱ्यांनी संस्कृतचे अध्ययन वाढण्यासाठी किंवा संस्कृत भाषेला तिची प्राचीन प्रतिष्ठा प्राप्त करून देण्यासाठी कोणताहि विशेष प्रयत्न केला नाही. तथापि त्यांनी अनेक प्रतिभासंपन्न संस्कृत साहित्यिकांचा यथायोग्य सन्मान केल्याचे दिसून येते जगन्नाथ पंडिता सारख्या संस्कृत कवीला मोंगल राजसभेत फार मोठा मान प्राप्त झाला होता. इंग्रज सत्ताधाऱ्यांनीहि 'महामहोपाध्याय' ही मानाची पदवी देऊन अनेक संस्कृत पंडिताचा वर्षानुवर्षे सतत गौरव केला अशा प्रकार राजसम्मानाने संतुष्ट झालेल्या व व राजसम्मानाची आकांक्षा बाळगणाऱ्या अनेक संस्कृत कवींनी परकीय प्रशासकाचीं चरित्रें संस्कृत काव्यांतून निरनिराळ्या प्रकारे गायिलेलीं आहेत. ज्यांची सत्ता उलथून पाडण्यासाठी श्रेष्ठ कोटीच्या देशभक्तांनी आमरण कष्ट केले अशा परकीय प्रशासकाच्या चरित्रावर आपल्या प्रतिभेचें हवन करणारे कवि संस्कृत साहित्यिकांच्या वर्गात निर्माण झाले, याचा कोणालाहि खेद वाटल्याशिवाय राहणार नाही

पण या कामीं एकट्या संस्कृत कवींनाच दूषण देता यणार नाही. त्या काळातील भारतातल्या सर्व प्रान्तिक भाषांच्या कवींनीहि हाच अपराध केला होता, असे विविध उदाहरणावरून सहज सिद्ध करून देता येईल.

आमच्या राष्ट्राच्या दुर्भाग्याने शकहूणादिकांच्या विलयानंतर महमदीयांचे व त्यानंतर थोड्याच काळात इंग्रजांचे साम्राज्य आसेतु हिमाचल पसरले या परकीय प्रशासकांनी भारताची कशी दुर्दशा केली होती, याचे वर्णन आचार्य मेधाव्रत शास्त्री यांनी आपल्या 'दयानन्ददिग्विजय' नामक महाकाव्याच्या दुसऱ्या सर्गांत पुढील प्रमाणे केले आहे. ———

दुःशासनान् मोगल-वंशजानां दिल्लीश्वराणां छलनापराणां
यज्ञोपवीताहरणं द्विजानां कन्यापहारः परितः प्रवृत्तः। (२-३१)
बाल्ये वयस्येव विवाहितास्ता द्विजैः स्वकन्या अति कोमलाङ्ग्यः।
नालं मुखाम्भोजमपावरीतुं भयेन नार्यो रजनीचराणां (२-३२)
महीसुराणामतुलं महस्तद् राजन्यतेजोऽपि नितान्तनष्टम्।
दशा विशां द्रव्यवतामवर्ण्या क्षुद्रः स शूद्रस्तु भयाद्रिपूणाम् (२-३३)
संस्कारदोषात्पिशिताशनाना मैरेयपानं मतिनाशनं तत्।
दुरोदर स्त्रीमृगयातिसङ्गो मांसाशनं चार्यजनेषु वृद्धम्। (२-३४)

अशा प्रकारची राष्ट्राची दुरवस्था ज्या परकीय प्रशासकांनी केली, यांचे गुणगान करणारी काव्ये लिहिण्यास जे कवि प्रवृत्त झाले, त्यांची विद्वत्ता कितीहि मोठी असली तरी ते परिस्थितिपराङ्मुख व लोभप्रवण होते, असे म्हटल्यावाचून राहवत नाही. अशो! कवींचा हा दोषहि अनेक काव्यांच्या निर्मितीस कारणीभूत झाला. राष्ट्रीय दृष्ट्या त्यांचे स्थान कोणते, ते वर सांगितलेच आहे. साहित्यदृष्ट्या व इतिहास-दृष्ट्याहि त्यातील अनेक काव्यांना खरेच महत्त्व आहे. अशा काव्यांपैकी काहींचा परिचय पुढे दिलेला आहे.

**असफविलास.**[1] शहाज्हान बादशहाच्या दरबारात आसफखान नावाचा एक अधिकारी होता. तो पंडितराज जगन्नाथाचा मोठा मित्र होता. या आपल्या मित्राची स्तुति जगन्नाथानी प्रस्तुत गद्यकाव्यात केली आहे. हा आसफखान इ. १६४६ मध्ये मरण पावला. शहाजहानचा विद्वान् पुत्र दाराशिकोह हाहि जगन्नाथाचा मोठा मित्र होता. त्याच्या स्तुत्यर्थ जगन्नाथाने **जगदाभरणम्**[2] या नावाचे एक काव्य लिहिलेले आहे.

**रसकल्पद्रुम.**[3]—१७ व्या शतकातील आपकखानाचा पुत्र शाइस्तेखान हा श्रेष्ठ दर्जाचा संस्कृत कवि होता. त्याचा मित्र चतुर्भुज याने शाइस्तेखानाच्या कृपेसाठी रसकल्पद्रुमः हा पाउग्र प्रस्तावामक एक सहस्र श्लोकांचा साहित्यशास्त्रीय प्रबंध लिहिला. त्यामध्ये स्वतः शाइस्तेखानाने लिहिलेले ६ संस्कृत श्लोक उद्धृत केलेले आहेत. त्यापैकी—

यत्नादृतस्त्वमलिना मलिनाशयेन
किं तेन चम्पक विषादमुरीकरोषि ?।
विश्वाभिराम-नवनीरद-नीलवेशाः
केशाः कुशेशयदृशां कुशलीभवन्तु ॥

यासारखे श्लोक शाइस्तेखानाचे असाधारण संस्कृत भाषाप्रभुत्व सूचित करतात.

१, २. कृ. ३११। ३ कृ. १०४.

१७ व्या शतकांतील सुंदरदेव नांवाच्या कवीने '**सूक्तिसुन्दरम्**' या नांवाचा एक सुभाषितसंग्रह तयार केला. त्यामध्ये तत्कालीन कवींची बरीच सुभाषितें संग्रहीत करण्यांत आली, हें त्या ग्रंथाचें वैशिष्ट्य होय. विशेष म्हणजे त्यामध्ये अकबर मुदफ्फरशाह, निजामशाह, शहाजहान यासारख्या मुसलमान राजांची स्तुति करणारे श्लोक उद्धृत केलेले आहेत. अकबरीय कालिदास नांवाच्या कवीने केलेली अकबर-स्तुति पहा—

> **वीर त्वं कार्मुकं चेदकबर कलयस्युग्रटङ्कार-घोरं**
> **दूरे सद्यः कलङ्का इव धरणिभृतो यान्ति कङ्कालशेषाः।**
> **शङ्कापन्नाश्च किं कारणमिति मनसा भान्ति पङ्कायितेन**
> **त्यक्त्वा हुंकारमङ्काद् विसृजति गृहिणीं किं च लङ्काधिनाथः ॥**

अशा यवनराज-स्तुतिपर काही संस्कृत श्लोकांमध्ये उर्दू शब्दाचाहि प्रयोग संस्कृत कवींनी केलेला दिसतो. उदाहरणार्थ—

> **जीमी कम्पति विम्यती प्रतिचलं विदीं गनीमं व्रज-**
> **त्योघस्य प्रतनोति च स्खलनताभारात् प्रभुर्भारतः।**
> **दर्यावाः प्रचलन्ति वीचिनिवहैः धूलिभिराफ्तवभा**
> **अस्वाने प्रतिहन्यती तव चमूयानेऽभियाने प्रभो ॥**

**अकबरनामा**[४]—याच नांवाच्या एका पारसी ग्रंथाचा हा संस्कृत अनुवाद कोणी तरी केलेला आहे. दरभङ्ग्याच्या महेश ठक्कुराने लिहिलेला "सर्वदेशवृत्तान्त-संग्रह" हा ग्रंथहि अकबरनामा या नांवाने ओळखला जात होता.

**जहांगिरचरितम्**—ले० रुद्रकवि. हा १६-१७ व्या शतकांतील नारायणशहा नामक राजाचा आश्रित होता. प्रस्तुत काव्यात दशकुमार-चरिताच्या पद्धतीने त्याने जहांगीरचें चरित्र वर्णिलेलें आहे. याच रुद्रकवीने **राष्ट्रौढवंश** नांवाचें २० सर्गांचें महाकाव्य लिहिलें असून त्यामध्ये बागुल राजवंशाचें वर्णन केलेलें आहे. आणखी एका अप्रसिद्ध कवीने जहांगीरच्या चरित्रावर आधारलेले विरुदावलि[५] नामक पुस्तक लिहिलें आहे.

**राजविनोदकाव्यम्**[६]—रामदासाचा शिष्य व प्रयागदत्ताचा पुत्र उदयराज कवि याने ७ सर्गांच्या प्रस्तुत काव्यांत सुल्तान बेगडा महमद या गुजरायच्या सुल-तानाचें स्तुतिपूर्ण चरित्र वर्णिलेलें आहे.

**गझनी महम्मदचरितम्**[७]—ले. पी. जी. रामार्य कवि. (१९ वें शतक.)

---

४. क्र. १९६। ५. क्र. ४०६। ६. क्र. १९६।
७. क्र. १९५ व ४४२। ८. क्र. ४४२।

**विजयपुरकथा**[९]— ले. पाण्डुरंग कवि. (१९ वें शतक). निजापुरच्या मुसलमान बादशहांची चरित्रें हा या ग्रंथाचा विषय आहे. निजापुरच्या सुल्तानाच्या चरित्रावर विजयपुरीश–कथा या नावाचें एक पुस्तक एका अज्ञात कवीने लिहिलेलें आढळते.[१०]

**अब्दुल्लाचरितम्**—ले. लक्ष्मीपति.[११]

**सुलतानचरितम्**—दिल्लीचे पण्डित छज्जूरामजी यांनी प्रस्तुत काव्य लिहिले असून त्यावर सरस्वती पत्रिकेमध्ये अभिप्राय लिहिताना प. महावीरप्रसाद द्विवेदी म्हणतात, "इद काव्य पदे पदे अनुप्रासविलासयुक्तम्। कल्पनाया च नैषधकाव्यसदृशम्।" प. छज्जुरामजींची 'दुर्गाभ्युदय' (नाटक), 'छज्जुराम शतकत्रयम्', 'साहित्यबिन्दुः' 'मूलचन्द्रिका' ही न्यायमुक्तावलीची टीका, 'सरला' नामक न्यायदर्शनावरील वृत्ति, सदानन्दाच्या वेदान्तसारावरील 'सारबोधिनी' टीका हीं पुस्तकें प्रकाशित झालेलीं आहेत. याव्यतिरिक्त निरुक्त–पञ्चाध्यायावरील 'परीक्षा' टीका, व्याकरणमहाभाष्याच्या २ आह्निकावरील 'परीक्षा' टीका कुरुक्षेत्रमाहात्म्यटीका व 'प्रत्यक्षज्यौतिषम्' हे छज्जुरामजींचे ग्रंथ अप्रकाशित आहेत. त्यांच्या साहित्यबिन्दु ग्रंथासंबंधी एकाने असे म्हटले आहे, की—

गतार्थोऽद्य जगन्नाथो विश्वनाथश्च पण्डितः।
जाते साहित्यसर्वज्ञे छज्जूरामकवीश्वरे ॥[१२]

मुसलमान राजासंबंधी अर्वाचीन संस्कृत साहित्यात आढळणारे हे व यासारखे ग्रंथ सोडले, तर त्यांच्या स्तुतिपर नित्यक स्फुट सुभाषित आढळतात. त्यापैकी काही पुढे दिलेलीं आहेत. ही सर्व सुभाषितें सुभाषितरत्नभाण्डागारात राजस्तुति प्रकरणांतून संकलित केलीं आहेत.

**अकबर :** हस्ताम्भोजालिमाला नखशशिरुचिरश्यामलच्छायवीचि-
स्तेजोऽग्नेर्धूमधारा वितरणकरिणो गण्डदानप्रणाली।
वैरिश्रीवेणिदण्डो लवणिम-सरसी–बालशैवालवल्ली
वेल्लत्यम्भोधरश्रीरकबरधरणीपालपाणौ कृपाणः ॥ (११८–१)
कर्णाटं देहि कर्णाधिकविधिविहितत्याग लाटं ललाट-
प्रोत्तुङ्ग, द्राविडं वा प्रचलभुजबल प्रौढिमागाढराढम्।
प्रस्फूर्जद्‌गुर्जरं वा दलितरिपुवधूगर्भ वैदर्भकं वा
गाजी राजीवदृङ् कुशशतमयथा नाहजल्लालुदीन ॥ (११८–३)

---

९ कृ १९६। १०. पृ ५०१। ११ प्राप्तिस्थान चौखम्बा, मूल्य ८ रु.
१२. दिव्यज्योतिः स. मासिकपत्रिका, सिमला. अर्वाचीन संस्कृत कवि परिचयात इ. स १९५७।

गाजी जल्लालुद्दीन क्षितिपकुलमणे त्वत्प्रयाणे प्रतीते
प्रेयस्यः प्रारभन्ते तरलतरगतिव्याकुला मङ्गलानि ।
नेत्राम्भःपूरपूर्णस्तनकलशमुखन्यस्तबालप्रवालाः
त्रुट्यन्मुक्ताकलाप-च्युत-कुचकुसुम-च्छद्मनाकीर्णलाजाः । (११८–४)

निजामशाहः नृपतिनिजाम तवाद्भुतचरणार्पणबहलपीडाभिः
रचयति वहिरिव रसनामरुणध्वजकैतवाद्वनिः । (११९–३३)
धरणिधरनिजामशाह युष्मत्कर-करवाल-करालकालसर्पः
द्विपदसुपवनं निपीय पीनो दिशि मुञ्चति कंचुकं यशस्ते ॥

अटत्कटकघोटक-प्रकट-टाप-टङ्कारवत्
घटच्चटदिति स्फुटं स्फुटति मेदिनीकर्परम् ।
निजामधरणीपतौ चलति कौतुकाडम्बराद्
इदं भुवनमण्डलं दरदरोदरोदर्यहो ॥ (११९–३५)

क्षोणीकाम निजामशाह भवतः प्रौढैः प्रतापानलैः
प्रागेव द्रवरूपतामुपगते चामीकराणां चये ।
अस्यद्वासमधाम धोरणि मुहुर्मज्जद्ग्रहग्रामणि
अस्यत्कामिनिनिष्पतद्वनितल मेरोः समुन्मीलति ॥ (११९–३६)

क्षोणीकाम निजाम तावकभुजं लब्ध्वा भुजङ्गीश्वरं
जानीमः करवाल–कालभुजगी किं नाम गर्भिण्यभूत् ।
मत्तेभेन्द्र–विभिन्नकुम्भ–विदलन्मुक्ताकलाप–च्छलाद्
अच्छामण्डपरम्परामधिरणं सूते स्फुरन्ती मुहुः ॥ (१२०–३७)

बाहुव्यूहमुरस्तलो वसुमतीं संवीक्ष्य मूर्च्छावतीं
भेरी–शाङ्कृतिचञ्चलेन पयसा वारां निधिः सिञ्चति ।
*दिग्बाला तनुते निजामनृपतेर्यातं पताकांशुकैः*
धूलिघोरणिरदिवनीसुतमिव प्रष्टुं दिवं धावति ॥ (१००–३०)

विद्वद्गोष्ठीगरिष्ठ प्रतिभटदमन श्रीनिजाम प्रतीमः
कृत्वा त्वत्कीर्तिगाथां वहति गणविधिं पद्मयोनिः कठिन्याः ।
वक्रा लेखागुरूणाममृतकरकलां कम्बुमल्ली मरालाः
शुद्धा लेखा लघूनां विसभुजगनभोनिम्नगा दन्तिदन्ताः ॥ (१२०–३९)

अङ्गाः सञ्जातभङ्गा घनवनवसतिप्राप्तरङ्गाः कलिङ्गाः
तैलङ्गाः स्वर्गगंगामिवधणमतयः शौर्यवङ्गाश्च वङ्गाः ।
लाटाः स्विद्यल्ललाटाः पदगमनदृढाः श्वासलोलाश्च चोलाः
जायन्ते श्रीनिजाम पृथुरण भवतः प्रौढनिःसाणनादात् ॥ (१२०-४०)

मुदाफरशाह : आकाश प्रसर प्रसर्पत दिशस्त्व पृथ्वि पृथ्वी भव
प्रत्यक्षीकृतमादिराजयशसा युष्माभिरुज्जृम्भितम् ।
श्रीमुद्दाफरशाहपार्थिवयशोराशे समुज्जृम्भणाद्
बीजोच्छ्वासविदीर्णदाडिमदशां ब्रह्माण्डमारोक्ष्यति ॥
(१२३–११३)

शाहिजहान –भूभृन्मौलितटीषु यपति महावारघरेऽस्मिन्नसौ
जाता भूप सरस्वती विजयिनी कल्लोलिनी पावनी
श्रीमच्छाहिजहां ब्रवीमि तदिदं माहात्म्यमस्या कथं
यस्यां मज्जति पङ्कजीयति शिवस्तन्मूर्धजोऽलीयति ॥
(१२८–१९१)*

**आङ्ग्लनृपतींची चरित्रें**—इंग्रजी शासन सुरु झाल्यानंतर मुसलमान सत्ताधाऱ्यांप्रमाणे इंग्रज सत्ताधाऱ्यांचीहि चरित्रे लिहिण्यास संस्कृत कवि प्रवृत्त झालेले दिसतात या संबंधात Modern Sanskrit writings" या आपल्या संक्षिप्त निबंधात डॉ. वे राघवन् लिहितात, ' Loyalty to the ruler and the tendeney to eulogise them are in the blood of the old style sanskrit scholors and only a change of the subject of eulogy from their former local kings to the new emperor from the far of land was nece ssary. The British administrators for themselves thought that it would add to their glory to havo *eulogies in the time honoured language* and they prompeted the writing of these compositions. Warren Hastings in the time collected such eulogies in Sanskrit to be filed against his impeachment."

आङ्ग्लनृपतांच्या विषयां लिहिलेल्या काव्यामध्ये व्हिक्टोरिया, एडवर्ड, पंचम जॉर्ज या तीन व्यक्ति व दिल्ली दरबार हे विषय अधिक आवडते दिसतात. या विषयांवरील काही ग्रंथांचा संक्षिप्त परिचय पुढीलप्रमाणे आहे —

---

१३ पृ ३

*संस्कृतानभिज्ञ मराठी वाचकांच्या दृष्टीने या ग्रंथात उद्धृत केलेल्या अनेक संस्कृत श्लोकांचे मराठी अनुवाद देणे आवश्यक आहे, याची कल्पना असून ग्रन्थविस्ताराच्या भयाने आम्हांस ते टाळावे लागले

**आंग्रेजचन्द्रिका**—विनायक भट्ट नावाच्या कवीने इ. १८०१ मध्ये प्रस्तुत ग्रंथ लिहिला. त्यामध्ये इंग्रजी साम्राज्याविषयीचा भरपूर वृत्तान्त वर्णिलेला आहे.[14]

**राजाङ्ग्लमहोद्यानम्**—ले. रामस्वामी.[15]

**इतिहासतमोमणिः**—इ. स. १८१३ मध्ये लिहिण्यात आलेल्या ग्रंथात इंग्रजांनी मिळविलेल्या भारतविजयाचे वर्णन क्रमशः केलेले आढळते.[16]

**आङ्ग्लसाम्राज्यमहाकाव्यम्**—त्रावणकोरचे संस्कृत विभागाधिकारी ए. आर. राजवर्मा ( १९ २० शतक ) यांनी प्रस्तुत महाकाव्य लिहिले आहे.[17]

**आङ्ग्लाधिराज्यस्वागतम्**—विशाखापट्टणचे म. म. वेंकटनाथाचार्य हे या स्तुतिकाव्याचे लेखक होत[18] परवस्तुरंगाचार्य यांनीहि याच नावाचे एक काव्य लिहिले असून त्यामध्ये इंग्रजी साम्राज्याचा इतिहास वर्णिलेला आहे.

## व्हिटोरिया-स्तुतिनिष्ठ काव्यें

इंग्रज सत्ताधाऱ्यांपैकी व्हिक्टोरिया राणी, पंचम जॉर्ज व सप्तम एडवर्ड ह्या तीन व्यक्ति अनेक संस्कृत काव्यांचा विषय झाले असल्याचे वर सांगितलेच आहे. त्यापैकी व्हिटोरिया राणीला उद्देशून निरनिराळ्या प्रांतातील संस्कृत कवींनी लिहिलेले काव्यग्रंथ पुढील प्रमाणे आहेत

**गीतभारतम्**—ले. त्रैलोक्यमोहन गुह. २१ सर्गांच्या या महाकाव्यात कवि महाशयांनी आङ्ग्लसाम्राज्य व सम्राज्ञी व्हिक्टोरिया यांचे यशोगान केले आहे.[19]

**ज्युबिलीगानम्**—व्हिक्टोरिया राणीच्या हीरक महोत्सव प्रसंगीं उत्तर कॅनरा जिल्ह्यातील कवींनी रचलेली काव्ये प्रस्तुत ग्रंथात संगृहीत केलेलीं आहेत. त्यापैकी काही काव्यें मराठीतहि आहेत.[20]

**चक्रवर्ति-व्हिक्टोरिया-भारतवर्षे ३२ विजयपत्रम्**—वाराणसीचे विद्वान् बलदेवसिंह यांनी इ. स. १८८९ मध्ये संगृहीत केले.

**व्हिक्टोरियाचरितसंग्रहः**—ले केरलवर्म वलियकोइल.

**व्हिक्टोरियाप्रशस्ति**—ले. व्रजनाथशास्त्री, पुणे.

**प्रीतिकुसुमाञ्जलि**—काशीच्या काही पंडितांनी व्हिक्टोरिया राणीला उद्देशून लिहिलेल्या विविध काव्यांचा संग्रह.

---

१४ क्र. २००१ १५ क्र २००१ १६. क्र. २००१

१७ क्र १८०१ १८. क्र. ८२१ १९. १९०२ मध्ये कलकत्त्यास मुद्रित

20 Modern Sanskrit Wrighting by Dr Raghavan.

**व्हिक्टोरियामाहात्म्यम्**—राजा सर सुरेंद्रमोहन टागोर यांनी १८९८ मध्ये हे माहात्म्य लिहिले. याच टागोर महाशयांनी '**प्रिन्स-पश्चात्**' नांवाचें एक खण्डकाव्य प्रिन्स ऑफ वेल्सच्या स्तुत्यर्थ लिहिलें.

**विजयिनीकाव्यम्**—ले. श्रीश्वर वियालंकार भट्टाचार्य, (कलकत्ता). यांनी इ. स. १९०२ मध्ये १२ सर्गांचें प्रस्तुत काव्य लिहिलें. याव्यतिरिक्त १९०२ सालीं सातव्या एडवर्डच्या राज्याभिषेकासंबंधीं **दिल्लीमहोत्सवकाव्यम्** या नांवाचें ६ सर्गांचें काव्य त्यांनी लिहिलें आहे.

**शोकमहोर्मिः**—वाराणसीचे कुलचंद्र शर्मा यांनी इ स. १९०१ मध्ये व्हिक्टोरिया राणीच्या निधनानिमित्त प्रस्तुत संवादात्मक गद्यपद्यमय शोककाव्य लिहिलें. याच विषयावर इ. स. १९०१ मध्ये कलकत्त्याचे यादवेश्वर तर्करत्न यांनी '**अश्रुबिंदुः**' काव्य लिहिलेलें आहे. श्रीपति टक्कुर नावाच्या कवीनें '**व्हिक्टोरिया-एकम्**' हे स्तोत्र व्हिक्टोरिया देवीच्या उद्देशून लिहिलेलें आहे. हीं सर्व काव्यें मुद्रित झालेलीं आहेत.

सप्तम एडवर्ड विषयीं लिहिलेलीं काव्यें संख्येने थोडीं असून तीं पुढील प्रमाणे आहेत.

**दिल्लीमहोत्सवकाव्यम्**—वर उल्लेखिल्या श्रीश्वर भट्टाचार्यांनी सातव्या एडवर्डच्या राज्याभिषेकासंबंधीं ६ सर्गांचें प्रस्तुत काव्य लिहिलें असून त्यामध्ये दिल्लीच्या प्रसिद्ध दरबाराचें वर्णन आलेलें आहे.[११]

**एडवर्डराज्याभिषेकदरबारम्**—प्रयागचे शिवराम पाण्डे यांनी १९०३ मध्ये प्रस्तुत काव्य लिहिलें. १९१० मध्ये '**एडवर्ड शोक प्रकाशम्**' या नांवाचें आणखी एक शोककाव्य त्यांनी लिहिलेलें आहे.

**एडवर्डवंशम्**—इ स. १९०५ मध्ये लखनौचे कवि ऊर्वीदत्तशास्त्री यांनी हे काव्य लिहिलें.

**दिल्लीप्रभा**—नेल्लोर जिल्ह्यातील कवि वेमूर्ति श्रीनिवास शास्त्री यांनी इ. स. १९११ मध्ये झालेल्या दिल्ली-दरबाराचें वर्णन या काव्यामध्ये केलेलें आहे. याच नांवाचें आणखी एक काव्य राजधानी विद्वान् शिवरामशास्त्री यांनी केलेलें आहे.[१२] याव्यतिरिक्त कलकत्त्याचे ईश्वरचंद्र शर्मा यांनी इ. स. १९०९ मध्ये लिहिलेलें **राजराजेश्वरस्य राजसूयशवितरत्नावली** हें सात सर्गांचें काव्य व एका अप्रसिद्ध कवीनें लिहिलेलें '**कैसरनीप्रतापमण्डनम्**' हीं काव्येंहि सप्तम एडवर्डच्या संबंधात लिहिलेलीं आढळतात. सप्तम एडवर्डनंतर पंचम जॉर्ज बादशहाच्या संबंधांत लिहिलेलीं काव्यें अधिक प्रमाणात आढळतात.

---

२१. पृ. २००। २२. पृ. ७६१।

**जॉर्जदेवचरितम्**—या नावाचीं काव्य जी. व्ही. पद्मनाभ शास्त्री (श्रीरंग निवासी) व लक्ष्मणसूरि यानी लिहिलेली आहेत. पद्मनाभ शास्त्रींचे जॉर्जदेवचरितम् हें **राजभक्तिप्रदीप** या दुसऱ्या नावाने प्रसिद्ध आहे. त्यानी 'पवनदूतम्' या नावाचे आणखी एक खण्डकाव्य लिहिलेले आहे.

**जॉर्जवंशम्**—ले. विद्यानाथ के. एस्. अय्यास्वामी अय्यर[२३] यानी लिहिले.

**जार्जमहाराजविजय**—ले. कोचा नरसिंहचारलु.[२४]

**चक्रवर्तिचत्वारिंशत्**—पंचम जॉर्जच्या राज्याभिषेकाप्रसंगी आर्. व्ही. कृष्णम्माचार्य यानी प्रस्तुत काव्य लिहिले आहे[२५]

आर्. व्ही. कृष्णम्माचार्य यानी कादम्बरीसार, हर्षचरितसारः, वेमभूपाल चरितम्, हे तीन सारग्रंथ व महाकवि-सुभाषितानि, साहित्यरत्नमञ्जूषा, सुभाषित शतकम्, हे तीन सुभाषितसंग्रह संपादित केले आहेत. याव्यतिरिक्त 'प्रस्तुताङ्कुर विमर्श', 'विलुप्तकौतुकम्', 'वृत्तवार्तिकटीका', 'चित्रमीमांसाटीका', 'वाणी विलाप', 'अकलाविविलाप', 'अन्यापदेश', 'वायसंदेशम्', 'श्रीदेशिक विंशत्', 'धर्मराज्यविज्ञप्ति', 'भारतगीता (स्वदेशस्तुतिपर)' इत्यादि बरींच काव्यें लिहिलेलीं असून तीं सर्व मुद्रित झालेलीं आहेत

**राजभक्तिमाला**—अमृतसरचे नरसिंहदत्त शर्मा यानी १९२९ मध्ये प्रस्तुत काव्य लिहिले.

महामहोपाध्याय लक्ष्मणसूरि (मद्रास) यानी जॉर्जदेवचरिताव्यतिरिक्त **दिल्लीसाम्राज्यम्** नावाचें एक नाटकहि लिहिलेले आहे[२६]

**आङ्ग्लजर्मनीयुद्धविवरणम्**—तिरुमलबुक्कपट्टण श्रीनिवासाचार्य यांनी प्रथम महायुद्धासंबंधी प्रस्तुत महाकाव्य लिहिलें.

**समरशांतिमहोत्सव**—ले. पी. व्ही. रामचन्द्राचार्य (मद्रास राज्यातील एक शिक्षण विभागाधिकारी).

आङ्ग्लगानम्—ले. एस्. नारायण, मद्रास.

'जॉर्जराज्याभिषेकम्'— व 'जॉर्जाभिषेकदरबार' हीं दोन काव्यें प्रयागचे शिवराम पाण्डे यानी इ. स. १९११ मध्ये लिहिलीं. इ. स. १९०३ मध्ये त्यानी लिहिलेल्या 'एडवर्डराज्याभिषेकदरबारम्' व इ. स. १९१० मध्ये लिहिलेल्या 'एडवर्डशोकप्रकाशनम्' या काव्यांचा उल्लेख वर आलाच आहे

२३ इ स १९११ मध्ये कुम्भकोण येथे मुद्रित.
२४ १९११ मध्ये तिरुपति येथे मुद्रित २५ मु ४९०।
२६ मद्रास येथे १९१२ मध्ये मुद्रित

**उत्तमजॉर्जजायसी-रत्नमालिका**-ले एस्. श्रीनिवासाचार्य (कुम्भकोणम्)

**जॉर्जप्रशस्तिः**—या नावाचीं २ काव्यें विजागापट्टणचे भट्टनाथ स्वामी व मुरादाबादचे पण्डित लल्मणी शर्मा यानी लिहिलेलीं आहेत.

मद्रासचे महालिंगशास्त्री यानी 'जॉर्जपञ्चकम्' या नावाचें एक काव्य लिहिलें आहे. त्याच्या श्लोकाची रचना बरीच सरस असून त्यामध्ये व्यक्त झालेल्या भावनावरून जॉर्ज बादशहाबद्दलचीं व इतर इंग्रज प्रशासकासंबंधीं तत्कालीन संस्कृत काव्यात आलेल्या इतर काव्यामधील भावनाची कल्पना येईल. महालिंगशास्त्रींचें 'जॉर्जपञ्चकम्' 'किङ्किणीमाला' या त्याच्या काव्यसंग्रहात प्रसिद्ध झालेलें आहे.

**जार्जपञ्चकम्**—उन्मुक्तो निखिलामयैरुपचित. सर्वैः सदाशासनैः
पृथ्वीभृत्प्रतिपन्नपादपतनं सर्वत्र निर्वारणः
दिक्षु प्रोद्धतदुर्जनान्धतमसप्रक्षोभदक्षोदयः
श्रीमान् पञ्चमजार्ज एव महसा राशिर्भुवि द्योतताम् ॥१॥

यामान् षड् दिवसस्य निष्प्रतिहतिर्नित्योदयश्रीयुतः
पाताले वसुधातले दिवि च वा य. स्वौजसा दीप्यते ।
साक य. सुमनोगणै. कुवलयं धत्ते विकासान्वित
श्रीमान् जार्जमहीश्वरो विजयतां तेजोभिरर्कातिगः ॥२॥

भासो यस्य विलङ्घयन्ति जलधिं क्षुब्धोर्मिमाल बलाद्
आक्रामन्ति महीध्रमौलिमुकुटास्त्वङ्गन्ति तारापथे ।
नौका–धूमरथाम्बरप्रवहण–स्वाधीन–शक्तित्रय
श्रीमान् जार्जसहस्रभानुरयनाव्याहतो दीप्यतु ॥३॥

एकस्मिन् समुदितवरे द्युतिनिधौ यस्मिन् प्रहर्षत्विषो
गृह्यन्ते पृथिवीभृतो न वचसाऽप्यन्येतरे स्वल्पकाः ।
पाश्चात्योदयभागपि प्रतिनिधि–प्रत्यूढ–पूर्वानन
श्रीमानेव समेधतां दिनमणिर्जार्जस्तुरीयोत्तरः ॥४॥

दुष्काल–व्यतिषङ्ग–दुर्गतधियां सरभदुर्गाटवी–
दावोद्दामसमीरण–व्रतघनो धर्मव्यवस्थोद्यतः ।
धार्ये वर्त्मनि वर्तयन् भुवमिमामार्यान्वयाधिष्ठितां
श्रीमान् जार्जनृपोऽवतात् प्रशमिताबाधां समा. शाश्वतीः ॥५॥

(किङ्किणीमाला, पृ. ८६)

**यदुनृपसौहार्दम्**—पंचम जॉर्ज बादशहाच्या निधनानंतर त्यांचा ज्येष्ठ पुत्र आठवा एडवर्ड याने स्वतः व वंशपरंपरेने मिळालेल्या साम्राज्य स्त्रीप्रेमाखातर सोडून

दिले. एडवर्डचा हा राज्यत्याग निःसंशय काव्याचा विषय होण्यासारखा आहे. या विषयावर प्रत्यक्ष इंग्रजी भाषेत सुद्धा काव्यरचना झाल्याचे ऐकिवांत नाही. पण एका संस्कृत कवीची प्रतिभा मात्र या घटनेमुळे उफाळून आली. श्री. ए. गोपालाचार्य यानी प्रस्तुत विषयावर 'यदुवृद्धसौहार्दम्'[२७] नावाचें ६०० श्लोकांचे संस्कृत काव्य लिहिलें असून त्यातील प्रत्येक श्लोकावर कवीने स्वतः टिप्पणीवजा टीका लिहिलेली आहे. प्रस्तुत काव्यांत अनेक इंग्रजी शब्दांचे संस्कृत पर्याय कवीने उपयोगांत आणलेले आहेत. उदा०–December = 'दिशम्भर'.

('भावमूर्तिनिधिचन्द्रसंख्यसंवत्सरेह्यभिधया दिशम्भरे।' (श्लोक ७३))
Parliament = राजकर्तृसमितिः (श्लोक ८६).

या प्रकारचे या कवीने वापरलेले संस्कृत पर्याय पुढील एका प्रकरणांत आम्ही उद्धृत केलेले आहेत.

मुसलमान व इंग्रज प्रशासकांव्यतिरिक्त परकीय सत्ताधाऱ्यांसंबंधी लिहिलेलें **पुरुसिकंदरीयम्** या नांवाचें एक महाकाव्य जयपूरचे साहित्याचार्य लक्ष्मीनारायण त्रिवेदी यानी लिहिलेलें आहे. अलेक्झांडर व पोरस यांच्या संबंधांतील घटना हा या काव्याचा विषय त्याच्या नांवावरूनच लक्षांत येण्यासारखा आहे. याव्यतिरिक्त श्रीवागीश्वरीस्तवराजः, ऋतुविलासितम् (काव्यम्), स्वर्णेष्टकीयम् (नाटक), निभण्डघट्टकम् (भाण), आननविश्वदर्शनम्, तर्करत्नावली, गोकुलेशमङ्गलाशासनम् हीं पुस्तकें श्रीलक्ष्मीनारायण त्रिवेदी यांनी लिहिलीं असून 'शिशुविलसितम्' या नांवाचें एक हिन्दी छंदातील संस्कृत काव्य त्यांनी लिहिलें आहे.[२८]

अशा प्रकारें आधुनिक संस्कृत साहित्यांतील परकीय राजस्तुति हें प्रकरण मोठें विचित्र आहे. राजस्तुतिपर काव्यें लिहिण्याच्या प्राचीन परम्परेची ही एक खेदकारक विकृति आहे, असे म्हटल्यावाचून राहवत नाही. विशेषतः दिल्लीदरबार, सप्तम एडवर्ड व पंचम जॉर्ज यांचे राज्याभिषेक व व्हिक्टोरिया राणीचें निधन या विषयावर ज्या संस्कृत कवींनी काव्यरचना केली, ते किती परिस्थितिपराङ्मुख होते, हें न सांगतां लक्षांत येण्यासारखें आहे. तथापि या कवींचें समर्थनच करावयाचें झाल्यास असें म्हणतां येण्यासारखें आहे, की ज्यानी आपली प्रतिभा परकीय राजांची स्तुति करण्याच्या कामीं वेठीस धरली, त्यांनी तिच्या साहाय्याने आपल्या इष्ट देवतांची स्तुति करून तिचा सदुपयोग केला आहे. जहांगीरचरितप्रमाणे 'राष्ट्रौढवंशम्' (२० सर्ग) सारखें स्वकीय राजवंशाचें वर्णन करणारा रुद्र कवि १६-१७ व्या

२७. श्रीराम प्रेस, मद्रास येथे इ. स. १९३७ मध्ये मुद्रित.
२८. दिव्यज्योतिः–विशेषांक १९५७.

शतकांत आढळतो, तसा जॉर्जपंचकम् प्रमाणेच देशिनेन्द्रस्तवाञ्जलिः लिहिणारा महालिंगशास्त्री २० व्या शतकात आढळतो. पंडितराज जगन्नाथानं 'असफविलास' हे काव्य लिहिलं त्याप्रमाणे 'गंगालहरी' सारखं उत्कृष्ट देवतास्तोत्रहि लिहिलेलं आहेत. या कवींची परकीय राजस्तुतिपर काव्यं ज्या गुणांनी अलंकृत झालेलीं आहेत, तेच गुण त्याच्या देवता–स्तुतिपर किंवा अवांतर काव्यांत त्यापेक्षाहि अधिक उत्कटतेने आढळतात. त्यामुळे परकीय राजस्तुतिपर काव्यें लिहिण्यांत त्यांची देशहितविमुखता किंवा स्वार्थबुद्धि कारणीभूत झाली, असा सरसकट आरोप करण्याऐवजीं त्यांच्या वृत्तीची निरंकुशता या कामीं कारणीभूत झाली, असं म्हणणें अधिक उचित होईल. व्याकरणाचे अपप्रयोग व छंदोभंग करण्याच्या कामीं कवींचं निरंकुशत्व प्राचीन शास्त्रकारांनी मान्य केलेंच आहे, तेंच निरंकुशत्व आधुनिक संस्कृत कवींनी विषयाची निवड करण्याच्या कामींहि गाजविलं.

---

प्रकरण ७ वें

# विलष्ट काव्यें

प्राचीन महाकवींपैकी सुबन्धु, बाणभट्ट, कविराज यासारख्या गद्यलेखकांनी व भारवि, माघ, हर्ष या पद्यलेखकांनी साहित्यामध्ये पाण्डित्यप्रदर्शन करण्याच्या हव्यासाने एक निराळाच सम्प्रदाय प्रवर्तित केलेला दिसतो. सुबन्धूने, 'वासवदत्ता' नामक "प्रत्यक्षरश्लेषमयः प्रबन्धः" लिहून जो श्लिष्टतेचा आदर्श स्थापित केला त्याला अनुसरून विविध प्रकारची श्लिष्टता आपल्या साहित्यांत ओतण्याचा हव्यास नंतरच्या अनेक कवींनी धरलेला दिसतो. १२व्या शतकांत झालेल्या कविराजाने 'राघवपाण्डवीयम्' नामक द्वर्थी काव्य लिहून श्लिष्टतेचा आणखी एक आदर्श निर्माण केला. *राघवपाण्डवीयम् महाकाव्याचे वैशिष्ट्य हें की त्या एकाच काव्या*मध्ये रामायण व महाभारत या दोन्ही कथा श्लेषबलाने निवेदन केलेल्या आहेत. कविराजाचा समकालीन बंगालचा कवि संध्याकरनन्दी याने 'रामपालचरितम्' नामक महाकाव्यात प्रभु रामचंद्र व बंगालचा समकालीन राजा रामपाल या दोघांचीं चरित्रें श्लेषबलाने एकत्र गुंफलेलीं आहेत.[1] त्याच १२ व्या शतकांतील धनञ्जय नावाच्या एका जैन कवीनेहि १८ सर्गांचें असेंच एक महाकाव्य लिहून या क्लिष्ट काव्याच्या सम्प्रदायांत आणखी एक भर टाकली आहे.[1]

प्राचीन महाकवींचीं देवता, राजर्षि व अन्य सत्पुरुष यांच्या चरित्रावर आधार*लेलीं महाकाव्यें लिहिण्याची परम्परा आधुनिक काळांतील संस्कृत महाकवींनी* जशी अखंडितपणे चालविली, तशी ही क्लिष्ट काव्याचीहि परम्परा त्यांनी अखण्डित राखली आहे. राघवपाण्डवीयकार कविराज हा या परम्परेचा प्रवर्तक. कविराजाने निर्माण केलेल्या परम्परेनुसार उत्तरकालीन अनेक कवींनी आपला मार्ग चोखाळला. कविराजाच्या या सम्प्रदायांतील कांही आधुनिक कवींचा व त्यांच्या क्लिष्ट साहित्याचा परिचय संक्षेपतः पुढीलप्रमाणे आहे.

**यादवराघवीयम्**—विश्वगुणादर्शचम्पूमुळे विशेष प्रसिद्धी पावलेल्या १७ व्या शतकांतील वेंकटाध्वरीने कविराजाच्या राघवपाण्डवीयम् काव्याचें अनुकरण करण्यासाठीच 'यादवराघवीयम्' हें द्वयर्थी व शब्दालंकारप्रचुर काव्य लिहिलें.

---

१ कीथ पृ. १३७।

"साकेताख्या ज्यायामासीद्याविप्रादीप्तातार्यधारा ।
पूराजीतादेवाद्याविश्वासाग्र्या सावाशारावा ॥ "

यासारख्या क्लिष्ट श्लोकावरून यादवराघवीयम् काव्याचे क्लिष्टत्व मोठमोठ्या संस्कृत पण्डितांसहि समजूं शकेल.

**राघवयादवपाण्डवीयम्**—कविराज व वेंकटाध्वरि या दोघांवरहि उणु मात करण्यासाठी चिदम्बर कवीने (१७ वे शतक) 'राघवयादवपाण्डवीयम्' या नावाचें ३ सर्गांचें त्र्यर्थी काव्य लिहून दाखविलें.

"अस्त्यञ्चिता यामघुरासमानैरनेकशोभारतवासभूमिः ।
परैर्वरालङ्करणैः प्रवीरैः पूर्हस्तिनामास्वदभूदयोध्या ॥ "

यासारख्या क्लिष्ट श्लोकांतून रामायण, भागवत व भारत या तीन ग्रंथांतील कथा गुम्फून चिदम्बर कवीने आपले असाधारण भाषाप्रभुत्व सिद्ध केलें आहे. हे दुर्बोध काव्य सुबोध करण्याचें दायित्व चिदम्बर कवीचा पिता अनन्तनारायण याने घेतलें. पुत्राच्या काव्यावर पित्याने अधिक पाण्डित्यपूर्ण टीका लिहिली. त्र्यर्थी काव्यांतून आपलें पाडित्य यथार्थपणे व्यक्त झालें नाही, असे वाटूनच की काय चिदम्बर कवीने पंचार्थी काव्य लिहावयास घेतलें. 'पञ्चकल्याणचम्पूः' या आपल्या श्लेषमय काव्यांतून राम, कृष्ण, विष्णु, शिव आणि सुब्रह्मण्य या पांच देवांचे विवाहोत्सव कवीने वर्णिले. या पञ्चार्थी काव्यावर टीका लिहूं शकणारा कोणीहि न आढळल्याने चिदम्बर कवीने स्वतः त्या काव्यावर टीका लिहिली. हा चिदम्बर कवि १७ व्या शतकाच्या पूर्वार्धात विजयानगर येथे वेंकटभूपालाचा सभापण्डित होता. याने लिहिलेला '**भागवतचम्पूः**' नामक ग्रंथहि उपलब्ध आहे. म्हैसूरातील उदयेन्द्रपुरच्या अनंताचार्य नामक कवीनेहि 'यादव राघवपाण्डवीयम्' या नावाचें एक त्र्यर्थी काव्य लिहिलेलें आहे. मागे उल्लेखिलेल्या (पृ. ४३) राजचूडामणि दीक्षित उर्फ रत्नखेट कवीनेहि याच नांवाचें व अशाच स्वरूपाचें काव्य लिहिलें आहे.

**सप्तसन्धानमहाकाव्यम्**—चिदम्बर कवीच्या पंचकल्याणचम्पूच्या पुढची पायरी म्हणजे मेघविजयगणि नामक जैन साधूचें प्रस्तुत सप्तार्थक काव्य होय. या काव्यांत श्लेषाच्या बळावर वृषभनाथ, शांतिनाथ, पार्श्वनाथ, नेमिनाथ, महावीर, कृष्ण व बलराम या सात जणांची चरित्रे गुम्फलेलीं आहेत. त्यापैकी ५ जैन तीर्थंकर होते. मेघविजयगणीच्या पूर्वी हेमचन्द्रसूरीने प्राचीन काळीं असेंच एक सप्तसन्धानकाव्य लिहिलें होतें असें—

श्रीहेमचन्द्रसूरीशैः सप्तसन्धानमादिमं ।
रचितं, तदलाभे तु स्यादिदं तुष्टये सताम् ॥

या श्लोकावरून स्पष्ट दिसतें. हेमचन्द्राचें सप्तसन्धान काव्य लुप्त झाल्यामुळें त्याची

उणीव भरून काढण्यासाठीच मेघविजयगणीने हा खटाटोप केला हें प्रस्तुत श्लोकारम्भ दिसते. प्रस्तुत लेखकाने '**देवनन्दाभ्युदयम्**' नावाचे सात सर्गांचे महाकाव्य लिहिलें असून त्यामध्ये विजयदेवसूरि यांचे चरित्र वर्णिलेलें आहे. त्याच्या '**शांतिनाथचरितम्**' या महाकाव्यात शांतिनाथाचे चरित्र वर्णिलेलें आहे. देवनन्दाभ्युदयम् व शांतिनाथचरितम् या काव्यातील श्लोकात शिशुपालवधम् व नैषधचरितम् यातील पंक्तींचा उपयोग समस्यापूर्तीसारखा केलेला आहे. उदा०--

> " श्रियामभिव्यक्तमनोनुरक्तता विशालशालाश्रितया श्रिया स्फुटा
> तथा बभासे स जगत्त्रयीविभुर्जगत्प्रतापावलिकीर्ति-मण्डलः ॥"
>
> " निपीय यस्य क्षितिरक्षिण. कथाः सुरा सुराज्याविमुख बहिर्मुखम्
> प्रपेदिरेऽन्त स्थिरतन्मयाशया सदा सदानन्दमृत प्रशसया ॥"
>
> " यया श्रुतस्येह निपीततत्कथास्तथाद्रियन्ते न बुधाः सुधामपि
> सुधाभुजां जन्म न तन्मन प्रिय भवेद्भवे यत्र न तत्कथाप्रथा ॥"

मेघविजयगणीने कच्छचा राजा विजयप्रभसूरि याला संदेश म्हणून '**मेघदूतसमस्यालेखः**' नावाचे एक काव्य लिहिलें असून त्यामध्ये मेघदूतातील पंक्तींचा वरील प्रमाणेच श्लोकपूर्तीसाठी किंवा समस्यापूर्तीसाठी उपयोग केला आहे. '**दिग्विजय.**' नामक १३ सर्गांच्या महाकाव्यात मेघविजयगणीने कच्छनृपति विजयप्रभसूरि यांचें चरित्र वर्णिलेलें आहे. जैनमतविरोधी सिद्धान्ताचे खण्डन करण्यासाठी त्याने 'प्रबोधचन्द्रोदयम्' या नाटकाच्या धर्तीवर '**युक्तिप्रबोधनम्**' नामक नाटक लिहिलेलें आहे. अशा प्रकारे मेघविजयगणीने (१७ वें शतक) ४ महाकाव्यें, एक खण्डकाव्य व एक नाटक असे एकूण ६ ग्रंथ लिहिले. त्यातील सप्तसन्धान काव्यामध्ये त्याचें असाधारण भाषाप्रभुत्व व्यक्त झालेलें आहे.[२]

**राघवनैषधीयम्**—जयशंकरपुत्र हरदत्त (१८ वें शतक) याने प्रस्तुत २ सर्गांचें द्व्यर्थी काव्य लिहिलें असून त्याची टीकाहि स्वत कवीनेंच लिहिली आहे.

**यादवराघवीयम्**—ले. नरहरि. याचें स्वरूप उपरिनिर्दिष्ट द्व्यर्थी काव्यासारखेंच आहे.

**नैषधपारिजातम्**—मागील प्रकरणात उल्लेखिलेल्या कृष्ण दीक्षित (अय्या दीक्षित) याने प्रस्तुत द्व्यर्थी काव्य लिहिलें असून त्यामध्ये नलराजाची व पारिजातपहरणाची कथा श्लेषाने एकत्र गुम्फलेली आहे.

---

२ कृ १३। (श्रीयशोविजय जैन ग्रंथमालेमध्ये मेघविजयगणीचे ग्रंथ प्रकाशित होत आहेत.)

**कोसलभोसलीयम्**—ले. शेषाचलकवि. ६ सर्गांच्या या द्व्यर्थी महाकाव्यांत तंजावरच्या भोसले घराण्यातील एकोजीचा पुत्र शहाजी व प्रभु रामचंद्र यांचें चरित्र श्लेषानें एकत्र सांधलें आहे. प्रस्तुत कवि हा शहाजी भोसल्याचा आश्रित कवि होता, हें सांगणें नकोच.

**अवोधाकरम्**—तंजावरच्या तुकोजी राजाचा मंत्री घनश्याम यानें हें त्र्यर्थी काव्य लिहिलें असून त्यामध्ये नल, कृष्ण व हरिश्चन्द्र यांचीं चरितें गुंफलेलीं आहेत. काव्यांची टीका स्वतः कवीनेच लिहिली आहे.[३]

**कलिदूषणम्**—वर उल्लेखिलेल्या घनश्याम कवीने संस्कृत व प्राकृत या दोन भाषेंत श्लेष साधतील असें हें अद्भुत काव्य लिहिलें आहे. अशा प्रकारचें दुसरें काव्य आढळत नाही. घनश्याम कवीप्रमाणेंच महाराष्ट्रांतल्या रामजोशी कवीने चार भाषांची एक लावणी लिहिली आहे, पण त्यामध्ये श्लेष नाही. या घनश्याम कवीने प्रबोधचन्द्रोदयम् या नाटकाधारसे **प्रचण्डराहूदयम्** या नावाचें एक लाक्षणिक नाटक लिहिलें आहे.

**कङ्कणबन्धरामायणम्**—संस्कृतांतील क्लिष्ट काव्याची परिसीमा कङ्कण-बन्धरामायणानें गाठली. या नावाचीं तीन आधुनिक रामायणें प्रसिद्ध आहेत. तीं तीन्ही रामायणे म्हणजे केवळ संस्कृत साहित्यातीलच नव्हे तर जागतिक साहित्यातील आश्चर्यें आहेत. ३२ अक्षराच्या एका श्लोकात संपूर्ण रामकथा कृष्णमूर्ति (१९ वें शतक) नावाच्या कवीनें लिहिली. हा श्लोक म्हणजेच त्यांचें 'कङ्कणबन्ध-रामायणम्' होय. हा ३२ अक्षरी श्लोक कङ्कणाकृति लिहिला म्हणजे कङ्कणबन्धरामायण तयार तयार होतें. तो श्लोक असा—

" नेतादेवालीनामाशावानाधीनानेकालोकी ।
*मास्यानंभारस्यायोगीशं पायादेत रामेराजा ॥* "[४]

हा श्लोक कोणत्याहि अक्षरापासून उजवीकडून डावीकडे व डावीकडून उजवीकडे वाचला असतां त्यातून ६४ श्लोक मिळतात. अशा प्रकारें एका श्लोकातून ६४ श्लोक काढून त्यातून रामकथा जाणावी लागते या कृष्णमूर्ती कवीच्या आईचें नांव गौरी व वडिलांचें नांव सर्वांग होतें. कङ्कणरामायणाचा हा अलौकिक प्रकार कृष्णमूर्तीनें प्रथमच सुरू केलेला दिसतो.

कृष्णमूर्तीवर मात करण्यासाठी चारलु भाष्यकार शास्त्री या कृष्णा जिल्ह्यातील काकरपारती गावीं राहणाऱ्या एका आधुनिक ( २० व्या शतकाचा पूर्वार्ध ) कवीनें पुढीलप्रमाणे दुसरें एक कङ्कणबन्ध रामायण लिहिलें तें असें—

---

३. कृ. १६६ । ४. कृ. पृ. १९९.

" रामानाथाभारासाराचारावारागोपाधारा
धाराधाराभीमाकारापारावारासीतारामा ॥ "[१]

या कङ्कणाकृति श्लोकांतून निरनिराळ्या उपायांनी १२८ अर्थ निघतात. संपूर्ण साहित्यसृष्टींत या क्लिष्टतेला दुसरी तोड नाही. वर उल्लेखिलेल्या क्लिष्ट काव्यांतून त्यांच्या लेखकांचें प्रगाढ भाषापाण्डित्य व्यक्त होतें यांत संशयच नाही, पण त्याबरोबरच संस्कृत भाषेतील शब्दांचें नानार्थसंपन्नत्वहि तितक्याच उत्कटतेने प्रतीत होतें. संस्कृतव्यतिरिक्त इतर कोणत्याहि भाषेत अशा प्रकारचीं काव्ये निर्माण होण्याची शक्यता असेल असें वाटत नाही.

---

५. इ. पृ. १९५.

## प्रकरण ८ वें

# शास्त्रनिष्ठ काव्यें

चवथ्या किंवा पाचव्या शतकांत झालेल्या भट्टीकवीनें क्लिष्ट-काव्याचा एक निराळाच आदर्श प्रस्थापित केला, पांडित्यप्रदर्शनाव्यतिरिक्त या काव्यलेखनामागे दुसरा कोणताहि हेतु भट्टीच्या अन्तःकरणात नव्हता. शास्त्रकारांनी सांगितलेलें 'सद्यः परनिर्वृति' हें काव्याचें प्रमुख प्रयोजन जरी या काव्याच्या मुळाशीं असलें, तरी तें फक्त एका विशिष्ट मर्यादेपुरतेंच. भट्टीच्या सम्प्रदायातील काव्याचें अवगाहन करून पंडितवर्गाला 'परनिर्वृति' म्हणजे आत्यन्तिक आनंद लाभण्याची शक्यता आहे. सर्वसामान्य रसिकांना मात्र त्या आनंदाचा वाटा मिळणें अशक्यच. भट्टीनें आपल्या महाकाव्याच्या शेवटी स्पष्टपणे म्हटलेंच आहे कीं, माझें हें काव्य टीकेच्या सहाय्यानेंच कळणें शक्य आहे. याचें वाचन करणाऱ्या बुद्धिहीन लोकांचें मरण ओढवल्यावाचून राहणार नाही, कारण मी हें काव्य विद्वानांसाठींच लिहिलें आहे.

> " व्याख्यागम्यमिदं काव्यमुत्सवः सुधियामलम् ।
> हता दुर्मेधसश्चास्मिन् विद्वत्प्रियतया मया ॥ " (१२-३४)

अलंकारशास्त्र हें सर्वथा काव्याशी सनद्ध आहे. काव्याची रमणीयता वाढविण्यासाठी उचित अलंकाराची योजना त्यामध्यें सर्वथा आवश्यकच असते. पण भट्टीच्या सम्प्रदायातले महाकवि अलंकाराचा उपयोग करण्यासाठीं किंवा आपलें अलंकारशास्त्रावरील पांडित्य प्रदर्शित करण्यासाठींच काव्यरचना करीत आले. साहित्यशास्त्रात सांगितलेल्या सर्व अलंकाराचा उपयोग करणें एवढेंच यांच्या काव्याचें ध्येय. अशा प्रकारच्या काव्यामुळें कवीचें अलंकारशास्त्रावरील प्रभुत्व भरपूर व्यक्त झालें तरी त्यामुळें उत्पन्न होणाऱ्या कृत्रिमतेपायीं काव्याचें काव्यत्व मात्र क्षीण होतें. पण्डितराज जगन्नाथानें—

> " निर्माय नूतनमुदाहरणानुरूपं काव्यं मयाऽत्र विहितं न परस्य किञ्चित् ।
> किं सेव्यते सुमनसां मनसापि गन्धः कस्तूरिकाजननशक्तिभृता मृगेण ॥ "

अशी प्रतिज्ञा करून आपल्या रसगंगाधरातील साहित्यशास्त्रीय सिद्धान्तांचें स्पष्टीकरण करण्यासाठीं जें काव्य निर्माण केलें, त्यात काव्यगुणांची कमतरता नाही; परंतु काव्यरचना भट्टीच्या

सम्प्रदायातील कवींच्या अन्तःकरणातहि आपले शास्त्रपाण्डित्य व्यक्त करण्याचीच आकांक्षा प्रामुख्याने असल्यामुळे त्यानाहि दूषण देणे योग्य होणार नाही.

भट्टीकाव्याच्या निर्मितीसंबंधी एक मनोरंजक कथा आहे. ती अशी— भर्तृहरि नावाचा वैय्याकरण एकदा आपल्या शिष्याना झाडाखाली व्याकरण शिकवीत बसला असताना गुरुशिष्याच्या मधून एक हत्ती गेला. या विघ्नामुळे भर्तृहरीने व्याकरणशास्त्राचे अध्यापन स्थगित केले. पण शिष्यानी प्रार्थना केल्यावरून अप्रत्यक्ष रीतीने व्याकरण शिकविण्यासाठी त्याने एक वर्षाच्या आत एक महाकाव्य लिहिले. या महाकाव्याचे प्रकीर्ण, प्रसन्न, अलंकार व तिङन्त असे ४ भाग आहेत. त्यात पाणिनीय सूत्राच्या क्रमानुसार व्याकरणशास्त्रातील सर्व उदाहरणे उपलब्ध होतात. १०व्या सर्गात सर्व अलंकारांची उदाहरणे आढळतात. हा भर्तृहरि म्हणजेच भट्टी होय. म्हणून या काव्याला भट्टीकाव्य असे नाव मिळाले. भट्टीच्या पद्धतीस अनुसरून अल्याकाळीं योगीन्द्रनाथ तर्कचूडामणी याने '**दशाननवधम्**' (मुद्रित) काव्य लिहिले. भूम किंवा भौमक कवीने (७ वे शतक) '**रावणार्जुनीयम्**' (मुद्रित) हे २७ सर्गांचे महाकाव्य अष्टाध्यायीच्या उदाहरणासाठी लिहिले असून त्यामध्ये कार्तवीर्याचें चरित्र वर्णिलेले आहे.

म. म. दिवाकर कवीने '**पाण्डवचरितम्**' नांवाचे १४ सर्गांचे महाकाव्य भट्टीच्या सम्प्रदायास अनुसरूनच लिहिले. त्याच्या प्रथम सर्गाच्या शेवटी कवीने जे वाक्य टाकले त्यावरून त्याच्या लेखनाचा ध्येय स्पष्ट होते. वाक्य असें—

"इति लक्षणादर्शे पाण्डवचरिते महाकाव्ये पाणिनीये कुटादि-
भूवादि-पादद्वयलक्षणसङ्ग्रह.पाण्डवनिवासो नाम प्रथमः सर्गः।"

या समाप्तिवाक्यावरून प्रस्तुत परम्परेतील कवींचे ध्येय काय होते तें न सांगताहि समजण्यासारखे आहे. याच पद्धतीस अनुसरून यदुनाथ कवीने **यदुनाथकाव्यम्**, ब्रह्मदत्तपुत्र नारायणने **सुभद्राहरणम्**, (सर्ग २०), व **धातुकाव्यम्** (धातुपाठाच्या उदाहरणार्थ), एका अप्रसिद्ध कवीने **पाणिनीसूत्रोदाहरणम्** नावाचें भागवतकथासम्बन्धी काव्य लिहिले. वासुदेव कवीच **वासुदेवविजयम्** हें काव्य मुद्रित झालेलेंच आहे. कृष्णलीलाशुक नामक कवीने **श्रीचिह्नकाव्यम्** या नावाचें काव्य लिहिले आहे. या १२ सर्गांच्या काव्यातील अन्तिम चार सर्ग कवीचा शिष्य दुर्गाप्रसाद याने लिहिले असून, त्यामध्ये त्रिविक्रमकृत व्याकरणाच्या उदाहरणाचा उपयोग केला आहे. आरंभीच्या सर्गात कृष्णलीलाशुकाने वररुचीच्या प्राकृत व्याकरणातील उदाहरणाचा उपयोग केलेला आहे.

अशा प्रकारें भट्टीने प्रवर्तित केलेली शास्त्रोदाहरणात्मक (अत एव क्लिष्ट) महाकाव्यांची परंपरा १७ व्या शतकापूर्वीच्या कवींनी कशी चालू ठेवली याची

कल्पना येण्यास दिलें एवढीं उदाहरणें पुरी आहेत. तीच परम्परा आधुनिक काळा-तील साहित्यिकांनीहि अखण्डित राखलेली आहे, याची कल्पना पुढील उदाहरणावरून येईल.

**रघुनाथभूपालीयम्**—तञ्जावरच्या रघुनाथनायकानें लिहिलेल्या काही महा-काव्याचा परिचय मागील प्रकरणांत आलाच आहे. त्याचा समाश्रित कृष्णकवि किंवा कृष्णपण्डित यानें आपल्या विद्वान् आश्रयदात्याच्या स्तवनार्थ व, त्याबरोबरच अलंकाराच्या निदर्शनार्थ ८ सर्गांचे प्रस्तुत महाकाव्य लिहिलेलें आहे. त्याची टीका रघुनाथनायकाच्या आदेशानुसार विजयेन्द्रतीर्थांचा शिष्य सुधीन्द्रतीर्थ यानें लिहिली आहे.

**रामवर्मयशोभूषणम्**—१८ व्या शतकांतल्या कोक्कनाथसदाशिव-मखी नामक कवीनें त्रावणकोरच्या तत्कालीन राजा रामवर्मा याचें यशोवर्णन अलंकार-निष्ठ पद्धतीनें प्रस्तुत काव्यांत केलेलें आहे.

**शठगोपगुणालंकारपरिचर्या**—श्रीरंगमच्या भट्टकुलांतील १७ व्या शतकांतील एका अप्रसिद्ध कवीनें शठगोपनम्माल्वार या साधूच्या स्तुत्यर्थ प्रस्तुत अलंकारशास्त्रपर काव्य लिहिलेलें आहे.

**अलंकारमञ्जूषा**—देवशंकर नांवाच्या कवीनें (१८ वें शतक) थोरले माधवराव पेशवे व रघुनाथराव पेशवे (राघोबा दादा) या दोघांचें स्तवन प्रस्तुत अलंकारनिष्ठ काव्यांत केलेलें आहे.

**अर्थचित्रमणिमाला**—भासनाटकचक्राच्या संशोधनामुळे विसाव्या शत-काच्या आरंभीं विशेष प्रसिद्धि पावलेले म. म. गणपतिशास्त्री प्रस्तुत यानीं काव्यामध्ये (मुद्रित) त्रावणकोरच्या समकालीन राजा विशाखरामवर्मा याची स्तुति अलंकार-मुखानें केली आहे.

**लोकमान्यालंकारः**—इंदूरच्या महाराजा होळकर महाविद्यालयाचे माजी अध्यापक गजानन रामचन्द्र परमेश्वर यानीं लिहिलेलें, लोकमान्यांच्या स्तुतीस वाहिलेलें प्रस्तुत काव्य आधुनिक अनेक काव्यांमध्ये विशेष उल्लेखनीय आहे. हें काव्य लिहिण्याचा त्यांचा उद्देश मागील प्रकरणांत (पृ. ११–१२) दिलेला आहे.

**अलंकारमणिहार**—म्हैसूरच्या परकालमठाचे ३१ वे अधिपति (इ. स. १८३९ ते १९१६) श्रीकृष्ण परकालस्वामी यानीं अलंकारांच्या निदर्शनार्थ श्री वेंकटेश्वर-स्तुतिविषयक प्रस्तुत काव्यग्रंथ लिहिला आहे. हे मठाधिपति आपल्या पूर्वाश्रमींचे कृष्णमाचार्य यांच्या नांवानें म्हणून म्हैसूरमध्ये प्रसिद्ध होते. त्यांनी विविध विषयांवर एकूण ६७ ग्रंथ लिहिले असून त्यांतील रहस्यत्रयविलासचम्पू, कार्तिकेयस्तव-

दीपिकाचम्पू, श्रीनिवासविलासचम्पू, चपेटाहस्तिस्तुतिः, उत्तरङ्गमाहात्म्यम्, रामेश्वरविजयम्, नृसिंहविलासः व मदनगोपालमाहात्म्यम् हीं काव्यें उल्लेखनीय आहेत.

**वृत्तरत्नावली**—बंगालच्या राधापूरचा नायब दिवाण यशवंतसिंह (१८ वें शतक) याचा आश्रित कवि रामदेव याने वृत्तांच्या उदाहरणासाठी यशवंतसिंहाच्या स्तुतीने पूर्ण असें प्रस्तुत काव्य लिहिलें आहे. हा रामदेवकवि चिरंजीव या नांवानें प्रसिद्ध होता.

**छन्दोमञ्जरी**--गोपालदासपुत्र गङ्गादास याने छन्दोनिदर्शनात्मक प्रस्तुत ६ प्रकरणांचा ग्रंथ लिहिला असून त्यांतील सर्व श्लोक श्रीकृष्णस्तुतिपर आहेत. याव्यतिरिक्त 'अच्युतचरितम्' नावाचे १६ सर्गाचें महाकाव्य या गङ्गादास कवीने लिहिलेलें आहे.

**वृत्तमञ्जरी**—नागपूरचे संस्कृत पंडित श्री. वसंत त्र्यंबक शेवडे यांनी वृत्तलक्षणात्मक प्रस्तुत भगवतीस्तोत्र लिहिलें आहे. त्यांत वृत्तलक्षणाचे श्लोक त्याच वृत्तांत दिलेले असून उदाहरणाच्या श्लोकांत वृत्ताचें नाव गोवलें आहे. श्री. शेवडे यांनी 'रघुनाथतार्किकशिरोमणिचरितम्' हें १२७ श्लोकांचें त्रिसर्गात्मक काव्य लिहिलें आहे. वाराणसीच्या सारस्वती सुषमे मध्ये (व. १२ अं. ३–४) ते प्रकाशित झालें होतें.

---

४. श्रीनाथ प्रेस, इन्दूर येथे मुद्रित. (या प्रकरणांत उल्लेखिलेली बहुतेक सर्वच काव्यें मुद्रित झालेली आहेत. या स्वरूपाची काही अमुद्रित काव्यें आम्हास ठाऊक आहेत, ती प्रकाशात आल्यावाचून त्याचा परिचय येथे देणें योग्य वाटले नाही.)

## प्रकरण ९ वे

# चम्पूवाङ्मय

वेद, उपनिषद व पुराणे या मौलिक वाङ्मयामध्ये गद्य व पद्य यांचे समिश्रण क्वचित् क्वचित् दृष्टिस पडत. परंतु अशा गद्य-पद्यमय स्वरूपाचा स्वतंत्र वाङ्मय प्रकार दहाव्या शतकापर्यंत स्वतंत्रपणे विकास पावलेला दिसत नाही. दहाव्या शतका मध्ये मात्र त्रिविक्रमभट्ट किंवा यमुनात्रिविक्रमभट्ट या विख्यात साहित्यिकाने नलचम्पू लिहून हा गद्यपद्यमय वाङ्मयाचा एक अभिनव प्रकार संस्कृत साहित्यात प्रवर्तित केला. हा त्रिविक्रमभट्ट दहाव्या शतकातील राष्ट्रकूट वंशाच्या तृतीय इंद्राचा सभापण्डित होता. त्याच्या मूळ नाव सिंहादित्य असे होते. सरस्वतीची कृपा होऊन सात दिवसाच्या आत त्याने नलदमयंतीची कथा या अभिनव पद्धतीने व उत्कृष्ट भाषाशैलीत लिहिली. भोजराजाने आपल्या सरस्वतीकण्ठाभरण ग्रंथात—

> " गद्यानुबन्धपदमिश्रितपद्यसूक्ति. ।
> हृद्यापि वाद्यकलया कलितेव गीति ॥ "

या शब्दात या अभिनव काव्यप्रकाराचे वर्णन केले आहे. या प्रकारच्या काव्याला "चम्पू" हे नाव कां मिळाले ते सांगणे कठीण आहे. विश्वनाथाने साहित्यदर्पणात—

> " गद्यपद्यमय काव्य चम्पूरित्यभिधीयते । "

अशा प्रकारचे या चम्पूचे लक्षण सांगितले आहे. त्रिविक्रमभट्टाच्या काळात सोमदेवाने यशस्तिलकचम्पू हा जैन साहित्यातील उत्कृष्ट ग्रंथ लिहिला. त्यानंतर विदर्भदेशाधिपति भोज व अनंतभट्ट यांनी रामायणचम्पू, लक्ष्मणसूरीने भारतचम्पू व भरताच्या शतकातील अभिनवकालिदास नामक कवीने अभिनवभारतचम्पू व भागवतचम्पू हे ग्रंथ लिहिले. चम्पूकारांच्या परंपरेत त्रिविक्रमभट्टानंतर विशेष गाजलेला चम्पूकार म्हणजे वेंकटाध्वरि हा होय प्रस्तुत ग्रंथाच्या दृष्टीने त्याचा अन्तर्भाव अर्वाचीन साहित्यिकांच्या प्रभावळीत प्रामुख्याने होतो. वेंकटाध्वरीचे निवासस्थान काञ्चीनगर् येथे होते. त्याचा 'विश्वगुणादर्शचम्पू' केवळ चम्पूसाहित्यातच नव्हे तर एकूण संस्कृत साहित्यांत आपल्या असाधारण वैशिष्ट्यामुळे विशेष ख्याति पावला आहे.

" विश्वावलोकस्पृहया कदाचिद् विमानमारुह्य समानरूपम् ।
कृशानु–विश्वावसु–नामधेयं गन्धर्वयुग्मं गगने चचार ॥ "

कृशानुरकृशासूयः पुरोभागि पदं गतः ।
विश्वावसुरभुद् विश्वगुणग्रहणकौतुकी ॥

या दोन श्लोकांत वेंकटाध्वरीने आपल्या चम्पूचें सामान्यस्वरूप सांगितलेलें आहे. दोषदर्शी कृशानु व गुणग्राही विश्वावसु हे दोघे गंधर्व विमानांतून प्रवास करीत भारतांतील प्रसिद्ध तीर्थक्षेत्रे व विविध प्रदेश पहात चालले असतां त्यांचा जो संवाद झाला, त्यामधे विविध प्रकारचे गुणदोषप्रदर्शन वेंकटाध्वरीनें केलें आहे. त्यापैकी महाराष्ट्राच्या गुणदोषांचे विवेचन मराठी वाचकांनी विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे—

विश्वावसुः—महाराष्ट्राभिख्यो मधुरजलसान्द्रो निरुपमः
प्रकाशो देशोऽयं सुरपुरनिकाशो विजयते ।
गृहस्था यत्रामी गुणजलधयः केऽपि विभवैः
समृद्धाः श्रद्धातो मुहुरतिथिपूजां विदधते ।

कृशानुः—रूखे किं प्राक्कालीनचरित्रमधुना कथयसि । अधुना किल कलिमालिन्याद् ईदृशी रीतिः एतद्देशवासिनामासीत् ।

तथाहि–
अपारैर्व्यापारैरहरिह नयन्तोऽशनदशा–
स्वय स्नाताः सन्ध्यां विदधति न जातु स्वसमये ।
त्यजन्तः स्वां वृत्तिं द्विजकुलभवा ग्रामगणकी–
भवन्तो हन्तामी कथमपि च जीवन्ति बहवः ॥ २ ॥

किंच।
उपनयनविवाहावुत्सवैकप्रधानौ
कलिविभवत एवौ कालभेदानभिज्ञौ ॥
विजहति न कदाचिद् वेदपाठैकयोग्ये
वयसि च यवनानीवाचनाभ्यासमेते ॥ ३ ॥

अपि च
अज्ञानामविराम–लौकिक–वचोभाजाममोघां पुनर्
मन्त्रोच्चारण एव पर्यवसितं मौनव्रतं कर्मसु ।
ग्रामाध्यक्ष्य–लेखनेन नयतां कालानशेषानहो
पारम्पर्यत ईदृशामिह नृणां ब्राह्मण्यमन्यादृशम् ॥ ४ ॥

अहो बत कलिमहिम्ना सदसद्विवेकवैधुर्यमखिलजनानाम् ।
ये मुष्णन्ति निशि प्रविश्य भवनं ये वा बलात्कानने
नीते स्वामिधनं हरन्ति ननु तानिदन्ति चोरा इति ।
सद्यो हन्त हरन्ति पोषकधनं सत्या विपर्यस्य ये
कष्टं तानपि दन्तकानिह पुरस्कुर्वन्ति सर्वे जनाः ॥ ५ ॥

'अयं खल्वनुपमो देश' इति त्वदुक्तं युक्तमेव । यदत्र
स्वल्पेनापि यत्नेन महती प्रतिष्ठा सिध्यति ।

वेदव्यासः स हि दश च यो वेद वेदाक्षराणि
श्लोकं त्वेकं परिपठति यः स स्वयं जीव एव ।
आपस्तम्बः स किल कलयन् सम्यगौपासनं यः
कष्टं शिष्टक्षतिकृति कलौ कार्श्यमृच्छन्ति विद्याः ॥६॥

विश्वावसु --किमरे भूसुरेष्वेव दोषमुद्‌घोषयसि ।
अत्रापि सन्ति बहवः कलिताग्निहोत्राः
शास्त्रार्थबोधकुशलाः किल शान्तिमन्तः ।
अन्तर्मुखाः सततमात्मविदो महान्तो
निर्धूतबाह्यविषया निगमाध्वनिष्ठाः ॥७॥

अन्यच्च—

शुचीभूता स्नानैः श्रुतहितपुराणाश्च नियमाद-
अपूतानाः स्पर्शानविहितहृदोऽमी विजहतः ।
सुराभ्यर्चां कृत्वा शुचिकृतमदन्त्यन्नमनघं
महाराष्ट्रे देशे विलसति महानेष हि गुणः ॥८॥

किंच—

यमनियमनेन वा जनपदाधिकारेण वा
द्विजव्रजमुपव्रजन् प्रभुपदं महाराष्ट्रजः ।
न यत्तिमिह पाल्यद् यदि धरासुराणां ततो
भवेद्‌ यवनवेष्टितं भुवनमेतदब्राह्मणम् ॥९॥

यच्च दोषान्तरं भवता परिभावितं तदशेषमपि साधुजनोपकारेण परिहीयते ।

कृशानु--असत्वेवम् अथापि अत्रत्यानाम् आद्येतरवर्णप्रभवानां पुनरतिदुःसह चेष्टितम् ।

देशे देशे लम्पटाः पर्यटन्तो भञ्जं भञ्जं ब्राह्मणादीनशेषान् ।
हारं हारं हन्त सर्वस्वमेवं पापा एते स्वोदरं पूरयन्ति ॥१०॥

विश्वावसुः—सत्यमेवमयापि महनीयमेव तेषामेवं चेष्टितम्।

तथाहि—

मायाचुञ्चुतया भयावहगतिः प्रत्यर्थिपृथ्वीभुजां
माहाराष्ट्रभटच्छटा रणपटुर्नो पर्यटाट्येत चेत्।
देवब्राह्मणवर्गनिग्रहकृतो देशांस्तुरुष्का इमे
निष्प्रत्यूहमनोरथा वितनुयुर्निर्देवभूमीसुरान् ॥११॥

अशा प्रकारे टिकठिकाणच्या समाजांतील गुणदोषांचे वर्णन करून वेंकटाध्वरी शेवटी वाचकांना प्रार्थना करतो की—

"प्रकामदोषप्रचुरेऽप्यमुष्मिन् ग्रंथे मदिये करुणानुबन्धात्।
प्रसादवन्तो न कृशानवन्तु परन्तु विश्वावसवन्तु सन्तः॥"

वेंकटाध्वरीसंबंधी अशी एक आख्यायिका आहे की 'विश्वगुणादर्शचम्पू' लिहि-ण्याच्या निमित्ताने सगळीकडचे दोष पहात बसल्यामुळे त्याच्या दृष्टीला अंधत्व प्राप्त झाले. ते निवारण व्हावें म्हणून वेंकटाध्वरीने लक्ष्मी आणि श्रीनिवास यांच्या स्तुत्यर्थ दोन सहस्रके लिहिली. त्यामुळे त्याला त्याची दृष्टी पुनः प्राप्त झाली. 'यादवराघवीयम्' या वेंकटाध्वरीच्या आणखी एका काव्याचा उल्लेख क्लिष्ट काव्यविषयक प्रकरणात मागे आलाच आहे. हे काव्य अनुलोम-प्रतिलोम पद्धतीने वाचल्यास त्यांतून राम आणि कृष्ण यांच्या कथा वाचावयास मिळतात.

**तत्त्वगुणादर्शचम्पूः**—वेंकटाध्वरीच्या विश्वगुणादर्शचम्पू पासून स्फूर्ति घेऊन श्रीशैल वंशांतील श्रीनिवास ताताचार्य यांचा पुत्र अण्णय्याचार्य याने तत्त्व-गुणादर्शचम्पू लिहिला. त्यामध्ये जयविजयसंवादांतून शैव व वैष्णव मतांचे गुणदोष-विवेचन कवीने केले आहे.[1]

**गङ्गागुणादर्शचम्पूः**--राजापूर येथील संस्कृत विद्यालयाचे आचार्य दत्तात्रय वासुदेव निगुडकर (१९-२० शतक) यांनी 'हाहा' व 'हूहू' या गंधर्वांच्या संवादातून गंगा नदीच्या गुणदोषांचे वर्णन मार्मिकपणें केलें असून शेवटी गंगेचें श्रेष्ठत्व वर्णिलेले आहे. 'राजापुरची गंगा' पाहून व विश्वगुणादर्शचम्पू वाचून निगुडशास्त्रींना प्रस्तुत चम्पू लिहिण्याची स्फूर्ति झाली असावी हे उघडच आहे. शास्त्रीबोवांनी जानकीहरणम्, रुक्मिणीहरणम्, बुद्धचरितम् च रत्नाकरी यांवर स्पष्टीकरणात्मक टिपणे व 'रघुवंशसारः' हे पुस्तक एवढे अवांतर लिखाण केले आहे.[2]

**वैकुण्ठविजयचम्पूः**—ले. श्रीनिवासाचार्यपुत्र राघवाचार्य. भारतांतील अनेक मंदिरांचे व तीर्थक्षेत्रांचे वर्णन या चम्पूत वाचावयास मिळते.[3]

---

१. क्र. ५३०। २. क्र. ५३१। ३. क्र. ५३२।

**कारिकातिलकचम्पूः**—ले. राममट्टसुत नीलकण्ठ. यामध्ये गंधर्व प्रवासाच्या वर्णनांतून नानाविध शैव क्षेत्रांचे वर्णन आढळते.[४] सतराव्या शतकातील अर्काट जिल्ह्यातील तिरुवालंगुडु या गावीं राहणाऱ्या रामपुंगव दीक्षित या पण्डितानें लिहिलेल्या 'तीर्थयात्राप्रबंधः' या ग्रंथात अनेक तीर्थक्षेत्रांचीं व मंदिरांचीं वर्णनें आढळतात[५] अशा प्रकारचीं काल्पनिक प्रवासवर्णनें करणारे आणखी काही ग्रंथ पुढीलप्रमाणे आहेत.

**विबुधानन्दप्रबन्धः**—ले. वीरराघवपुत्र वेङ्कटकवी[६]

**श्रुतकीर्तिविलासचम्पूः**—ले. सूर्यनारायण.[७]

**केरलाभरणम्**—ले. केशवपुत्र रामचंद्र (१७ वें शतक)[८]

१७ व्या शतकांतील नामवंत लेखकांमध्ये केरळचे नारायणभट्टपाद अथवा भट्टारी यांचे स्थान फार वरचे आहे त्यांच्या संबंधीची अधिक माहिती पुढे एका स्वतंत्र लेखात आम्ही दिलेली आहे. रामायण, महाभारत व इतर पुराणे यांतील विविध विषयांवर नारायणभट्टपादांनी केरळातील शाक्यार (किंवा चाक्यार) जातीच्या लोकांसाठी एकंदर वीस चम्पू ग्रंथ लिहिले.[९] त्यांचीं नावे पुढील प्रमाणे आहेत— पाञ्चालीस्वयंवरचम्पूः राजसूयचम्पूः; द्रौपदीपरिणयचम्पूः, सुभद्राहरणचम्पूः, दूतवाक्यचम्पूः, किरातचम्पूः, भारतयुद्धचम्पूः, स्वर्गारोहणचम्पूः, मत्स्यावतारचम्पूः, नृगमोक्षचम्पूः, गजेन्द्रमोक्षचम्पूः, स्यमंतकचम्पूः, कुचेलवृत्तचम्पूः, अहल्यामोक्षचम्पूः, निरनुनासिकचम्पूः, दक्षयागचम्पूः, पार्वतीस्वयंवरचम्पूः, अष्टमीचम्पूः, गोष्ठीनगरवर्णनचम्पूः, कैलासवर्णनचम्पूः, शूर्पणखाप्रलापचम्पूः, नलायनीचरित्रचम्पूः व रामकथाचम्पूः

## रामायणविषयक चम्पू

महाकाव्यांचे वर्गीकरण मागीलप्रकरणातून ज्या प्रकारे करण्यात आलें आहे, त्याचप्रकारें चम्पू ग्रंथांचेंहि वर्गीकरण करणें आवश्यक आहे. कारण त्यांतील विषयांचे प्रकार महाकाव्यांच्या विषयांहून वेगळे नाहीत. रामायण, भारत, भागवत व पुराणें हेच १९व्या शतकाच्या पूर्वार्धापर्यंत संस्कृत साहित्यिकांचे मुख्यतः उपजीव्य ग्रंथ होते. त्यांतील कथांच्या आधारें कांहींनी महाकाव्ये, चम्पू, नाटकें इत्यादि विविध प्रकारचें साहित्य निर्मिलेलें आहे. ज्यांनी रामायणीय कथेवर महाकाव्यें लिहिलीं अशा लेखकांनी त्याच विषयावर क्वचित् चम्पू व नाटकें लिहिलीं आहेत. त्यापैकी कित्येकांचा उल्लेख महाकाव्यांच्या प्रकरणात अनुक्रमानें आलेला आहे. रामायणविषय कांही महत्वाच्या चम्पूंची नामावली पुढीलप्रमाणें आहे.—

---

४. पृ. ५३३ । ५ पृ. ५३४ । ६. पृ. ५३५ । ७. पृ. ५३६ ।
८ पृ. ५३७ ९. पृ. १७५ ।

**चम्पूराघवम्**[९]--ले. आसुरी अनन्ताचार्य. ( १९ वें शतक ).

**रामायणचम्पूः**--लेखिका नरसिंह अय्यंगार यांची कन्या[१०] सुन्दरवल्ली. ( हिचा सविस्तर परिचय पुढे आला आहे ).

**चम्पूरामायणम्**--[११]ले. सीतारामशास्त्री, राहणार काकरपरती, आंध्र. या सीताराम शास्त्रींनी '**सीतारामदयालहरी**' या नांवाचें आणखी एक खण्डकाव्य लिहिलें आहे.

**रघुनाथविजयचम्पूः**[१२]—ले. कृष्णकवि.

**रामचर्यामृतचम्पूः**[१३]—ले. कृष्णय्यगार्य.

**रामचम्पूः**[१४]—ले. वंदलामुडी रामस्वामी.

श्री. एम्. कृष्णम्माचारियर यांनी आपल्या History of Sanskrit Literature या ग्रंथाच्या चवथ्या भागांतील ५४१ व्या परिच्छेदामध्ये कांही अप्रकाशित रामायणचम्पूंची यादी दिली आहे. ती पुढीलप्रमाणे—

चम्पू लेखक

अमोघराघवचम्पूः--ले. विश्वेश्वरपुत्र दिवाकर.

कुशलवचम्पूः--ले. वेंकटय्या सुधी,

रामकथासुधोदयचम्पूः—ले. देवराजदेशिक.

रामाभिषेकचम्पूः—ले. देवराज देशिक.

सीताविजयचम्पूः--ले. घण्टावतार.

रामचन्द्रचम्पूः[१५]—रत्नखेटाचा नातु रामचंद्र.

रामचन्द्रचम्पूः—विश्वनाथ.

रामाभ्युदयचम्पूः—राम.

उत्तरकाण्डचम्पूः—राघव.

उत्तरचम्पूः—ब्रह्मपण्डित.

उत्तरचम्पूः—राघवभट्ट.

---

१०. विजयवाडा येथे मुद्रित. वेंकटनरसिंहाचार्यांनी टीका लिहिलेली आहे. ११. बंगलोर येथे मुद्रित. १२. मद्रास येथे मुद्रित. १४. मुंबईमध्ये मुद्रित. १४. म्हैसूर येथे मुद्रित. १५. मद्रास येथे मुद्रित. १६. क्र. १५१.

**आनन्दकन्दचम्पूः**—१७ व्या शतकांतील ओर्च्छानरेश वीरसिंह देव यांचा आश्रित पंडित मित्रमिश्र याने श्रीकृष्णाच्या बाललीलांवर हा चम्पू ग्रंथ लिहिला. याचा 'वीरमित्रोदयः' हा धर्मशास्त्रविषयक ग्रंथ सर्वत्र मान्यता पावला आहे[19]

**राधामाधवविलासचम्पूः**—जयराम पिण्ड्ये.[20]

**भागवतचम्पूः**—गोदावरी जिल्ह्यांतील पेरुर या गावीं राहणाऱ्या सोमशेखर किंवा राजशेखर या नांवाने प्रसिद्धि पावलेल्या १८व्या शतकांतील विद्वानाने हा ग्रंथ लिहिला. त्याचा 'साहित्यकल्पद्रुमः'[21] या नांवाचा साहित्यशास्त्रविषयक ग्रंथ उपलब्ध आहे. माधवराव पेशव्यांनी आपल्या राजसभेत या सोमशेखराचा मोठा सत्कार केला होता.

कृष्णचरित्रावरील मुद्रित झालेल्या आणखी कांही चम्पू ग्रंथांची नामावली पुढीलप्रमाणे आहे.

चम्पू — लेखक

'आनन्दवृन्दावनचम्पूः— परमानन्ददास.[22]

माधवचम्पूः— चिरंजीव.[23] याने 'विद्वन्मोदतरङ्गिणी' या नांवाचा आणखीहि एक ग्रन्थ लिहिला आहे.

बालकृष्णचम्पूः—[24] जीवनजी शर्मा

मन्दारमरन्दचम्पूः—[25] श्रीकृष्ण

रुक्मिणीपरिणयचम्पूः—[26] अम्मल आणि वेंकटाचार्य. हे दोघेहि प्रतिवादी भयंकरांचे वंशज होते.

सात्राजितीपरिणयचम्पूः —[27]रामेस्वरसुत कृष्णगांगेय.

रुक्मिणीवल्लभपरिणयचम्पूः—नरसिंहतात.

श्रीकृष्णचरित्र विषयक अमुद्रितचम्पू ग्रंथांची नामावली.[28]

ग्रंथ — लेखक

भागवतचम्पूः—रामभद्र

कृष्णचम्पूः—शेषसुधी

" परशुराम

आनन्ददामोदरचम्पूः—भुवनेश्वर

१९ क्र. ५२८। २०. मुंबईत मुद्रित २१ क्र. ५२४। २२ वाराणसी-मध्ये मुद्रित २३. कलकत्यात मुद्रित २४. मुंबईत मुद्रित २५ क्र. ५४४। २६. क्र. ५४२।

| ग्रन्थ — | लेखक |
|---|---|
| वासुदेवनन्दिनीचम्पूः— | गोपालकृष्ण |
| प्रणयिमाधवचम्पूः— | माधवभट्ट |
| मुकुन्दचरितचम्पूः— | श्रीनिवास |
| आनन्दवृन्दावनचम्पूः— | कविकर्णपूर |
| ,, | –केशव |
| ,, | –माधवानन्द |
| गोपालचम्पूः— | जीवराज |
| ,, | किशोरविलास |
| ,, | विश्वनाथसिंह |
| कृष्णविलासचम्पूः— | लक्ष्मण |
| ,, | –अनन्तरायसुत नरसिंहसूरि |
| कृष्णविजयचम्पूः— | वीरेश्वर |
| ,, | कृष्णशास्त्री |
| यादवराघवचम्पूः— | भाष्यकार[२७] |
| रुक्मिणीचम्पूः— | घनश्यामसुत गोवर्धन |

याव्यतिरिक्त संतान गोपाल प्रबंधः कालिंदीमुकुन्दचम्पूः, श्रीकृष्णचम्पूः, इत्यादि ग्रंथांचे लेखक अप्रसिद्ध आहेत. भगवान् विष्णूच्या कृष्णावताराव्यतिरिक्त इतर अवतारासंबंधीच्या कथांवर काही वैष्णव सम्प्रदायी लेखकांनी पुढीलप्रमाणे चम्पूग्रंथ लिहिले आहेत.

| ग्रन्थ — | लेखक |
|---|---|
| नृसिंहचम्पूः[२८] | –अनन्तसुत केशवभट्ट. रा. पुण्यस्तम्भ ( आंध्र ) |
| ,, | [२८]–दैवज्ञसूर्य |
| ,, | [२८]–संकर्षण |
| लक्ष्मीशचम्पूः[२८] | –अनन्तसूरि |

गजेन्द्रचम्पूः[२८]–पतञ्जलि ( १९ वे शतक. यांच्या संबंधी सविस्तर माहिती पुढील प्रकरणात येईल. )

वराहचम्पूः—श्रीकृष्णग्रामातील वरदवल्लीवंशातल्या वरद पंडिताचा पुत्र श्रीनिवास ( १७वें शतक ). याच्या अवतार प्रपंचाची माहिती पूर्वी आलेलीच आहे.

---

२७. इ. ५४४। २८. पुनर्दन मुद्रित। २९ इ. ५४४।

**पञ्चकल्याणचम्पूः व भागवतचम्पूः**[29] हे दोन चम्पू ग्रंथ चिदम्बराने (१७ वे शतक) लिहिले आहेत. त्याचीं 'राघवयादवपाण्डवीयम्' हे त्र्यर्थी काव्य, 'शब्दार्थचिन्तामणिकाव्यम्' हें रामायण व भागवत कथायुक्त द्वर्थी काव्य व 'श्लेष चिन्तामणिकाव्यम्' हीं तीन काव्यें त्याच्या असाधारण भाषाप्रभुत्वाची साक्ष देतात.

-> [ शैवचम्पू

| ग्रन्थ | — | लेखक |
|---|---|---|

नीलकण्ठविजयचम्पूः—नीलकण्ठ दीक्षित उर्फ अय्या दीक्षित (१७ वें शतक).
त्रिपुरविजयचम्पूः—शैल (१७ वे शतक). तंजावरच्या व्यंकोजीराजाचा मंत्री आनंदयज्वा याचा हा पुत्र.
कुमारसम्भवचम्पूः[30]—तंजौरच्या व्यंकोजीराजाचा द्वितीय पुत्र सरफोजी भोसले (१८ वें शतक).
पार्वतीपरिणयचम्पूः[31]—ले. कुन्दुकुरी रामेश्वर.
गौरीपरिणयचम्पूः[31]—शिवकंठसूरि.
त्रिपुरविजयचम्पूः[31]—अतिरात्रयज्वा.
त्रिपुरविजयचम्पू[31]—नृसिंह.
शिवविलासचम्पू.[31]—विरूपाक्ष.
शिवचम्पू.[31]—विरूपाक्ष.
शङ्करानन्दचम्पूः[31]—गुरुस्वयम्भूनाथ.
वीरभद्रविजयचम्पू[31]—एकामरनाथ.
वीरभद्रविजयचम्पूः[31]—मल्लिकार्जुन.
चन्द्रशेखरचम्पूः—[31]रामनाथ (२० वें शतक). ]

## अवांतर चम्पू

रामायण, भारत व भागवताव्यतिरिक्त अवांतर पुराणकथासंबंधीं बरेच चम्पूग्रंथ लिहिण्यात आले आहेत. उदा०—सतराव्या शतकातील अम्मालोकनाथाचा पुत्र चक्रकवि[32] याने रुक्मिणीपरिणय, गौरीपरिणय व द्रौपदीपरिणय या तीन प्रसंगावर तीन चम्पू ग्रंथ लिहिले. याव्यतिरिक्त 'जानकीपरिणयम्' या नांवाचे एक महाकाव्यहि त्याने लिहिलें आहे त्यामध्ये—

'रुक्मिणी-जानकी-गौरी-द्रौपदीपरिणीतयः ।
कृतयो यस्य, तस्यैषा कृतिश्चक्रकवेः शुभा ॥'

---

३०. क्र. ५२७ । ३१ क्र. ५४४ । ३२ वाराणसीत मुद्रित ३३. क्र. ११५

अशा आपल्या परिणयविषयक ग्रंथांचा उल्लेख त्याने केला आहे. या चक्रकवीचे ग्रंथ मुद्रित झालेले आहेत नारायणभट्टपादांनी लिहिलेल्या पौराणिक कथांसंबंधी चम्पूग्रंथांची नामावली याच प्रकरणांत वर आलेली आहे.

| ग्रन्थ | लेखक |
|---|---|
| शम्बरासुरविजयचम्पूः | सोंठीभद्रादि रामशास्त्री (इ. स. १८५६ ते १९१५) रा. पीठापुर (आंध्र)." याच लेखकाने 'श्रीरामविजयम्' हें काव्य व 'मुक्तावलीनाटकम्' लिहिलें आहे. |
| वल्लीपरिणयः" | यज्ञसुब्रह्मण्य तथा स्वामी दीक्षित. (रा. तेनेवल्ली. १९ वें शतक). |
| पद्मावतीपरिणयचम्पूः" | श्रीशैल. |
| मद्रकन्यापरिणयचम्पूः" | गंगाधर. |
| कल्याणवल्लीकल्याणचम्पूः | रामानुज. |
| कल्याणचम्पूः | पापय्याराध्य. |
| मीनाक्षीपरिणयचम्पूः | आदिनारायण. |
| वर्णानन्दचम्पूः | कृष्णदास. |
| कल्पकौमुदीचम्पूः | चक्रपाणी. |
| काव्यकल्पचम्पूः | महानन्दधीर. |
| वीरचम्पूः | पद्मानन्द. |
| गङ्गाविलासचम्पूः व जगदम्बाचम्पूः | महादेवसुत गोपाल. |
| शम्बरासुरविजयचम्पूः | बदरीरामशास्त्री. |
| दत्तात्रेयचम्पूः | दत्तात्रेय. |
| बाणयुद्धचम्पूः | कोचुनी ताम्पिरन. (कोगन्नूर). |
| विक्रमसेनचम्पूः | नारायणगागाधरी. |
| अनिरुद्धचरितचम्पूः" | रघुपतिसुत देवराज. |
| अनिरुद्धचरितचम्पूः" | साम्बशिव. |
| भार्गवचम्पूः" | रामकृष्ण. |
| भागीरथीचम्पूः" | अनन्तसूरि (१९ वें शतक). |
| भागीरथीचम्पूः" | अच्युत नारायण मोडक, नाशिक (१९ वें शतक). |
| श्रीनिवासविलासचम्पूः" | वेंकटेश. |

१४. इ. ५३९। १५. मद्रासमध्ये मुद्रित. १६. त्रावंकोर येथे मुद्रित.
१७. इ. ५४४। १८. मुंबईत मुद्रित.

ग्रन्थ — लेखक

श्रीनिवासविलासचम्पूः[३९]—श्रीकृष्ण.
रामेश्वरविजयचम्पूः[३९]—श्रीकृष्ण.
बाणासुरविजयचम्पूः[३९]—सुरपुरम् वेंकटाचार्य.
इन्दिराभ्युदयचम्पूः[३९]—रघुनाथ.
कुमारभार्गवीयचम्पूः[३९]—गणपतिसुत भानुदत्त.
संकर्षणचम्पूः[३९]—लक्ष्मीपति.
हयवदनविजयचम्पूः[३९]—वेंकटराघव.
सत्यसंधचरितचम्पूः[३९]—कल्पवल्ली.
चिन्तामणिविजयचम्पूः[३९]—शेषकवि.
ज्ञानाङ्कुरचम्पूः[३९]—लक्ष्मीनृसिंह.
पुरुषोत्तमचम्पूः[४०]—नृसिंह.
विजयविजयचम्पूः[४०]—वक्रकान्तलक्ष्मीनारायण.
जगद्गुरुविजयचम्पूः[४१]—यलंदूर श्रीकण्ठशास्त्री.
कल्पवाहनचम्पूः—कुन्दुकट्टण ताम्बरन् कवि. ( रा. कांगनूर ).

हरिश्चंद्रविजयचम्पूः—कुम्भकोणंच्या शांकरमठाचे अध्यापक कविरत्न पञ्चपागेशशास्त्री. (१९–२० शतक). यांनी तारकप्रतिष्ठामहोत्सवचम्पूः, जगद्गुरुअष्टोत्तरशतकम्, पांचारसी पुस्तकें, दहा अष्टके व अवांतर अनेक देवतास्तोत्रें लिहिलेली आहेत. यांचे सर्व ग्रंथ मुद्रित झालेले आहेत.

## राजचरित्रात्मक चम्पू

साधुसंत व राजे महाराजे यांची चरित्रें हा महाकाव्याप्रमाणेच चम्पू काव्याचाहि आवडता विषय आहे. त्यापैकी राजेलोकाच्या चरित्रावरील कांही चम्पू पुढील प्रमाणे आहेत.

**राधामाधवविलासचम्पूः**—ले. जयराम पिण्डे. या चम्पूच्या पूर्वार्धांत राधामाधवाचा विलास वर्णिलेला असून उत्तरार्धामध्ये शिवाजी महाराजांचे वडील शहाजी राजे यांच्या सभेचें वैभव वर्णिलेलें आहे. या चम्पूवर इतिहासाचार्य राजवाडे यांनी लिहिलेल्या प्रदीर्घ प्रस्तावनेमुळे त्याची ख्याति सर्वत्र पसरलेली आहे.

**शंकरचेतोविलासचम्पूः**—काशीनरेश चेतसिंह याच्या चरित्रावर शंकरदीक्षित ( १८ वे शतक ) नांवाच्या पण्डिताने प्रस्तुत चम्पू ग्रंथ लिहिला.[४२] हा शंकर

३९. मद्रासमध्ये मुद्रित. ४०. क्र. ५४४। ४१. म्हैसूरला मुद्रित.
४२. क्र. ५३८।

दीक्षित बुंदेलखंडाचा राजा समरसिंह याचा सभापण्डित होता. त्याने गंगावतरण-चम्पू व प्रद्युम्नविजय नाटक हे आणखी दोन ग्रंथ लिहिलेले आहेत.

विक्रमसेनचम्पूः— "ले. नारायण (१८ वें शतक) तंजावरच्या शहाजी राजाचा अमात्य त्र्यंबक याचा हा कवि नातू होता. याच्या वडिलांचें नांव गंगाधर असें होतें. प्रस्तुत चम्पूमध्ये त्यांनी प्रतिष्ठानचा अधिपति विक्रमसेन याचें चरित्र वर्णिलेलें आहे.

आनन्दरङ्गचम्पूः—"ले. श्रीनिवास. प्रस्तुत चम्पूमध्ये आनंदरंग नांवाच्या राजाचें चरित्र व विजयनगरच्या राजवंशाचा इतिहास आढळतो. हा कवि डुप्ले या फ्रेंच गव्हर्नराचा भाषणसहायक होता.

ग्रन्थ — लेखक

विशाखतुलाप्रबन्धचम्पूः—राजराजवर्मा.
विशाखसेतुयात्रावर्णनचम्पूः—गणपतिशास्त्री.
विशाखकीर्तिविलासचम्पूः—रामस्वामीशास्त्री.

या तीन चम्पू ग्रंथांमध्ये त्रावणकोरचे अधिपति विशाख महाराज यांचें चरित्र वर्णिलेलें आहे.

म्हैसूरच्या महाराजासंबंधीं पुढील चम्पूग्रंथ आढळतात."
महीशूराभिवृद्धिप्रबन्धचम्पूः—वेंकटरामशास्त्री.
महीशूरदेशाभ्युदयचम्पूः—सीतारामशास्त्री.
कृष्णराजेन्द्रयशोविलासचम्पूः—एम्. नरसिंहाचार्य.
कृष्णराजराजोदयचम्पूः—यदुगिरी अनन्ताचार्य.
श्रीकृष्णनृपोदयप्रबन्धचम्पूः—कुक्के सुब्रह्मण्यशर्मा.
शारदीन्यातवर्णनचम्पूः—कुक्के सुब्रह्मण्यशर्मा.
धर्मविजयचम्पूः—भूमिनाथनल्ल दीक्षित (१८ वें शतक). यामध्ये तंजावरच्या व्यंकोजीचा पुत्र शहाजीराजा यांचें चरित्र वर्णिलेलें आहे.

भोसलवंशावलिचम्पूः—ले. वेंकटेशकवि. तंजावरच्या राजघराण्याचें चरित्र यामध्ये वर्णन केलेलें आहे.

केरलाभरणचम्पूः—ले. रामचन्द्र दीक्षित ( [illegible] ) या रामचंद्राचा पिता यज्ञराम दीक्षित हा महान् वैय्याकरण होता. प्रस्तुत चम्पू हास्यरसप्रधान आहे.

---

४१. इ. ५४१

चित्रचम्पूः—ले. चित्रालंकार भट्टाचार्य, वाणेश्वर. कवीचा आश्रयदाता राजा चित्रसेन याचे चरित्र यात वर्णिलेलें आहेत.[४४]

राजेमहाराजाप्रमाणेच लोकांना आदरणीय असलेल्या साधुसंतांची चरित्रेंहि कित्येक चम्पूग्रंथामध्ये वर्णिलेली आढळतात. त्यामध्ये

पुरदेवचम्पूः[४४]—ले. अर्हदास.
जैनाचार्यविजयचम्पू.[४४]—( लेखक अज्ञात )-यामध्ये मल्लीसेन इत्यादि जैन साधूंचीं चरित्रे वर्णिलेलीं आहेत.

नागमुनिविजयचम्पूः—मैत्रेयरामानुज.
यतिराजविजयचम्पूः—अहोबिलसूरि.
रामानुजचम्पूः—रामानुजदास.
या तीन ग्रंथामध्ये रामानुजाचार्यांचें चरित्र वर्णिलेलें आहे.[४४]

आनन्दकन्दचम्पूः[४४]—समरपुंगव दीक्षित. काही शैव साधूंचीं चरित्रें यामध्ये वर्णिलेलीं आहेत.

श्रीनिवासमुनियात्राविलासचम्पू.—गोविन्ददास व श्रीनिवासरामानुज या दोघा लेखकानी श्रीनिवासमुनि नावाच्या वैष्णव आचार्यांच्या तीर्थयात्रेचें वर्णन यामध्ये केलेलें आहे.

भारतात सर्वत्र शैव वैष्णव इत्यादि सम्प्रदायाची असंख्य तीर्थक्षेत्रे आहेत. या तीर्थक्षेत्रातील देवता व मंदिरें यांच्या संबंधीं अनेक रोचक लोककथा त्या त्या विभागामध्ये प्रचलित आहेत. या कथांमुळेच त्या तीर्थक्षेत्राच्या महात्म्याचा प्रचार सर्वत्र होत असे. असल्या लोककथावरें आधारलेले काही चम्पू ग्रंथ अर्वाचीन संस्कृत साहित्यात आढळतात. उदा०—

भद्राचलचम्पूः—ले. राघव. यामध्ये वेंकटगिरीच्या श्रीनिवासाचें माहात्म्य कथारूपाने वर्णिलेलें आहे. याच विषयावर देवदास नावाच्या कवीने 'वेंकटगिरी-माहात्म्यम्' व पद्मनाथसुत त्र्यम्बक कवीने 'श्रीनिवासकाव्यम्' रचलेलें आहे. या देवस्थानासंबंधीं अनेक स्तोत्रें संस्कृत साहित्यात उपलब्ध आहेत.

श्रीनिवासचम्पू.[४४]—वेंकटेशसुत श्रीनिवास.
वेंकटेशचम्पूः[४४]—ले. धर्मराज. या दोन्ही चम्पूमध्ये तिरुपतीच्या मंदिराचें महात्म्य वर्णिलेलें आहे
मार्गसहायचम्पूः[४४]—ले. नवनीतकवि. विरिंचिपुरच्या मार्गसहायमंदिराचें वर्णन यामध्ये आहे.

---

४४ क्र. ५४६ ।

द्विपचापविजयचम्पूः[५]—ले.—चक्रवर्ति वेङ्कटाचार्य. दर्भशयनाची कथा यामध्ये वर्णिलेली आहे.

व्याघ्रालयेशाष्टमीमहोत्सवचम्पूः[५]—त्रावणकोरच्या व्यक्कोम मंदिराची कथा हा या चम्पूचा विषय आहे.

वज्रमुकुटविलासचम्पूः[५]—ले. अलसिंग.
वज्रमुकुटविलासचम्पूः[५]—ले. योगानन्द.
यदुगिरिभूषणचम्पूः[५]—ले. अप्पलाचार्य.
सम्पत्कुमारविलासचम्पूः[५]—ले. रंगनाथ. मेल्कोटेनगरातील देवताचे महोत्सव हा या चम्पूचा विषय आहे.

अप्पेशोत्सवचम्पूः—ले. वेंकटसुब्बा.
पद्मनाभचरितचम्पूः—ले. कृष्ण. त्रिवेन्द्रमच्या पद्मनाभाचे चरित्र यात वर्णिलेले आहे.

हस्तिगिरिचम्पूः—ले. वेंकटाध्वरी[५]. हा चम्पू वरदाभ्युदयचम्पू या दुसऱ्या नावानेहि प्रसिद्ध आहे. त्यामध्ये कांचीवरमच्या देवराजाचा महिमा वर्णिलेला आहे. आचार्यपञ्चाशत् (वेदान्तदेशिकाचे स्तोत्र) श्रवणानन्दः सुभाषितकौस्तुभः, प्रद्युम्नानन्दम् (नाटक), शृङ्गारदीपिका (भाण), सुभद्रापरिणयम् (याचे केवळ दोनच अंक उपलब्ध आहेत) हे वेंकटाध्वरीचे इतर ग्रंथ सटीक मुद्रित झालेले आहेत.

वरूथिनीचम्पूः—ले. रापालदास भट्टाचार्य याचा पुत्र गुरुप्रसन्न भट्टाचार्य. हा कवि ढाका व वाराणसी येथे संस्कृताध्यापक होता.

---

## प्रकरण १० वें.

# संस्कृत साहित्यांतील इतिहास

प्राचीन भारतीय साहित्यामध्ये इतिहासलेखनाची परम्परा नव्हती. भारतात आलेल्या मुसल्मान किंवा यूरोपीयन लेखकांनी जे काही इतिहासविषयक लेखन केले, त्यातून प्रेरणा मिळाल्यामुळे एतद्देशीय लेखकांनी ऐतिहासिक स्वरूपाचे लेखन केले. प्राचीन संस्कृत वाङ्मय हें सर्वथा इतिहासग्रथविरहित आहे. अशा प्रकारचा एक समज आपल्या देशात रूढ करण्यात आला आहे. त्यामुळे इतिहासजिज्ञासूच्या दृष्टीने संस्कृत साहित्यात विशेष अध्ययन करण्यासारखें काही नाही, असाहि समज काही लोकांच्या ठिकाणीं आहे. इतिहासज्ञानासाठी फारसी, अरेबिक किंवा इग्रजी भाषेच्या ज्ञानाची जितकी आवश्यकता आहे तितकी संस्कृतची नाही असें मानणाऱ्या लोकांच्या दृष्टीने इतिहास शब्दाचा नक्की अर्थ काय त कळत नाही. वस्तुतः प्राचीन भारताच्या केवळ इतिहासाचेंच नव्हे तर सम्पूर्ण संस्कृतीचें मौलिक ज्ञान प्राप्त करण्यासाठी संस्कृताध्ययनाव्यतिरिक्त दुसरा उपाय नाही इतर भाषेतून जे प्राचीन ऐतिहासिक स्वरूपाचे ग्रंथ आढळतात, त्यामध्ये राजवंशाची माहिती, त्यांच्या राज्यव्यवस्थेचें स्वरूप, युद्धप्रसग इत्यादींचें वर्णन आढळत. अशा प्रकारची माहिती प्राचीन संस्कृत ग्रथातहि भरपूर प्रमाणात आढळते. संस्कृत ग्रथामध्ये काव्यात्मकतेचें प्रमाण काहीसें अधिक असते एवढाच फरक. इतर भाषातील प्राचीन ग्रथामध्ये राजकीय इतिवृत्त अधिक प्रमाणात आढळत या सबधात कोणाचाहि मतभेद असण्याचे कारण नाही. पण इतर भाषात अधिक इतिवृत्त आहे व संस्कृतात तें अजिबात नाही असें म्हणण्यात काहीच अर्थ नाही. ' इतिहासपुराणाभ्या वेदं समुपबृहयेत् ' यासारख्या ऋषिवचनातून इतिहासाध्ययनाला वेदाध्ययनाइतकेंच महत्त्व दिलेले आढळतें. छांदोग्य उपनिषदाच्या प्रथम खडामध्ये ' ऋग्वेदो यजुर्वेद: सामवेदः आथर्वणश्चतुर्थ इतिहास-पुराण पञ्चमो वेदाना वेदः ' असा इतिहासविषयक महत्त्वाचा उल्लेख आहे. त्याच छांदोग्य उपनिषदामध्ये सातव्या अध्यायाच्या द्वितीय खण्डामध्ये ' वाग् वा नाम्नो भूयसी वाग्वा ऋग्वेद विज्ञापयति यजुर्वेद सामवेदम् अथर्वण चतुर्थम् इतिहासपुराण पञ्चम वेदानाम् ।' अशा प्रकारचा इतिहासविषयक आणखी एक उल्लेख आढळतो. कौटिल्याच्या अर्थशास्त्रामध्ये इतिहासाच्या अध्ययनाचें महत्त्व प्रतिपादन केलेले आहे.

मध्यंतरीं मुसलमानांच्या कारकीर्दीत काही दुष्ट सत्ताधाऱ्यांनी असंख्य संस्कृत ग्रंथांचा नाश केला. त्या विनाशातून वाचलेल्या व आज सर्वत्र उपलब्ध असलेल्या इतिहास विषयक संस्कृत ग्रंथांची तुरळक नामावली पाहिली तरी देशील आपल्या विशिष्ट दृष्टीनुसार इतिहास लेखनाची परंपरा भारतामध्ये कशी अविच्छिन्न होती याची कल्पना येऊ शकेल. रामायण व महाभारत यांना इतर अनेक दृष्टीप्रमाणें इतिहास दृष्टीनेहि फार मोठें महत्त्व आहे. त्यानंतरच्या उल्लेखनीय ग्रंथांत बाणभट्टाचें '**हर्षचरितम्**' (७ वे शतक), नयचन्द्रसूरीचे '**हम्मीरवंशकाव्यम्**' (१० वे शतक), कल्हणाची '**राजतरङ्गिणी**' (११ वे शतक), बिल्हणाचें '**विक्रमाङ्कदेवचरितम्**' व जयसिंहसूरीचें '**कुमारपालचरितम्**' (१२ वे शतक), पद्मगुप्ताचें '**नवसाहसाङ्कचरितम्**' ज्यानकाचें '**पृथ्वीराजविजयम्**' सोमेश्वराची '**कीर्तिकौमुदी**', बंगालच्या संध्याकरनंदीचें '**रामचरितम्**' व आनन्दभट्टाचें '**वल्लालचरितम्**', मेरुतुङ्गाचा '**प्रबन्धचिन्तामणिः**', राजशेखराचा '**चतुर्विंशतिप्रबन्धः**' गंगाधराचें '**रघुनाथाभ्युदयम्**', रघुनाथडिण्डिमाचें '**साल्वाभ्युदयम्**' गङ्गादेवीकृत '**कम्परायचरितम्**', इ. ग्रंथांची परंपरा भारतातील इतिहासलेखनाची परंपरा सिद्ध करण्यास पुरेशी आहे.

भारताचा प्राय. सर्वच प्राचीन इतिहास संस्कृत ग्रंथांच्या आधारें उपलब्ध होतो. *काही ऐतिहासिकांनी उपेक्षिलेलीं पुराणसुद्धा इतर अनेक इतिहास संशोधकांच्या* मतें ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें महत्त्वाचीं मानण्यात येतात. हर्षचरितम्, नवसाहसाङ्कचरितम्, कुमारपालचरितम् यासारख्या प्राचीन आख्यायिकांच्या ग्रंथांत तत्कालिन भरपूर इतिहास उपलब्ध होतो. प्राय. सर्वच इतिहासलेखक कल्हणाच्या राजतरङ्गिणीला ऐतिहासिक दृष्ट्या फारच महत्त्व देतात. पण इतिहासदृष्ट्या महत्त्वाच्या त्या ग्रंथांत कवित्वाचा अंश, काव्यदृष्ट्या प्रसिद्ध असलेल्या आख्यायिका ग्रंथाइतकाच आढळत नाही काय ?

इतिहाससंशोधक कांही व्यक्तींचा कालनिर्णय करतांना तेव्हा त्यांच्यासंबंधीं लिहिलेल्या अलंकारिक काव्यांचा प्रमाणाम्हणून निःसंकोच उपयोग करीत असतात. मम्मटाच्या काव्यप्रकाशामध्ये,

"मुक्ताः केलिविसूत्रहारगलिताः सम्मार्जनीभिर्हृताः
प्रातः प्राङ्गणसीम्नि मन्थरचलद्बालाङ्घ्रिलाक्षारुणाः ।
दूरात् दाडिमबीजशङ्कितधियः कर्षन्ति केलीशुकाः
यद् विद्वद्भवनेषु भोजनृपतेस्तत्त्यागलीलायितम् ॥

हा उदात्त अलंकाराचें उदाहरण म्हणून उल्लेखिलेला श्लोक, मम्मटाचा कालनिर्णय करताना त्या श्लोकांतील भोजराजाच्या उल्लेखामुळे प्रमाणभूत मानतात. अशा प्रकारें अप्रत्यक्षरीत्या इतिहासनिर्णयाच्या कामीं उपयोगी पडणार कितीतरी साहित्य संस्कृतात आढळतें.

सुमारें १२ व्या शतकापासून भारतांत आधुनिक प्रादेशिक भाषांचा उदय झाला. मुसलमानांच्या आक्रमणानंतर बहुतेक सारा राजकीय व्यवहार उर्दू व फारसी भाषेत होऊं लागल्याने त्याहि भाषांना फार महत्त्व आलें. त्यामुळे १२ व्या शतकानंतरचा इतिहास जाणण्यासाठी संस्कृताव्यतिरिक्त या नवोदित भाषांतील साहित्याचे ज्ञान आवश्यक आहे. तथापि त्याहि काळांत संस्कृत साहित्याचा प्रवाह खंडित झालेला नसल्याने तत्कालीन इतिहासाच्या अभ्यासासाठी उपयुक्त ठरणारें भरपूर संस्कृत साहित्य आढळून येतें. प्रस्तुत प्रबंधाच्या मर्यादेनुसार १७ व्या शतकानंतर लिहिण्यांत आलेल्या ऐतिहासिक दृष्ट्या महत्त्वाच्या अनेक ग्रंथांचा उल्लेख मागील प्रकरणांत यथावसर आलेला आहे. आजहि १७ व्या व १८ व्या शतकाचा इतिहास संपूर्णपणे संशोधिला गेला नाही. त्या काळाच्या इतिहासाचा सखोल अभ्यास करण्यासाठी इतर भाषांतील साहित्य प्रमाणभूत आहे यांत संशयच नाही. तथापि त्या दृष्टीने उपयोगी पडणाऱ्या संस्कृत ग्रंथांचीहि संख्या कांही उपेक्षणीय नाही. ' अर्वाचीन संस्कृत ग्रंथांच्या आधारें भारताचा इतिहास ' या विषयावर एखादा स्वतंत्र प्रबन्ध लिहितां येण्यासारखा आहे. प्रस्तुत प्रबंधाची व प्रकरणाची मर्यादा लक्षांत घेतां, त्या दृष्टीने कांहींसें दिग्दर्शन करण्यासाठी केवळ महाराष्ट्राच्या इतिहासासंबंधीं उपयुक्त असणाऱ्या कांही संस्कृत ग्रंथाचा संक्षिप्त परिचय पुढे देण्यांत येत आहे.

**शिवभारतम्**:—छत्रपति शिवाजी महाराजांच्या चरित्रासंबंधीं व तत्कालीन ऐतिहासिक महत्त्वाच्या घटनांसंबंधी ' शिवभारतम् ' इतका प्रामाणिक ग्रंथ दुसरा नाही. या ग्रंथाचा लेखक कवीन्द्र परमानन्द हा शिवाजी महाराजाचा आश्रित असून त्याच्याबरोबरच अनेक महत्त्वाच्या घटनांमध्ये त्याने भाग घेतला होता. त्याच्या प्रस्तुत ग्रंथातून जी अधिकृत माहिती उपलब्ध झाली तिच्यावरून शिवचरित्रासंबंधींच्या अनेक भ्रामक कल्पनांचा निरास झाला.[1] या ग्रंथाचा सविस्तर परिचय पुढील एका प्रकरणांत दिलेला आहे.

## पर्णालपर्वतग्रहणाख्यानम् :—

शिवाजी महाराजांनी पन्हाळा किल्ला जिंकण्यासाठी केलेल्या संग्रामाचे वर्णन प्रस्तुत ५ प्रकरणांच्या ग्रंथामध्ये जयराम पिण्डये नावाच्या कवीनें संवादरूपाने केलेले आहे प्रस्तुत कवीच्या राधामाधवविलास चम्पूसंबंधीं अधिक माहिती चम्पूविषयक प्रकरणांत आलीच आहे. शिवाजीमहाराजांची युद्धनीति व त्याच्या मावळे वीरांची युद्धपद्धति यासंबंधीं यथार्थ वर्णन या ग्रंथांत आहे. शिवाजी महाराजांचे चरित्र लिहिण्याच्या कामीं हा ग्रंथ सुद्धा शिवभारताप्रमाणे थोडया अल्प प्रमाणांत कां होईना उपयोगी आहे.[1]

---

१. क्र. १५८। भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे तर्फे मुद्रित।

**बुधभूषणम्**—शिवाजी महाराजाचा ज्येष्ठ पुत्र संभाजी, याने प्रस्तुत संस्कृत ग्रंथ लिहिला असून त्यामध्ये कामन्दकीयासारख्या नीतिपर ग्रंथातील राजनीतिविषयक सुभाषितेंची संकलन केलेले आहेत.

"तस्यात्मज शम्भुरिति प्रसिद्ध समस्तसामन्तशिरोवतंसः
*य. काव्यसाहित्यपुराणगीत कोदण्डविद्यार्णवपारगामी ।* (बु. भू. १५)
विविच्य शास्त्राणि पुरातनानामादाय तेभ्य खलु सोऽयमर्थम्
करोति सद्ग्रथमघु नृपालः स शम्भुवर्मा बुधभूषणाख्यम् । (बु भू १६)

या श्लोकातून संभाजीने स्वतःच्या ग्रंथकर्तृत्वाचा स्पष्ट उल्लेख केला आहे.

**शम्भुराजचरितम्**—या ग्रंथाचा लेखक हरिकवि हा महाराष्ट्रीय पंडित गुजराथेत सुरत येथे राहात असे. संभाजीचा मंत्री कविकलश (कुप्रसिद्ध कलुषा कब्जी) किंवा कविकुलेश याने या हरिकवीला प्रस्तुत काव्य लिहिण्याचा आदेश दिला होता.

**राजारामचरितम्**-ले. केशवपण्डित ५ सर्गांच्या प्रस्तुत काव्यामध्ये राजाराम महाराजांचे चरित्र व त्यांच्या काळी औरंगजेबाच महाराष्ट्रावर आक्रमण चालू असता स्वातंत्र्यसंरक्षणासाठी मराठी वीरानी कर्नाटकात राहून केलेल्या उद्योगाचें वर्णन आढळतें[२]

**शिवकाव्यम्**—ले. पुरुषोत्तम कवि. शिवाजी महाराजापासून दुसऱ्या बाजीराव पर्यंतचा मराठी साम्राज्याच्या उदयास्ताचा इतिहास कवीने या काव्यात वर्णिलेला आहे.[३]

**अलंकारमञ्जूषा**—ले. देवशंकर पुरोहित. हा कवि गुजरातमध्ये राटोड या गावीं रहात असे. अलंकारांची उदाहरणे देण्यासाठी त्याने हें काव्य लिहिलें असून त्यामध्ये माधवराव व रघुनाथराव या पेशवे घराण्यातील पुरुषाचं वर्णन केलेलें आहे.

पेषण रिपुगणस्य महाजौ यश्चकार बहुधोद्यतखड्गः ।
वाति पेषमिति पेशलमर्थं पेषवापदमुपैति वदत्तम् ॥

या श्लोकामध्ये कवीने 'पेशवा' या शब्दाची निरुक्ति सांगितलेली आहे. पेशवे घराण्यातील पुरुषासंबंधीं लिहिलेले याव्यतिरिक्त दुसरें संस्कृत काव्य आढळत नाही.[४]

तंजावरच्या भोसले घराण्यासंबंधीं लिहिण्यात आलेलीं बरींच संस्कृत काव्यें उपलब्ध आहेत. याचें कारण त्या घराण्यामध्ये 'अभिनव भोज' यासारख्या उपाधीला पात्र झालेले शहाजी व सरफोजी यासारखे विद्यारसिक नृपती व त्यांच्या आश्रयास राहिलेले 'अभ्र पाणिनी' (बोपाचस्पति कवि), 'अभिनव जयदेव' यासारखे कवि हे होय.

---

२ इ १५८। ३. इ. ४४४। ४. इ ९२०.

**कोसलभोसलीयम्**— या काव्याचा लेखक शेषाचलपति कवि हा आंध्रातला तत्कालीन श्रेष्ठ व्याकरणपंडित होता. त्यामुळे त्याला 'आंध्रपाणिनी' ही मानाची उपाधी प्राप्त झाली होती. आपले असाधारण भाषापांडित्य व्यक्त करण्यासाठी त्याने प्रस्तुत द्व्यर्थी काव्य लिहिले. त्यामध्ये कोसल वंशातील रामचंद्राचे व भोसले वंशातील शहाजीचा पुत्र एकोजी यांचे चरित्र गुंफलेलें आहे. शहाजीने कनकाभिषेक करून या आंध्रपाणिनीचा मोठा सत्कार केला होता.[५]

**भोसलवंशावलि**—ले. गंगाधर. हा लेखक तंजौरच्या व्यंकोजी राजाचा अमात्य होता. प्रस्तुत ग्रंथाचे नाव 'भोसलवंशावलि' असले तरी त्यामध्ये व्यंकोजीचा पुत्र शहाजी याचीच प्रशस्ती आढळते.[६]

**भोसलवंशावलिचम्पूः**—मनलूरच्या धर्मराजाचा पुत्र नैध्रुव व्यंकटेश[७] याने प्रस्तुत चम्पूमध्ये तंजौरचा प्रथम सरफोजी व त्याचे पूर्वज यांचे सविस्तर वर्णन केलेले आहे. या काव्याचा फक्त पहिला भाग (प्रथम आश्वास) उपलब्ध झालेला आहे. सरफोजीने या कवीला 'साहित्यभोग' ही पदवी दिली होती. राघवानन्दम्, नीलापरिणयम् व गणपति विलासम् हीं नाटकं व्यंकटेशाने लिहिलीं आहेत.

**शृङ्गारमञ्जरीशाहजीयम्**—तिलायूरच्या विद्म्बर दीक्षिताचा पुत्र पेरिय अप्पा दीक्षित याने प्रस्तुत नाटक लिहिलें. त्यामध्ये तंजौरच्या शहाजी राजाचें विलासी चरित्र रंगविलेले आहे.[८] **तिरुवय्यूर**—नावाच्या गावामध्ये या नाटकाचा प्रयोग झाला होता, असें म्हणतात.

**कान्तिमतीपरिणयम्**—तंजौरच्या शहाजी राजाच्या आश्रयास राहणाऱ्या नरसाम्भातिप्पाध्वरीचा पुत्र चोक्कनाथने प्रस्तुत काव्यामध्ये शहाजी व कांतीमती याने याचा विवाह वर्णिलेला आहे.[९]

**शाहेन्द्रविलासम्**—ले. लिंगरायपुत्र श्रीधर वेंकटेश. हा कवि अय्यावल या या नावाने प्रसिद्ध होता. ८ सर्गांच्या प्रस्तुत काव्यात तंजौरच्या शहाजी राजाचे विलासी चरित्र वर्णिलेले आहे.[१०]

**शाहविलासगीतम्**—ले. दुण्ढीराज. याच्या पित्याचे नाव लक्ष्मण व गुरूचें नाव त्र्यम्बक असें होते. हा स्वामीमलई या गावीं राहत असे. प्रस्तुत काव्यात जयदेवाच्या गीतगोविंदानुसार शहाजीचे वर्णन केलेले आहे. हा कवि शहाजीच्या आश्रयास राहणारा एक पुराणिक होता. स्वतःचा उल्लेख तो 'अभिनव जयदेव' म्हणून करतो.

५. कृ १६३। ६ कृ १६३। ७ ७०६। ८ कृ १६२।
९ कृ. १६१, ९३९। १० कृ. १६२, २८६।

**शाहराजीयम्**--ले. भवानी व विद्वेश्वर याचा पुत्र लक्ष्मण. हा राहणारा काशीचा, पण पुढें शहाजी राजाना सभापण्डित झाला होता. विद्यानाथ कवीचें, **प्रतापरुद्रीयम्** हें साहित्यशास्त्रनिष्ट काव्य आदर्श ठेवून लक्ष्मण कवीने प्रस्तुत काव्य लिहिलें. त्यामध्ये साहित्यशास्त्रातील विविध सिद्धान्ताचीं उदाहरणें पहावयास मिळतात. याच कवीने '**शाहराजसभा-सरोजाणिनी**' या नावाच आणखी एक काव्य लिहिलेंलं आहे.

**धर्मविजयचम्पू**--ले. भूमिनाथ दीक्षित. हा नल्ला दीक्षित म्हणून प्रसिद्ध होता. याच्या पित्याचें नाव बालचन्द्र व गुरूचें नाव रामभद्र दीक्षित असें होतें. या धर्मविजयचम्पूमध्ये त्यानें शहाजी राजाचें चरित्र वर्णिलेलं असून त्यामध्ये त्याला 'अभिनव भोजराज' असें सूचक विशेषण दिलेंलं आहे.[11]

**सुमतीन्द्रजयघोषणा**--सुरीन्द्रतीर्थ व वेंकटनारायण याचा शिष्य सुमतीन्द्र या माध्वसम्प्रदायी कवीने शहाजीच्या स्तवनार्थ हें काव्य लिहिलें. राजाने या कवीला तिरुवाइमरुदूर या गावीं एक मठ दिला होता.[12]

**शाहजिप्रशस्ति**--ले. भास्कर कवि या कवीला शहाजी राजाने भास्कररायपूर या नावाचें ४० घराचें एक गाव अर्पण केलें होतें तीं सर्व घरें भास्कर कवीने आपल्या शिष्याना देऊन टाकलीं होतीं यांव्यतिरिक्त नारायणकविकृत **शाहराज नक्षत्र माला** हें २७ श्लोकाच व श्रीनिवासकृत **शाहराजाष्टपदी** हेंहि एक काव्य शहाजीच्या समयात आढळतें.

तंजावरच्या भोसले घराण्यातील शहाजीप्रमाणेच सरफोजी भोसल्यावर लिहिलेलीं बरींच संस्कृत काव्यें उपलब्ध आहेत. त्यापैकी काही महत्त्वाचीं काव्यें पुढीलप्रमाणे आहेत.--

**शरभराजविलासम्**- इ स. १७२२ सालीं कालवशातील जगन्नाथ नावाच्या कवीने हें काव्य लिहिलें त्याच्या पित्याचें नाव श्रीनिवास प्रस्तुत काव्यात तंजावरच्या भोसलेवंशाचा इतिहास वर्णिलेला असून त्यामध्ये प्राधान्याने सरफोजींचें चरित्र गुम्फिलेलं आहे.[13]

**गुणरत्नाकर**--ले. नरसिंह कवि "अलङ्काराच्या उदाहरणार्थमित्यर्थ लिहिलेल्या या काव्यात सरफोजी भोसल्याच्या गुणाचं वर्णन कवीने केलें आहे.

---

११ पृ १६२, ७५९। १२ पृ १६३।
१३ पृ १६३, ३११। १४ पृ ९३७

**सरभोजिचरितम्**—ले. अनन्तनारायण. याच्या आईचें नांव बृहदम्मा व वडिलाचें नाव मत्युन्जय होतें. सरफोजीने या कवीस 'पञ्चरत्नकवि'[१५] ही पदवी दिली होती. **'शरभोजिमहाराजजातकम्'** या काव्याच्या लेखकाचें नाव उपलब्ध नाही. पण प्रस्तुत काव्यामध्ये शरफोजीचे सम्पूर्ण चरित्र वर्णिलेले आढळते. शरफोजी विषयींचीं हीं काव्ये व विशेषतः त्याने स्थापन केलेलें 'सरस्वती महाल' हें विख्यात ग्रथालय यामुळे सरफोजीची कीर्ति संस्कृत साहित्याच्या जगतात खरोखरच अजरामर झालेली आहे.

**साहित्यमञ्जूषा**—सदाशी नावाच्या एका कवीने इ. स. १८२५ मध्ये लिहिलेल्या प्रस्तुत साहित्यशास्त्रनिष्ठ काव्यामध्ये शिवाजी महाराजाचें चरित्र व भोसले वंशाचें इतिवृत्त वर्णिलेले आहे.

अशा प्रकारें एकट्या भोसले वंशासबधीं व त्या वंशातील श्रेष्ठ राजपुरुषा-विषयीं लिहिलेलीं अनेक काव्ये जशीं आढळतात तशींच भारतातील इतर अनेक नामांकित राजवंशाविषयीं व राजपुरुषाविषयीं लिहिलेलीं काव्यें संस्कृत साहित्यात आढळतात. या काव्याच्या सहाय्याने ऐतिहासिक माहितीचें सकलन करून बराच इतिहास प्रकाशात आणता येण्याची शक्यता आहे. या दृष्टीने केवळ अंगुलीनिर्देश करण्यासाठी आम्ही भोसले वंशाविषयीच्या संस्कृत ग्रंथाचा परिचय या प्रकरणात दिला आहे. या सर्व काव्याच्या आधारें भोसले वंशाचा इतिहास स्वतंत्रपणे लिहिण्याची शक्यता आहे.

---

१५. पृ. १५९।

## प्रकरण ११ वें

# शिवाजीमहाराजांची संस्कृतनिष्ठता

मागील प्रकरणांतून अनेक साहित्यिकांनी केलेल्या संस्कृत साहित्यसेवेचा परिचय दिलेला आहे. त्यामध्ये काही राजांनी संस्कृत लेखकांना दिलेल्या दानाचा किंवा सन्मानाचा अनुषंगाने उल्लेख आलेला आहे. १७ व्या शतकापर्यंत अरबी, फारसी व उर्दू या यावनी भाषांचा अत्यंत प्रचार झाल्यामुळे तत्कालीन प्रादेशिक भाषांचें स्वरूप अत्यंत भिन्न झालें होतें. काही विद्वान संस्कृतांत साहित्यरचना करीत असले तरी संस्कृत भाषेलाहि एक प्रकारची ग्लानी आली होती. अशा परिस्थितींत संस्कृत भाषेचा उद्धार प्रयत्नपूर्वक करणारे अनेक राजे भारतांत होते. त्या सर्वांच्या संबंधीं योग्य ती माहिती संकलित करून एक स्वतंत्र प्रबंध लिहिता येण्याची शक्यता आहे. अशा सर्व संस्कृतसेवक राजपुरुषामध्यें छत्रपति शिवाजी महाराजांचें स्थान फार मोठें आहे. स्वराज्यसंस्थापनेच्या महान् संघर्षांतहि शिवाजी महाराजांचें लक्ष संस्कृत भाषेकडे होतें. त्या भाषेचें राष्ट्रीय व सांस्कृतिक दृष्ट्या असाधारण महत्त्व महाराजांच्या क्रान्तदर्शी दृष्टीला १७ व्या शतकांतहि दिसत होतें व म्हणून त्यांनी आपल्या राज्यामध्यें संस्कृत भाषेचा उद्धार करण्याच्या दृष्टीने मोठें महत्त्वाचें कार्य केलें. महाराजांच्या प्रत्यक्ष प्रेरणेने त्या काळीं काही महत्त्वाचे संस्कृत ग्रंथ निर्माण झाले. त्यांचा परिचय पुढीलप्रमाणे आहे.

**राज्यव्यवहारकोश**—स्वराज्य स्थापन होतांच, उर्दूच्या प्रभावामुळे कलुषित झालेल्या मराठी भाषेच्या शुद्धीकरणाचें कार्य महाराजांनी आरंभिलें. त्यासाठी महाराजांनी पं. रघुनाथ हणमंते यांच्याकडून प्रस्तुत राज्यव्यवहारकोश लिहून घेतला. राज्यव्यवहारामध्यें सर्वत्र रूढ झालेल्या परकीय शब्दांचें उच्चाटन करून त्या जागीं संस्कृत भाषेतील शब्द रूढ करण्याची महाराजांची आकांक्षा होती व म्हणूनच त्यांनी रघुनाथ पंडितास हा राज्यव्यवहारकोश लिहिण्याच्या कामीं नियुक्त केलें होतें. त्या संबंधीचा उल्लेख—

"कृते म्लेच्छोच्छेदे भुवि निरवशेषं रविकुला-
वतंसेनात्यर्थं यवनवचनैर्लुप्तसरणिम् ।
नृपव्याहारार्थं स तु विबुधभाषां वितनितुं
नियुक्तोऽभूद् विद्वान् नृपवरशिवच्छत्रपतिना" ॥

सोऽयं शिवछत्रपतेरनुज्ञां मूर्धाभिषिक्तस्य निधाय मूर्ध्नि ।
अमात्यवर्यो रघुनाथनामा करोति राज्यव्यवहारकोशम् ॥"

या दोन श्लोकामध्ये स्वच्छ शब्दात रघुनाथपंत हणमंत्यानी केलेला आहे. प्रथम श्लोकाच्या तिसऱ्या ओळींत शिवाजी महाराजांची संस्कृतविषयक आकांक्षा अभावितपणे व्यक्त झालेली आहे. 'नृपव्यवहारार्थम्' म्हणजे राजाच्या बोलण्यामध्ये संस्कृत भाषेचा वापर व्हावा या हेतूने शिवाजी महाराजानी हा कोश लिहून घेतला होता, हें उघड आहे. या कोशाची थोडीशी कल्पना पुढील उदाहरणावरून येऊ शकेल.

"राजा क्षेत्र पादशाह स्वामी साहेब ईरित ।
अस्तु पुरं तु दस्तूरोऽत्यादूर्यवनभाषया ॥
युवराजः परिज्ञेयो वलीयहदनामकः ।
शाहजादा राजपुत्रः प्रधानः पेशवा तथा ॥" इत्यादि.

या छन्दोबद्ध कोशात अमरकोशातील वर्गाप्रमाणे १० वर्ग असून त्यामध्ये बहुजन समाजाच्या तोंडीं रुळलेल्या म्लेच्छभाषीय शब्दांना वरीलप्रमाणे पर्याय दिलेले आहेत रघुनाथपंताच्या या भाषाशुद्धीच्या उद्योगाचा उपहास काही लोकानी केला असावा असें दिसतें. त्याना उत्तर देण्यासाठी रघुनाथपंतानी पुढील सुभाषित आपल्या कोशात लिहिलें आहे.

" विपश्चित्सम्मतस्यास्य किं स्यादज्ञविडम्बनैः ।
रोचते किं क्रमेलाय मधुरं कदलीफलम् ॥"

अशा प्रकारें विरोधकांना काटे खाणाऱ्या उंटाची उपमा देऊन रघुनाथपंतानी निरुत्तर केलें आहे.

करणकौस्तुभ—भाषाशुद्धीच्या समस्येप्रमाणेच पञ्चाङ्गशुद्धीची समस्या शिवाजी महाराजाच्या काळात निर्माण झाली होती. तिचे निरसन करण्यासाठी महाराजानी कृष्ण जोतिषाकडून प्रस्तुत ग्रंथ लिहून घेतला होता. हा ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा शिवाजी महाराजानीच आपल्याला दिली, असा स्पष्ट उल्लेख—

" प्रकुरु सत्करणं ग्रहसिद्धये सुभगदृग्गणितैक्यविधायि यत् ।
इति नृपेन्द्र शिवाजिमहोदितः प्रकुरुते करणं द्विजकृष्णकः ॥"

या श्लोकात ग्रंथकारानें केलेला आहे. 'शिवशाहीतील पञ्चाङ्गशुद्धि' या लेखामध्ये प्रसिद्ध इतिहाससंशोधक द. वि. आपटे यांनी प्रस्तुत शास्त्रीय ग्रंथाचा संक्षिप्त परिचय दिला आहे. कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यानी 'भारतीय ज्योतिषशास्त्र' या आपल्या विख्यात ग्रंथात प्रस्तुत करणकौस्तुभाचा उल्लेख मोठ्या आदराने केला आहे.

**शिवार्कोदय.**—शिवाजी महाराजाच्या राज्याभिषेकासाठी काशीचे वेदमूर्ति विश्वेश्वरभट्ट याना सन्मानाने निमन्त्रित करण्यात आले होते. शिवाजी महाराजाच्या राज्याभिषेक विधीसाठी या गागाभट्ट काशीकरानी 'राज्याभिषेकप्रयोगः' या नावाचा धर्मशास्त्रविषयक स्वतंत्र ग्रंथ तयार केला.[1] भोसले वंशाचे क्षत्रियत्व सिद्ध करण्यासाठी गागाभट्टाने फार मोठें इतिहाससंशोधन केले होते असे म्हणतात. राज्याभिषेक आटोपल्यानंतर शिवाजी महाराजानी मीमांसाशास्त्रविषयक प्रस्तुत ग्रंथ लिहिण्याचें दायित्व गागाभट्टावर सोपविले होते जैमिनीच्या पूर्वमीमांसासूत्रावर शबरस्वामींनी जे भाष्य लिहिले, त्यावर श्लोकवार्तिक नामक पद्यात्मक टीका कुमारिल भट्टानी लिहावयास घेतली होती पण पहिल्या अध्यायाच्या प्रथम पादावरील टीका पूर्ण झाल्यानंतर कुमारिल भट्ट दिवंगत झाले. त्यामुळे हे कार्य सातव्या शतकापासून अपूर्णच राहिले होते. गागाभट्टाची विद्वत्ता ओळखण्याइतकी बुद्धिमत्ता किंवा गुणज्ञता रणपण्डित शिवाजी महाराजाच्या ठिकाणी होती. गागाभट्टाच मीमांसापाण्डित्य कुमारिलभट्टाच्या तोडीचें आहे हें जाणून महाराजानी त्याना हे खण्डित कार्य पूर्ण करण्याची आज्ञा दिली. या सबधात गागाभट्ट म्हणतात,—

> यत्तार्कपादे बहुनाग्रहेण श्लोकैः कृतं वार्तिकमार्यवर्यैः।
> गागाभिधेनायमपूरि शेषः तस्याज्ञया छत्रपतेः शिवस्य ॥

शिवाजी महाराजाची आज्ञा शिरसावंद्य मानून 'चतुर्थाश्रममङ्गदीप' घडत असताहि त्याकडे दुर्लक्ष करून वेदमूर्ति गागाभट्टानी ग्रंथरचनाचें कार्य केले व त्या ग्रंथाला 'शिवार्कोदय.' असे मोठे सूचक नाव दिले. शिवार्कोदयाला गागाभट्टानी 'शिवच्छत्रपतीचा यशस्तम्भ' अशी उपमा एका श्लोकात दिली आहे तो श्लोक असा —

> " श्रीमद्भोसलवंश-भूषणमणि क्षोणीश शाहात्मज-
> च्छत्राधीश शिवक्षितीश यशसः स्तम्भो निखातोऽपरः ।
> गागाभट्टमनीषिणाऽविकरणिग्रन्थः शिवार्कोदयो
> येनावद्ययशोध्वजेन सकलैर्वादेवेति लोकत्रयी ॥"

शिवाजी महाराजाच्या प्रेरणने लिहिलेल्या शिवार्कोदयाव्यतिरिक्त गागाभट्टांनी, 'दिनकरोद्योत' (यामध्ये आचार, अशौच, कालदान, पूर्त, प्रतिष्ठा, इष्टापूर्त, प्रायश्चित्त, वर्णकृत्य, व्यवहार, व्रत, शूद्र, श्राद्ध आणि सस्कार हे भाग आहेत.) 'निरूढपशुबन्धप्रयोग', 'पिण्डपितृप्रयोग' कायस्थधर्मप्रदीप, सुधानन्दुर्गोदय ('षोडशसस्कारविषयक) हे धर्मशास्त्रविषयक आणि मीमांसाकुसुमाञ्जलि, भट्टचिन्तामणि हे महत्वपूर्ण अनातर शास्त्रीय ग्रन्थ लिहिले आहेत.

---

१. रा. वा सि शेन्डे, प्राप्तिस्थान—P P. H Book stall मुबई, पृ. स. ११७, मूल्य ३ रु ।

- **शिवभारतम्**—शिवचरित्रविषयक मराठी, फारसी, इंग्रजी, पोर्तुगीज इ. भाषांत लिहिलेली तत्कालीन असंख्य पत्रें आजवर प्रकाशात आलेलीं आहेत व पुढेहि येतील. पण शिवचरित्राविषयीं प्रमाणभूत असलेल्या त्या सर्व उल्लेखांपेक्षा शिवभारताची योग्यता फार मोठी आहे. याचें कारण त्या महाकाव्याचा लेखक कवीन्द्र परमानंद नेवासेकर हा महाराजाच्या सहवासात राहणारा त्याचा एक सहकारी होता. त्याचें प्रतिभासामर्थ्य ओळखण्याइतकी साहित्यिक प्रतिभा शिवाजी महाराजांच्या ठिकाणीं होती. परमानंदाची काव्यशक्ति ओळखून महाराजांनी त्याला आज्ञा दिली कीं—

" यानि यानि चरित्राणि विहितानि मयाधुना ।
विधीयन्ते च सुकवे तानि सर्वाणि वर्णय ॥ "

स्वतःचें चरित्र संस्कृत महाकाव्याच्या स्वरूपात लिहून घेण्याची परंपरा फार जुनी आहे. बाणभट्टाचें 'हर्षचरितम्' हें या परंपरेतील ठळक प्राचीन उदाहरण आहे. (प्रस्तुत काव्याचा प्रासंगिक उल्लेख पूर्वी ४५ ठिकाणीं आला असून सविस्तर परिचय पुढे दिलेला आहे.)

**राजमुद्रा**—"प्रतिपच्चन्द्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
शाहसूनो शिवस्यैषा मुद्रा भद्राय राजते ॥

या उदात्त अर्थाने युक्त असा महाराजांच्या राजमुद्रेचा श्लोक संस्कृतात आहे, या गोष्टीला विशेष महत्त्व आहे. ही मुद्रा केव्हा झाली व कोणी केली, इत्यादि वादात शिरण्याचें आम्हास प्रयोजन नाही. ती संस्कृतात आहे, या गोष्टीला आमच्या दृष्टीने विशेष महत्त्व आहे.

शिवाजी महाराजांनी संस्कृत विद्येला आश्रय दिल्यामुळे महाराष्ट्रात जें वातावरण निर्माण झालें त्यामुळे त्याची प्रत्यक्ष प्रेरणा नसताहि उत्कृष्ट प्रतीचें वाङ्मयीन कार्य संस्कृत साहित्याच्या क्षेत्रात होऊं लागलेलें दिसतें. त्यामध्ये अत्यंत महत्त्वाचें कार्य म्हणजे नीलकंठ चतुर्धर यानें लिहिलेली महाभारतावरील 'नीलकण्ठी' टीका होय. हा नीलकंठ चतुर्धर नगर जिल्ह्यातील कोपरगांवचा रहिवासी होता. या विख्यात् टीकेव्यतिरिक्त आचारप्रदीपः, शिवताण्डवटीका व गणेशगीताटीका हे ग्रन्थ त्याने लिहिले आहेत.

शिवाजीचा ज्येष्ठ पुत्र संभाजी यानें लिहिलेल्या 'बुधभूषण' काव्याचा उल्लेख मागील सन्दर्भात आलेलाच आहे. अशा प्रकारें अप्रत्यक्षरीत्या संस्कृत साहित्याची सेवा करणारे छत्रपति शिवाजी महाराजांसारखे जे विचारशील नृपति मध्ययुगींच्या काळामध्ये होऊन गेले, त्या सर्वांच्या संस्कृतसेवेसंबंधीं माहिती गोळा करून स्वतंत्र प्रबंध लिहिण्याची शक्यता व आवश्यकताहि आहे.

---

# प्रकरण १२ वें

# अवान्तर काव्यें

मागील प्रकरणांतून उल्लेखिलेल्या विविध स्वरूपाच्या काव्यांव्यतिरिक्त इतर अनेक प्रकारच्या विषयांवर लिहिलेलीं लहान मोठीं काव्यें आजवर ठिकठिकाणीं प्रकाशांत आलीं आहेत. त्याचें वर्गीकरण करणें काहींसे अशक्य आहे अशा अवान्तर काव्यामध्ये शृङ्गार, निसर्गवर्णन, कांहीं स्फुट शतकें, टीकाग्रंथ, प्रवासवर्णनें यासारख्या विविध विषयाचा अन्तर्भाव होतो. त्यापैकी काही काव्याचा परिचय येथे देत आहोंत.

## शृङ्गारकाव्यें

**कृष्णलीला**—१७ व्या शतकांतील मदन नांवाच्या कवीने घटखर्पर काव्यांतील एकेक पङ्क्ति घेऊन समस्यापूर्तीच्या पद्धतीने प्रस्तुत काव्य लिहिलें आहे. अशा प्रकारें घटखर्पराच्या एका श्लोकांतून मदन कवीचे ४ श्लोक (प्रत्येक पङ्क्तीला एक या प्रमाणात ) तयार झाले आहेत. उदा—

निचितं समुपेत्य नीरदैः प्रियहीना हृदयावनीरदैः।
सलिलैर्निहित रजः क्षितौ रविचन्द्राविव नोपलक्षितौ ॥

या घटखर्पराच्या श्लोकांतील पहिल्या पंक्तीची समस्यापूर्ति करून,

निचित समुपेत्य नीरदैः वसुदेवे हृरिवादनीरदैः।
रचितं फणिभुजाननैरुपरिच्छत्रमभासिकाननैः ॥

हा श्लोक लिहिला. शृङ्गारनिष्ठ काव्याची पुढील यादी पहा.[1]

काव्य — लेखक
शृङ्गारतटिनी – भट्टाचार्य
शृङ्गारतिलकम् – गागाभट्ट
शृङ्गारकल्लोलम् – रायभट्ट

---

१. पृ. ३१४.

काव्य — लेखक

शृङ्गारमञ्जरी – मानकवि
शृङ्गारमाला – सुकालमिश्र ( १८ वें शतक )
शृङ्गारकौतूहलम् – लालमणि
शृङ्गाररसोदयम् – रामकृष्णसुत रामकवि
शृङ्गारविलासः – वाग्भट्ट
शृङ्गारकोशः – रमणपति
रदपंकन्दर्पम् – भावानन्द
रतिमुकुलम् – अच्युत
विरहिमनोविनोदम् – विनायक
यौवनोल्लासम् – उमानन्द
शृङ्गारमञ्जरी – रायमनोहर
केलिरहस्यम् – विद्याधर कविराज
शृङ्गारसरसी – माधमिश्र
रससर्वस्वम् – विठ्ठल
शृङ्गारामृतलहरी – सामराज दीक्षित
शृङ्गारकलिका[२] – कामराज
शृङ्गारकलिका[२] – हरि
शृङ्गारसारसंग्रहः – शम्भुदास
शृङ्गारसार – कालिदास
पुनर्मिलनम्* – तपेश्वरसिंह ( तपस्वी ) B.A.LL.B. (वकील) गया.

राधामाधवाचें पुनर्मिलन हा या काव्याचा विषय आहे. याच कवीने हरिप्रिया या नांवाचें १०८ श्लोकांचे आणखी एक खण्डकाव्य लिहिलें आहे.

श्रीकृष्णम्माचारियर यांनी आपल्या ग्रंथांत शृङ्गारविषयक काव्यांचा उल्लेख विविध प्रकरणांतून केलेला आहे. त्यांतील कांही काव्यें अशी :—

अनङ्गजीवनम्, अनङ्गतिलकः, अनङ्गदीपिका, अनङ्गब्रह्मविद्याविलासः– ( ले. वरदाचार्य, ) अनङ्गमङ्गलम्, अनङ्गलेखा, अनङ्गवती, अनङ्गविजयः ( शिवरामकृष्णकृत व जगन्नाथकृत ), अनङ्गशेखरम्, अनङ्गसर्वस्वम्, अनङ्गदर्पः, अनङ्गसेनाहरिनन्दिनी मदनभूषणम्, मदनमञ्जरी, मदनमञ्जरीमहोत्सवः, मदनमहोत्सवः, मदनलीलादर्पणः, मदनविलासः, मदनसञ्जीवनम्, मदनसाम्राज्यम्, मदनसुखपेटिका, मदनानन्दम्, मदनाभ्युदयम् ( वेंकटेशकृत व कृष्णमूर्तिकृत ),

२. मुंबईमध्ये मुद्रित । * स्टॅण्डर्ड प्रिंटिंग प्रेस, गया येथे मुद्रित.

कामकलाविलास, कामभञ्जरी, कामनैभवम् (अश्वयकुमारशास्त्री कृत), कामलीला, कामसम्मोदनम्, कामिनीकामुकोल्लास, कामोदयसिद्धि, कुसुमबाणविलासः, पञ्चबाणविलास', पञ्चबाणविजयः, पुष्पबाणविलासः, रतिनीतिमुकुलम्, रतिमन्मथम्, रतिमुकुलम्, रतिरहस्यम्, रतिविजय, रतिविलाप, रतिविलास, रम्भाभिसरणम्, रसविलास, कुमारीविलसितम्.

शृङ्गारिक काव्याची ही यादी वाचून कोणालाहि उबग येईल. ज्या विषयावर प्राचीन काळातील श्रेष्ठ कवींनी अपरंपार काव्यरचना केली, त्याच विषयावर एवढी मोठी काव्यरचना करणाऱ्यानी संस्कृत साहित्यात कोणत्याहि वैचित्र्याची भर टाकलेली नाही. बहुतेकांच्या शृङ्गाराचे आलम्बनविभाव देखील तेच ते आहेत

निसर्गवर्णनाला वाहिलेली ऋतुसंहारासारखी स्वतंत्र काव्यें फारच थोडी आढळतात. त्यामध्ये जगद्धराचे वसन्तोत्सवम्, रत्नाराध्य कवीचे दारुकावन विलासम्, लक्ष्मीनारायण द्विवेदीचे ऋतुविलसितम्, विश्वेश्वर कवीचे षड्ऋतुवर्णनम्[1] ही काव्य उल्लेख करण्यासारखी आहेत. दिल्लीचे साहित्याचार्य प. ज्यरामशास्त्री यांनी 'ज्वाहरवसंतसाम्राज्यम्' या नावाचे ७ सर्गांच (४०० श्लोक) दिल्लीतील वसन्तऋतुवर्णनपर काव्य लिहिलें आहे.[5] हें काव्य प. जवाहरलाल नेहरु यांच्या षष्ट्यब्दीपूर्ति महोत्सवाच्या वर्षी (१९५०) मध्ये प्रकाशित झालें, म्हणून त्याला 'जवाहरवसन्तसाम्राज्यम्' असें नाव कवीनें दिलें आहे. एरव्ही या काव्यातील जवाहर शब्दाला काहीहि अर्थ नाही. चन्द्रावली, मधुमण्डनम्, निसर्गमधुरम् यासारखीं आणखी काही निसर्गवर्णनपर काव्य आढळतात.[6]

सत्रुरामायणम्[1]–इ. स. १६२८ मध्ये कृष्णभट्टाचा पुत्र भय्याभट्ट लिहिलेल्या याने या काव्यामध्ये काशीतल्या रामाचे वर्णन केलेलें आहे.

**तीर्थाटनम्**—म्हैसूर विद्यापीठाच्या संस्कृत विभागाचे प्रमुख चक्रवर्ती राजगोपाल (१८८२ ते १९३४) यांनी ४ अध्यायाच्या प्रस्तुत पद्यग्रंथामध्ये आपले भारतातील प्रवासाचे विविध अनुभव वर्णिलेले आहेत. मदुरेचे म्ही. एस्. रामस्वामी शास्त्री, वकील यांनी 'निविल्यद्‌दलचम्पू' मध्ये आपल्या प्रवासाचें वर्णन केलें असून त्यात प्रामुख्याने पुण्यतीर्थे व विश्वविद्यालय वर्णिलीं आहेत.[7] सत्य रामशास्त्री यांनी लिहिलेला श्रीवणाचा प्रवास व डॉ. छाब्रा यांनी लिहिलेला हॉलंडचा प्रवास (न्यक्तर जनपद शोभा) मधुरवाणीमध्ये १९५३ मध्ये प्रसिद्ध झाला. प्रवास वर्णनाची पुस्तक फारच थोडीं आहेत.

३ पृ ३१२। ४ अर्जुन मुद्रणालय दिल्ली येथे मुद्रित. ५ पृ ३१४। ६. पृ. २९० A। ७. मदुरा येथे १९३७ मध्ये मुद्रित।

रामानन्दम्—ले. माध्वसिद्धान्त प्रबोधी संस्कृत पाठशाळेचे अध्यापक साहित्यशिरोमणि श्रीनिवासभट्ट. ( पृष्ठसंख्या ४८, मूल्य ६ आणे ).

सुषमा—मुंबईच्या सेंट झेवियर कॉलेजचे संस्कृताध्यापक गौरीप्रसाद झाला यांनी हा प्रस्तुत स्फुट काव्याचा संग्रह लिहिला आहे. ( मूल्य १॥ रुपया ).

कवितासङ्ग्रहः—नागपूरच्या मॉरिस कॉलेजचे ( नवीन नांव नागपूर महाविद्यालय ) माजी प्राचार्य व संस्कृतचे प्राध्यापक महामहोपाध्याय केशव गोपाळ ताम्हन यांनी रचलेल्या स्तुतिपर २४ काव्यांच्या प्रस्तुत संग्रहांत काही देवतांची स्तोत्रें व नागपुरातील राजे लक्ष्मणराव भोसले, मोतीबाग जामदार, म. म. भट्टजीशास्त्री घाटे, नारायण दाजिबा वाडेगावकर यासारख्या माननीय व्यक्तींवर केलेले काही स्तुतिपर श्लोकहि प्रस्तुत पुस्तकांत संगृहीत केले आहेत.[८]

धारायशोधाराः—सातार्‍याच्या न्यू इंग्लिश स्कूलचे संस्कृताध्यापक श्री दिगम्बर महादेव कुलकर्णी यांनी माळव प्रदेश व त्याचा इतिहास वर्णन करणारें हें काव्य लिहिलें आहे. श्री कुळकर्णी यांची कविल शक्ति प्रखर असून त्यांची रचनाशैलीहि अत्यंत प्रसन्न आहे. ' That which is not in the interest of the beehive, cannot be in the interest of the individual bee.' या पण्डित जवाहरलाल नेहरूंच्या सुभाषिताचा श्री. दि. म. कुळकर्णी यांनी केलेला,

कृत्यं भवेद् यन्मधुकोशहान्यै दुःखाय तत् स्यादपि मक्षिकाणाम् ।
व्यक्तिः समाजश्च सदा भवेताम् स्वार्थैकदृष्ट्यापि मिथोनुकूलौ ॥
( पृ. २८, श्लोक १९९ )

हा अनुवाद मूळ वाक्याइतकाच सरस आहे. महाराष्ट्रीय नृपवर्णनाच्या ओघात श्री. दि. म. कुळकर्णी यांनी केलेले अहल्यादेवीचे पुढील वर्णन अत्यंत चित्तवेधक आहे.

"स्नुषा तदीया सुकृतैः प्रजानां मल्लारिसिंहासनमारुरोह ।
प्रजाः प्रजाः स्वा इव तन्त्रयित्वा राजन्वतीं या विदधे स्वभूमिम् ॥१५५॥
चैव कन्याः प्रथिता जगत्यां पापानि यासां स्मरणाद् ह्रियन्ते ।
न वेद्मि तासां प्रथमा भवेत् का तपस्विभार्या नृपतिस्नुषा वा ॥१५६॥
पुर्वाधिरूढा पदवीमहल्या भूत्वा सुमत्रा रघुनाथपादे ।
परा पराभूतवती महान्तं विनैव युद्धं रघुनाथवीरम् ॥१५७॥
सुरालयास्तीर्थजलावतारा अनाथसत्राण्यपि पाठशालाः ।
मार्गेषु पूर्तानि बहूनि नित्यं कुर्वन्ति साक्ष्यं तदुदारतायाः ॥ १५८॥

८. कर्नाटक प्रेस, मुंबई येथे मुद्रित ।

रुद्राक्षभूषस्य तपोधनस्य पतिव्रताऽरण्यतपस्विनी स्त्री ।
एतानि कर्तुं न भवेत्समर्था यशश्च लभ्यं न विना सुकार्यैः ॥१५९॥
इन्दूरधान्यां मिथिलोजजन्योरंध्वर्यवैराग्य गुणद्वयाढ्या ।
श्रीदेव्यहल्या जनको विदेहो योगीश्वरो भर्तृहरिः शशास ॥१६०॥
झाशी निवासिन्यबलाऽपि लक्ष्मी. युवत्प्रगल्भा रणचण्डिकेव ।
इन्दूरवासिन्यबला त्वहल्या युवत्प्रगल्भाऽपि सरस्वतीव ॥१६१॥

**श्रीविष्णुचतुर्विंशत्यवतारस्तोत्रम्**—( संस्कृत टीकेसहित ) श्रीमद्-भागवताच्या द्वितीय स्कन्धातील सप्तम अध्यायात वर्णिलेल्या, भगवान् विष्णूच्या २४ अवतारांवर नागौर ( राजस्थान )चे स्वामी लक्ष्मणशास्त्री यांनी हे स्तोत्रात्मक चित्रमाव्य रचलेले आहे. प्रत्येक श्लोकात विष्णूच्या एकेका अवताराचे नाव, क्रम व चरित्र वर्णिलेले आहे.

याव्यतिरिक्त प्रस्तुत लेखकाने श्रीविष्णुचरितामृतम् ( मूल्य २ रु. ) विष्णुस्तवषोडशी, श्रीहरिद्वादशाश्चरीस्तोत्रम्, श्रीरामविवाहः, श्रीरामपादयुगुलीस्तवः या सर्व पुस्तकाच्या संस्कृत टीका व भाषांतरे स्वतः लेखकाने केलेली आहेत.[९]

**विनोदलहरी**[१०]—ले. कविरत्न माधव नारायण डाऊ. प्रस्तुत काव्यावर श्री गोविंद वेंकटेश डाऊ ( कवीचा चुलत भाऊ ) याने ' सुबोधिनी ' नामाची संस्कृत टीका लिहिली आहे. श्री. माधवराव डाऊ हे विदर्भातील दारव्हा या गावी एक नामांकित वकील होते. प्रस्तुत विनोदलहरीत कवीने हरि हर व उमा रमा यांच्या परिहासनिष्ठ संवादातून सामान्य व्यक्तीच्या संसारातील सुखदुःखाचे मनोज्ञ चित्रण केले असून पति पत्नींनी धर्माचरणाने व परस्पराच्या अनुकूलतेने आपला दुःखपूर्ण संसार सुखी करावा, असे प्रतिपादन केलेले आहे. प्रस्तुत काव्यात सुहृत्प्रलाप, दर्पदलन, अनुताप, प्रियसङ्गम, उपशमशम', या नावाचे ५ तरङ्ग असून श्लोकांची संख्या ३०० आहे.

तव रमे वरमेडयमुपेत्य को भवदवे वद वेदनयाहत
त्वमधुना मधुनाशनसादरं कुरु मनः सुमनस्समुपायनम् । २–८२
मन्दारमालास्यमुदेऽजितस्य, मन्दा रमा लास्यमुदे जितस्य ।
सदा हसत्तामरसाननश्रीः स दाहसत्तामरसाऽऽननश्रीः ॥४–३

यासारख्या श्लोकातून श्री. माधवराव डाऊंचे शब्दालंकारनैपुण्य लक्षात येऊ शकेल. त्यांचा विनोदहि अत्यंत उच्च प्रतीचा व विद्वानांना आनन्द देणारा आहे.

---

९. सर्व पुस्तके निर्णयसागर प्रेस, मुंबई येथे मुद्रित
१०. शारदाश्रम, यवतमाळ तर्फे प्रकाशित.

करलालितोऽपि हरिणाऽनिशं दर
ऋजुतामगान्न इरमप्यवक्षिण:
भगिनीं स्वभर्तरि विरर्तुमुद्यत:
कुटिल. तालवमकरोत् स्वभावजम् ॥ १-४८

स्त्रीसुतानुचरवर्गदुर्गतात्
जीवनाग्निधनमेव साम्प्रतम् ।
सम्प्रधार्य मरणोद्यतेन तत्
पीतमुल्बणविषं न हन्ति माम् ॥ १-४४

नयनैर्विषमत्वमाश्रित ननु पञ्चत्वमित मदाननैः ।
अवधारय मामकीं दशा स्वयमेवाक्षमता निरीक्ष्य मे ॥ १-४५

वनिता नितान्तचपला विलासिनी तनय स्मर' स च विवेहता गत ।
विधुनोति मर्मभिदसौ स्मृतावपि क्व सुत सुखाय धृतपञ्चसायक ॥ १-३०

अतनुस्तनुते ननु लोकवग
स्मृत एव मनः कुरुते विकृतम् ।
अपहन्ति सतामसतां च मतिं
विहितास्य भुवि स्मर इत्यभिधा ॥ १-३१ ॥

एकमाहुरतनु तनूकृत
तावकीन-नयनानलार्चिभि. ।
आत्मज पुनरपूज्यता गत
नाभिजातमपर मनीषिण ॥ १-३२

याप्रारख्या शिव-विष्णूच्या सभाषणातील श्लोकातून श्री. डाऊच्या विनोदबुद्धीची भरपूर कल्पना येऊ शकेल श्री. डाऊच्या शैलीसंबंधी लिहिताना लो. बापूजी अणे, श्री. बाबासाहेब खापर्डे ( माजी शिक्षणमंत्री, मध्यप्रदेश ) व प्रा. स. गो. सोमलवार यांनी त्याला त्रिविक्रम भट्ट, भारवि याप्रारख्या प्राचीन श्रेष्ठ कवींची उपमा दिलेली आहे. श्री. बापूजी अणे प्रस्तुत काव्यासंबधी लिहितात की, "Its study will certainly dispell the shibboleth that Sanskrit is a dead language and make them realise that it is as living to day as any one of the modern languages in the East or West."

विनोदलहरींतील धन्यपुरुषवर्णनामध्ये श्री. डाऊ यांनी लो. टिळकांचे जे वर्णन केलेलें आहे, तें त्यांच्या विचारसरणीची कल्पना येण्याच्या दृष्टीने उद्धृत करणें अत्यंत आवश्यक आहे. लो. टिळकासंबंधी इतकें चांगलें काव्य सहसा कोठे आढळणार नाही.

परिणतिपरिपूता यस्य चेतःप्रवृत्ति-
विलसति परमोच्चैर्यस्य शीलानुबन्धः ।
अविचलमतिरूढो यस्य कार्यावलोकः
जयति स भुवि धन्यो लोकमान्यो न चान्यः ॥ ५–३५

स्वजनजनपदाना यत् सुख तत् तदीय
तदवगतदुःखान्तर्दह्यते यः शमीय ।
तदवनपरिनद्धः सन्तत सन्ततासो
जयति स भुवि धन्यो लोकमान्यो न चान्यः ॥ ५–३६

अभिलषति न मान गौरव वात्मनीन
गणयति न च खेदं गेहतो देहतो.वा ।
स्थितमतिरनिशं य खिद्यते लोकबन्धुः
जयति स भुवि धन्यो लोकमान्यो न चान्यः ॥ ५–३७

वितरति बलमुच्चैर्यो जनाना समाजे
हरति च परिताप मानस मानमस्थम् ।
मनसि वचसि कर्मण्येकतानो मनस्वी
जयति स भुवि धन्यो लोकमान्यो न चान्य ॥ ३८ ॥

जनयति जनतायामादर मातृभूमे—
दिशति सदभिमान पौरुष वाग्विसर्गैः ।
अपनयति जघन्यां य. दववृत्ति तदीया
जयति स भुवि धन्यो लोकमान्यो न चान्य. ॥ ३९ ॥

आधुनिक लेखकांमध्ये प. शिवदत्त त्रिपाठी यांची साहित्यसेवा फार मोठी आहे. त्यांचे श्रीकृष्णचरितम्" अनेक दृष्टींनी वाचनीय आहे. श्रीमद्भागवतावरील श्रीधरस्वामी व गिरिधराचार्य यांच्या टीका प्रमाणभूत मानून पचतत्र, दशकुमारचरित, यशस्तिलकचम्पू, शिवराजविजय इत्यादिकांची शैली आत्मसात् करून प. शिवदत्त त्रिपाठींनी १३४ स्तबकांत (पृ. स. ४६१) प्रस्तुत श्रीकृष्णचरितम् लिहिले आहे. याव्यतिरिक्त त्यांनी एकूण २२ पुस्तकें लिहिलीं असून तीं सर्व आस्तिकसमाज ग्रथमाला या संस्थेतर्फे प्रकाशित झालेलीं आहेत. त्यांचीं नावें पुढीलप्रमाणे आहेत—

गद्यभारतम् २ भाग, गद्यरामायणम्, आस्तिकस्मृति, दुर्वासस्तृप्तिस्वीकार-नाटकम्, श्रीदुर्गाचरितम्, श्रीरामामृतसिन्धु, सूर्यदानकम्, विवाहदिग्दर्शनम्, कृष्णभेदेवचरितम्, दाधीचारिगराङ्कुश, नीतिवाक्यरत्नावली, गोलामदर्शनम्, हिन्दुहितवार्ता इत्यादि.

---

११ प्राप्तिस्थान—श्रीजानकीनिवास, पुष्कर, अजमेर.

पं. शिवदत्तांनीं काही हिन्दी रूपांतरहि केलेलें आहे.

**अलकामिलनम्**—जयपुरचे प्रा. द्विजेन्द्रनाथ पुरकायस्थ यांनी मेघदूताची पूर्ति करण्याच्या उद्देशानें दोन सर्गांचें प्रस्तुत खण्डकाव्य पृथ्वीवृत्तांत लिहिलें आहे. पहिल्या सर्गांत यक्षपत्नीच्या विरहावस्थेचें वर्णन ४१ श्लोकांत केलें असून, दुसऱ्या सर्गांत ७२ श्लोकांमध्यें यक्ष दम्पतीच्या शृंगारविलासाचें वर्णन केलेलें आहे. प्रस्तुत काव्यांत छोटोंपाची उदाहरणें भरपूर आहेत. द्विजेन्द्रलालजींनीं 'अद्वैतामृतसारः' हें साठ श्लोकांचें आणखी एक पुस्तक लिहिलें आहे.

**संस्कृतनिबन्धादर्शः**—ले. वासुदेव द्विवेदी. विद्यार्थ्यांना संस्कृत लेख लिहिण्याच्या कामीं मार्गदर्शन करण्याकरितां प्रस्तुत पुस्तक लिहिलें आहे. त्यामध्यें मातृपितृभक्तिः, स्वच्छता, एकता, विद्यार्थिनां कर्तव्यम्, समाजसुधारः, महात्मा गान्धी, यासारख्या ३१ विषयांवर सुबोध निबंध लिहिले असून, संस्कृत पत्रलेखनाचें दिग्दर्शन केलेलें आहे. सार्वभौम प्रचार कार्यालय, आग्रा, या संस्थेतर्फे प्रस्तुत पुस्तक प्रकाशित झालें असून त्याव्यतिरिक्त संस्कृतवाक्यसंग्रह', (संस्कृत भाषणाचा मार्गदर्शक), स्तुतिप्रार्थना, संस्कृतगीतमाला (स्त्रीगीतांचा संग्रह) यासारखीं आणखी काही पुस्तकें प्रकाशित झालीं आहेत.

**कीरसन्देश**—ले. श्री. ग. लक्ष्मीशान अय्या, एम्. ए., प्राध्यापक, निजाम कॉलेज, हैद्राबाद.

**गंगालहरी**—ले. प्राचार्य के. व्ही. एन्. आप्पाराव, एम्. ए., संस्कृत कॉलेज, कोव्वूर (गोदावरी). हीं दोन पुस्तकें संस्कृतसेवकसमाज राजेश्वरीपुरम्, गुंटूर, या संस्थेतर्फे प्रकाशित झालीं आहेत.

**साहित्यवैभवम्**—जयपूरचे साहित्याचार्य श्रीभट्ट मथुरानाथशास्त्री (मञ्जुनाथ) यांनी एका विशिष्ट हेतूनें प्रस्तुत काव्यग्रंथ लिहिला. या ग्रंथाचें वैशिष्ट्य म्हणजे त्यामध्यें हिन्दी व उर्दू भाषांतील गजल, ठुमरी, दोहा, चौपाई, कवित्त, सवय्या, बारहमासी इत्यादि विविध छंदांचा उपयोग बुद्धिपुरःसर केलेला आहे. त्याप्रमाणें रेडिओ, विमान, मोटर, यासारखे नवीन विषय काव्यासाठीं निवडलेले आहेत. आजवर संस्कृत कवींनीं नवीन प्रकारचीं वृत्तें व नवीन विषय हाताळले नाहीत, त्यामुळें संस्कृत भाषेचा प्रचार कमी झाला, असें लेखकाचें स्पष्ट मत आहे. पं. मथुरानाथांची एकूण काव्यसंख्या मोठी असून त्यामध्यें काव्यगुणहि मोठ्या प्रमाणांत आहेत. त्यांची भाषाहि अत्यंत ओघवती व सुबोध आहे. प्रादेशिक भाषेतील छंदांचा उपयोग करण्याच्या त्यांच्या प्रयोगाचें अभिनंदन पं. श्यामसुंदर शर्मा, श्री. ए. बी. ध्रुव, नारायणशास्त्री खिस्ते, पं. गोपीनाथ कविराज या सारख्यांनीं जरी केलें असलें तरी डॉ. गंगानाथ झा यांनी मात्र त्यासंबंधीं प्रतिकूलता दर्शविली आहे ते लिहि-

तात—"*The adoption of the Hindi metres and the consequent abandonment of the older metres is in my opinion not an improvement. It is only when framed in the older metres that Sanskrit poetry appears in its natural setting. I hope the poet will compose the rest of the works in Sanskrit metres.*" डॉ. गंगानाथ झा याच्या मताशीं आम्ही सहमत आहोंत. प. मथुरानाथजींनी संस्कृतांतहि इतर भाषांतील वृत्तांत काव्यरचना करतां येते हें सिद्ध करण्याच्या हेतून अशा प्रकार विविध प्राकृत छंदांचा उपयोग केला असला तरी हा प्रकार सर्वत्र रूढ होणे योग्य नाही असें आम्हांस वाटत. हिन्दी, उर्दूतील छंदांचा उत्तरेत जसा प्रचार आहे, तसा दक्षिणेत नाही. त्यामुळे दक्षिणेतील संस्कृत वाचकांस असलीं काव्यें सरळ वाचतां येणार नाहीत. दक्षिणेतील काही संस्कृत लेखकानी त्या भागांत लोकप्रिय असलेल्या गेय छंदात काव्यरचना केली तर ती प. भट्ट मथुरानाथासारख्या प्रादेशिक छंदाच्या पुरस्कर्त्यांना सुद्धा वाचणा वाटणार नाही. संस्कृत ही अखिल भारताची भाषा आहे, याचा विसर संस्कृत लेखकांना कधीहि पडता कामा नये. असो!

प्रस्तुत 'साहित्यवैभवम्' ग्रंथाचे दोन भाग असून पहिल्या भागाला 'जयपूर-वैभवम्' असें नाव आहे. या भागांतील 'विशिष्टजनचत्वर' या प्रकरणात जयपूर-मधील १२२ थोर पुरुषांवर कविता लिहिलेल्या आहेत. दुसऱ्या भागाला 'साहित्य-खण्ड' असें नाव आहे. 'नवयुगगीथी' नावाच्या प्रकरणात सामाजिक परिस्थितीचें चित्रण कवीनें केलेलें आहे. या ग्रंथावर 'सहचरी' नावाची टीका कवीनें स्वतः लिहिलेली आहे. *साहित्यवैभवम्'* मधील गेयकाव्याचा परिचय प्रस्तुत ग्रंथातील पुढील एका प्रकरणांत येईलच. याच लेखकानें हाल कवीच्या गाथासप्तशतीचा समवृत्त संस्कृत अनुवाद केला आहे. भट्ट मथुरानाथ यांनी ईश्वरविलसितम्, पद्यमुक्तावली, त्रिपुरसुन्दरीस्तवराज, अलंकारमणिनिधि, गोविन्दवैभवम् (स्वरचित संस्कृत टीका व हिंदी अनुवादासहित) मञ्जुकवितानिकुञ्जम् हे काव्यग्रंथ लिहिले आहेत. 'मञ्जुकवितानिकुञ्जम्' मध्ये जयपुरवैभवम् व साहित्यवैभवम् या काव्यांव्यतिरिक्त संस्कृतसर्वस्वम् व काव्यकलारहस्यम् हीं आणखी दोन काव्यें समाविष्ट झालीं आहेत. जयपूरच्या 'भारती' या प्रख्यात संस्कृत मासिक पत्रिकेचें संपादकत्वहि आरंभापासून भट्ट मथुरानाथांकडेच असून त्यांच्या लेखनकार्यांत मुळीच खण्ड पडलेला नाही.

**सत्यध्यानविजयम्**—ले. श्रीनिवासपुर केशव. ५ सर्गांच्या प्रस्तुत काव्यात (श्लो. स. २९०) श्रीसत्यध्यानमुनि यांचें चरित्र वर्णिलें आहे धारवाडच्या मनोरंजन प्रकाशन समितीनें प्रकाशित केलेल्या प्रस्तुत काव्यामध्ये कवीच्या धाकट्या

भावाने लिहिलेली त्यावरील टीका असून शेवत 'सन्ध्यानाटकम्' हे केशवकृत स्तोत्र व कुम्भोणच्या संस्कृत सभेचाहि वृत्तात प्रकाशित केला आहे.

**कवीन्द्रचन्द्रोदयः**—शहाजहानच्या कारकीर्दीत प्रयागमध्ये हिंदु यात्रेकरूंवर जुल्मी कर लादण्यात आला होता. तो उठविण्यासाठी कवीन्द्राचार्य नावाच्या सत्पुरुषाने राजदरबारी बरीच खटपट केली व ती यशस्वी झाली. यामुळे सर्व हिन्दु जनतेला जो विलक्षण हर्ष झाला त्याचें प्रतिबिंब प्रस्तुत काव्यसंग्रहात अगदी स्वच्छपणे उमटलेलें आहे. सतराव्या शतकातील ६९ विद्वान् पंडितांनी कवीन्द्राचार्यांची संस्कृत गद्य व पद्यकाव्यामध्ये मनगच्च स्तुति केली. हा सर्व स्तुतिसंग्रह श्रीकृष्ण उपाध्याय नावाच्या विद्वानाने नीट संकलित केला. त्यामुळे तत्कालीन ६९ लेखकांची नावानिशी माहिती आपणास उपलब्ध होते. तत्कालीन पाण्डित्याचीहि बरीच कल्पना या श्लोक-संग्रहावरून आपणास येते. दिल्लीच्या हिन्दु कॉलेजचे प्राध्यापक विद्यासुधाकर डॉ. हरदत्त शर्मा व पुण्याच्या भांडारकर इन्स्टिट्यूटचे श्री. एम्. एम्. पाटकर यांनी हा कवीन्द्रचन्द्रोदय संपादित केला आहे. कवीन्द्रचन्द्रोदयातील उत्कृष्ट काव्यांची काही उदाहरणे पुढीलप्रमाणे आहेत—

मायूरीं मर्दयन्ती मृदुपदरचना न्यासतो भूतलेऽस्मिन्
चौरीं सचूर्णयन्ती सुरुचिररसभृत् सच्चमत्कारचार्वी ।
माघं सघर्षयन्ती कविकुलजयिनी मां च रोमाचयन्ती
यद्वाणी भाति भूयस्त्रिभुवनभवनोद्दीपिका दीपिकेव ॥ २९५ ॥
(पृ. ५४)

बाणं बाणवदेव दिक्षु सगुणं क्षिप्रं क्षिपन् भ्राजते
कृष्णं चौरमुरारिदण्डिजयदेवाख्यं च नारायणम् ।
बासत्वं लभते स कोऽपि सुभगः श्रीकालिदासः कविः
श्रीहर्षं च विहर्षयन् विजयते श्रीमत्कवीन्द्रः कृती ॥ ३०४ ॥
(पृ. ५५)

काणादे कणभुक् पतञ्जलिरसौ प्रायेण पातञ्जले
साङ्ख्ये श्रीकपिलः किलेति कलितो लोकेन लोकोत्तरः ।
श्रीव्यासोऽप्ययं चैव जैमिनिमुनिर्वेदान्तमीमांसयो—
र्न्याये गौतम एव केवलमसौ श्रीमत्कवीन्द्रो यतिः ॥ ३०९ ॥
(पृ ५६)

पुण्यवतामधिवासो वासव इव वसुधामवतीर्णः । सद्दयधिर्धैर्यस्य । परिधिः शर्मणाम् । शेवधिः कविसमुदायस्य । आविर्विरोधिवर्गस्य । व्याधिर-विद्यायाः । वितत्तोपाधि' दूरीकृतोपाधिश्च । भानुरिव प्रवर्तितविमानप्रसरः । सवर्द्धितविविधविधिः श्रुतिमार्गाविरोधी । सिन्धुः शौर्यस्य । बन्धुः साधुतायाः ।

बन्धुर्विद्वद्वृन्दस्य । सीमा सौजन्यस्य । विश्रान्तिस्तितिक्षायाः । आरामो रामणीयकस्य । धाम धर्मस्य । मर्म सत्कर्मणाम् । निलयन कलाकलापस्य । आलबालं वात्सल्यलतायाः । प्रासादः सदाचारस्य । उपधान निमलक्षमायाः । निवणिरगण्यगुणगणमणीनाम् । प्रपा सद्विद्यायाः । आदर्शः सर्वशास्त्राणाम् । शृणिरुन्मत्तद्विपानाम् । पत्तन सत्यजातस्य । पत्य स्वस्त्ययनस्य । मूल श्रुतिकुलस्य । घण्टापथः पटुतायाः । शृङ्गारकः शृङ्गाररसस्य । वरुणालयः करुणायाः । तत्त्व सत्त्वगुणस्य । कान्तारं कुबुद्धीनाम् । १

मरुः पापपयसः । पात्री मैत्रीकरणस्य । आलोको लौकायतिकस्य । निदर्शन दर्शनीयतायाः । ज्वलनस्नीरा द्विपर्द्देन्योपदस्य । परशु परवेदनाकाननस्य । आलान मानमतङ्गजस्य । उपदेशक परोपकारस्य । प्रवर्त्तकः सत्रचिरस्य । मार्गोपदेष्टा शिवाचारस्य । आधारः सभावन्धस्य । केदारः प्रमोदानाम् । सार्थः परमार्थानाम् । ग्रन्थिरतिथिपुरस्कारस्य । सवर्त्तः शत्रुवृत्तस्य । अपर सन्ता-लतायाः । कपाट कपटाचरणस्य । वाष्पाडम्बरः ( ! ) शरणागताधीनाम् । निधानं सर्वमन्त्राणाम् । निदान सर्वसपत्तीनाम् । २

जेता सकलवनितानियमस्य । केतुर्निनयस्य । सेतुः कीर्तिपूर्तस्य । अहेतुः कोदण्डपाण्डित्यस्य । दाताः सर्ववर्णानाम् । चित्रभानुः शास्त्रवान्धकाराणाम् । दिग्गिलासिनीकर्णपूरीकृतकीर्तिपल्लवोऽपि निजाश्रितनिजाश्रितविपल्लवः । वल्कलवल्क इव विदग्धाल्कको ध्वसितकसस्य । शूर इव सदवृत्तरगः । हरिरिव प्रनीतविक्रमः । घन इव प्रमारितापः । भागीरथीप्रवाह इवास्खलितगतिः पावनश्च । परीवादरतोऽपि परिवादपराचीनचेतोवृत्ति सुभाषितव्यसनी । भास्वानप्यपरोपतापी । पुण्याचलोऽप्यस्तम्भी । पुण्यगान्ध सवर्द्धितविद्वद्वृन्दः परोपकारनिस्तन्द्रो यतीन्द्रः कवीन्द्र इति ॥ १ ॥ इति प्रथमा ॥ ( पृ. ४१ )

**संस्कृतायोगप्रश्नावलिप्रतिवचनम्**—भारत सरकारच्या संस्कृतायोगाने ( संस्कृत कमिशन ) संस्कृत शिक्षणासंबंधी प्रसृत केलेल्या प्रदीर्घ प्रश्नावलीला उत्तर म्हणून कल्याणचे श्री. जीवन्यायतीर्थ यानी हे पद्यात्मक पुस्तक लिहिले." ( याच विषयावर आम्ही स्वतः 'प्रश्नावलीविमर्शः' या नावाची १९ लेखाची माला 'संस्कृतभविष्यम्'मध्ये लिहिली व ती पुस्तकरूपाने प्रकाशित केली आहे. )

**मुक्ताजालम्**—सर चिन्तामणराव देशमुख यानी महात्मा गांधींच्या शंभर सुभाषिताचा संस्कृत पद्यानुवाद 'गांधीसूक्तिमुक्तावली' या नावाने केला.

---

१२. १९५७ मार्चच्या मञ्जूषा मासिकात प्रकाशित.

त्यावर टीका करण्यासाठी मुंबईने श्री. व्ही. पी. जोशी यानी ७० श्लोकांचें प्रस्तुत पुस्तक लिहिलें आहे. श्री. देशमुखाच्या अनुवादासंबंधीं लेखकाचें मत—

" मुक्तावल्या भाषा यद्यपि संस्कृतमयीह नागलीया
गांधीवाङ्माधुर्यां कलां न सा षोडशीमपि स्पृशति ॥ " (श्लो ४०)

अशा प्रकारचें आहे.

जीवनसागर—भारत सरकारचे राष्ट्रीय प्राध्यापक म. म. डॉ. पांडुरंग वामन काणे याच्या अमृतमहोत्सवानिमित्त त्याचे शिष्य श्री. वि. भी. वेलणकर (एम्. ए., एल्एल्. बी.) यानी त्याच चरित्र प्रस्तुत पुस्तकाच्या रूपाने लिहिलें. त्यामध्ये ओवी, दिंडी यासारखीं जुनीं व अनुमदारमाला, स्वर्गसौंदर्य, मोहिनी, यासारखीं आधुनिक मराठी वृत्तें कवीने उपयोजिलीं आहेत. श्री. वेलणकरानी विष्णुवर्धापनम्, गुरुवर्धापनम्, हीं स्फुटकाव्य लिहिलीं असून, विख्यात मराठी कवी यशवंत याच्या ' जयमंगला ' या मराठी काव्यसंग्रहाचें संस्कृतात उत्कृष्ट भाषांतर केलें आहे. पोष्ट खात्यातील उच्चाधिकाराचा भार सांभाळून केलेली ही संस्कृत सेवा खरोखरच फार प्रशंसनीय आहे.[13]

धर्मशतकम् व अर्थशतकम्—मुंबईचे प्रसिद्ध व्यापारी प. जयराज पाण्डे यानी अत्यंत प्रासादिक संस्कृत भाषेंत धर्म व अर्थ या पुरुषार्थासंबंधीं हीं दोन शतकें लिहिलेलीं आहेत. धर्मशतकामध्ये वैदिक ऋषि, कॉन्फ्यूशियस (श्लोक ६७ ते ७०), बुद्ध (श्लोक ७१ ते ७८), प्लेटो (श्लोक ७९ ते ८६), येशू (श्लोक ८७ ते ९१), जरतुष्ट्र (श्लोक ९२), शोपेनहोअर (श्लोक ९३), महम्मद (श्लोक ९४ ते ९६) अशा प्रकारें जगातील श्रेष्ठ धर्मप्रवर्तकाचे विचार प. जयराज पाण्डे यानी गुंफलेले आहेत.

" परापहरणं विना कुरुत कर्म धर्माध्वना " (श्लो. ९४)
" सुखासुखसमा मतिः सुकृतसंज्ञिता साध्यताम् " (श्लो ५७)
" परापरविवेकिताऽखिलसुखाद्यभूमिर्मता ।" (श्लो ६३)
" परस्य परिपोषणं स्वपरिपोष उद्दीप्यताम् ।" (श्लो ८३)

यासारखीं धर्मविषयक सुभाषितें प्रस्तुत धर्मशतकामध्ये ठिकठिकाणीं आढळतात.

प. जयराज हे उत्कृष्ट अर्थशास्त्रज्ञ असून शेअरच्या व्यापारामध्ये त्यांचें स्थान फार मोठें आहे. आपल्या अर्थशतकामध्ये त्यानी या विषयातील आपलें

---

१३. राष्ट्रवैभव छापखाना, मुंबई ४ येथे मुद्रित ।

पाहित्य उत्कृष्ट प्रकारें व्यक्त केलें आहे धननिरशणाचें औचित्य (श्लोक २१ ते ४०), पदार्थांचा मूल्यविचार ( श्लोक ४१ ते ५० ), धनवृद्धिविचार (श्लोक ५२ ते ६९), जनतेच्या दुःखहरणाचा उपाय ( श्लोक ७० ते ८१ ), भांडवलशाहीची निंदा व समतावादाचें औचित्य ( श्लोक ८२ ते ९६ ), याप्रमाणें अर्थशास्त्रातील आधुनिक विचार या शतकात गोवलेले आहेत. धर्मशतकाप्रमाणेंच अर्थशतकांतहि,

" विभाति न हि भौतिक ननु सुखं सुवर्णाद् ऋते ।" (श्लो. ७)
" सत भवति तद्धन जगदभीष्टसम्पादनम् ।" (श्लो २०)
" न कर्म परिमुच्यतां न बहुना विना मुच्यताम् ।" (श्लो ५९)
" पुराणमपनीयतां नव-भवः समुद्भाव्यताम् ।" (श्लो. ६५)

यासारखीं रोचक सुभाषितें ठिकठिकाणीं पहावयास मिळतात.



# प्रकरण १३ वे

# शतक काव्यें

शतक काव्यें हे संस्कृत वाङ्मयातील एक विशेष स्वरूपाचे दालन आहे. भर्तृहरि, अमरु, भल्लट, मयूर यासारख्या श्रेष्ठ प्राचीन कवींची कीर्ति त्याच्या शतक काव्यामुळेच आजवर अजरामर झालेली आहे. भर्तृहरीच्या पावलावर पाऊल टाकून नीति, शृंगार व वैराग्य विषयावर अनेक कवींनी आजवर शतक काव्ये लिहिलेली आहेत. परंतु भर्तृहरीची कीर्ति कोणालाहि लाभल्याचे दिसत नाही. अर्वाचीन कालखंडात अनेक विषयावर शेकडों कवींनी शतक काव्य लिहून संस्कृत साहित्य मंदिराचें हे दालन निरंतर प्रकाशित ठेवलेले आहे. त्यातील काही शतकांचा विषयानु रोधाने पुढे संक्षिप्त परिचय दिलेला आहे.

## शृंगारशतकें

शृंगारिक विषयावर लिहिलेल्या काही अवांतर काव्यांचा परिचय मागे एका प्रकरणात दिलेला आहे. त्यामध्ये या शतक काव्यांनी आणखी भर पडेल. वक्षोजशतकम् व रोमावलीशतकम् ही विश्वेश्वर कवींची दोन शृंगारात्मक शतक काव्यमालेमध्ये प्रकाशित झाली आहेत.[1]

**शृङ्गारशतकम्**—या विषयावर नरहरि, जनार्दन व व्रजलाल या तीन कवींनी काव्यरचना केली आहे. व्रजलालाचे शृंगारशतक मुंबईत प्रकाशित झाले आहे.

**कुचशतकम्**—लेखक आनिय श्रीनिवास.[2]

**कचशतकम्**—तंजौर जिल्ह्यातील वाल्लूर येथे राहणाऱ्या वरदकृष्णम्मा चार्याने (१९ व शतक) हे शतक लिहिले आहे.[3]

**शृङ्गारसप्तशती**—व्रजचंद्राचा पुत्र परमानन्द कवि याने इ. स. १८६९ हे काव्य लिहिले.

**अधरशतकम्**—हे शतक नीलकण्ठ नावाच्या कवीने लिहिले आहे. मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे विद्वान् ग्रंथपाल श्री एन्. ए. गोरे एम्. ए.

---

१. इ २१२। २ कृ ३१४। ३ कृ ३१४। ४ कृ ५०४।

यानी चिकित्सकपणे प्रस्तुत शतक संपादून इ. स. १९५६ मध्ये प्रकाशित केले. प्रस्तुत ग्रंथाला जोडलेल्या आपल्या विद्वत्तापूर्ण प्रस्तावनेमध्ये श्री. गोरे यानी नीलकण्ठ कवीचा काळ इ. स. १६१० ते १६७० हा निश्चित केलेला आहे. पण त्याच्या निवास-स्थानासंबंधीची माहिती त्याना प्रमाणाभावीं निश्चित करता आली नाही. आपल्या शतश्लोकीसाठी 'अधर' हाच विषय का निवडला यासंबंधीं नीलकण्ठ कवि म्हणतो-

कान्ताधरविषयोऽपि प्रायो नाय परिश्रमो व्यर्थः ।
सुंदरवस्तुनि यस्मादास्तेऽधिकमेश्वर तेज ॥

सात्विक बुद्धिच्या रसिकाला नकोशी वाटेल अशी एकहि अधरविषयक कल्पना या ११८ श्लोकाच्या शृंगारिक शतकात नाही, हेच याचे वैशिष्ट्य आहे. श्री. गोरे यानी नीलकण्ठविरचित **शृंगारशतकम्, जारजातशतकम्, चिमनी शतकम् व शब्दशोभा** या चार अवान्तर ग्रंथाचा उल्लेख आपल्या प्रस्तावनेत केलेला आहे. त्यापैकी शब्दशोभा हा व्याकरणविषयक लघुग्रंथ आहे. 'चिमनी चरितम्' या १०६ श्लोकाच्या काव्यात अलावर्दीखानाची सून चिमनी हिचा दयादेव शर्मा नावाच्या ब्राह्मणाशीं घडलेला प्रेमप्रकार वर्णिलेला आहे. नीलकण्ठाची भाषा प्रासादिक व ललित असून कल्पनाशक्ति मोठी तरल आहे. पण त्याने काव्य रचनेसाठी निवडलेले विषय मात्र फारच सामान्य आहेत. या अधरशतकाचे, बर्लिन, बिकानेर व कलकत्ता येथील ग्रंथसंग्रहाल्यात प्रत्येकी एकेक हस्तलिखित उपलब्ध झालें होते. पैकी बिकानेर व कलकत्ता येथील हस्तलिखिताच्या आधारें श्री. गोरे यानी प्रस्तुत शतकाच्या संपादनाचे कार्य केलेलें आहे.

## नीतिशतकें

नीतिशतकामध्ये श्रीधरवेंकटेश कवि[१] (१८ वे शतक) व वेंकटनाथ कवी याचे '**दयाशतकम्**'[२] उल्लेखनीय आहे. श्रीधरवेंकटेश कवीने **मातृभूतशतकम्** व '**तारावलीशतकम्**' या नावाचीं आणखी दोन शतक लिहिलीं आहेत. त्याचीं हीं तिन्ही शतकं गेय स्वरूपाचीं आहेत.

बिकानेरचे प्रसिद्ध संस्कृताध्यापक श्री. विद्याधरशास्त्री यानी '**विद्याधर-नीतिशतकम्**' लिहिले आहे. याव्यतिरिक्त 'शिवपुष्पाञ्जली', 'सूर्यप्रार्थना', 'मत्तलहरी', 'लीलालहरी', 'सत्यसंदोहिनी', 'काव्यवाटिका' हीं काव्य व 'पूर्णानन्दम्', 'कलिपलायनम्' हीं दोन नाटकं विद्याधरशास्त्रींनी लिहिलेलीं आहेत. नीतिशतकाव्यतिरिक्त आणखी अन्यत्र नीतिकाव्याचा निर्देश श्री. कृष्णमाचार्यांनी केला आहे. त्याची नावे उद्धृत करणे अप्रस्तुत होणार नाही.

---

५. पृ १६२।

'नीतिकल्पतरुः' (२६८); 'नीतिकल्पलता' (२६८); 'नीतिकाव्यम्' (२५६); 'नीतिचन्द्रिका' (२६८); 'नीतिदिपष्ठिका' (२५९); 'नीतिनवरत्नमाला' (२५४ ले. विजयराघवाचार्य); 'नीतिप्रदीपः' (२६८); 'नीतिमञ्जरी' (घम्मुराजकृत, २६८); 'नीतिमाला' (२६८); 'नीतिरत्नम्' (२६८); 'नीतिरहस्यम्' (२६८); 'नीतिरामायणम्' (७२१); 'नीतिलता' (६८); 'नीतिवाक्यामृतम्' (२६८), (५१४); 'नीतिविलास.' (२६८), 'नीतिशास्त्रसमुच्चय.' (२६८); 'नीतिकुसुमावली' (२६८).

**अशोषांकरामायणम्**—सुब्रह्मण्य सुरि यांनी हिलिलेल्या या १९९ आर्यायुक्त काव्याचें वैशिष्ट्य हें की त्यांत प्रत्येकीं पहिल्या तीन आर्यात रामायणाची कथा व चवथ्या आर्येत त्या कथेचें नैतिक रहस्य सांगितलेलें आहे.

**गुमानीशतकम्**—गुमणिक नांवाच्या कवीने लिहिलेल्या प्रस्तुत काव्यांत पहिल्या ओळींत भारतांतील कथा व दुसऱ्या ओळींत तिचें नैतिक रहस्य सांगितलेलें आढळतें. या गुमानी शतकाचें पद्यात्मक मराठी भाषांतर नागपुरचे कै. म. म. केशवराव ताह्मण यांनी केलें आहे. ( मुद्रित )

**वैराग्यशतकम्**—या विषयावर नीलकण्ठ दीक्षित ( अय्या दिक्षीत )[६] व अप्पय्य दीक्षित यांनी लेखन केलें आहे. यान्यतिरिक्त अय्या दीक्षितांचें **अन्यापदेशशतकम्** व अप्पय्य दीक्षितांचें '**आर्याशतकम्**' हीं उपलब्ध आहेत. रावळपिंडीच्या पंडित तेजोभानूने[७] 'वैराग्यशतकम्' 'नीतिशतकम्' व 'शृंगारशतकम्' अशीं तीन शतकें लिहिलीं आहेत. त्यामुळे त्याला 'अभिनवभर्तृहरिः' ही पदवी लाभली आहे.

**अन्यापदेशशतकम्**—या विषयावरहि बऱ्याच पंडितांनी काव्यरचना केली आहे. त्यामध्ये नीलकण्ठ ( क्र. १५४ ); पंडितराज जगन्नाथ ( क्र. ३११ ); गीर्वाणेन्द्र ( क्र. १५४ ); गणपतिशास्त्री, मधुसूदन, एकनाथ, काश्यप याचीं नावें उल्लेखनीय आहेत. त्या व्यतिरिक्त घनश्याम अथवा आर्यक (१८ वें शतक) नांवाच्या सोमनाथ, मोहनशर्मा, वीरेश्वर भट्ट, दर्शनविजयगणी, यांनी शतकें लिहिलीं असून तीं 'अन्योक्तिशतकम्' या नावानें ओळखलीं जातात.

'**आर्याशतकें**'—आर्याछंदामध्ये अनेकांनी शतककाव्यें लिहिलीं आहेत. त्यामध्ये विश्वेश्वर ( क्र. ३१२ ) व नीलकण्ठ ( क्र. २४८ ) यांचीं आर्याशतकें जयपूरचे आयुर्वेदाध्यापक पं. कृष्णराम (क्र २४५) यांचें '**आर्यालंकारशतकम्**', हीं उल्लेखनीय आहेत. अनंत शर्मा ( क्र. ८८६ ); विश्वेश्वर ( क्र. ३०५ )

६. क्र. १५४। ७. दिव्यज्योतिः विशेषांक।

गोवर्धन (पृ. ३०५); रामशरीयर यांनी आर्यासप्तशती नांवाचीं काव्यें लिहिलीं आहेत. सातवाहन हाल नृपतीच्या गाथासप्तशती या प्राकृत काव्याचा संस्कृत साहित्यावरहि फारच प्रभाव पडलेला आहे. त्या प्रभावानें सप्तशती काव्याचा एक स्वतंत्र संप्रदायच निर्माण झाल्यासारखा दिसतो. १२ व्या शतकांत गोवर्धनाचार्यांनी लिहिलेली प्रसिद्ध आर्यासप्तशती त्याच संप्रदायांतली आहे. त्यानंतर शृंगारसप्तशती नांवाचा काव्यसंग्रह आणखी एका कवीनें लिहिला. १९ व्या शतकांत (इ. स. १८६९ मध्ये) मकरन्दाचा पुत्र परमानन्द कवि यानेंहि 'शृङ्गारसप्तशती' लिहिली. लक्ष्मीधराचा पुत्र विश्वेश्वर यानें 'आर्यासप्तशती' लिहिली.[8] 'मित्रगोष्ठी' मासिकाचे संपादक प्राध्यापक विधुशेखर भट्टाचार्य यांनी 'दुर्गासप्तशती' हें काव्य लिहिलें आहे. सप्तशतीच्या पाठोपाठ दुर्वासकवीनें लिहिलेली 'आर्याद्विशती'[9] रामराज दीक्षित यांची 'आर्यात्रिशती' मल्लराजाचें 'आर्यात्रिशतीमुक्तकम्'[10] यांसारख्या काव्यांचा उल्लेख करतां येईल.

## निसर्गवर्णनें

निसर्गवर्णनासंबंधीं लिहिलेल्या शतकामध्यें नरहरि कवीचें चन्द्रकलदमोत्प्रेक्षा शतकम्,[11] कविकंकणाचें मृगाङ्कशतकम्, श्रीधर व्यंकटेशाचें तारावलीशतकम्, व नारायण शर्मा कवीचें शैलाब्धिशतकम् उल्लेखनीय आहेत. हा पुस्तेरी नम्बी नारायण शर्मा कवि (१९ वें शतक) मल्याळचा रहिवासी होता. त्यानें पट्टाभिषेकप्रबन्धः व आर्याशतकम् या नांवाचीं आणखी दोन पुस्तकें लिहिलीं आहेत. विज्ञानचिन्तामणि नांवाच्या नियतकालिकाचा तो संपादक होता. वाराणशीचे राजपंडित पं. ताराचंद्र (१९ वें शतक) यांनी 'काननशतकम्' नांवाचें निसर्गवर्णनात्मक काव्य लिहिलें आहे. 'शृङ्गाररत्नाकरः' नांवाचें त्यांचें आणखी एक शृंगारिक काव्य उपलब्ध आहे. म. म. मथुरानाथ तर्कभूषण यांनी कोकिलदूतम्[12] नामक एक सन्देशकाव्य लिहिलेलें आहे. नारायणपंडितकृत आश्लेषाशतकम्[13] काव्याचा अन्तर्भावहि निसर्गवर्णनपर शतकांतच करतां येईल.

दैवतविषयक महाकाव्यांना उल्लेख करण्याचे आरंभीच्या प्रकरणांतून आलेलाच आहे. पण स्तोत्रपरहि दैवतनिष्ठ कवींनी विविध प्रकारची जर शतकें आहेत. त्यामध्ये रामचन्द्रकृत देव्यार्याशतकम्[14]; श्रीनिवासपुत्र वरदादेशिक (१७ वें शतक) यांचें अम्बुजवल्लीशतकम् व पादशतकम्[15]; वल्लवार्दकृत वल्डी-

---

८. मुबईत मुद्रित। ९. पृ. १०५। १०. मुबईत मुद्रित।
११. पृ. ३१४, मुंबईत मुद्रित। १२. चौखम्बा-पुस्तकालय-मुद्रित।
१३. पृ. ३१४। १४. पृ. २४२।

कुचपञ्चशती व धरणीधरकृत **रसवतीशतकम्**", हीं देवीविषयक स्तोत्रें उल्लेखनीय आहेत." विधुशेखर भट्टाचार्यांच्या दुर्गाशतीचा उल्लेख वर आलाच आहे.

सदाक्षर नावाच्या १७ व्या शतकातील 'कविकुंजर' या नावाने प्रसिद्धीस आलेल्या कवीने **अम्बाशतकम्** लिहिले आहे. वयाच्या २२ व्या वर्षी हा कवि ( १६१४ ते १६३४ ) दिवंगत झाला. एवढ्या अल्पायुष्यात त्याने 'कविकर्णरसायनम्' नावाचे २४ सर्गांचे महाकाव्य व 'रत्नावली-भद्रस्तव' नावाचें आणखी एक काव्य लिहिलेले आहे. कर्नाटकचा राजा विरदेव हा त्याचा आश्रयदाता होता. **मीनाक्षीशतकम्** हे देवीविषयक शतक पारियीयूर कृष्णकवि." या १९ व्या शतकातील कवीने लिहिले आहे त्याव्यतिरिक्त 'मालिनी शतकम्', 'हनुमत्शतकम्', 'लक्ष्मीनृसिंहशतकम्' हीं तीन शतकें, 'कौमुदी सोमम्' हे नाटक, 'कलिविलासमणिदर्पण' हे काव्य, 'रघुनिष्यंदिनी' नावाची रामायणाच्या एका भागावरील टीका एवढी साहित्यनिर्मिति यान केली आहे.

हिन्दुविश्वविद्यालयाचे प्राध्यापक बटुकनाथ शर्मा ( जन्म १८९५ ) यांनी **कालिकाशतकम्** हे देवीविषयक शतक लिहिले असून त्याव्यतिरिक्त **आत्मनिवेदनशतकम्**, 'शतकसप्तकम्' व 'नल्वदूतम्'" हीं अवान्तर काव्य लिहिलीं आहेत रामानुजाचार्यांचा पुत्र सुदर्शनाचार्य ( २० वे शतक ) याने **कोमलाम्बाकुचशतकम्**' आणि 'हनुमद्विलासम्' व 'अनुप्रास' हीं आणखी दोन काव्यहि लिहिलेलीं आहेत. '**शारदाशतकम्**' हें काव्य श्रीनिवासशास्त्री (१९ वें शतक, तंजावर जिल्हा ) यान लिहिलें असून त्याव्यतिरिक्त **विंशतिशतकम्**, **योगिभोगिसंवादशतकम्**, **महाभैरवशतकम्** व **हेडिपाजशतकम्** हीं आणखी चार शतकें लिहिलीं असून **श्रीगुरुसौंदर्यसागरसहस्रनिकम्** हे एक मोठे काव्य लिहिले आहे." 'नृसिंहशतकम्' व 'नवरत्नशतकम्' ( दोन्ही मुद्रित ) याचे लेखक नेलोरनिवासी तिरुवेंकटतातादेशिक होते. 'स्तुतिमालिका' नावाचे आणखी एक यांचें काव्य उपलब्ध आहे. **पद्मनाभशतकम्** चा लेखक रामवर्मकुलशेखर हा कवि १९ व्या शतकात त्रावणकोर संस्थानाचा राजा होता. 'अजामिलोपाख्यानम्', 'कुचेलोपाख्यानम्', 'भक्तिमञ्जरी', 'उत्सववर्णनम्' हे अवान्तर ग्रंथहि या कुशल राजाने लिहिले असून ते सर्व मुद्रित झाले आहेत." त्रावणकोरच्या राजघराण्यातील दुसरा सुविद्य राजपुरुष म्हणजे केरळवर्मा. (१९-२० शतक ) याने **गुरुवायुरेशशतकम्**, **व्याघ्रालयेशशतकम्**, **द्रोणाद्रि-**

१५ कृ ३१४। १६ मुंबईत मुद्रित। १७ कृ ४९२।
१८ कृ २५४। १९ कृ २५४। २० कृ १७८।

**शतकम्** ' हीं तीन शतककाव्यें व त्याव्यतिरिक्त ' क्षमापनसहस्रम् ', ' विशाख राजमहाकाव्यम् ', व ' शृंगारमञ्जरी ' हीं आणखी तीन काव्यें लिहिलेलीं आहेत. केरळवर्मा राजाला ' केरळकालिदास ' ही उपाधि लाभली होती व त्या उपाधीला साजेसेच त्याचे काव्यसौंदर्य होतें. अम्बिकादत्त व्यासांच्या ' शिवराजविजय ' इत्यादि ग्रंथाचा परिचय मागें आलाच आहे. त्यांनी **गणेशशतकम्** हें शतक काव्य व ' प्रस्तारदीपिका ', ' रत्नाष्टकम् ', ' शिवविवाह. ', इत्यादि अनेक इतर पुस्तकेंहि लिहिलेलीं आहेत. केरळच्या चाकूलोल्मनारायण मेनन यांनी **कृष्णशतकम्** हें शतक काव्य व ' तापीनिसरण-महाकाव्यम् ', आणि ' देवीस्तवः ' हीं अवान्तर दोन काव्य लिहिलीं आहेत.[20]

**सूर्यशतकम्** व **मारुतिशतकम्** —काशीचे म. म. रामावतार शर्मा यांनी लिहिलेलीं हीं दोन शतकें 'शारदा' नामक संस्कृत मासिकांत प्रकाशित झालीं होतीं. त्याच ' मुद्गरदूतम् ' हें काव्य काशीच्या ' सुप्रभातम् ' या मासिकांत प्रकाशित झालें होतें. याव्यतिरिक्त ' यूरोपीयदर्शनम् ', ' परमार्थदर्शनम् ', ' भारतीयम् इतिवृत्तम् ' हीं त्याचीं पुस्तकें प्रकाशित झालीं आहेत. अशोकस्तम्भावरील पाली लेखाचे टिप्पणीसहित संस्करण त्यांनी ' प्रियदर्शिप्रशस्तय. ' नावाच्या पुस्तकांत प्रकाशित केलें आहे.

**' शूलपाणिशतकम् '**—हें शतकस्तोत्र कस्तुरी श्रीनिवासशास्त्री (जन्म इ. स. १८३३, गाव कृचिमञ्चीवरी अग्रहार, गोदावरी जिल्हा, आंध्रप्रदेश) यांनी लिहिलें आहे. इ. स. १९१७ मध्ये वयाच्या ८३ व्या वर्षी यांचा देहान्त झाला. राजमहेन्द्री च्या महाविद्यालयांत २५ वर्षेपर्यंत ते प्राध्यापक होते. प्रस्तुत शतकाव्यतिरिक्त ' सोमकदम्ब ' ' द्वादशमञ्जरी ', ' शिवानन्दलहरी ', ' शिवशतस्तुति. ', ' नृसिंह-स्तोत्रम् ' व ' समुद्राष्टकम् ' हीं त्याचीं अवान्तर काव्य आहेत.[21]

**' राधाप्रियशतकम् '**—कोल्हापूरचे पंडितप्रवर राधाकृष्ण तिवारी यांनी हें काव्य आपल्या विद्यार्थिदशेतच लिहिलें आहे. हे कवि वैष्णवसम्प्रदायी होते. ३५ वर्षांच्या वयापर्यंत त्यांनी भागवताचीं एक सहस्र पारायणें केलीं होतीं.[22] ' दशावतारस्तवनम् ', ' दशावतारचरितम् ', ' गजेन्द्रचरितम् ' (५ सर्ग) हीं पद्यकाव्यें व ' सावित्रीचरितम् ', ' नाम्मसनचरितम् ', ' श्रीरामचरितम् ' व ' श्रीकृष्ण-चरितम् ' हीं गद्यपुस्तकें त्यांनी लिहिलीं आहेत.

**पत्राक्षरशतकम्**—तञ्जावर जिल्ह्यातील एका गावचे निवासी म. म. वेदान्त-केसरी गणपतिशास्त्री ( १९-२० शतक ) यांनी हें मणिनिबद्ध शतक लिहिलें

---

२१. पृ. १८० । २२ पृ २८८ । २३ 'दिव्यज्योति.' विशेषांक १९५७,

आहे. कुम्भकोणंच्या अद्वैतसभा व शांकरमठ या संस्थेचे प्रमुखत्व या गणपतिशास्त्री कडेच होते. कथाकशतकाव्यातिरिक्त ध्रुवचरितम्, रसिकभूषणम्, गुरुराजसप्ततिः, तटाटकापरिणयम्, हीं अवान्तर काव्येहि यानी लिहिलेलीं आहेत.

**वीराञ्जनेयशतकम्**—ले. श्रीशैल दीक्षित हा कवि ( १९ वे शतक ) बंगलोर येथे 'कर्नाटक प्रकाशिका' या वृत्तपत्राचा सम्पादक होता. हनुमन्नक्षत्रमाला, व गोपालार्या हीं दोन काव्यें हि त्याने लिहिलीं आहेत. त्याव्यतिरिक्त शेक्सपीयरच्या 'कॉमेडी ऑफ एरर्स' या नाटकाचें 'भारतीविलासम्' नामक गद्य कथात्मक भाषांतर, 'कावेरीगद्यम्' या नांवाचा प्रवासवृत्तान्तपर निबंध हे ग्रंथ त्याने लिहिले आहेत. गायनकलेमध्ये सुद्धा हा कवि अत्यत निपुण होता.[२४] वर उल्लेखिलेल्या शतककाव्याच्या विविध प्रकाराव्यतिरिक्त विविध प्रकारचीं शतककाव्यें आढळतात. मुंबईचे व्यापारी श्री जयराम पाण्डे यांच्या **धर्मशतकम्** व **अर्थशतकम्** या काव्यांचा परिचय पूर्वी दिलेला आहे. कलकत्याचे विमलकुमार जैन[२५] यांनी **रक्षाबन्धनशतकम्** व **वर्णिशतकम्** हीं दोन शतके लिहिलीं असून 'वीरपञ्चाशत्का', 'गणेशपञ्चविंशतिका', 'मुनिद्वात्रिंशत्का', 'द्रव्यदीपिका', 'गान्धिवादाष्टकम्' इत्यादि अवान्तर काव्येंहि लिहिलीं आहेत. **विधवाशतकम्** व **कचशतकम्** हीं दोन शतकें तंजावर जिल्ह्यांतील वाल्लतुर गावचे निवासी वरदकृष्णम्माचार्य[२६] यांनी लिहिलीं आहेत. **ओष्ठशतकम् स्तनशतकम्**[२७] **रसवतीशतकम्** ( क्र. ३१४ ) **पलाण्डुशतकम्** ( क्र. २४५ ) व **पलाण्डुराजशतकम्**, **काकशतकम्** ( क्र. ७६१ ), यासारखीं आणखीहि विविध विषयावरील शतकें उपलब्ध असून तीं सर्व मुद्रित झालीं आहेत.

इतर सर्व भाषांप्रमाणे संस्कृतांतहि आधुनिक काळांत राष्ट्रवादी साहित्य बऱ्याच मोठया प्रमाणांत निर्माण झालें आहे. त्यामध्ये जी मातृभूस्तवनपर काव्यें आढळतात, त्यात श्री. ति. वि. कपालिशास्त्री यांचे **भारतीस्तवः** नामक शतककाव्य विशेष उल्लेखनीय आहे. १५ ऑगष्ट १९४७ या स्वातंत्र्यदिवशीं त्यांनी हे शतक आनंदाच्या ऊर्मीत लिहून काढलें. त्यामध्ये ७ विविध छंदांमध्ये श्लोकरचना केलेली आहे. कपालिशास्त्रींचा सविस्तर परिचय पुढील एका प्रकरणात दिलेला आहे.

याच संदर्भात आम्ही आपल्या स्वतःच्या शतककाव्यांचा परिचय दिलास तें अनुचित होणार नाही. 'विभूतिवन्दनास्तोत्रम्' हे १०८ श्लोकांचे राष्ट्रवादी शतककाव्य असून त्यामध्ये पहिल्या ७ श्लोकात भारतभूमि व हिमालय, गंगासिंधू इत्यादि पवित्र स्थानांना वंदन केलेलें आहे. त्यापुढील ८ श्लोकांत प्रयाग, रामेश्वर,

२४. क्र. ४८४। २५. दिव्यज्योति विशेषाकः पृ. ३०, क्र. २५३।
२६. क्र. ५०४। २७. क्र. ८३।

अयोध्या, मथुरा, इत्यादि पुण्यक्षेत्रांचें स्तवन केलें आहे. त्यानंतरच्या ५ श्लोकांत श्रुति, स्मृति, रामायण, भारत इत्यादि भारतीय धर्मग्रंथांचें माहात्म्य वर्णिलें आहे. व पुढे शेवटपर्यंत मनु, व्यास, वाल्मीकि, याज्ञवल्क्य, या प्राचीन व शिवाजी, टिळक, गांधी, रामकृष्ण, विवेकानंद, हेडगेवार इत्यादि अर्वाचीन थोर पुरुषांचें प्रत्येकी एका श्लोकांत गुणगान केलेलं आहे. इ. स. १९४९ मध्ये रायपूरच्या कारागृहांत आम्ही हें स्तोत्र लिहिलें होतें. 'मन्दोर्मिमाला' नामक (प्रस्तावनालेखक प. श्री. दा. सातवळेकर) काव्यसंग्रहाच्या आरंभींच मुद्रित झालें आहे. 'मातृलहरी' हें दुसरें राष्ट्रवादी शतककाव्य आम्ही शिखरिणी छंदांत लिहिलेलें आहे. याव्यतिरिक्त 'जवाहरतरङ्गिणी' (**भारतरत्नशतकम्**, इंग्रजी भाषांतरासहित, प्रस्तावनालेखक लोकनायक बापूजी अणे.) 'विनायकवैजयन्ती' (**स्वातन्त्र्यवीरशतकम्**-मराठी भाषान्तरासहित, प्रस्तावनालेखक म. म. डॉ. वा. वि. मिराशी. स्वातन्त्र्यवीर सावरकरांच्या 'अमृतोत्सव' प्रसंगीं मुंबईमध्ये या काव्याचें प्रकाशन झालं.) **कालिदासरहस्यम्**-हिन्दी भाषान्तरासहित; प्रस्तावनालेखक लोकनायक अणे; उज्जयिनी येथे राष्ट्रपति राजेन्द्रप्रसादांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या कालिदास महोत्सवासाठी ५ दिवसांत आम्ही हें शतक लिहिलें. व या महोत्सवप्रसंगीं झालेल्या प्रचंड कविसंमेलनांत त्याचें गायन करण्याचा योगहि आम्हास लाभला), 'रामकृष्णपरमहंसीयम्' (**युगदेवताशतकम्**, हें मदाक्रान्ता वृत्तांत लिहिलें आहे.) 'वात्सल्यरसायनम्' (**बाललीलाशतकम्** हें बालकृष्णभक्तिपर स्तोत्र वसंततिलका वृत्तांत लिहिलें आहे.) **शाकुन्तलशतश्लोकी** हें काव्य आम्ही विद्यार्थ्यांकरिता लिहिलें होतें. 'कालिदासरहस्यम्' या शतकांत सर्वत्र कालिदासानें शब्दप्रयोग व उपमा यांचा उपयोग करून कालिदासाचें गुणगान केलेलें आहे. उदाहरणार्थ—

काम पयोज्ञा. शतशोऽपि सन्तु कविप्रसूर्भारतभूस्त्वयैव ।
नक्षत्रताराग्रहसंकुलाऽपि ज्योतिष्मतीचन्द्रमसैव रात्रिः ॥४९॥

त्वद्गुम्फितश्लोकपरम्परासु सहस्रधात्मा खलु काव्यलक्ष्म्या ।
समस्तसाहित्यगुणैर्विभक्त पयोमुचां पङ्क्तिषु विद्युतेव ॥५१॥

विलोकयन्ती परमादरेण त्वत्काव्यगौरीं प्रतिभा मदीया
भूतार्थशोभा ह्रियमाणभावा प्रसाधने न क्षमते क्षमाऽपि ॥७३॥

त्वद्रूपेण कवीन्द्र ! नूनमभवत् चन्द्रः स कान्तिप्रदः
शृङ्गारैकरसः स्वयं नु मदनो मासो नु पुष्पाकरः ।
गीर्वाणीगुरुविप्रजापतिरसौ नो चेत् कथं जायतां
लोकेऽस्मिन् कवितोवंशीव मधुरा शृङ्गारसाराऽपरा ॥१०५॥

मुग्धा मालविकाग्निमित्रपुरतः सा नृत्यरङ्गस्थिता
बालेवेन्दुमती स्वयंवरसभास्थानप्रविष्टाऽथवा ।
भीतिव्याकुलितोर्वशी सुललिता श्रीविक्रमाद्वासिता
मोहं ते रसराजराज ! कविता चित्ते विधत्ते मम ॥१०६॥

क्रन्दन्तीव रतिः स्ववल्लभवरिष्वङ्गाय भावातुरा
म्लायन्तीव च यक्षिणी प्रियकरालोके चिरं वञ्चिता ।
मूर्च्छन्ती जनकात्मजा रघुपतित्यक्तेव वा कानने
कारुण्यैकरसा दुनोति कविता ते मानसं मामकम् ॥१०७॥

स्वातंत्र्यवीर शतकाच्या आरंभी भारताच्या स्वातंत्र्यासाठी प्राणार्पण करणाऱ्या तेजस्वी क्रान्तिकारकांचे वर्णन पुढील श्लोकात केलेले आहे—

येषां भ्रुवौ रौद्रपिनाकलेखाः नेत्राणि भालानलज-स्फुलिङ्गाः ।
तर्जन्य उत्क्षत्रकुठारधारा जयन्ति ते राष्ट्रविमुक्तिवीराः ॥९॥

वित्तं स्वराष्ट्र-प्रविलीनचित्तं शस्त्रं च येषां रिपुनाशशास्त्रम् ।
सेना स्वदेशोद्धृतिकामना सा जयन्ति ते राष्ट्रविमुक्तिवीराः॥१०॥

धैर्यं समस्ताचलनिश्चलत्व वीर्येऽखिलोग्र-ग्रह-तीव्रतेजः ।
कार्ये च येषां शिबि-कर्ण-चर्या जयन्ति ते राष्ट्रविमुक्तिधुर्याः ॥११॥

येषां गिरो लेखणभाषणोत्थाः भास्वद्रसावता इव विद्युदुग्राः ।
भुजङ्गसत्राग्निशिखा-प्रभा वा प्रज्वालयंल्लोकहृदिन्धनानि ॥१२॥

स्वशोणितैरेव महाभिषेकः स्वशीर्षपद्मैश्चरणोपहारः ।
नीराजना च प्रदहत्स्वदेहैः येषां स्वभूपूजनरीतिरेषा ॥१३॥

आधुनिक संस्कृत साहित्यांतील शतकाव्यांचा विस्तार व त्यांची विविधता यांची कल्पना येण्याच्या दृष्टीने प्रस्तुत प्रकरणांत दिली एवढी माहिती पुरेशी आहे, असें आम्हांस वाटतें.

---

## प्रकरण १४ वें

# स्तोत्रसाहित्य

मम्मटाचार्यांनी सांगितलेल्या ६ काव्यप्रयोजनांमध्ये 'शिवेतरक्षतिः'— म्हणजे अमंगलाचा नाश हें एक काव्यप्रयोजन आहे. या प्रयोजनाच्या समर्थनार्थ मयूर, जयदेव यासारख्या कवींनी केलेल्या स्तोत्रात्मक काव्याच्या कथाहि सांगण्यात येत असतात. अमंगलाच्या नाशासाठी, उपास्य दैवताच्या वाङ्मयपूजेसाठी किंवा चित्तशांतीसाठी लिहिलेलीं देवांचीं स्तोत्रें सर्वच भाषांमध्ये आढळतात. किंबहुना जगांत अशी एकहि भाषा नसेल की जीमध्ये स्तोत्रवाङ्मयच नाही. संस्कृत साहित्यांत अतिप्राचीन काळापासून स्तोत्रवाङ्मयाचा प्रवाह सतत वहात आहे. वेदांमध्ये इन्द्र, अग्नि, मरुत्, वरुण इत्यादि दैवतांच्या स्तोत्रांमधून या प्रकारच्या काव्याचा प्रथम आविष्कार झाला. स्तोत्रकाव्यामध्ये कवि भक्तिभावानें उपास्य दैवताच्या माहात्म्याचें वर्णन करीत, आपल्या हृदयांतील कोमल भावना व उदात्त स्वरूपाच्या प्रार्थना व्यक्त करीत असतात. त्यांत बहुधा प्राधान्यानें भक्तिमूलक करुणादि रसांचा परिपोष झालेला असतो. 'शृङ्गार एव मधुरः परः प्रह्लादनो रसः' या सिद्धान्तानुसार शृंगारास 'रसराज' मानून प्राधान्य देणाऱ्या संस्कृत कवींनी स्तोत्रवाङ्मयाचाहि प्रचंड प्रवाह निर्माण केला आहे. संस्कृतांतील संपूर्ण स्तोत्र-वाङ्मयाचा विमर्श करावयास एका स्वतंत्र ग्रंथाची आवश्यकता आहे. प्राचीन काळापासून 'पुष्पदन्त' (शिवमहिम्न स्तोत्रकर्ता), मयूरभट्ट (सूर्यशतककर्ता) बाणभट्ट (चण्डीशतककर्ता), जगद्गुरु शंकराचार्य, कुलशेखर (मुकुन्दमालास्तोत्रकर्ता), यामुनाचार्य (आलवन्दारस्तोत्रकर्ता), लीलाशुक (कृष्णकर्णामृतकर्ता) यासारख्या कवींच्या प्रतिभेनें संस्कृतांतील स्तोत्रवाङ्मय इतकें समृद्ध केलें आहे कीं त्यांच्या नांवाचा उल्लेख होतांच नानाप्रकारचे स्तोत्रात्मक श्लोक रसिकांना आठवूं लागतात. स्तोत्रवाङ्मयाचा तो सनातन प्रवाह अर्वाचीन काळांतहि अनिरुद्ध गतीनें वहात आहे. एवढेंच नव्हे, तर तो अधिक विशाल स्वरूप धारण करीत आहे. शतक काव्याच्या प्रकरणांत स्तोत्रात्मक अनेक शतकांचा उल्लेख केलेलाच आहे. प्रस्तुत प्रकरणांत अवांतर स्तोत्रांचा परिचय दिला आहे.

आधुनिक पण्डितकवींतील श्रेष्ठ कवि पण्डितराज जगन्नाथ, यांनी 'गङ्गालहरी स्तोत्र' अगदि स्वतःच्या उद्धाराच्या उत्कंठेनें आर्ततेनें मोठ्या भक्तीनें गायिलें

आले. 'गंगालहरी' सारखे दुसरें लोकप्रिय संस्कृत स्तोत्र अर्वाचीन कालखण्डांत झाल्याचें दिसत नाही. पंडितराजांचींच 'अमृतलहरी' (यमुनास्तोत्र), 'लक्ष्मीलहरी', 'करुणालहरी', 'सुधालहरी', इत्यादि अवान्तर लहरी काव्ये आहेत. पण त्यांना गंगालहरीसारखी मान्यता मिळालेली दिसत नाही. 'भामिनीविलासा'तील—

रे चेतः कथयामि ते हितमिदं वृन्दावने चारयन्
वृन्दं कोऽपि गवां नवाम्बुदनिभो बन्धुर्न कार्यस्त्वया ।
सौन्दर्यादमृतमुद्गिरद्भिरभितः सम्मोह्य मन्द-स्मितैः
एष त्वां तव वल्लभांश्च विषयानाशु क्षयं नेष्यति ॥

यासारखे श्लोक किंवा रसगंगाधरातील—

स्मृतापि तरुणातपं करुणया हरन्ती नृणाम्
अभङ्गुरतनुत्विषां वलयिता शतैर्विद्युताम् ।
कलिन्दगिरिनन्दिनी तटसुहृद्द्रुमालम्बिनी
मदीयमतिचुम्बिनी भवतु कापि कादम्बिनी ॥

यासारखे अनेक श्लोक, किंवा—

"अयि ! गर्तमुखे गतः शिशुः पथिकेनापि निवार्यते जवात् ।
जनकेन पतन् भवार्णवे न निवार्यो भवता कथं विभो ॥"

"विहाय संसार–महामरुस्थलीमलीकदेहादि–मिलन्मरीचिकाम् ।
मनोमृगो मे करुणामृताम्बुधे विगाढुमीश ! त्वयि गाढमीहते ॥"

"बधान द्रागेव द्रढिमरमणीयं परिकरं
कपाले बालेन्दुं नियमय पुनः पन्नगगणैः ।
न कुर्यास्त्वं हेलामितर–जन–साधारणतया
जगन्नाथस्यायं सुरधुनि! समुद्धारसमयः ॥"

यासारख्या विविध श्लोकांतून सामान्यतः शृङ्गारिक जीवनाविषयीं सर्वत्र प्रसिद्धि पावलेल्या पंडितराजांच्या अन्तःकरणांतील प्रगाढ भक्तिभावनेचा परिचय होतो.

## सहस्रकें

देवताविषयक शतककाव्यांप्रमाणें कांहीं प्रसिद्ध सहस्रक काव्यें आधुनिक कालखण्डांत निर्माण झालेलीं आहेत. त्यातील कांहीं सहस्रकांचाहि उल्लेख मागील प्रकरणांत आलाच आहे. त्या व्यतिरिक्त कांहीं अविस्मरणीय सहस्रक काव्यें पाहा:—

'**लक्ष्मीसहस्रम्**'— 'विश्वगुणादर्शचम्पू'चा विख्यात लेखक वेंकटाध्वरि याने एका रात्रीतून हे सहस्रक काव्य लिहिले. त्यात सर्व प्रकारचे अलंकार व उत्कट भक्तिरस यांचा आविष्कार,

' परमादियु मातरादिम यदिम कोशक्रुताहमध्यमम् ।
अमरः क्लिपामरसतत स बभुव स्वयमेव मध्यम ॥

यासारख्या पाण्डित्यपूर्ण श्लोकातून व्यक्त झालेले आहे.'

'**शिवदयासहस्रम्**'—(ले. नृसिंह) व '**शिवपादकमलरेणुसहस्रम्**' (ले सुन्दरेश्वर)' ही दोन शिवभक्तिपर सहस्रके विशेष उल्लेखनीय आहेत

१९ व्या शतकातील विख्यात संस्कृतलेखिका, प्रतिवादिभयंकर वेंकटाचार्यांची धर्मपत्नी त्रिवेणी हिच्या जीवनाचा व 'शुकसन्देशम्' 'भृङ्गसन्देशम्' 'रङ्गाभ्युदयम्' 'सम्पत्कुमारविजयम्' 'रङ्गराजसमुदयनाटकम्' 'तत्त्वमुद्राभद्रोदय नाटकम्' इत्यादि ग्रंथांचा परिचय पुढील एका प्रकरणात सविस्तरपणे दिलेलाच आहे. या कवयित्रीने **लक्ष्मीसहस्रम्** व **रङ्गनाथसहस्रम्** ही दोन सहस्रश्लोकात्मक स्तोत्रे लिहिलेली आहेत. आधुनिक काळातील विशेष उल्लेखनीय सहस्रक म्हणजे वासिष्ठगणपतिमुनींचे **उमासहस्रम्** हे स्तोत्र होय. या स्तोत्रामध्ये गणपतिमुनींचे संपूर्ण आध्यात्मिक पांडित्य व्यक्त झाले आहे. त्यांचे पट्टशिष्य ब्रह्मश्री कपाली शास्त्री यांनी त्यावर अत्यंत मार्मिक भाष्य लिहिलेले आहे.

## शिवस्तोत्रे

शिवस्तोत्रांमध्ये अप्पय्य दीक्षित यांचे **शिवमहिमकलिकास्तव** व **शिव कामिस्तवरत्नम्** ही दोन स्तोत्रे, कस्तूरी श्रीनिवासशास्त्री यांची **शिवानन्दलहरी** व **शिवपादस्तुति** ही दोन स्तोत्रे विशेष उल्लेखनीय आहेत. अप्पय्य दीक्षिताने 'आत्मार्पणस्तुति' 'पञ्चरत्नस्तव' 'भक्तामरस्तोत्रम्' 'शान्तिस्तव' 'वरदराजाष्टकम्' 'आदित्यस्तोत्ररत्नम्' इत्यादि विविध स्तोत्रेंहि लिहिलेली असून ती सर्व मुद्रित झालेली आहेत. संस्कृत विश्वपरिषदेचे कार्यवाह श्री जयतकृष्ण हरिकृष्ण दवे यांनी सोमनाथ मंदिराच्या प्रतिष्ठापन महोत्सवप्रसंगी **श्रीसोमस्तवराज** या नावाचे एक ४० श्लोकांचे शिवस्तोत्र लिहिले असून ते इंग्रजी अनुवादासहित भारतीय विद्याभवना तर्फे मुद्रित झाले आहे.

**भैरवस्तव** —पंजाबचे साहित्याचार्य सत्यव्रतशर्मा यांनी हे स्तोत्र व **मातृस्तोत्रम्** आणि 'भ्रमभञ्जननाटकम्' ही दोन अवान्तर पुस्तकेंहि लिहिलेली आहेत.'

१. मुद्रित । २. बृ. ३०५ । ३. 'दिव्यज्योतिः' विशेषांक

" कर्पूरधूलिधवलद्युतिधाम धाम भ्राजिष्णु सम्रलमूलप्रकटमयूखैः।
सकल्पकल्पनकुलावलिकल्पशाल स्वत्पादपद्कजमिद विजयाय मञ्जु ॥ "

यासारख्या भैरवस्तवातील श्लोकावरून सत्यव्रतशास्त्रींच्या काव्यशैलीची कल्पना येते.

**हरहरीयम्**—नागपुरचे विख्यात सस्कृत पडित म. म. कृष्णशास्त्री घुले यानी प्रस्तुत श्लेषगर्भ व पाडित्यपूर्ण स्तोत्र लिहिले असून त्याची पाण्डित्यपूर्ण टीकाहि त्यानी स्वत च लिहिली आहे. १९५३ मध्ये हे सपूर्ण स्तोत्र सस्कृतभवितव्यम् या नागपूरच्या साप्ताहिकात ( टीका विरहित ) क्रमशः प्रकाशित झाले. पुढील दोन श्लोकावरील टीकेवरून म. म. कृष्णशास्त्री घुले याच्या पाडित्याची काहीशी कल्पना येऊ शकेल.

" मन्थान लिङ्गमर्गणि स्त्रुचतुपुनररणि वेदिकां वायर्योनि
तुण्डैर्मेषाजवाजिप्रनडुहधि गतैः पञ्चभि. पञ्चतुण्डम् ।
चित्य भस्माऽवलिप्त हतपशुयजनस्थानरूपे श्मशाने ''
वास्तव्य ते कपालान् घटशकलकृतांस्त्वाञ्च जानेऽग्निमेव ।।

' मन्थानमिति '–मन्थान लिङ्ग जाने तथ च अरणि–अधरारणि वेदिका वेदी वा योनि जाने । जानेति सर्वत्रान्वयः । मेषश्च अजश्च वाजी च ना च अनड्वांश्च मेषाजाश्व पुरुषवृषभा. तेभ्य· अधिगतैः प्राप्तै· श्येनचिति त्यागे, भूमौ निपातै. पञ्चभिस्तुण्डैः त्वा पञ्चतुण्ड जाने। चित्य चितौ भव चित्य तन्नामके स्थडिले स्थित आवहनीय-रूपत्वात् भस्मावलिप्त, हताः पशव यत्र तादृश यत् यजनस्थान तत् रूप यस्य तस्मिन् श्मशाने वास्तव्य वसन्त जाने " श्मशान वा यन्मृताना पशूना शीर्णाण्युपधीयन्ते " इति तैत्तिरीय सहिता । ( ५ २८ ) वास्तव्यः त वसेस्तव्यत्कर्तरिणिच्च" इति कर्तरित व्यप्रत्यय. । ते कपालान् तव कपालांश्च घटशकल्कृतान् पुरोडाशश्रपणार्थे विहितान् जाने । एव त्वा च अग्निमेव जाने । तथा च श्रुति । "एष रुद्रो यदग्नि" तै.स. २-६-६ ।" यस्मात्भुवनानि चक्र तस्मै रुद्राय नमोऽस्त्वग्नये इति चक्रू अथर्ववेदे ७ ८७ १ पुराण च "रुद्रमग्नीं द्विजा. प्राहुरिति" वनपर्व अ २२४ श्लोक २६॥ ३९॥

" उमा वाप्यूमा वा जगति तव पत्नीति कथिता—
म्बिका वा या वेदे भवति हर सान्या न शरदः ।
शरच्चासौ दुर्गा चरतु नवभिः सा स्वतुरगै
मवस्या नो तैवामिति शरदि तामर्चति जन· ।।४२।।

हे हर ! उमा वा ऊमा वा अम्बिका च या तव पत्नी इति जगति कथिता सा वेदे शरदः अन्या न इति कथितम् अस्ति । तथा च श्रुति. " एष ते रुद्रभाग सह स्वस्राम्बिकया इत्याह शरद्वा अस्याम्बिका स्वसा तया वा एष हिनस्तीति " तैत्तिरीय ब्राह्मण (१-८-६) । सा दुर्गा शरद्रूपा शरन्निशारूपा इत्यर्थः. नवभिः स्वतुरगै. चरतु

न तु तनोधिकैः नवनवतिभिः । तावतिः रातिः न स्यान्नोतु इत्यर्थः । अतः इति हेतोः शरदि तां दुर्गां ज्नः अर्चति । तथा च श्रुति । ये ते रात्रियुक्तासो नवतिर्नव अशीतिः सन्त्वष्टा उनो ते सप्तसप्ततिः इत्यादि ऋग्वेदपरिशिष्टम् ॥४२॥

## अवतारस्तोत्रें

*भगवान् विष्णूच्या विविध अवतारांसंबंधी लिहिलेल्या स्तोत्रांमध्ये केळ्ळम* कोण्ड रामराय ( यांचे सविस्तर चरित्र पुढील एका प्रकरणात दिलेले आहे. ) यांचे **'दशावतारस्तोत्रम्'**, कालोरच्या वेङ्कटरमण कवीची **'दशावतारगीता'**, वादिराजाची **'दशावतारस्तुतिः'**, विजयराघवाचार्यकृत **'दशावतारस्तव'**, सोमपुरच्या राधाकृष्ण विरचित **'दशावतारस्तवनम्'** (या कवीने दशावतार*चरितम्' या नावाचे आणखी एक पुस्तक लिहिले आहे.), यासारखी कांही स्तोत्रें* उल्लेख करण्यासारखीं आहेत

**'श्रीविष्णुचतुर्विंशत्यवतारस्तोत्रम्'**— नागौर ( राजस्थान ) येथील संस्कृत पंडित स्वामी लक्ष्मणशास्त्री यांनी चित्रकाव्याच्या पद्धतीने प्रस्तुत स्तोत्र लिहिले असून त्यामध्ये श्रीमद्भागवतात वर्णिलेले भगवान् विष्णूचे वराह, यज्ञ, कपिल, दत्त, कुमार, नारायण, ध्रुव ( वरद ), पृथु ( वैन्य ), ऋषभ (नाभ्यात्मज), हयग्रीव, मत्स्य, कूर्म, नृसिंह, हरि, वामन, मनु, हंस, धन्वन्तरी, परशुराम, श्रीराम, कृष्ण, व्यास, बुद्ध व कल्की हे २४ अवतार वर्णिलेले आहेत. स्वतः कवीने याचे हिन्दी भाषान्तरहि केलेले आहे श्री. लक्ष्मणशास्त्री यांनी 'श्रीविष्णुचरितामृतम्' 'श्रीहरिद्वादशाक्षरीस्तोत्रम्', 'श्रीरामपादयुगलीस्तवः', 'श्रीहरिस्तोत्रम्', 'श्रीरामविवाहः' इत्यादि अवान्तर स्तोत्रादि लिहिलेलीं असून तीं सर्व मुद्रित आहेत.

## श्रीरामस्तोत्रें

श्रीरामस्तोत्रांमध्ये नागपूरचे म. म. वेदान्त गोपाळ ताम्हण यांनी लिहिलेलीं *'श्रीरामस्तवः', 'श्रीरामाष्टकम्', 'श्रीरामपञ्चकम्' व 'श्रीरामस्तुतिः' हीं स्तोत्रें;* केळ्ळकोण्ड रामरायाची 'वीरराघवस्तुति', 'रमारम्भरघसनम्' हीं दोन रामस्तोत्रें, ( केळ्ळकोण्ड रामरायाचीं अशाप्रकार स्तोत्रें पुढील प्रमाणे आहेत. 'विनोदि विष्णु-सहस्रनामावली (सव्याख्या)', 'हकारादि हयग्रीव-सहस्रनामावली' (सव्याख्या) 'परमात्म-सहस्रनामावली', 'हयग्रीवाष्टोत्तरम्', 'हयवदनस्तव, हयग्रीव-

३. पृ २१७. ४. मागील एका प्रकरणात या ग्रंथाचा उल्लेख केला आहे ५. निर्णयसागर प्रेस, मुंबई येथे मुद्रित

नवरत्नमाला, व हयग्रीवपञ्चविंशतिः.) वेंकटरमण कवीची 'रामगीता' व 'कृष्णगीता' (हीं दोन्ही स्तोत्रें 'नवगीतकुसुमाञ्जलीत' प्रकाशित झालीं आहेत). बंगलोरच्या श्रीशैल दीक्षिताची 'वीराञ्जनेयशतकम्',' हनुमन्नक्षत्रमाला' व गोपालार्या हीं स्तोत्रे उल्लेखनीय आहेत.

महाराष्ट्रांतले विख्यात आधुनिक ऋषि श्री वासुदेवानंद सरस्वती महाराज (यांच्याबद्दल सविस्तर माहिती पुढील एका प्रकरणात आहे) यांनी अनेक देवतांचीं स्तोत्रें लिहिलीं असून तीं सर्व एकत्र मुद्रित झालीं आहेत[6]. त्या व्यतिरिक्त त्यांचीं 'सप्तशती-गुरुचरित्रम्', 'दत्तलीलामृताब्धिसारः' 'माघमाहात्म्यम्', 'श्रीगुरुचरित्र-त्रिशतीकाव्यम्' 'श्रीगुरुचरित्रसाहस्री', 'श्रीगुरुसंहिता', 'वेदनिवेदनस्तोत्रम्', हीं धार्मिक संस्कृत पुस्तके, वासुदेवानंदस्वामी महाराज ग्रंथ प्रकाशनाचे अध्यक्ष वामन दत्तात्रेय गुळवणी महाराज यानी प्रकाशित केलीं आहेत. '**नटराज सहस्रम्**' नांवाच्या अतिप्राचीन नामस्तोत्राचें भाष्य शास्त्राचार्य आनन्दताण्डव दीक्षित व सोमदेवशर दीक्षित या दोन विद्वानांनी लिहिलें आहे[7].

## विभूतिस्तोत्रें

उपास्य देवतांप्रमाणेंच श्रद्धेय विभूतींवर लिहिलेलीं असंख्य स्तोत्रकाव्यें फार मोठ्या प्रमाणांत उपलब्ध आहेत. वास्तविक अशल्या सर्व फुटकळ काव्यांचा एकत्रित संग्रह एखाद्या स्वतंत्र ग्रंथामध्ये करावयाची अत्यंत आवश्यकता आहे. कित्येक थोर पुरुषासंबंधीचीं स्तोत्रे त्यांच्या चरित्रपर ग्रंथांत आढळतात. 'कवीन्द्रचन्द्रोदयः' नावाच्या ग्रंथांत (या ग्रन्थाचा स्वतंत्र परिचय इतरत्र आलेला आहे.) ज्याप्रमाणे कवीन्द्राचार्यांच्या स्तुतीचे अनेकांनी लिहिलेले सर्व श्लोक संग्रहीत केलेले आहेत, त्याचप्रमाणे आधुनिक काळांत झालेल्या लोकोत्तर पुरुषांसंबंधींचे स्तुतिपर व सुभाषित-गर्भ श्लोक स्वतंत्र पुस्तकांत संकलित करण्याचा उद्योग कोणीतरी करण्यासारखा आहे.

**'कालिदासप्रतिभा'**—मद्रासच्या संस्कृत अकादमीने दि. २५-१०-१९५५ या दिवशीं कालिदास दिनोत्सवानिमित्त प्रस्तुत काव्यसंग्रह प्रकाशित केला. त्यामध्ये कालिदासाच्या प्रतिभेला उद्देशून निरनिराळ्या २८ कवींनी लिहिलेलीं स्तोत्रकाव्यें गाण्यांत आलीं. तीं सर्व अष्टकें किंवा दशकें 'कालिदासप्रतिभा' नांवाच्या पुस्तकांत संग्रहीत केलेलीं आहेत[7], कवीन्द्रचन्द्रोदयाप्रमाणे या काव्यसंग्रहांतहि अनेक कवींच्या प्रतिभासामर्थ्याचा परिचय होतो. या संग्रहांत पुढील कवींचीं काव्यें प्रकाशित झालेलीं आहेत.

६. समर्थ भारत मुद्रणालय, पुणें २. ७. प्रभा प्रेस, लेक व्ह्यू रोड, मद्रास १७ येथे मुद्रित.

कवि — काव्य

१. आर. अप्पलाचार (कुम्भकोणम्)–'नवरत्नमालिका'
२ के. बालसुब्रह्मण्य शास्त्री (मद्रास)–'कालिदासदशकम्'
३. वैद्यरत्न प. एम्. डोरैस्वामी अय्यंगार –'कालिदासप्रतिभा-प्रशंसा'
४. डॉ. जी. सी झाला (दिल्ली)–'कालिदासाष्टकम्'
५. म. म. काशी कृष्णमाचार्य (गुंटूर)–'कालिदासोन्नति'
६. म. म. के. कृष्णमूर्तिशास्त्री (मद्रास) 'कालिदासमाहात्म्यम्'
७. के. एस्. नागराजन् (बंगलोर)–'कालिदासीयकाव्येषु प्रकृतिवर्णनम्'
८. आर. नारायणस्वामी (मन्नरगुडी)–'कालिदासदशकम्'
९. व्ही. ए. रामस्वामी शास्त्री (पुणे)–'शृङ्गाराद्वैतवादी कालिदासः।'
१०. डॉ. वे. राघवन् (कविकोकिल), (मद्रास)–'किं प्रियं कालिदासस्य?'
११. सरस्कवि पी. राघवाचार्य (मदुरा)–'कालिदासपञ्चकम्'
१२. पी. रामदास (आनन्दताण्डवपुर)–'कालिदासपञ्चकम्'
१३. के रामभूर्तिशास्त्री (मद्रास)–१६ श्लोक
१४. शास्त्ररत्नाकर पी. एम्. रामशास्त्री (मद्रास)–१६ श्लोक
१५. महोपाध्याय के. एल्. व्ही शास्त्री (मद्रास)–१५ श्लोक
१६. व्ही. एस्. सुब्रह्मण्यशास्त्री (मद्रास)–'कालिदासदशकम्'
१७. जी. एल्. शानभाग (बडोदा)— "
१८. एस्. सुब्रह्मण्यशास्त्री (मद्रास)–९ श्लोक
१९. साहितीवल्लभ टी. सुन्दरार्य (सिरकाझी)–१० श्लोक
२०. टी. डी. ताताचार्य (तिरुपति)–'कालिदासस्य धर्मतत्परता'
२१. टी. एस्. जी. वरदाचार्य (मयलीपट्टम्)–१२ श्लोक
२२. ए. वेंकटाचार्य (चिदम्बरम्)–अष्टक
२३. व्ही. एस्. वेंकटराघवाचार्य (मद्रास)–'सौंदर्यदेवः कालिदासः'
२४. डॉ. जी. व्ही. सीतापति (मद्रास)
२५. बी. के. श्रीनिवासाचार्युलु (मद्रास)–पञ्चक
२६. टी. चन्द्रशेखर (मद्रास)–१० श्लोक
२७. विद्याधरशास्त्री (बिकानेर)–५ श्लोक
२८. एस्. पी. सारल्य (मद्रास)–३ श्लोक

**'कालिदासरहस्यम्'**—या आम्ही लिहिलेल्या (मुद्रित) शतक काव्याचा निर्देश मागील प्रकरणात आलाच आहे.

श्रीदयानन्द सरस्वतीसंबंधी अनेक विद्वानांनी संस्कृतांत स्तोत्रें रचलेलीं आहेत. प. अखिलानन्द शर्मा यांच्या 'दयानन्ददिग्विजयः' या २१ सर्गांच्या

महाकाव्यातील पहिल्या सर्गाच्या आरंभीचे ३५ श्लोक म्हणजे दयानन्दसरस्वतींचे स्तोत्रच आहे. कविरत्न मेधाव्रत यांनी लिहिलेल्या 'दयानन्ददिग्विजयः' या २७ सर्गांच्या महाकाव्यातील संपूर्ण पहिला सर्ग म्हणजे दयानन्दांचे स्तोत्रच आहे., श्री. म. म. केशव गोपाळ ताम्हन 'यांनी श्रीमच्छंकराचार्यस्तोत्रम्', 'श्रीसद्गुरु वासुदेवानन्द-सरस्वतीस्तोत्रम्' 'लोकमान्य-बाळ-गंगाधर-टिळकस्तव.' हीं विभूति-विषयक स्तोत्रे लिहिलीं असून तीं श्री. ल. रा. कुळकर्णी यांनी प्रकाशित केलेल्या 'कवितासंग्रहः' नावाच्या पुस्तकात प्रकाशित झालेली आहेत त्यापैकी श्रीमच्छंकराचार्य स्तोत्रातील तीन श्लोक म. म. ताम्हन यांच्या शैलीचा परिचय देण्यासाठी पुढे उद्धृत केले आहेत.

**धरा भारती दुर्मतध्वान्तकीर्णा यदारभ्य काश्मीरमासेतुबन्धम् ।**
**तदा येऽर्कवद् द्राविडेष्वाविरासन् नमस्याम तान् शंकराचार्यपादान् ॥१॥**
**अधर्मं विलोक्यैधमानं समन्तात् परिक्षीयमाणं तथा श्रौतधर्मम् ।**
**क्षितिं तस्य ये रक्षणायावतेरुः नमस्याम' ' ' ' ॥ २ ॥**
**अशेषं जगत् सत्यलोकादि मिथ्या सदानन्दचिद्रूप आत्मैव वस्तु ।**
**रहस्यं श्रुतीनामवोचन् य इत्थं नमस्याम ' ' ' ॥ ३ ॥**

श्रीगोपाल नावाच्या एका कवीने **श्रीमन्नरसिंहसरस्वतीमानसपूजा-स्तोत्रम्** लिहिलेले आहे. श्री महालिंगशास्त्री यांनी काञ्चीकामकोटी पीठाचे आचार्य श्री. चन्द्रशेखर-सरस्वती यांच्या स्तुत्यर्थ **देशिकेन्द्रस्तवाञ्जलिः** (२९ श्लोक) **विजयवादित्रम्** (१८ श्लोक), **धर्मचक्रानुशासनम्** (२४ श्लोक), **आचार्य पञ्चरत्नम्** व **गुरुराजाष्टकम्** हीं पाच स्तोत्रे लिहिलीं असून तीं सर्व 'देशिकेन्द्र स्तवाञ्जलिः' नावाच्या पुस्तकात संकलित झाली आहेत. महात्मा गांधीसंबंधी श्री. गणेशराम शर्मा कृत 'मोहनाभिनन्दनम्' व कमलकुमार जैन कृत 'गांधीवादाष्टकम्' यासारखी स्तोत्रे क्वचित् आढळतात.

बंगलोरच्या संस्कृत महाविद्यालयाचे प्रधान आचार्य सी. वेंकटरमण यांनी 'नवनीतकुसुमाञ्जलि.', नावाचा काव्यग्रंथ लिहिला आहे त्यामध्ये 'रामगीता' 'कृष्णगीता', 'दशावतारगीता', गणेशगीता', 'सद्गुरुगीता', 'शिवगीता', 'वाणीगीता', 'लक्ष्मीगीता', 'गौरीगीता', या ९ गीता १०८ श्लोकांमध्ये गुम्फलेल्या आहेत. याच कवीच्या 'कमलाविजयम्' (टेनिसनच्या 'कप' नाटकाचे भाषांतर) या नाटकाचा उल्लेख एका प्रकरणात आलाच आहे.

वाराणसीचे गंगाधरशास्त्री यांनी (१९ वे शतक) 'हंसाष्टकम्' नावाचे एक तत्त्वज्ञानपर स्तोत्र लिहिले असून 'अलिविलाससंलापम्' नावाचे आणखी एक काव्य' लिहिलेले आहे संस्कृत नियतकालिकांतून आजपर्यंत दोनशे सत्पुरुषांसंबंधी

८ ज्ञानसंवर्धं प्रेस, धर्मपूर यथे मुद्रित । ९ इ. ३५१ ।

स्तोत्ररूपें प्रकाशित झालेली आहेत. त्या सर्वांचे संकलन करण्याचा उद्योग कोणीतरी करावयास हवा. 'संस्कृतभवितव्यम्' च्या पहिल्या चार वर्षांत प्रकाशित झालेल्या महत्त्वाच्या स्तोत्रांचा उल्लेख पुढे देत आहोत—

१. परमहंस-शंकराचार्य-स्मरणार्चनम्-ले. कुर्तकोटी शंकराचार्य (वर्ष १)
२. कालिदासार्तिक्यम्—ले शिवदास कृष्ण गार्लिगे ( वर्ष १ )
३. विद्वद्रत्न-केशव-लक्ष्मण-दप्तरी महाशयस्य स्तुति.–
शिवदास कृष्ण गार्लिगे ( वर्ष १ )
४. प जवाहरलाल-स्तुतिदशकम्-ले. ग. रा. सावंडे ( वर्ष १ )
५. शिवराजस्तोत्रम्[10]-श्री. भा वर्णेकर ( वर्ष १ )
६. केशव-बळीराम-हेडगेवार-महोदयाना स्तवनम्
ले सखाराम धुंडीराज माहूरकर ( वर्ष २ )
७. श्री लोकमान्यस्तवनम्—ना. म. विंचुळे, ग रा. सावंडे, वि कृ पेशवे. ( लोकमान्य टिळकांसबंधी आजवर अनेक संस्कृत स्तुतिकाव्य ठिकठिकाणीं प्रकाशित झालेली आहेत.)
८. भारतस्य अर्थमन्त्रिण चिन्तामणि देशमुख महाशयस्य स्तुतिपद्यम्-श्री भा वर्णेकर ( वर्ष २ )
९. विनोबा भावे-महाभागाना स्वागतपुष्पाञ्जलि.—काशिकै वैदिकपण्डितैः कृता ( वर्ष २ )
१०. श्री राजेन्द्रप्रसाद-महोदयाना सुस्वागताभिनन्दनम्—काशीविद्वत्परिषदेने केलेले ( वर्ष २ )
११. श्रीशंकराचार्य.—धर्मदेव विद्यावाचस्पति ( दिल्ली )
१२. कवीन्द्राय रवीन्द्राय समर्पिता काव्यदक्षिणा—डा कि. द्वा. देशमुख ( वर्ष ४ )
१३. कालिदासप्रशस्ति —महालिंगशास्त्री ( वर्ष ४ )
१४. कालिदासस्तोत्रहार —श्री लक्ष्मीनारायण शानभाग ( वर्ष ४ )
१५. कवीन्द्रो रवीन्द्रः—धर्मदेव विद्यावाचस्पति ( वर्ष ४ )
१६. श्रीगुरुश्रद्धाञ्जलि ( शृंगेरीपीठाचार्य श्री चन्द्रशेखर भारती यांच्या संबंधी ) हे —रामकृष्णभट्ट ( वर्ष ४ )

रविवर्मस्तुति.-मलबारच्या वासुदेव नामक कवीने प्रस्तुत राजाचा मृत्युञ्जय स्वामींची स्तुति केली आहे याच कवीने दमयन्तीपरिणयम्[11] नावाचे आणखी एक काव्य लिहिले आहे.

---

१०. 'मन्दोर्मिमाला' या स्वतन्त्र काव्यसंग्रहात मुद्रित. । ११. ई. ५०१ ।

शतककाव्याच्या प्रकरणामध्ये आम्ही आपल्या स्वतःच्या विभूति स्तोत्रात्मक शतकाचा परिचय दिला आहे. याव्यतिरिक्त वेदमूर्ति पं. श्री दा. सातवळेकर, गुरुवर्य म. म. वा वि. मिराशी, जगन्नाथ पीठाधीश्वर भारतीकृष्णतीर्थ, सरसंघचालक श्री मा. स. गोळवलकरगुरुजी, पंडितराज राजेश्वरशास्त्री द्रविड, यासारख्या आम्हास आदरणीय वाटणाऱ्या काही थोर पुरुषासंबंधी आम्ही लिहिलेली स्तुतिकाव्ये निरनिराळ्या संस्कृत व मराठी वृत्तपत्रातून उचित समयी प्रकाशित झालेली आहेत. श्रीमद्भगवद्गीतेच्या स्तुत्यर्थ आम्ही लिहिलेले '**वाङ्मयी कृष्णमूर्ति**' हे स्तोत्र शेवटी उद्धृत करून हे प्रकरण संपवितो.

मुनिजन-शुचिचेत:कुञ्ज-सञ्चारिणी सा
जनगण-चलचेतोवृत्ति-गोपी-मनोज्ञा ।
प्रतिपद-मधुरार्थ-स्फीतवेणुप्रणादा
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ १ ॥

त्रिगुणघटित-रूपाकृष्ट-सर्वान्तरायाः
नयनरुचिर-माया-पूतनायाः समग्रम् ।
विषमय-विषयाख्य-स्तन्यमुच्छोषयन्ती
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ २ ॥

जननमरण-चक्रद्वन्द्व-सञ्चालिताङ्गं
शकटकपटरूपं सारयन्ती प्रपञ्चम् ।
मुनिगणहृदयस्थेनैव लीलापदेन
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ ३ ॥

भृशमतिदृढदीर्घैर्दामभिर्भाष्यरूपैः
यदपि समुपबद्धाऽऽचार्य-धी-नन्दपत्न्या ।
पुनरपि च नवार्थाध्वानमभ्युत्सरन्ती
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ ४ ॥

भ्रमसरिदवगाढ-ज्ञप्ति-गोपी-विकार-
वसनमपहरन्ती सत्त्ववृक्षाधिरूढा ।
रजसि तमसि मग्नानुद्धरन्त्यार्तगोपान्
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ ५ ॥

अविचलमतिगूढाध्यात्म-गोवर्धनाद्रिं
स्ववचसि तमनन्याधारमभ्युद्धरन्ती ।
भवभयपरिवर्षोत्पीडितान् पालयन्ती
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ ६ ॥

उपनिषद्दुदकुम्भैर्व्यागृहीतं श्रुतीनां
परमऋषिगणेनाध्यात्मिक-ज्ञानदुग्धम् ।
सकलमपहरन्ती गूढगत्या प्रविश्य
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ ७ ॥

श्रुतिनिगदित-शुद्धब्रह्म-तेज:प्रकाशा
स्मृतिविहितमयन्ती कर्ममार्गं पवित्रम् ।
उपनिषदमृतं सुरलोककुम्भैर्दधाना
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ ८ ॥

अतिचिरमुपगूढा भाष्यकाराख्यगोपैः
सुदृढतम-विवेकोद्दाढ्मिर्गाढभक्त्या ।
हृदयगतमिवाविष्कुर्वती सत्सदुक्तैः
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ ९ ॥

हृदयसरिदवस्थं कालियं कामरूपं
प्रमद-कुवलयेभं लोभ-चाणूरदंष्ट्रम् ।
प्रबलतममजय्यं निघ्नती क्रोधकंसं
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥ १० ॥

प्रियसखमिव योगारूढमाऽऽश्वासयन्ती
गुरुमिव गुरुबोध ज्ञानिनं मानयन्ती ।
सुतमिव सुहितं सद्भक्तमुल्लालयन्ती
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥११॥

प्रणतजन-कुचेलं ज्ञानसम्पद्विहीनं
प्रियसुहृदमिव द्राग् लीलया मोचयन्ती ।
अहित-हितविवेकाभाव-दारिद्र्यदोषात्
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥१२॥

दुरित-सदसि कृष्टां मोह-दुःशासनेन
शमधिगत-रजस्कां शेमुषीं याज्ञसेनीम् ।
विमल-वचन-वस्त्रैर्गोपयन्ती स्मृताऽपि
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥१३॥

कलमधिकलयन्ती ज्ञानदां स्ववक्त्रे
भुवनहितकरं सत्कर्मचक्रं च हस्ते ।
हृदि नवविधभक्तिस्फीतरत्नैकहारं
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥१४॥

मतिकृतिकरणाद्यान् भोगमार्गप्रवृत्तान्
सुविहित–निजकर्म–प्रेरणाद्याश्य–तीव्रैः ।
रथिनमिव हि पातुं देहिनं प्रेरयन्ती
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥१५॥

जनिमृतिमय–धर्मक्षेत्रमध्ये विषण्णं
विजयमुपदिशन्ती धर्मसम्मूढचित्तम् ।
द्विगुणितनय–संख्याध्याय–सारस्यन्दनस्था
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥१६॥

प्रबलषडरि–भीष्मः सर्वथा दुर्निवारः
विशसितुमभिधावतः स्वप्रियं भक्त–पार्थम् ।
तमवतुमभिसर्पन्तीव सत्तत्व–चक्रा
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥१७॥

बहुविध–जनभाषानूक्त–तार्क्ष्योपविष्टा
भुवनतलमशेषं सञ्चरन्ती चिराय ।
चकितविबुध–सविल्लोचनाम्भोज–दृष्टा
जयतु जयतु गीता वाङ्मयी कृष्णमूर्तिः ॥१८॥

---

## प्रकरण १५ वें

# दूतकाव्यें

कविकुलगुरु कालिदासाच्या प्रत्येक ग्रंथाने संस्कृत साहित्यामध्ये एक अभिनव सम्प्रदाय निर्माण झालेला आहे. शाकुन्तल, रघुवंश, कुमारसंभव यासारख्या काव्यातील कित्येक मनोज्ञ कल्पना भारतीयच नव्हे तर अभारतीय कवींनी सुद्धा आत्मसात् केलेल्या आहेत. याचे उदाहरण म्हणजे कांबोडियातील एका शिलालेखावर कोरलेले भववर्मा नावाच्या कवीचे पुढील श्लोक होत[१]—

" शरत्कालाभियातस्य परानावृत्य तेजसः ।
द्विषामसह्यो यस्यैव प्रतापो न रवेरपि ॥
यस्य सेना रजोभूतमुज्झितालङ्कृतिष्वपि ।
रिपुस्त्रीगण्डदेशेषु चूर्णभावमुपागतम् ॥ "

भववर्म्याच्या या श्लोकामध्ये रघुवंशाच्या ४ थ्या सर्गातील—

" दिशि मन्दायते तेजो दक्षिणस्यां रवेरपि ।
तस्यामेव रघोः पाण्ड्याः प्रतापं न विषेहिरे ॥ ४९ ॥
भयोत्सृष्टविभूषाणां तेन केरलयोषिताम् ।
अलकेषु चमूरेणुश्चूर्णप्रतिनिधीकृतः ॥ ५४ ॥ "

या कालिदासाच्या श्लोकाचे प्रतिबिंब स्पष्टपणे उमटलेले आहे.

भवभूति, श्रीहर्ष, राजशेखर, बिल्हण यासारख्या प्राचीन लेखकांनी आपापल्या कलाकृतींमध्ये कालिदासाचे किती व कोठें अनुकरण केलेले आहे हे संस्कृत वाङ्मयाच्या रसिकांना मुद्दाम सांगावयाची आवश्यकता नाही. अशा प्रकारें अनेक कवींच्या प्रतिभेला मार्गदर्शन करणाऱ्या कालिदासाच्या मेघदूत या नितांतहृद्य खण्डकाव्याने संस्कृत साहित्यात दूतकाव्याची एक अभिनव परम्परा निर्माण झालेली दिसते. म्हणून दूतकाव्याचा आदिकवि कालिदासच ! मेघदूतानंतर वायुदूत, भ्रमरदूत, हारितदूत, पवनदूत, शुकदूत इत्यादि अनेक दूतकाव्य निर्माण झालेली आहेत.

भामहाने आपल्या 'काव्यालंकार' या ग्रंथामध्ये या दूतकाव्य पद्धतीवर प्रतिकूल टीका केलेली आहे. तो म्हणतो,

---

१. म. म. मिराशीकृत कालिदास, पृ. २८६ ।

अयुक्तिमद् यथा दूता जलभृन्मारुतेन्दव. ।
तथा भ्रमरहारीतचक्रवाकशुकादयः । (१-४२)
अवाचो व्यक्तवाचश्च दूरदेशविचारिणः ।
कथ दूत्य प्रपद्येरन्निति युक्त्या न युज्यते ॥(१ ४३)
यदि चोत्कण्ठया यत् तदुन्मत्त इव भाषते ।
तथा भवतु भूम्नेद सुमेधोभिः प्रयुज्यते ॥ (१-४४)

अशा प्रकारे भामहाने या दूतकाव्य पद्धतिसंबंधी प्रतिकूल अभिप्राय व्यक्त केला असला तरीहि कवींनी तिकडे लक्ष दिल्याचे दिसत नाही भामहाच्या टीकेनंतरहि दूतकाव्याची परपरा अखण्डित चालूच राहिली.

वस्तुतः हीं दूतप्रेषणात्मक काव्याची पद्धति ऋग्वेदाइतकी प्राचीन आहे. ऋग्वेदाच्या दशममण्डलातील १०८ व्या सूक्तामध्ये सरमा नावाची कुत्री पणीकडे पाठविल्याचे दिसते. रामायणामध्ये मारुतीचे दौत्य अत्यत प्रभावी रीतीने आदिकवि वाल्मीकीने चित्रित केल आहे. महाभारतात नलदमयती उपाख्यानामध्ये वर्णिलेलें हंसदौत्य आबालवृद्धांच्या माहितीचे आहे. अशा प्रकारे दूतकाव्याची परपरा अत्यत प्राचीन आहे प्रत्यक्ष कालिदासाच्या दृष्टीपुढे रामायणातील हनुमद्दूताची कल्पना होती हें मेघदूतातील---

' इत्याख्याते पवनतनय मैथिलीवोन्मुखी सा । '

यासारख्या उपमेवरून स्पष्ट दिसते. पण पुढे मेघदूताचा अनेक कवींच्या अन्तःकरणावर सखोल परिणाम घडत राहिला व त्यातून दूतकाव्याची परम्परा निर्माण झाली.जर्मन कवि शीलर याच्याहि मनावर मेघदूताने प्रभाव पाडला होता असें दिसतें. त्याने आपल्या 'मरिया स्टुअर्ट' नावाच्या नाटकात तुरुगात खितपत पडलेल्या नायिकेने मेघद्वारा प्रियकराकडे संदेश पाठविल्या असा प्रसग वर्णिलेला आहे.

जैनकवींमध्ये चरित्र सुन्दर गणीचे ( १५ वे शतक ) '**शीलदूतम्**'[२] मेघविजय कवीचें (१५ वें शतक) '**जैनमेघदूतम्**'[३] यासारखीं तत्त्वोपदेशक दूतकाव्यें आढळतात. नीतितत्त्वोपदेशासाठी लिहिलेलीं '**काकदूतम्**'[४], '**इन्दुदूतम्**', '**हंसदूतम्**'[५] यासारखीं दूतकाव्य आढळतात.

**काकदूतम्**[६] या काव्यात कारागृहात पडलेला एक पापी ब्राह्मण कावळ्याच्या द्वारा कादम्बरी ( मदिरा ) नावाच्या आपल्या प्रेयसीकडे सन्देश पाठवितो असें वर्णन असून त्या सन्देशामध्ये नीतिमार्गाचा उपदेश केलेला आहे.

---

२. वाराणसीत मुद्रित, ३. भावनगरमध्ये मुद्रित, ४. 'सहृदया' मासिकांत प्रकाशित ५. मुंबईत प्रकाशित. ६. पृ. ३२२।

मेघदूताला पूर्वार्ध कल्पून त्याचा उत्तरार्ध म्हणून लिहिलेली अर्वाचीन कवींची काही काव्य आढळतात. त्यामध्ये यक्षाची स्त्री यक्षाला उलट सन्देश पाठविते असे दाखविले आहे. सर्वशास्त्रीचा पुत्र कृष्णमूर्ति (१७ वे शतक) याने या पद्धतीचे **'यक्षोल्लास'** हे काव्य लिहिलेलें आहे व त्यामध्ये तो स्वतःचा निर्देश 'अभिनव कालिदास' म्हणून करतो याच कृष्णमूर्तीने 'मदनाभ्युदयभाण' लिहिला आहे[7]

**मेघप्रतिसन्देशम्** – म्हैसूर राजाचे प्रधान पंडित मंडिकल रामशास्त्री यानी हे काव्य लिहिले असून ते म्हैसूर शासनीय मुद्रणालयात प्रसिद्ध झाले आहे. मोरेड रामचन्द्रकवीचें **'घनवृत्तम्'** हें मद्रासमध्ये व मिथिलेचे म. म परमदत्त झा याच **'यक्षमिलनकाव्यम्'** दरभंगा येथे प्रकाशित झालेले आहे.

मेघदूतातील पद्यांची समस्यापूर्ति करून काव्य लिहिण्याची स्फूर्ति काही कवींना झालेली दिसते. त्यापैकी शीलदूताचा (चरित्रसुन्दर गणीविरचित) उल्लेख वर आलाच आहे. मेघविजयगणीने लिहिलेले त्याच पद्धतीचे **'मेघदूतसमस्यालेखम्'**[8] व एका अप्रसिद्ध कवीचे **'चेतोदूतम्'** हीं दोन काव्य भावनगर येथे प्रकाशित झालीं आहेत. उगमसुन विनय याने **'नेमिदूतम्'**[9] हें अशा प्रकारचें समस्यापूर्तिनिष्ठ काव्य लिहिले असून त्यामध्ये राजैश्वर्याचा त्याग करणाऱ्या नेमीकडे त्याच्या पत्नीने पर्वतद्वारा सन्देश पाठविल्याचे वर्णन आहे. आर. कृष्णम्माचार्य यानी 'मेघसन्देशविमर्श' या नावाचा आधुनिक पद्धतीचा एक ग्रन्थ लिहिला असून तो मद्रासमध्ये मुद्रित झाला आहे.[10]

दूतकाव्याची विशेष आवड बंगाली साहित्यिकांच्या ठिकाणीं दिसून येते. कलकत्याचे प्रसिद्ध लेखक व संस्कृत पंडित डॉ. ज्तीन्द्रविमल चौधरी यानी १९५३ मध्ये 'बंगीय दूतकाव्यतिहास.' या नावाचे उत्तम पुस्तक संस्कृतात लिहून कलकत्ता येथे प्रकाशित केले. त्यामध्ये बंगालमधील साधारणतः पंचवीस दूतकाव्याचा सविस्तर परिचय त्यानी दिला आहे त्यापैकी अर्वाचीन कालखंडातील उल्लेखनीय दूतकाव्य पुढीलप्रमाणे आहेत.

| दूतकाव्य | — | लेखक |
|---|---|---|

उद्धवसन्देशम् —रूपगोस्वामी (१७ वे शतक) (यापूर्वी चैतन्य महाप्रभूचे शिष्य रूपगोस्वामी यानी याच नावाचे दूतकाव्य लिहिले होते.)

पिकदूतम्—रुद्र न्यायवाचस्पति[11] (१७ वे शतक)

७ पृ ३११। ८ पृ ३२०। ९ मुंबईत मुद्रित। १०. पृ. ३२८।
११ काव्यमाला व प्राच्यवाणी जर्नलमध्ये प्रकाशित १९४५।

हंससंदेशम् -- रघुनाथदास (१७ वे शतक)
पवनदूतम्—भट्टारक ज्ञानभूषण यांचा शिष्य वादिराज. (१७ वे शतक)
(हा जैन सम्प्रदायी होता.)
पवनदूतम्--सिद्धनाथ विद्यावागीश.
वातदूतम्—कृष्णानन न्यायपञ्चानन (१७ वे शतक)
अनिलदूतम्—रामदयाल तर्करत्न
पादांकदूतम्-- श्रीकृष्ण सार्वभौम. (१७ वे शतक) बंगालचा राजा रघुनाथराय याच्या आज्ञेने लिहिण्यात आले.
पादपदूतम्--गोपेन्द्रनाथ गोस्वामी (१७ वे शतक)
कोकिलसंदेशम् —वेंकटाचार्य (१७ वे शतक)
चन्द्रदूतम् —कृष्णचन्द्र तर्कालंकार (१८ वे शतक)
हनुमद्दूतम्—नित्यानंदशास्त्री जोधपुरवासी.
गोपीदूतम् --लम्बोदर वैद्य.[१२]
तुलसीदूतम् —त्रिलोचन (१८ वे शतक)[१२]
तुलसीदूतम् —वैद्यनाथ द्विज
कोकिलदूतम्—हरिदास (१८ वे शतक)
काकदूतम् —रामगोपाल (१८ वे शतक)
पिकदूतम् --अम्बिकाचरण देवशर्मा
मेघदूतम् —त्रैलोक्यमोहन (१९ वे शतक)
पान्थदूतम्—भोलानाथ (२० वे शतक)
भक्तिदूतम् --कालीप्रसाद
भ्रमरदूतम्—रुद्रवाचस्पति
भ्रमरसंदेशम्--वासुदेव

**शुकसन्देशम्** व **हनुमत्प्रसादसन्देशम्**—ले. रंगनाथ ताताचार्य. (जन्म १८९४) हा कवि तंजावरच्या सरस्वती महाल या ग्रंथालयाचा प्रमुख अधिकारी होता. 'काव्यरत्नावली' नांवाच्या याच्या एका काव्यसंग्रहात संस्कृत वाक्प्रकाराचा उपयोग अधिक प्रमाणांत करण्याचा प्रयत्न दिसतो. याची सर्व काव्ये प्रकाशित झाली आहेत.

**कीरसन्देशम्**—श्री. ग. लक्ष्मीकांतय्या. हैद्राबादच्या निजाम कॉलेजामध्ये हा कवि संस्कृतचा प्राध्यापक आहे. त्याने प्रस्तुत काव्य सर्वजनपुस्तकमालेतर्फे प्रकाशित झाले आहे.

---

१२. कलकत्ता येथे जीवानन्द विद्यासागर याच्या काव्यसंग्रहांत मुद्रित.

**क्षीरदूतम्**—त्याच नावाचें आणखी एक काव्य रामगोपाल कवीने लिहिलें आहे.

**भृङ्गसंदेशम्**[13]—लेखिका त्रिवेणी. हिचा सविस्तर परिचय पुढील एका प्रकरणांत दिलेला आहे.

**भ्रमरसन्देशम्**—ले. य. महालिंगशास्त्री. यांच्या अन्य काव्याचा परिचय इतर प्रकरणात आला आहे.

**मधुकरदूतम्**—ले. चक्रवर्ति राजगोपाल. हा कवि म्हैसूर विश्वविद्यालया-मध्ये संस्कृत विभागाचा अध्यक्ष होता. नियोगिनिग्रहम्[14] व गंगातरंगम् हीं काव्यें 'पद्मिनी', 'कुमुदिनी', 'विलासकुमारी' व 'सङ्गम' या चार आधुनिक पद्धतीच्या कादम्बऱ्या, 'तीर्थाटनम्' नावाचें प्रवास वर्णन 'कविसमयविचार' या नावाचा साहित्यशास्त्रीय प्रबंध एवढी वाङ्मयसंपत्ति या कवीनें निर्माण केली आहे.

**कोकिलसन्देशम्**—या एकाच नावाचीं काव्यें नृसिंह, वरदाचार्य (वेंकटदेशिकाचा पुत्र) वेङ्कटाचार्य (अनन्त तातार्यांचा पुत्र) यांनी लिहिलीं. वासुदेव कवीनें लिहिलेल्या 'भृङ्गसन्देशम्' या काव्याला प्रत्युत्तर म्हणून उद्दण्डकवीनें लिहिलेलें 'कोकिलसन्देशम्' नावाचें आणखी एक काव्य प्रकाशित झालें आहे.

त्या व्यतिरिक्त **पिकसन्देशम्** या नावाचीं दोन काव्यें रङ्गाचार्य व त्यांचा नरसिंहाचार्य यांनी लिहिलीं आहेत. हिन्दु विश्वविद्यालयाचे प्राध्यापक म. म. प्रमथनाथ तर्कभूषण या बंगाली कवीनें 'कोकिलदूतम्' नावाचें काव्य लिहिलेलें आहे. या व्यतिरिक्त अण्णयराचार्य, गुणवर्धन, नरसिंह या कवींनी '**कोकिलसन्देशम्**' याच नावाचीं काव्यें लिहिलीं आहेत[15]

**हंससन्देशम्**—ले. विद्याविधान कवीन्द्राचार्य सरस्वती. 'कवीन्द्रचन्द्रोदयः' नावाच्या काव्यसंग्रहांत याच कवीन्द्राचार्यांची स्तुति आढळते. यांनी 'कवीन्द्रकल्पद्रुम.' नावाचा आणखी एक ग्रंथ लिहिला आहे.

**हंससन्देशम्**—या नावाचीं दोन स्वतंत्र काव्यें वेंकटेश व सरस्वती या दोन कवींनी लिहिलीं आहेत.

**गरुडसन्देशम्**—हें काव्य [illegible]च्या श्रीनिवासाचार्यांचा पुत्र वीर नरसिंहाचार्य याने लिहिलें असून त्याने लिहिलेल्या प्रियसन्देशम् या काव्याचा निर्देश वर केला आहे.

---

१३. काव्यमालेंत मुद्रित। १४ पृ. ४९१. १५. ही सर्व काव्यें मुद्रित झालेली आहेत

**चकोरसन्देशम्**—या नावाचीं तीन स्वतंत्र काव्ये वासुदेव, वेंकट व पेरुसूरि या तीन कवींनी लिहिलेलीं आहेत. त्यातील पेरुसूरीला ' नवीनपतञ्जली ' ही उपाधि लाभली होती.

**मयूरसन्देशम्**—या नावाचीं काव्यें रङ्गाचार्य व श्रीनिवासाचार्य या कवींनी लिहिलीं आहेत.

**सुरभिसन्देशम्**—ले विजयराघवाचार्य. प्रस्तुत काव्यात भारतातील आधुनिक नगरांचीं वर्णनें केलेलीं आहे. हा लेखक तिरुपति येथे ताम्रपट-शिलालेखाचा अधिकारी ( एपिग्राफिस्ट ) होता. त्याने 'पञ्चलक्ष्मीविलास ', ' नीतिनवरत्नमाला ', ' अभिनवहितोपदेश ' ' कवेन्दुमण्डली ', ' वसन्तवासम् ' ' धानप्रशंसा ', ' दिव्य क्षेत्रयात्रामाहात्म्यम् ', ' आत्मसमर्पणम् ', ' नवग्रहस्तोत्रम् ', ' दशावतारस्तव ' ' लक्ष्मीस्तुति ' हीं अवान्तर काव्य लिहिलेलीं आहेत[16] **पञ्चलक्ष्मीविलास** या काव्यात विजयराघवाचार्यांनी धनलक्ष्मी, धान्यलक्ष्मी, जयलक्ष्मी, गृहलक्ष्मी व आरोग्य लक्ष्मी, या पाच लक्ष्मींच्या स्तुत्यर्थ ५ सहस्र श्लोक लिहिलेले आहेत.

**मुद्गरदूतम्**—ले रामावतार शर्मा. हें दूतकाव्य हास्यरसप्रधान आहे. या कवीचा व त्याच्या काव्याचा परिचय इतरत्र विस्ताराने दिलेला आहे. हास्यरस प्रधान दुसरें दूतकाव्य म्हणजे बटुकनाथ शर्मा यांचें **वल्लवदूतम्** हें होय.

सहस्रबुद्धेकृत व राजगोपाल अय्यगार कृत **काकदूतम्**, आणि कृष्णमूर्ति शास्त्री कृत **शुनदूतम्** या विडम्बनात्मक व विनोदी दूतकाव्यांचा परिचय पुढे हास्य रसविषयक प्रकरणात येईल.

**' सन्देश '**—हें नीतिपर काव्य वाराणसीचे न्यायविजय मुनिमहाराज या जैन कवीने लिहिलेले आहे. या सन्देशकाव्यात ' प्रोत्साहनम् ', ' सहिष्णुता ', ' आश्वासनम् ', ' आत्मप्रबोध ' या चार भागामध्ये छात्रोचित उपदेश केलेला आहे. पुढील ३ श्लोकावरून या उपदेशाची कल्पना यईल.

कुतूहलात् दरतिप्रवीण मन सदा मा कुरु हे विवेकिन ।
क्षणो गतो नैव पुन समेति ततोऽप्रमत्त पठनोद्यत स्या ॥ १-४

विनष्टपुत्साहघन यदीय मत स जीवन्नपि भाग्यहीन ।
सर्व समुत्साहबल प्रकर्षे सिद्धि समारोहति साध्यवस्तु ॥ १-१०

आत्मोन्नतिर्मानवजीवनाद या न देवदेहादपि लभ्यते सा ।
इत्येवमालोच्य महानुभाव मा भू प्रमादीति ममोपदेश ॥ ४-१९

इंग्रजी व हिन्दी भाषांतरासहित हा सन्देश प्रकाशित झाला आहे.[17]

---

१६ कृ २५४ F १७ लहानामित्र स्टिम् प्रिंटिंगप्रेस बडोदा ।

काव्य — कवि

हंसदूतम्—हरयोगी[१८]

उद्धवदूतम्— ले माधव ( १९ वे शतक )[१९]. रूपगोस्वामीकृत याच नावाच्या काव्याचा उल्लेख वर आला आहे.

सुभगसन्देशम्—या नावाचीं दोन काव्यें लक्ष्मणसूरि व नारायण कवि यानी लिहिलीं असून तीं तंजावरमध्य मुद्रित झालीं आहेत.[२०]

पान्थदूतम्—ले. भोलानाथ

कृष्णदूतम्—नृसिंह.

पवनदूतम्—वादिचन्द्र [मुद्रित]

मानससन्देशम् विम्मिरि वीरराघव.

मनोदूतम्—ले. व्रजनाथ.[२१] 'मनोदूतम्' याच नावाचीं आणखीं दोन काव्यें विष्णुदास व रामकृष्ण यानी लिहिलीं आहेत. विष्णुदासाचें काव्य वसन्ततिलका वृत्तात असून रामकृष्णाचें[२२] शिखरिणी वृत्तात आहे.

कोकसन्देशम्—ले. विष्णुदास.[२३]

याव्यतिरिक्त 'हंससन्देशम्', 'उद्धवसन्देशम्', 'मारुतसन्देशम्' ( मद्रासमध्ये मुद्रित ), 'मयुरोष्टसन्देशम्', 'रत्नाङ्गदूतम्' ( म्हैसूरमध्ये मुद्रित ), 'चातकसन्देशम्', 'पद्मदूतम्' ( कलकत्ता येथे मुद्रित ), यासारखीं आणखी कित्येक दूतकाव्य उपलब्ध असून त्यांच्या लेखकांची नाव मात्र उपलब्ध नाहीत.

'अलकामिलनम्'— जयपुरचे विन्द्रलाल शर्मा पुरकायस्थ यानी मेघदूताच्या उत्तरार्धाधारावर हें काव्य लिहिलेलें आहे.[२४] या काव्याच्या 'विरहावशेष' नावाच्या प्रथम सर्गात ( श्लोकसंख्या ४१ ) यक्षिणीची विरहावस्था व दुसऱ्या 'मिलनोल्लासः' नावाच्या ७१ श्लोकांच्या सर्गात त्यांचें मिलन वर्णिलेलें आहे.

अशाप्रकारे कालिदासापासून प्रवृत्त झालेली दूतकाव्याची स्रोतस्विनी निरंतर वाहत असून तीमध्ये शेकडो संस्कृत कवींच्या प्रतिभेचे विविध तरङ्ग उत्पन्न आहेत. बहुतेक सर्वच कवींनी कालिदासाची शैली व भावमधुरता आपल्या काव्यात आणण्याचा प्रयत्न केलेला आहे. पण कालिदासीय मेघदूताच्या तोडीचें दुसरें दूतकाव्य आजवर निर्माण झालेलें दिसत नाही वासिष्ठ गणपति मुनींनी 'भृङ्गदूतम्'

---

१८. पृ ३२२। १९ मुंबईत मुद्रित. २० पृ. ३२३। २१. मुंबईत मुद्रित। २२ बंगीय साहित्य परिषद् पत्रिकेत मुद्रित २३ चौखम्बा बुक सिरीज. २४. राजस्थान प्रिंटिंग वर्क्स, जयपुर

नांवाचें काव्य लिहिलें,.पण त्यांत कालिदासीय दूतकाव्याचें माधुर्य व सौन्दर्य उमटलें नाही म्हणून त्यांनी ते नदींत टाकून दिलें.

## मेघदूताचीं भाषान्तरें

जगांत बायबल व पंचतन्त्र या दोन ग्रन्थांच्या खालोखाल जर कोणत्या एका ग्रन्थाचीं सर्वांत अधिक भाषान्तरें झालीं असतील तर तीं मेघदूताचीच. मेघदूताचें सर्वांत प्राचीन भाषान्तर १३ व्या शतकांत तिबेटी भाषेत झालें असें मानतात. या तिबेटी भाषान्तराची एक प्रत तंजावरच्या हस्तलिखित संग्रहालयांत आहे. याच भाषान्तराच्या आधारें जर्मन पंडित डॉ. बेख ( Beckh ) यानें जर्मन भाषेत मेघदूताचें भाषान्तर केलें. सिंहली भाषेतीत एक प्राचीन भाषान्तर सीलोनचे श्री. टी. व्ही. पानबोके यांनी इ. १८८३ मध्ये प्रकाशित केलें.[२५]

मेघदूताचा प्रो. मॅक्समुल्लर यांनी इ. १८४७ मधे केलेला जर्मन अनुवाद उत्कृष्ट मानण्यात येतो. तत्पूर्वी इ. १८१३ मध्ये एच्. एच्. विल्सन यानी इंग्रजी अनुवाद केला होता. इ. १८४१ मध्ये बोन व इ. १८४७ मध्ये ग्रील्ड मिस्टर या दोघानी मेघदूताचीं लॅटिन भाषान्तरें केलीं. आर्थर रायडर या अमेरिकन पंडिताने मेघदूताचें भाषान्तर केलें आहे. यूरोपीय भाषांतील कांहीं प्रसिद्ध व उल्लेखनीय भाषान्तराचाच येथे निर्देश केला आहे. भारतांतील प्रत्येकच भाषेमध्ये अनेक विद्वानानी अनेक प्रकारें मेघदूताचीं भाषान्तरें आजवर केलीं असून यापुढेहि तीं वेळोवेळीं होत राहतील.

---

२५. डॉ. बलदेव उपाध्याय–'मेघदूत : प्रसार तथा प्रभाव' हा जयभारती-तील लेख पाहा.

## प्रकरण १६ वे

# सुभाषितसंग्रह

' नूनं सुभाषितरसोऽन्यरसातिशायी ', ' कर्तव्यो हि सुभाषितस्य मनुजैरावश्यकः संग्रहः ' यासारख्या सूक्तींतून सुभाषितांचें महत्त्व प्राचीन कवींनी सांगितलेलें आहे. सामान्य लेखकाच्या अनेक वाक्यांतून जो आशय स्पष्ट व्हावयाचा नाही, तो श्रेष्ठ कवीच्या एका सुभाषितांतून लख्ख प्रकाशित होतो. त्यांतहि ते सुभाषित जर मनु, शंकराचार्य, भर्तृहरि, कालिदास, यासारख्या परममान्य पुरुषाच्या तोंडचें असेल तर त्याला एक प्रकारचें प्रामाण्य प्राप्त होतें. वेदांतील सूक्तें म्हणजे अनेक ऋषींच्या सुभाषितांचाच संग्रह आहे असें अनेकांचें मत आहे व तदनुसार वेद हे जगांतील पहिले आर्ष सुभाषितसंग्रह होत असें म्हणता येईल. महाभारत हा सुभाषितांचा रत्नाकरच आहे. महाभारतांतील सुभाषितें भगवान व्यासांनी इतर ग्रंथांतून घेतलीं की इतर ग्रंथकारांनी भारतांतून घेतलीं याविषयीं विद्वानांत मतभेद आहेत. 'धम्मपद' म्हणजे तर भगवान् बुद्धाच्या सुभाषितांचाच संग्रह आहे. गाथासप्तशती हा महाराष्ट्री ग्रंथ, एक सुभाषितांच्या मंथनांतूनच निघालेला आहे. भर्तृहरीच्या शतकत्रयामध्ये आढळणारीं कित्येक सुभाषितें त्यापूर्वीच्या ग्रंथांमध्ये आढळतात. सातव्या शतकांत झालेल्या भर्तृहरीनें तीं पूर्वीच्या ग्रंथकारांपासून घेतलीं असतील, असें अनुमान करणें अनुचित होणार नाही. तात्पर्य, अनेक ग्रंथांमध्ये विखुरलेलीं सुभाषितें एकत्र संकलित करण्याची प्रवृत्ति अति प्राचीन काळापासून साहित्यिकांमध्ये दिसून येते. अशाप्रकारें निर्माण झालेल्या सुभाषित-संग्रहात्मक ग्रंथांमध्ये प्रसिद्ध कवींच्या सुभाषितांप्रमाणें अनेक अप्रसिद्ध किंवा अज्ञात कवींचीं सुभाषितें आढळतात. हे संग्रहग्रंथ निर्माण करणाऱ्या विद्वानांनी जणु त्या अज्ञात कवींचीं वाङ्मय शरीरेंच जतन करून ठेविलीं. काही प्रसिद्ध कवींचीं बोटांवर मोजण्याइतकीं सुभाषितें अशा संग्रहांतून आढळतात, व तेवढ्यावरूनच त्यांच्या अलौकिक प्रतिभेची कल्पना आजहि येऊ शकते.

प्राचीन काळीं ' कवीन्द्रवचनसमुच्चयः ', नन्दनकृत ' प्रसन्नसाहित्यरत्नाकरः' *(१० वे शतक) अमितगतीचा ' सुभाषितरत्नसंदोहः ' (१० वे शतक); श्रीधरदासाचें* ' सदुक्तिकर्णामृतम्' (१३ वे शतक); जल्हणाची 'सूक्तिमुक्तावली' (१३ वें शतक); वल्लभदेवाची सुभाषितावली यासारखे विख्यात सुभाषितसंग्रह निर्माण झाले व त्यांतून संस्कृत ' सुभाषितांचा ' साठा प्रमाणानें वाढत गेला. नंतरच्या काळांतहि हें कार्य

अखण्डितपणे चालू राहिले असे दिसते. १७ व्या शतकानंतरच्या अर्वाचीन कालखण्डात जे उत्कृष्ट सुभाषितसंग्रह निर्माण झाले, त्यापैकी काहींचा परिचय प्रस्तुत प्रकरणात दिलेला आहे.

**भामिनीविलासः**— हा पण्डितराज जगन्नाथाचा काव्यसंग्रह एका दृष्टीने सुभाषितसंग्रहच आहे. त्यामध्ये अन्योक्ति, शृंगार, करुण व शांत या चार उल्लासात त्याच्या स्वतःच्याच स्फुट काव्यांचा संग्रह केलेला असल्याने तो मर्यादित झालेला आहे. या संग्रहाचे कारण त्याने आपल्या फटकळ पद्धतीने सांगितलेले आहे. ते असे—

" दुर्वृत्ता जारजन्मानः हरिष्यन्तीति शङ्कया ।
मदीयपद्यरत्नानां मञ्जूषैषा विनिर्मिता ॥ "

सुभाषितसंग्रहांमुळे वाङ्मयीन चार्विलकवाला आळा बसत असल्याने त्याची फार आवश्यकता असते.

ग्रंथ — संग्राहक

**प्रस्तावरत्नाकरः**—पुरुषोत्तमपुत्र हरिदास ( १७ वे शतक )
**सुभाषितहारावली**—हरिकवि ( १७ वे शतक )
**पद्यावली**—या नावाचे ३ सुभाषितसंग्रह रूपगोस्वामी, मुकुन्दकवि व विद्याभूषण, या ३ कवींनी केलेले आहेत.
**पद्यमुक्तावली**— या नावाचे २ संग्रह घासीराम व गोविंदभट्ट या दोन विद्वानांनी केलेले आहेत.
**सुभाषितमुक्तावली**—या नावाचे २ संग्रह पुरुषोत्तम व मथुरानाथ या कवींनी केले आहेत.
**प्रस्तावचिन्तामणिः**—चन्द्रचूड
**प्रस्तावतरङ्गिणी**—श्रीपाल
**प्रस्तावमुक्तावली**—केशवभट्ट
**प्रस्तावसारसंग्रह**—रामशर्मा
**प्रस्तावसार**—लोहित्यसेन
**पद्यामृततरङ्गिणी**—हरिभास्कर
**पद्यामृतसरोवरः**—संग्राहकाचे नाव उपलब्ध नाही
**पद्यसंग्रहः**—कविभट्ट
**पद्यवेणी**—व्रजजीवनपुत्र वेणीदत्त
**सुभाषितकौस्तुभ**—वेंकटाध्वरी
**सुभाषितावली**—सकलकीर्ति
**सुभाषितरत्नकोशः**—भट्टकृष्ण

सुभाषितरत्नावली—उमामहेश्वर भट्ट

सारसंग्रहः—शम्भुदास (१६ व्या शतकातल्या गुजराथचा अधिपति मुझफरशाह याची स्तुति या संग्रहात आढळते.)

सारसंग्रहसुधार्णवः—भट्ट गोविंदजित्

सुभाषितरत्नकोशः—भट्ट श्रीकृष्ण.

सुभाषितनीविः—वेंकटनाथ.

सुभाषितपद्यावली—श्रीनिवासाचार्य.

सुभाषितमञ्जरी—चक्रवर्ति वेंकटाचार्य.

सुभाषितसर्वस्वम्—गोपीनाथ.

सुभाषितसुधानिधिः—सायणाचार्य.

सूक्तिवारिधिः—पेद्दुभट्ट.

सूक्तिमुक्तावलिः—विद्यानिवास भट्टाचार्यांचा पुत्र विश्वनाथ

सूक्तावलिः—लक्ष्मण.

सुभाषितकुङ्कुम—या नावाचे २ संग्रह अनुक्रमे केशवी दासकथा नायक व रामेश्वर राघवयतीन्द्र यांनी केलेले आहेत.

सुभाषितरत्नाकरः—या नावाचे ४ संग्रह मुनिदेवाचार्य, कृष्ण, उमापति व के. एस्. भाटवडेकर यांनी केलेले आहेत.

सुभाषितानि—हरिहर.

सुभाषितरङ्गसारः—जगनाथ

रसिकजीवनम्—गदाधर भट्ट

सभ्यालङ्करणम्—गोविंदजित्.

सभ्यभूषणमञ्जरी—गौतम.

पद्यतरङ्गिणी—मल्लनाथ. अठराव्या शतकातील माधव नावाच्या राजाचा हा आश्रित पंडित होता. प्रस्तुत संग्रहात १२ तरङ्गामध्ये पृथक् पृथक् सुभाषितांचा संग्रह केला आहे.*

सूक्तिसुन्दरम्—१७ व्या शतकातील सुन्दरदेव नावाच्या पंडिताने प्रस्तुत सुभाषित संग्रहाचे संकलन केले आहे. त्यामध्ये १६ व्या व १७ व्या शतकातील 'अप्रसिद्धप्रसिद्ध' कवीश्वर, केशव दीक्षित, गणपति, गौरी, चन्द्रचूड, घनश्याम, जगज्जीवन, धरणीधर, नारायणभट्ट, भट्टाचार्य, भानुकर, मौनीरङ्गनाथ, श्रीपादिक, रामचन्द्रभट्ट, लक्ष्मण, वेणीदत्त, शंकरमिश्र, हनुमान, हरिनारायणमुनि इत्यादि अप्रसिद्ध कवींची सुभाषितें आढळतात. त्यामध्ये शंकर (उत्पन्नचित्,

* पृ. ३७१, ३७२ व ३७३ मध्ये या सर्व ग्रंथांचा संदर्भ आढळेल.

कानिलेन्द्र) मुहम्मदशाह, निजामशाह, शहाजहान इत्यादि मुसलमान राजांची स्तुति आढळते.

अशा प्रकारे आजवर झालेल्या अनेक सुभाषितसंग्रहातून संग्रहकारांनी मुख्यत: प्राचीन कवींचीच सुभाषिते संकलित केल्याचे दिसून येते. फारच थोड्या संग्रहकारांनी काही समकालीन कवींचा परामर्श घेतल्याचे दिसते. समकालीनांची उपेक्षा होण्याचे कारण आजच्यासारखीं परस्पर संबंधाची यांत्रिक साधनं त्या काळात उपलब्ध नसल्याने देशभर विखुरलेल्या प्रसिद्ध किंवा अप्रसिद्ध कवींच्या सुभाषितांचा संग्रह करणे या संग्रहकारांना सर्वथा अशक्य होते.

आधुनिक काळातला अत्यंत महत्त्वाचा सुप्रसिद्ध सुभाषितसंग्रह म्हणजे काशीनाथ पांडुरंग परब यांनी संपादित केलेला व वासुदेव लक्ष्मण पणशीकर यांनी सुधारलेला **'सुभाषितरत्नभाण्डागारम्'** हा ग्रंथ होय. या ग्रंथाच्या आजवर ८ आवृत्ति प्रकाशित झाल्या आहेत. पण त्यामध्येहि प्राचीन कवींच्याच सुभाषितांचा संग्रह प्रामुख्याने केलेला आहे. अर्वाचीन कवींच्या नवीन विषयावरील सुभाषितांचा संग्रह करण्याची आज अत्यंत आवश्यकता निर्माण झालेली आहे. निरनिराळ्या संस्कृत नियतकालिकांतून असंख्य कवींची प्रतिभा सर्वथा नवीन विषयावर आजवर पल्लवित झालेली आहे. ज्या नियतकालिकांतून ही काव्य आजवर प्रकाशित झालीं, तीं नियत कालिकेच आज नामशेष झालेली आहेत. अशा परिस्थितीत त्यांत प्रकाशित झालेली असंख्य सुभाषितं नवीन सुभाषितसंग्रहाच्या अभावीं कोणासहि कधीहि उपलब्ध होण्याची शक्यता राहिलेली नाही. आधुनिक संस्कृत साहित्यातील या उपेक्षित विषयाकडे जिज्ञासूंचे लक्ष केन्द्रित व्हावे यासाठी आम्ही प्रस्तुत प्रकरणात विविध प्रकारचीं सुभाषितं संकलित केलीं आहेत. त्यामुळे हें प्रकरण काहीसे मोठे होईल. पण त्यामध्ये विविध प्रकारच्या आधुनिक सुभाषितांचे संक्षिप्त संकलन वाचकांना उपलब्ध होईल.

**सुश्लोकलाघवम्**–[1] आधुनिक कवींच्या सुभाषितामध्ये महाराष्ट्रातले प्रसिद्ध कवि विठ्ठलपंत (विठोबाअण्णा दप्तरदार) यांचा सुश्लोकलाघवम् हा काव्यसंग्रह विशेष उल्लेखनीय आहे. या सुश्लोकलाघवात ५०० पेक्षा अधिक श्लेषगर्भ सुभाषितं आहेत. दुसरे वैशिष्ट्य म्हणजे विषयाचे वैचित्र्य होय. प्राचीन संस्कृत कवींनी न सांगितलेले अनेकविध विषय या 'सुश्लोकलाघवात' आढळतात. कवीच्या समकालीन लोकजीवनाचे प्रतिबिंबहि या सुभाषितांतून स्वच्छपणे पहावयास मिळते. विठोबाअण्णाचे साहित्य, वेदान्त, व्याकरण, आयुर्वेद, इतिहास इत्यादि विविध विषयांवरील प्रभुत्व अनेक श्लोकांतून व्यक्त होते. त्यांच्या समकालीन अनेक

---

१. पुणें येथे इ. स. १९१७ मध्ये मुद्रित

मराठी कवींपेक्षा ते अत्यंत श्रेष्ठ प्रतीचे कवि होते, असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. महाराष्ट्रातल्या सर्व हरिदास मंडळीच्या जिव्हेवर निळोबाअण्णांची सुभाषिते कालपर्यंत नाचत होती. आपल्या 'मुक्तेश्वलाघवाचे' महत्व कवीने स्वतः पुढील सुभाषितात वर्णिलेले आहे.—

"इतिहास–पुराणागम–विचक्षणादूषणस्य बलिनोऽपि
मुक्लोकलाघवस्य दर्शने किल नामशेषतैव स्यात् ॥१२॥

"मूर्ध्यञ्जलिं विरचय्य मुहुर्वयेऽह
मुक्लोकलाघवमहो शृणुतानसूयम् ।
जायेत चेतसि तत. सुमहाप्रसादः
स्यादेव वागविषयः सहज. प्रमोद ॥१३॥

मुक्लोकलाघवश्लोक विचित्रानन्ददायकम् ।
सकला. स्पृहयन्त्येव हरिदासा विशेषत. ॥१४॥

मुक्लोकलाघवश्लोकः प्रस्तुतो जनसंसदि ।
न कस्मै रोचतां नूनमेकं बरकम् विना ॥१५॥

निळोपंतानी आपल्या काव्यातून अनेक श्रेष्ठ महाराष्ट्रीय संतांची श्लेषगर्भ स्तुति केलेली आहे. अशा प्रकारची संतांची स्तुति इतरत्र कोठेहि आढळत नसल्याने ती उद्धृत करण्याचा अनावर मोह होत आहे.

श्रीसमर्थ रामदास—

अकिंचन–वरेण्योऽपि समर्थपदवीं गत ।
दासोऽपि य किल स्वामी स साधु. कोऽपि राजते ॥
यो हि श्रीरामदास स्यात् परित्यज्य श्रियं स्त्रियम् ।
असौ न परलीन स्यादिति क सज्जनो वदेत् ॥३३३॥

(परलीन – परब्रह्मलीन, परळीग्रामवासी)

यो रामदास स्यात् तस्य कल्याणास्थितिरालये
सभाजयति तं प्रेम्णा दुर्गाधीश. सदा स्थिर ॥३३४॥

(दुर्गाधीश –दुर्गाणाम् अधीश शिवराज । दुर्गायाः अधीशः सदाशिव. )

ननावरप्रेमरसावह यो य सूर्यवंशैकमणिप्रवेक ।
सरामक शोभनलक्ष्मणाढ्य स रामदास. किल राम एव ॥३३६॥

स्वात्ममहाजोदयकर दनिताशं सद्धारुत्वावामम् ।
कल्याणानिवनभूपदसोत्साम रामदासमवलम्बे ॥३३७॥

(अस —राक्षस, इन्द्रियम् । सदुपास्त्यावामम् – मारुतिविशेषण ।
मम्-ष्ट्र-धारुत्वावामम्—रामदासम् । )

### श्रीरामदासांच्या पुण्यतिथीसंबंधीं सुभाषितें

य पुरा मनसा नियम्य सहसा स्वार्थाय पुण्यस्तवो-
योगस्त्वास्थित एनमार्यमहितं सत्यज्य सर्वात्मना ।
त्यागो नैव वरस्तनोरिति जनान् संदर्शयन् किं तपो-
योगे तापसशेखरे निजतनुं श्रीरामदासोऽत्यजत् ॥३४४॥

( तपस्-माघ महिना )

आदौ दुर्मतिसंगतिस्त्वसुभृतां प्रायो मनोभ्रंशिका
चेत् तत्रापि भगप्रसंग उदयेत् त्यागस्तनोस्तद्वरं ।
स्थेयं न क्षणमात्रमित्युपदिशन् पक्षेऽन्तिमे सप्तमो
माघे मासि जगद्गुरुर्निजतनुं श्रीरामदासोऽत्यजत् ॥३४५॥

( दुर्मति=दुर्जन, दुर्मतिनाम संवत्सर भगप्रसंग=विषयसेवन; फाल्गुनारम्भ । )

अस्मिन् भूवलये विधाय विमलां चन्द्रप्रभां कोमलां
कीर्ति जेतुमितो नरं परपदं यो रामदासो व्रजेत् ।
तत्रैवैष चिरं वसेन्न पुनरागच्छेदिति द्योतयन्
जेतुं मन्ददिने जनेशपदवीं श्रीरामदासो ययौ ॥३४६॥

स्नातानां गुरुराजपूर्णकरुणा-पीयूष-धाराम्बुभि
श्रीगोविन्द पदाम्बुज स्मृति-सुधा स्वादैकतृप्तात्मनाम् ।
सत्या नैव च शुक्लपक्ष उदयेदेव जनान् सूचयन्
सस्थामाप स कृष्णपक्ष इव न श्रीरामदासो गुरु ॥३४७॥

( शुक्लपक्ष=शुक्लपक्ष, गुरुराज=देवगुरुबृहस्पति )

पुण्यादौ मधुशुक्लपक्षनवमी श्रीरामजन्मोत्सवं
दासस्याप्यथ तेन सा विजहतुस्ता कृष्णपक्षस्थिता ।
ता एव शरणं गता इव सता प्राणप्रयाणोत्सवं
कारुण्यात् तपसि स्थिता व्यरचयत् पुण्या शरण्याग्रणी. ॥३४८॥

( तपसि स्थिता - माघमासे स्थिता )

श्रीरामदासकृत दासबोध ग्रथासंबधी सुभाषित--

बोधस्य यत्न सुज राघवस्य दासो भव त्वं यत एष बोधः ।
न दासपृष्ठं त्यजतीति गुह्यं प्रबोधयन् भाति स दासबोधः ॥३५२॥

रामदासशिष्य रंगनाथस्वामी --निगडीकर

दूरखुल्लालकारं विधुपारयाद्त-पदाम्बुज द्वितयम ।
निगडीहृतसस्थानं वन्दिनाम रंगनाथमवलम्बे ॥ ३५३ ॥

यस्य मनोहरनामा हरि सहायो नरस्य नीरागस्य ।
अरिवर्गं विजितवतो द्रुतसदनायनम को नु विवदेत ॥ ३५४ ॥

गगा तत्र सरस्वती च यमुना तत्रैव चेत्यादिना
प्रोक्ता श्रीधरकीर्तनस्य मुनिभिर्नि गवतीर्थात्मना।
लोकप्रत्ययगामिनी तु विहिता सा तेन च यत्नतः
नके यत्कृतकीर्तन गतिमगुवन्ब्रह्मारक्षोगणा ॥ ३५५ ॥

कबीर—

अहो सदारामपद श्रितस्य कुञ्ज मन मग्नसमप्लुतस्य ।
समुद्भवेत् स सुमनस्कताऽस्य निदानाय यवन कबीर ॥ ३२७ ॥

यो ह्यादिमवर्णोत्तर-रस गनी सो कुज स्यपि कबीर ।
सुमन सहस्रम च भ्रान्त्वा न समाश्रयत पयकारम् ॥ ३२८ ॥

कबीरपुत्र कमाल—

नूर्णा सुधमस्य ( य व ) कन्यति कबीरस्य तनय
कमालेत्यतस्मिन विषय इह हेतुन सगुचितान ।
उप यस्तु यावत कृतपरिकरस्तावन्चिरात
समाख्यवास्यय मम समयह च मतिगतिम ॥ ३२९ ॥
( कमाल = क मस्तक माला यस्य स । क (मस्तक) माला = रुण्डमाला )

तुलसीदास—

आत्मारामतनुद्भूतिस्तुलस्यामोदमदिरम ।
सुमन कोटित प्रीत्य श्रीरामस्य भवन्न किम ॥
( आत्माराम-तुलसीदासस्य पिता । आत्मा आराम । )
लोकोऽयं किल मोहिता ममतया या या न नामाचरेत
प्रत्यासन्न-महाभुजगम-परित्वगादि-घोरक्रिया ।
तां जह्याद् यदिरामदन्तासुधालाभस्य सद्भाजन
स्यादित्यत्र निदानाय तुलसीदास समुज्जृम्भते ॥ ३३० ॥

*नाथसम्प्रदाय—*

अथ नाथपथ सार बन्धं बध्यति सले ।
मूर्धा यशोपलब्ध्यान निवृत्ति सार मुनय ॥ १८६ ॥
यदि सार्ध च नश्ति च स्वर्गादिव्यपपदान्तर ।
नि गोमप्रमरिता निर्गुण नित्यमाश्रय ॥ १८७

ज्ञानेश्वर—

यद्विलासवशादात्मद्वस्तु नैव प्रकाशते ।
अलंदीपो विनाशाय तमसस्तस्य केवलम् ।। ३८८ ।।

नामदेव—

सिषेविरे हृषीकेशं सन्तो नाम सहस्रशः ।
सेवकत्वं परं नामदेव एव व्यवस्थितम् ।। ३९० ।।
यस्य नाम्नः पराख्यातिः सदा सर्वत्र राजते ।
सत्यं ब्रवीमि लोकेऽत्र सदामोदरसंगतः ।। ३९१ ।।
( स दाम ( दामाशेटी ) उदर संगतः । सदा मोदरसं गतः )

एकनाथगुरु जनार्दनस्वामी—

विध्वस्त तमस्तोमो जयति द्विजराज एव चात्रेयः
श्रितसज्जनैकनाथो जनार्दनो यस्य वंशेऽभूत् ।। ३९५ ।।
युक्तायुक्ततया किमप्यगणयन् जागर्त्यहो सर्वथा
सत्संकल्प-समर्थनाय भगवान् विन्यस्तपर्यस्तिकः ।
यत्रायस्य जनार्दनो घनरसं यच्छत्विति घ्यातवान्
दत्तस्तावदिहोदवीवधमपि स्कन्धे दधार स्वयम् ।। ३९६ ।।

मुक्तेश्वर—

श्री विश्वंभरलीलायोगो मुक्तेशभूतिमातनुते ।
या हि महाभारतरणसमुद्यमे प्राकृतान् समुण्णयति ।। ३९८ ।।
( महाभारत-रणसमद्यमे । महाभार-तरण-समुद्यमे । )
भावन्ते विबुधा सुधामधुरिमोद्गारं विधत्ते सुधा
स्फारं मुग्धकुमारवागिति पुनः सा नैव किंचिद् वयम् ।
व्यापन्नाऽस्ति चिराय यत्पुनरियं मुक्ताऽस्य मुक्ताधिया-
दुक्ता पर्वचतुष्टयी मधुरता तस्यां किम ब्रूमहे ३९९ ।।
या नाथेन समर्पिता भगवते पितुपयुद्धया सिता
या धारयाद्य मुखामृतेन हरिणा संभाव्य दत्ता पुनः ।
न्यस्ता साम्प्रतपाणिनास्य ददतो यत्रेऽङ्ग पतेदुर्दा
गृहीति प्रभुणैव तस्य यत वाक् स्वाद्वीति किं ब्रूमहे ।।४००।।
मुक्तस्थितेः पर्वचतुष्कमार्या वदन्ति सर्वत्र सतोक्तादि ।
तामन्यथाऽसौ कथमंग कुर्याद् पूर्वान् सदन्तः सवतिश्मस्य ।।४०१।।

तुकाराम—

अभंगकीर्तिग्रामेण तुकारामेण साधुना ।
अजो दशरथो नित्यं परमानन्दसम्भृतः ॥४०३॥

( तुका-अपत्य ? )

शृण्वन् वचांसि स जघन्य तुकोदितान्य—
व्यक्तान्यपि प्रमुदमेति पिता प्रकामम् ।
तैः शास्त्रगर्भभरितैः किमभंगरूपैः
युक्तं द्रवीभवति विश्वगुरुस्तदेवः ॥४०४॥

रक्षार्थान्यजनार्पितैर्नं धनैर्नित्यं द्विजानां यदि
स्यात् सन्त'णमेव वित्तपतिना गव्यो व्ययो न क्वचित् ।
तद्योगेन हरेः प्रसाद उदितः प्राज्ञप्रक्लृप्तो यत-
श्चात्मप्रत्यय उद्भवेदिह तुकारामं स्मरामो वयम् ॥४०५॥

आनन्दतनय—

गोरससेवी साधुव्रजतोषकरो यशोदया युक्तः
आनन्दसुतो हरिणा सम इत्याकारतः परं भेदः ॥४०६॥
अरणिसमुद्भूतो यो गोरससेवी परिस्फुरत्कान्तिः
आनन्दसुतोऽग्निसमो भेदस्तु पर नरानरत्वेन ॥४०७॥
प्रकटितचारुहरिगुणं मञ्जुमधुरवचनमरणिसम्भूतम् ।
तं कृष्णलिखकण्ठं शुकमहमानन्दनन्दनं वन्दे ॥४०८॥

वामन पण्डित—

स्वचोपयुक्तिकौशल्यं वामनस्य महाद्भुतम् ।
गिरेरपि समुद्भूता येन चिद्घनना द्रुतम् ॥४११॥
वामनस्य गिरीशस्य चैकमत्यं तु सर्वथा ।
इत्याह वामनो भूत्वा स्वयमेव निदर्शनम् ॥४१२॥

मयूरकवि (मोरोपंत)—

इह मुख्यश्लोपेनो कोऽभवत् कविनायकः ।
इति मीमांस्यमाने तु मयूरेशः स्मरायलम् ॥४१३॥

( मुख्य क-लोपेनः कविनायकः = विनायकः)

आर्यावितमहानन्दः सर्वलोकहृताबरः ।
विराजते मयूरेशः कलापरनिरोमणिः ॥४१४॥

या विठ्ठलपंतांनी आपल्या सुश्लोकलाघवामध्ये वर उल्लेखिलेल्या सत्पुरुषा व्यतिरिक्त, भास्कराचार्य-लीलावती ( श्लो. ३०६ ), व्यास ( श्लो. ३१६ ३१७ ), शुक्राचार्य ( श्लो. १७८ ), कालिदास ( श्लो ४१६ ४१८ ), भारवि (श्लो. ४१९), शंकराचार्य मध्वाचार्य ( श्लो. ३८२ ), मत्स्येन्द्रनाथ ( श्लो. ३८३ ३८४ ), गोरक्ष नाथ (श्लो. ३८५ ), इत्यादि प्राचीन सत्पुरुषांची श्लेषगर्भ स्तुति केलेली आहे. आणि आनन्दमूर्ति ( श्लो. ३५७ ), केशवस्वामी ( श्लो. ३५८ ), अमृतराज ( श्लो. ३६० ), सिद्धराज ( श्लो. ३६२ ), रामचंद्र पंडित ( श्लो. ३६३ ), खेचर साधु ( श्लो. ३८९ ), जनाबाई (श्लो. ३९२), सावतामाळी (श्लो. ३९३), माणकदास ( श्लो. ३९४ ), दामाजीपंत ( श्लो. ४०२ ), आनंदतनय (श्लो. ४०६ ते ४१० ), इत्यादि महाराष्ट्रीय संतांची व कवींची स्तुति आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीमध्ये केलेली आहे. अशा प्रकारची सुभाषित इतरत्र आढळत नाहीत.

श्री. म. गो. जोशी यांनी ' काव्यकुसुमगुच्छ ' नावाचा एक काव्यसंग्रह लिहिला आहे. त्यामध्ये महाराष्ट्रातील अर्वाचीन काळातले अत्यंत श्रेष्ठ संस्कृत पंडित म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांची स्तुति पुढील श्लोकात केलेली आहे.

अद्वैतान्वयि ' वासुदेव 'वचनं पुण्याभिधानं तथा
सत्यं ज्ञानमनन्तवेदकथितं श्रीशारदामंगलम् ।
आचार्यैरनुमोदितं कविवरैः कॉलेजविद्यार्थिभि-
रानंदाश्रमपंडितैरनुमतं गीर्वाणवाणीपदम् ॥ १ ॥
सम्मानं क्रियते बुधैः समुचितो द्रव्यादिकैः साम्प्रत-
मेतद्भारतभूषणं भवति भो विद्वत्सपर्यात्मकम् ।
हृद्भावानुगतप्रतीकमुचितं "श्रीवासुदेवस्य" च
सप्तत्वे फलपुष्पवस्त्रसहितं गीर्वाणवाणीपदम् ॥ २ ॥
जगन्मान्यं पूर्णं नरकविबुधानन्दफलदं
"महाभाष्यं ' यस्य प्रभवति महाराष्ट्रवचसा ।
न सौकर्यं ह्यस्मिन् मतिकुशलताभवगुणैः
सरस्वत्या गेहे भरतकुलदीपो भवति यः ॥ ३ ॥
विद्यादेवी प्रणततिरसा पूजिता येन भक्त्या
तद्रूपांगे अविरतरतो रज्यते स्नेहपूर्णा ।
श्रीति दीप्तिर्मुखसरसिजे दिव्यदृष्या विभाति
नित्यं वन्दे चरणयुगुलं शारदापादपद्मम् ॥ ४ ॥
अभ्यंकरकुलदीपस्तमेव दीपः सरस्वतीगेहे ।
भारतवर्षाभरणं सार्थं श्रीवासुदेवपदमस्ति ॥ ५ ॥

( काव्यकुसुमगुच्छ, पृ. ७-८ )

भारत सरकारचे माजी अर्थमंत्री व विद्यापीठ आयोगाचे अध्यक्ष, सर चिंतामण द्वारकादास देशमुख हे उत्कृष्ट संस्कृत कवि आहेत. त्यांच्या 'गांधीसूक्तिमुक्तावली' चा उल्लेख मागे एका प्रकरणात केलेला आहे. श्री. देशमुख हे कविवर्य रवीन्द्रनाथ टागोर यांना एकदा ( इ. स. १९३९ ) भेटावयास गेले. त्याप्रसंगी त्यांनी कविवर्यांना जी काव्यदक्षिणा समर्पण केली ती सुभाषितगुणांनी युक्त असल्यामुळे येथे उद्घृत केलेली आहे.

राज्ञोऽन्तिकं रिक्तकरो न यायात् पुरो गुरूणां न विदायशून्यः ।
न मन्दिरं विस्मृतगन्धमाल्यो द्रष्टुं च बन्धुं न विनोपहारम् ॥ १ ॥
राजा बृहद्वाङ्मयसमृतेस्त्वं गुरुर्नरोद्धारपराशयानाम् ।
नन्वीश्वरो भारतभावनानां सर्वस्य बन्धुर्वसुधाकुटुम्बः ॥ २ ॥
उपस्थितोऽहं तव दर्शनाय कवीश ! किं ते गुरु कल्पयेऽर्घ्यम् ?
मन्दप्रबोधस्तमसावृतोऽसौ रवीन्द्र भूत्वात्र इव प्रदीपः ॥ ३ ॥
स्मरामि रामाय तु वन्यरामा दन्तव्रणाङ्कानि ददौ फलानि ।
मेघार्थमर्घ्यं कुटजप्रसूनैः चकार यक्षः कृपणो विवासे ॥४॥
पूगीफलं भाग्यमवित्तदत्तं भवेत् कदाचिद् विजयाह्वतिभ्याम् ।
दाम्याश्च चामीकरमेव पत्रं दानार्थमाप्तुं गणनावलम्बि ॥५॥
तस्मात् कवे साहसमातनोमि कृताञ्जलिस्ते करुणोपहारम् ।
समर्पयन् विस्खलितानुविद्धं विवक्षुरल्पं हृदयस्थितं यत् ॥६॥
धन्योऽस्मि यद्दर्शनमाप्तवांस्ते आर्यप्रभामर्मविचक्षणस्य।
वाग्वंजयन्तीधरनायकस्य मनुष्यकल्याणधृतव्रतस्य ॥७॥
त्वत्तः समिद्धा हृदये स्फुलिङ्गा ये ये जनानां विविधासु दिक्षु ।
तेषां ज्वलत्त्वन्यतमो ममापि स्वान्तं प्रविश्य स्वर्रानि विनाश्य ॥८॥
आशा ममैषा यदयं स्फुलिङ्गः सवर्धमानो ज्वलतु प्रकाण्डम् ।
सैव प्रदेया गुरुदक्षिणा ते सन्देशपूर्तिः कथमन्यथा । ९॥
अलं प्रलापेन न रागणाया उद्वेजनीया गुरवः श्रमार्ताः ।
शान्तिः सदा शान्तिनिकेतनं ते विराजतां स्वान्तविशोधजन्या ॥१०॥
( संस्कृतभवितव्यमुमध्ये प्रकाशित )

श्री महालिंगशास्त्रींच्या "व्याजोक्तिरत्नावली" तील काही सुभाषिते पुढीलप्रमाणे आहेत.[२]

---

२. 'व्याजोक्तिरत्नावली'– महालिंगशास्त्रीविरचित. 'साहित्यचन्द्रशाळा'– तिरवलंगडु, [ P. O. तञ्जावर जिल्हा. ]

यस्मादप्सरसः सुधा हिमकरः श्रीरित्यभूवंज् जगत्
प्रह्लादैकरसाः सुपर्वपरिषन्निर्व्याजभाग्योदयाः।
तस्मादेव पयोनिधेर्यदुदगाद्धालाहलोऽपि स्वयं
प्राणिप्राणहरः किमस्ति गमकं सौजन्यदौर्जन्ययोः ॥ ३८ ॥

वार्तैरेव तु वर्तनं वनभुवि स्वैरो निवासग्रहो
निर्मुक्त्यापि निचारवचः फणिपतेस्त्यागस्तथाऽन्यादृशः।
खेला मण्डलबन्धविस्तृतफटाटोपैर्दृशोरुत्सवो
नो चेत् प्राणहरं मुखे विषमसौ कस्यास्तु नो वल्लभः ॥ ३४ ॥

आयुः पुष्टिविवर्धनं तव पयः साकं विवर्तैर्निजैः।
दातुं रक्षितुमुत्तमं भुवि घनं धर्मार्थिनां त्वां विदुः।
तीर्थं मङ्गलधाम दैवतनिभा हा धिक्, त्वमर्यादया
मातर्गाः कथमद्य शौनककरे पापाशयैः पात्यसे ॥ ९२ ॥

नागपूरचे म. म. केशव गोपाळ ताम्हण यांच्या कविता संग्रहांतील[१] समस्यापूर्तीची चार सुभाषितें लक्षात ठेवण्यासारखी आहेत. ती अशीः—

दुरासाद्या लंका जलधिपरिखा राक्षसवृता
द्विपञ्चास्यः स्वामी परमनिभृताऽशोकवनिका।
कपिरप्येकस्तीर्त्वा जलनिधिमपश्यज्जनकजां
क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥१॥

नवच्छिद्रः कायः सततगतयः पञ्चमरुतः
चलं चेतोऽत्यन्तं परममवशश्चेन्द्रियगणः।
रुणद्धयेतान्यन्तर्नियमविधिमास्थाय पुरुषः
क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥२॥

वधूरेका मूर्ध्नि प्रतिवसति चान्यार्धवपुषि
कपालाद्यो भाले सततविजयाप्राशनरुचिः।
तयापीक्षामात्रात् स्मृतिपथमनैषीन्मनसिजं
क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥३॥

वयोऽत्यल्पं वासः कतिपयदिनानि क्षितितले
प्रचण्डः पाखण्डप्रवचनपटुर्वादिनिवहः।
व्यजेष्टैकः श्रीमान् शिवगुरुसुतो दुर्मतजुषः
क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे ॥४॥

---

१. कवितासंग्रहः—महामहोपाध्याय केशव गोपाळ ताम्हणकृत; कर्नाटक मुद्रणालय; ठाकुरद्वार, मुम्बापुरी.

सातान्याचे कवि श्री. दिगंबर महादेव कुळकर्णी यांच्या 'धारायशोधारा:'[४] यामधील उत्कृष्ट सुभाषिते पाहा —

आयुर्वर्षशतं नृणां परिमितं रात्रौ तदर्धं गतं
वाक्यं भर्तृहरेर्यथार्थमभवद् ह्यज्ञातदीपे युगे ।
सम्प्रत्यध्ययनं त्वयः प्रवसनं क्रीडा तथार्जनं
शक्यं येन कृतं निशीथसमये दीपाय तस्मै नमः ॥

वैरं नश्यति दुःखमेति सुचितां कीर्ति गुणी विन्दति ।
सर्वं हीनगुणं प्रयाति विलयं श्रेष्ठं पुनस्तिष्ठति ।
यीतं भाति वयो युगादिमधुरं दूराद् यथा पर्वता
मत्ता यस्यवशाद् भवन्ति विमदाः कालाय तस्मै नमः ॥

गीताः सुगीता विलसन्ति भरि तथापि मुख्या भगवत्प्रणीता ।
अंशावतारा: परमेश्वरस्य पूर्णावतारेण कथं समाना: ॥ (१२६)

पपाठ वेदं महिषोऽपि सम्यग् ज्ञानेश्वराणां कृपया तथैव ।
अन्धस्य दृष्टिर्गमनं च भित्तेः सतां प्रभूताः किल सन्ति लीलाः ॥(११३)

चिच्छेद रामो जननीशिरोऽपि तत्याज राज्यं रघुराजसूनुः ।
ददौ पुरर्षीवनमात्मपित्रे आज्ञा गुरूणां ह्यविचारणीया ॥१३॥

श्री. लाटकर शास्त्री यांच्या साहित्यसेवेचा उल्लेख इतरत्र आलेला आहे. त्यांच्या ' अनंतचरितम् ' (अनंत शिवाजी देसाई टोपीवाले यांचे चरित्र) या गद्य ग्रंथांतील कांही पद्य सुभाषितें पुढीलप्रमाणे आहेत.

वाल्मीकी राममस्तौदपि स कुलगुरुः कालिदासस्तमेव
श्रीव्यासो मन्दमूनं कथमपि च रिपुं भार्गवः स्वीचकार ।
मोदन्ते विप्रपूर्वाः जनुषि रघुपतेः क्षत्रियस्यापि यद्वद्
वासिष्ठे नो तथा ते क्वचिदिह हि गुणाः प्रीतये नैव जातिः ॥(पृ. ३)

स्वार्थं चिन्तयतः कुटुम्बभरण-व्यापारलोलोऽधिकः
तस्माद् भद्रतरः स्ववाग्व्यय-जनोद्धारोद्यमी मानवः ।
एवं जातिहिते रतोऽपि पुरुषोऽनल्पप्रशंसोचित
देशोद्धार-समर्पिताखिल-धनात् हीनोऽपि मर्त्योत्तमात् ॥ (पृ. ४)

---

४. धारायशोधारा:—कवि दिगम्बर महादेव कुळकर्णी, चैतन्य मुद्रणालय, सातारा.

धर्म्यैर्विष्णुपदात् तथा हिमगिरेरग्रात् समानीय यद्
गाङ्गं वारि वितीर्यते बुधजनैस्तत् सादरं सेव्यते ।
गङ्गीभूतजलां तु पर्वणि नदीं कृष्णां गदन्तो द्विजाः
स्तोयं विभजन्ति किन्तु सुजनास्तत्रापि बद्धादराः ॥ (पृ. ५)
दीपात्कज्जलमर्कतोऽपि च शनिः क्षाराम्बुधेः कौस्तुभो
व्यासश्चापि पराशराच्छ्वपचात् संभाजिराजोऽभवत् ।
एवं सन्त्यमिता महालघुसुताः क्षुद्रा महान्तोऽप्यतो
जानीमोऽत्र न केवलात् पितृगुणात् साधुत्वभाजो जनाः ॥ (पृ. १५)
अप्राप्तपक्षराजिस्ताक्ष्यो नीडस्थ एव भुङ्क्तेऽन्नम् ।
अम्बरगतिक्षमस्तु स आश्रीपतिपदयुगं भ्रमति ॥ (पृ. ४२)
लब्ध्वाऽपि पैतृकधनं विपुलं विमूढाः
कार्श्यं नयन्त्यनुदिनं क्रयविक्रयाभ्याम् ।
ये बुद्धिपौरुषयुता अपि तेऽधना द्राक्
अल्पैरहोभिरलका-पतितां प्रयान्ति ॥ पृ. ४९ ॥
तोयेऽल्पे यस्तरति शिशुको लीलया यौवने स
स्रोतःसङ्गात् प्रविशति झषोऽम्भोनिधिं तत्र चापि ।
आपातालं मुहुरुपगतः स्वेच्छया रत्नराशीन्
क्रोडीकुर्वन् विहरति सुखं कौतुकाद् यावदायुः ॥ पृ. ६०
विद्वांसः स्वगुणोत्सुकान् सुवणिजः केतूनल्पांस्तथा
लीलाहार्यधनांश्च चौर्यनिपुणाः सेव्यान् नरान् सेवकाः ।
मुग्धान् वञ्चनजीविनोऽपि कितवा यस्यां लभन्तेऽखिलाः
सैवा सर्वशरण्यतामुपगता मुम्बापुरी राजते ॥ पृ. ३५
नाहं क्षत्रियवंशजो न च नटो नो गायको मान्त्रिको
नो, नो चित्रपटादिदर्शनपटुर्नो साक्षरोऽस्पृश्यजः ।
ज्योतिर्ज्ञानविशारदो न हि मतिर्वैदेशिको नो भिषग्
बह्वी राजकृपा कुतो नु सुलभा तद् ब्राह्मणस्याधुना ॥
( लाटकरकृत शाहुचरितम्, पृ. ७ )

अखिलानन्दशर्मा यांनी रचलेल्या दयानन्ददिग्विजयः या ग्रंथांतील काही सुभाषितें पहा–

'परहितानुरतो न हि दृश्यते जगति कोऽपि महान् पुरुषोत्तमः । ४-१२
बहव एव भवन्ति गतानुगाः सकलकृत्यविधौ जगतीतले । ४-१४
मलिनता न दधाति गुणे पदम् । ४-१५
न मधुरेऽस्ति कषायवतां रुचिः । ४-१६

दिवसभीत निशाटन सन्तितिर्न रविदर्शनमिच्छति कर्हिचित । ४-१८
विमलदर्पण एव विराजते मुखशशिद्युतिरुत्तमवर्त्मणाम् । ४-२०
जगति ये विमुखा प्रकृति जडामनुनयन्ति कथ न हि ते जडा ।४-२१
तदपरं किमिहास्ति महीतले यदुदरंभरिभिर्न कलङ्कितम् । ४-१६
पत्युरनुवर्तनं खलु विवाहितायाः श्रुत परो धर्मं ।
मनसो यत्र न वर्तनमम्ब विवाह कथ स धर्माय ॥
सयोगितास्वयवरम् पृ. ३१

भक्ता परेश यनिता पुमास लतास्तरु धूर्तजनास्तु लुब्धम ।
खगाश्च नीड सरित समुद्र व्रजन्ति तद्वत् कवयो नरेन्द्रम् ॥
सयोगितास्वयवरम्, पृ. ५३

आच्छादितो जलधरैरपि कि विवस्वान्
नाविष्करोति निजमप्रतिम प्रकाशम् । सयोगितास्वयवरम्, पृ. ५६
मातुर्गुणा हि तनयानुगता भवन्ति ॥ स. स्व., पृ. ६४
ताप विना का घटना दृढा स्यात् ॥ कालिदासप्रतिमा, पृ. १८-६,
वेंकटराघवकृत.

ननु रसमयसृष्टिर्यातिसृष्टेर्विशिष्टा ॥ कालिदासप्रतिमा प्रथात-
श्रीनिवासाचार्येषु ४०-३
रम्याकृतीना न हि देशकालौ ॥ ,, ४०-४
तारापथस्तारकाभि क्षुण्ण किं याति सक्षयम् । आह्निकस्तव, पृ. ३०
पुस्तकमन्त्रैर्मस्तकभार । निवह न्धो वेद न सारम । ,, पृ ८३
लोकोत्तर खलु गुणो बहुदु लभूलम् । किङ्किणीमाला, ९५-२४
सर्वं स्फुटेऽपि निजदोषगणे न विद्वान् । किं. माला, ९२-१२
स्थानप्रभाव परपोडकानाम अर्थोपपत्ति कृपणाशयानाम् ।
दम्भान्यितानां महनीयतेति त्रोण्यत्र मे मर्मविघट्टनानि ॥ ,, ९३-१७
काव्यवद् व्यवहारेऽपि व्यङ्ग्यस्यैव प्रधानता । किं माला ९३-१८

अम्भो वहन प्रतिहत भवति प्रवृद्धम
षड्गारराशिरनिलोपहत समिन्धे ।
उ मेघमुज्ज्वलधियामुपरोद्धमेते
दाशयन्ति कि भवपरिश्रमजा विपाका ॥ किं. माला १००-७

शरीरं वाङ्मयानित्य कल्पान्तेऽप्यभङ्गुरम् ॥ किं. माला १०१-८
न नृपा क्षुद्रधिय क्वचिद् भवन्ति । द्राविडार्यासप्तशति २-२१
नारीवय खलु कुचद्वयिमानुमेयम् । द्राविडार्यासप्तशति १-४०
यत्रैजगत्कृदाम्भादयते प्रलीना। हीना क्यारतदितरे सु न मे यजन्ते। १-३

| | |
|---|---|
| व्यस्तस्य चिह्नं व्यसनोन्मुखत्वम् ॥ ४७ ॥ | पृ. २४ |
| पातः पदध्वस्ययपूर्वको हि ॥ ४८ ॥ | |
| धाम्ना धनं ये लघयन्ति तेषां संपद् विपद् वा न सतां प्रमाणम् ॥५६॥ | |
| लोकोपकारस्थिरनिश्चयानां कुत्राऽनयानां परिहीयते किम् ? ॥५७॥ | |
| नूनं दुरंतः फलितः कदाचित् किं दुर्नयः स्यात् सफलः सदैव ॥५८॥ | |
| दैवी हि शक्तिः प्रतिभूर्जयस्य ॥ ६१ ॥ . . . | पृ. २७ |
| स्वास्थ्यं कुतो दुर्जनसप्रसक्तौ ? | |
| रज्जुः किलाऽसावुभयाग्रपाशा ॥ ६३ ॥ | |
| क्वचिन्न्यायपीठं रणात्साऽन्यदस्ति ॥ ६५ ॥ . . . | पृ. २८ |
| गर्ह्यं हि धर्मं महता भवति व्रपार्यं ॥ ७ ॥ . . . | पृ. ३० |
| न्यूनं हि पूरयति यः स खलूपदेष्टा । | |
| द्वेष्टा तु दुष्टवचसा रसिकः प्रयोगे ॥ १३ ॥ . . . | पृ. ३१ |
| बोध. क्वचिद्धि विषये गुरुसव्यपेक्षः ॥ २६ ॥ . . . | पृ. ३४ |
| ज्ञान सुपात्रनिहितं महितार्थकारि ॥ २८ ॥ . . . | पृ. ३५ |
| भस्मोच्चये हि रभसं वितथ हुतं स्यात् ॥ ३१ ॥ . . | पृ. ३६ |

देहाद्युपाध्यपहृत सुसनातनोऽपि
भ्रात्यैव नूतन इति प्रतिपद्यतेऽयम् ।
यातीति चोद्यलयो क्रियते ततोऽस्मिन्
भूमेर्भ्रमेरिव रवौ विपरीतबुद्धिः ॥ ३९ ॥ . . . . पृ ३७

मृत्योर्न बिभ्यति हि ते सुधिय. कृतार्था ।
योगात् कुतश्चिदनुजु वृणते च पक्षम् ॥ ४३ ॥

अध्यात्मधीभुवि ततो नियत प्ररोहेद् ।
धर्मद्रुम गुरुफलः समतर्कबीजः ॥ ४६ ॥

स्वस्याप्रिय किमपि यच्चरित परेण ।
तत्तु स्वय हि वितथ न परस्य कुर्यात् ॥
सर्वेषु साधु च यथाविभव विदध्याद् ।
धर्मस्य तत्त्वमुचित तदिदं समस्तम् ॥४८॥

| | |
|---|---|
| ज्यायान्स्तु स्वजनतः सहजः स्वधर्मः ॥५१॥ . . . | पृ. ४० |
| ज्ञानं न सामिकृतधीलसितं यथार्थम् ॥६२॥ . . . | पृ. ४३ |
| दीप्तिमान् हि भगवद्वच.क्रमः ॥२॥ . . . . . | पृ. ६८ |

निश्चयो हि ननु मार्गदर्शकः ॥८॥ . . . . . . . पृ. ६९
पंकिलं हि जलमल्पपल्वले ॥२५॥ . . . . . . पृ. ७३
केवलं च फलमिच्छतां कुतः कर्म सम्यगुचितं विधीयते ? ॥२६॥ पृ. ७३
तस्य तस्य विषयस्य संततं चिंतनं हि विषमत्वजीवनम् ॥ पृ. ७४
पारतन्त्र्यमिह कस्य नाऽप्रियम् ? . . . . . . पृ. ७५
ईश्वरप्रणिहितं शनैः शनैः शर्म किं किमिव नाऽऽवहेन्मनः ? ॥ पृ. ७५
या च भक्तिरनुरक्तिरीश्वरे सा हि शक्तिरखिलातिशायिनी ॥ पृ. ७५
नूनं सार्वदिकोपयोगि तदिदं तत्त्वं समत्वं पुनः ।
कालेये कलहाकुलेऽस्तु सुतरां काले किलाऽऽलंबनम् ॥ . . पृ. ८०
निमित्तमात्रकर्तृत्वं जनस्याऽस्य बहिर्भवम् ।
स प्रयोजककर्ताऽन्तः प्रचोदयति यो विभुः ॥५९॥ . . पृ. ८०

शिवकुमारशास्त्रीकृत यतीन्द्रजीवनचरितांतील सुभाषित—

"दिने दिने कालफणी प्रकोपं
कुर्वन् समागच्छति सन्निधानम् ।
निपीत-मोहासव-जातमादो
न भीतिमायाति कदापि कोऽपि ॥"

अर्वाचीन संस्कृत साहित्यांत व सुभाषितसंग्रहात अनुवादित साहित्याने फार भर घातली आहे. अनुवादित साहित्यासंबंधी सविस्तर माहिती पुढे एका [प्रकरण]ात येईलच. येथे विविध भाषांतील उत्तम सुभाषिताचे संस्कृत अनुवाद दिले आहेत; त्यावरून संस्कृत साहित्यांतील सुभाषितांचा संग्रह कसा समृद्ध होत आहे याची सहज कल्पना येईल.

समिन्धे ज्ञानाग्निं विनयहविरह्नाय रुचिरम्
तिरोधत्ते घनं मद-रचित-धूम्रोपपटलम् ।
सुविद्यां वन्दारुः क्व च उदासतः प्राप सुभगाम्
विपश्चित् पोतारूढः स्मय-विहित-पोतव्यसनात् ॥ 'सूक्तिरत्नावली,' २४

स्निग्धात्मा परहृदयानुरागशीलः ।
सम्प्राप्नोत्यननुपलब्धितो विभूतिम् ।

५. 'सूक्तिरत्नावलि' ले. प्रभाकर दामोदर पंडित, श्री बायजी मुद्रणालय, जळगांव (पू. खा.)

संश्लिष्टा तरुमनुरक्तवल्लरीयम् ।
उच्छ्राय स्वयमधिगच्छति प्रकामम् ॥ सु. र., १५

मन्दोऽप्यनारतमनुष्ठित उद्यमश्चेद् ।
अत्यद्भुतं किल फलं तनुते विशालम् ।
पीत्वा शनैरनिशमम्बिरसोत्ययाप्य ।
जातो विहायसि बलाहक एव भीम ॥ सूक्तिरत्नावलि, १७

द्रष्य साम्प्रतिकार्य-सिद्धि-निपुणस्तात्कालिक संग्रह
अस्यास्तु निजजङ्गमार्यनिवहो माऽभूद्गुणा दैवतम् ।
रम्यं क्रीडनकं विनोदनपटु स्वल्पावधि स्याच्छिशो
शश्वच्छान्ति-सुखैकधाम-सुभगं मातु पदं मङ्गलम् ॥ सु. र., ८

विश्वशान्तिप्रदो लोके परमं दोषाकरं स्वयम् ।
निर्दोषोऽपि रविश्चण्डो ललाटतप उत्पत्ते ॥१॥

## गान्धीसूक्तिमुक्तावलींतील[१] सुभाषिते

क्वचिद् भवेदल्पवचा विवेकभ्रष्टो ब्रुवाण प्रतिशब्दमाता
भूयिष्ठसाहाय्यदमस्ति मौनं ग्वस्मादृश सत्यगवेषणस्य ॥५७॥

अवितथसुवमाणामुद्भवो निर्मितीनां
भवति तदवबोध सत्रियोऽभ्रान्तिमांश्चेत् ।
अथ तु विरल्पाता जीयोऽमी क्षणाश्चेत्
विरलतरनिपातास्तानवेम कलायाम् ॥७६॥

कलाया शृरसनाया गुरुतरमहो जीवनमत
प्रयच्छ्यग्रे यस्य व्रजति निकट जीवनमति ।
प्रकर्ष स श्रेष्ठो भवति हि कलाकृत्सु न कला
चतुष्कोणं हित्वा विहितदृढमूल सुचरितम् ॥८०॥

तथा शरीर मम दोषपात्रं यथाऽवलिप्तस्य नरान्तरस्य ।
तस्मादिय मे प्रतिपत्तिरस्ति यथाऽपरो भ्रान्तिपरस्तथाऽहम् ॥१२॥

यथ सर्वे द्रुता भवितुमलमीशस्य कल्पे
यदि स्वस्था मुग्धो भयमनुत्तरेभ्यश्वरमृतम् ।
अयं मे विश्वासो यदहमनुगच्छामि ननु सत्
प्रभो सत्य स्वध्वाऽखिलमनुजजातेरपि मयम् ॥

---

१ प्रकाशक—गांधी स्मारक निधि, राजघाट, नवी दिल्ली. मुख्य विक्रेता—सस्ता साहित्य मंडळ, कनाट सर्कस, नवी दिल्ली, १

## अभङ्गरसवाहिनींतील सुभाषितें

सुवर्णपात्रं पयसा प्रपूर्य पुरो हितं चेद् बत कुक्कुरस्य ।
मुक्ताफलानां यदि नाम हारः खरस्य कण्ठे निहितः कदाचित् ॥
कस्तूरिका घ्राणसुखस्य हेतोः दत्ता कदाचिद् यदि सूकराय ।
ज्ञानोपदेशो बधिरस्य कर्णे कुतो यदीमानि कुतः फलेषु ॥
यद् येन वेद्यं स तदेव वेद भक्तेतरो भक्तिरसानभिज्ञः ॥

अभङ्गरसवाहिनी, ३५

सा श्रेयसी नीचदशा मता मे मूर्च्छन्ति यस्यां न हि मत्सराद्याः ।
पूरेण हार्या महता हि वृक्षाः तिष्ठन्ति सुस्थाः खलु वेतसास्तु ॥
ये सन्ति नीचैः शिरसः पुरस्तान् तुङ्गास्तरङ्गा अतियन्ति सिन्धोः ।
अहो बताग्रे चरणानतानां नूनं बलाढ्या अपि दुर्बलाः स्युः ॥ ५५

हस्तौ पादौ चान्दनो चन्दनस्य स्पर्शस्यांगं सर्वतः स्पर्शरूपम् ।
एवं तावद् दुर्गुणो नाम कश्चिद् नैव द्रष्टुं शक्यते सज्जनेषु ॥

श्री. तुकाराम महाराजांच्या अभंगपदांचा हा संस्कृतानुवाद श्री. म. पां. ओक, (संस्कृताध्यापक, पुणें) यांनी केलेला असून तो 'अभङ्गरसवाहिनी' नांवानें प्रकाशित झाला आहे.

## 'द्राविडार्यासुभाषितसप्तति'तील सुभाषितें

साधूनामुपकृतमश्मखण्डप्रोत्कीर्णाक्षरबन्धवन्निरूढम् ।
यन्मूर्खेष्वघृणिषु तत्तु तुल्यं कीलाले लिखिताक्षरानुपूर्व्याः ॥ २-३

सन्तप्तं मधुरमतीवदुग्धं निर्दग्धो धवलतरश्च शङ्खः ।
विद्विष्टा अपि साधवस्त एव स्निह्यत्स्वप्यपसौहृदास्तु नीचाः ॥ २-५

'अमृतोर्मिल' नांवाच्या नवीन स्वकल्पित वृत्तांमध्यें दोन श्लोक महालिंगशास्त्रींनी रचले आहेत ते असे—

साक्षात्सन्दर्शनमपि, मङ्गलं, । सेवा, साक्षे स्थितिरन्नपाता ।
तत्साद्गुण्यस्तुतिरपि भूत्यं । साक्षात्सङ्गो निरुपमफलदः ॥ २-९
व्याघ्रस्यामयहर्ता वैद्यः । तस्यैवाशनमचिराद् भविता ।
प्रायः क्षुद्रे कृत उपकारो । याति ग्रावाहतभाण्डदशाम् ॥ २-६१
भोगार्हे वयसि च दुर्विधित्वं । वार्धक्ये विभवागमं च धिग् धिक् ॥ २-४
मानोदग्रा रिपुषु न कृपणा । . . . . २-७

अशा प्रकारें अनेक कवींचीं सुभाषितें उद्धृत करून प्रस्तुत प्रकरण हवें तेवढें वाढविता येईल. शेवटीं मन्दोर्मिमाला या आमच्या स्वकृत सुभाषितप्राय काव्य संग्रहांतील कांहीं सुभाषितें उद्धृत करून हें लांबलेलें प्रकरण समाप्त करीत आहे.

प्रकृतिमहता दोषोऽप्येषा ध्रुवं सुगुणाग्रहः । . . . . १३-४
औदासीन्यं भजति हि महान् यत्र नीचोऽग्रगामी । . . . १३-६
कामं चरन्ति सुजना अपि दुर्जनेषु
नाङ्गीकृता तदपि तैर्विकृतिस्तदीया । . . . . . १३-९
किं हंसी सिकतासु तुष्यति लसन्मुक्ताकणास्वादिनी
किं वा दग्धवने रमेत नितरां चूतप्रिया कोकिला ।
किं दृष्ट्वा भ्रमरी कदापि कुटजं फुल्लारविन्दप्रिया
किं कल्याणपरायणा सुजनधीः सञ्चिन्तयेत् पातकम् ॥ . १४-१४
वारां निधिं ऊर्मिभिरुष्यति बिन्दुशोषे
पर्णेऽथवा विगलिते विमरण्यनाशः । . . . . . १५-१९
प्रोच्चण्डो जलबिन्दुना किमु कदा दावानलः शाम्यति । . १६-२३
वैरं सदैव परितः परिशङ्कनीयम् । . . . . १९-३७
नाशोऽप्यल्पीयसा श्रेयान् सुखं चेद् भूयसां भवेत् । . . १९-४१
दुष्काव्यं यदि रत्नवर्णलिखितं किं स्याद्गुणैर्मण्डितं ।
गीता यद्यपि भूर्जपत्रलिखिता किं स्याद् विहीना गुणैः ॥ . २०-४३
पादाघातं लभन्तेऽमी ग्रावाणश्चिरजीविताः
मूर्ध्नि तिष्ठन्ति पुष्पाणि स्वल्पीयस्यपि जीवने ॥ . . २०-४४
नभश्चरतया किं स्यान्मशको गौरवास्पदम् ॥ . . . २०-४६
श्रेष्ठत्वं भुवि को लभेत नितरामुच्चैः प्रभावं विना . . २०-४७
सुगन्धसारस्य तु चन्दनस्य घृष्टावितेनैव यशोविकासः . . २१-५०
सेवा भूतलभारभूतवपुषां भूपाऽपि दोषास्पदम् . . . २०-५१
तिलप्रायेण लोकानां सुखेन सुखिनो हि ये ।
विदन्ति पर्वतप्रायं सुखं हि निजजीवने ॥ . . . २१-५८
फुल्लारविन्दमधुपान विधौ निमग्नो
निर्वेदमेति किमु नाम मधुव्रतोऽसौ । . . २३-६४
योऽस्मान् विकासयति तं सततं स्मराम । . . . २३-६५
हस्तं प्राप्य सुपूर्णतां गलन्ति सुफलान्यपि । . . २३-६६
शीर्णानि किन्तु कुसुमानि पुनस्तथैव ।
विदन्ति कान्तिमयं मामृतसिञ्चनेन ॥ . . २४-६८

सर्वः करोति सरसेषु हि पक्षपातम् । . . . . . २५-७७

जीवतस्तु मृतप्राया भासन्ते ये गुणाः सदा ।
त एव म्रियमाणस्योज्जीवन्तीव पुनः पुनः ॥ . २५-७८

आश्चर्यं गुणिनां न चैकमपि यद्दोषं सहन्ते जनाः । . . २५-७९

लब्धोत्कर्षो भवति बहुधा बुद्धिहीनोऽविनीतः । . . २५-८०

प्रीतिविश्वासयोर्लोके हानोपादानतुल्यता । . . . २५-८२

विधिरिह यदि हन्त प्राप्नुयात् प्रातिकूल्यं
भवति गुणनिधीनामप्यध.पात एव । . . २६-८४

पुष्पशय्यासु भाग्येन कश्चित्संस्थाप्यते सदा ।
हन्त दुर्भाग्यतोऽन्येषां वह्निशय्याऽपि दुर्लभा ॥ २९-१०२

विश्वसत्यं क्षणमपि न तरसज्जनैश्चञ्चलेषु । . . ३१-११२

क्रिया न क्षुद्राणां फलति सुखलभ्येऽपि करणे । . . ३१-११६

अवाच्यावादकत्वं हि लक्षणं परमं सताम् । . . ३२-१२१

विषकन्यासमाश्लेषः खलस्य मधुभाषणम् । . . ३२-१२३

मुञ्चन्ति ते जलमुचो न सुवर्णबिन्दून् । . . ३२-१२७

ते राजवल्लभाः खलु प्रतिष्ठितास्ते गुणैर्विना लोके ।
लाङ्गूलचालनकलां प्रकटयितुं यैः प्रदर्शिता प्रतिभा ॥ ३४-१३४

विकसति कलिका किं बन्धनाद् विप्रलूना । . . . ३५-१४३

तद् विश्वोन्नतमाप्नुमर्हति पदं को नाम वैनायकम् । . ३५-१४५

भक्तानां प्रविशन्ति कर्णकुहरे दीनस्य नाभ्यर्थनाः । . . ३६-१५१

कः संसारे लवमपि सुखं विन्दते पारतन्त्रे । . . . ३७-१५७

वरं मुकुलितावस्था न गन्धो न प्रफुल्लता ।
लिहन्ति चञ्चरीका यत् कृन्तन्ति ललना अपि ॥ . ४३-१८६

दानं स्यादुचितं परं जलनिधे नोच्चैस्तरां गर्जनम् । . ४३-१८७

न किं पावकः कानने दह्यमाने
शिवया चन्दनं भस्मशेषं करोति ॥ . . . ४९-२२१

न हि न हि खलु दुःखं पारतन्त्रेण तुल्यम् । . . . ५१-२३२

आङ्ग्लानां समुपासते हि बहवो भाषां घनाकांक्षया
उच्चैर्घोषमय स्तुवन्ति बहवस्ते राज्यभाषां हि ताम् ।
सेवन्ते ह्यभिमानतः सुकृतिनस्तां मातृभाषां निजाम् .
अस्माभिः सुरभारती रसवती सेवार्थमङ्गीकृता ॥

सौवर्णं सकल वपु सुललिता चञ्चू सुमाणिक्यवत्
मुक्ता मानसपद्मकेसरमहो जानामि भोज्य तव ।
निरक्षीरविवेकिनी मतिरदो लीलोपमान गत
किं सर्वैरपि हस ! मण्डनगणैर्नाधासि चेद् दृक्पथम् ॥

कान्ति विदन्ति य पराप्य सतत तेजो मदीय विधु
सिन्धुर्मामवमत्य हर्षमतुल तस्योदये विन्दते ।
बाष्पीकृत्य रवि करंजलनिधि चन्द्र करोत्यप्रभ
नैवापचित्तमानसा खलु परोत्कर्ष सहन्ते जना ॥

दुष्टाना परपीडन सुखकर लोकोपकृत्य सता
मूर्खाणामतिभाषण च विदुषा सत्य मित भाषणम् ।
भीरूणा शरण परन्तु मरण वीराग्रणीना रणे
स्त्रीरूप खलु कामिना प्रियतम स्त्रीणा स्वल्पस्तुति ॥

माधुर्य वचसा गुण सुचरिते शान्त प्रधानो रस
बोधव्यञ्जकता तथा प्रतिपद सच्छास्त्रपूता गिर ।
दोष क्वापि कदापि नैव घटितो नालकृतौ वासना
तन्मन्येऽखिललोकनिर्वृतिकर काव्य सता जीवनम् ॥

अशा प्रकारें आधुनिक कवींचीं सहस्रावधि सुभाषितें संकलित करता येणे शक्य आहे, याची ऐषमात्र कल्पना देण्यासाठी या प्रकरणात आम्ही काही सुभाषित (संपूर्णश व खण्डश ) उद्धृत केलीं आहेत. संस्कृत भाषेच्या प्रचारासाठी व पुनरुद्धारासाठी प्रयत्न करणाऱ्या एखाद्या अखिल भारतीय संस्थेने अर्वाचीन सुभाषिताच रत्नभाण्डार प्रकाशात आणण्याचा प्रयत्न करायला हवा. नाहीतर हें सारें निधान काळाच्या भक्ष्यस्थानीं पडल्याशिवाय राहणार नाही.

---

## प्रकरण १७ वें

# धार्मिक आश्रमांची संस्कृतसेवा

संस्कृत वाङ्मयाइतकें इतर कोणत्याहि भाषेंतील वाङ्मयामध्ये अध्यात्मिक विषयाला वाहिलेलें वाङ्मय आढळत नाही. इतर भाषांमध्ये जें कांही अध्यात्मिक साहित्य आज आढळतें, त्या सर्वांचें मूळ संस्कृतातच आहे. द्वैतवादी, अद्वैतवादी इत्यादि तात्त्विक सम्प्रदायाचें किंवा भक्तिमार्गी, कर्ममार्गी व ज्ञानमार्गी साधकाचे आधारभूत ग्रंथ संस्कृतातच आहेत. वेद, उपनिषदें व भागवतादि पुराणें यांच्या आधारावरच विविध तत्त्वज्ञानाचा व साधनामार्गांचा विकास भारतात झालेला आहे. आपल्या सिद्धान्ताच्या परिपोषासाठी किंवा प्रचारासाठी शैव, वैष्णव, जैन, बौद्ध इत्यादि नानाविध सम्प्रदायाच्या विद्वान् अनुयायांनी आपल्या सिद्धान्ताला अनुकूल असें काव्यनाटकादि साहित्य फार मोठ्या प्रमाणात संस्कृतात निर्माण केलें या विविध सम्प्रदायातील आचार्यांची संस्कृत साहित्य सेवा निरन्तर चालू असून त्यांनी निर्माण केलेलें साहित्य हि फार मोठें आहे.

साधारणत अकराव्या शतकापासून इतिहासातलें मध्ययुग सुरू होतें. या मध्ययुगाच्या आरंभापासून ज्ञानेश्वर, तुलसीदास, चण्डीदास, नरसी मेहता इत्यादि श्रेष्ठ साधुनी संस्कृतानभिज्ञ जनतेच्या उद्धारासाठी, प्राकृत भाषेमध्ये संस्कृतातील अध्यात्म विद्येचा सुकाळ करण्यासाठी किंवा भक्तिमार्गांचा प्रचार वाढविण्यासाठी आपले लोकोत्तर ग्रंथ निर्माण केले त्यांच्या प्रभावाने मध्ययुगाच्या आरंभापासून सर्व प्रादेशिक भाषांमध्ये नवचैतन्य निर्माण झालें. हे सत्पुरुषच विविध प्रादेशिक भाषांतील साहित्याचे आद्यप्रवर्तक आज गणले जातात. अशा प्रकारें प्रादेशिक भाषांचा विकास होत असता शैव, वैष्णव इत्यादि सम्प्रदायातील संस्कृतज्ञ सत्पुरुषांनी संस्कृत भाषेवरील परम श्रद्धेमुळे संस्कृत भाषेंतच आपल्या प्रतिभेचा आविष्कार केला प्राचीन व अर्वाचीन संस्कृत साहित्यात शिव, विष्णु, राम, कृष्ण इत्यादि देवतांच्या व धर्मधुरीणांच्या चरित्रावर आधारलेला एवढा मोठा ग्रंथसंग्रह संस्कृतात आढळतो हें आरंभीच्या प्रकरणात दाखविलें आहे. त्याचें कारण हेंच की त्या ग्रंथांचा लेखकवर्ग हा मुख्यत धार्मिक

१. कृ. २ १०

प्रवृत्तीचा होता. राजाश्रयाचा लाभ झाल्यामुळे, किंवा धनमानाचा लोभ सुटल्यामुळे, किंवा काही श्रेष्ठ राजपुरुषाच्या धीरोदात्त गुणांचे आकर्षण निर्माण झाल्यामुळे साहित्यनिर्मितीस प्रवृत्त झालेल्या लेखकांनी लौकिक दृष्ट्या महत्त्वाचे साहित्य बऱ्याच मोठ्या प्रमाणात निर्माण केले आहे. तथापि आध्यात्मिक प्रवृत्तीच्या लेखकांनी मात्र आपली संपूर्ण प्रतिभा उपास्य दैवताच्या चरणी वाहिली होती व म्हणून त्यांच्या हातून निर्माण झालेले विविध प्रकारच्या साहित्याचे स्वरूप केवळ धर्मनिष्ठ होते. साहित्यातील हे प्रवाह केवळ संस्कृतातच नाही तर इतर भाषांतील साहित्यातहि आपणास पाहावयास सापडतात. मुद्रणकलेच्या उदयापूर्वी, आधुनिक काळात ज्या प्रमाणें वाटेल तो उठलासुटला लेखनकार्यास प्रवृत्त होतो, त्याप्रमाणे कोणीहि प्रवृत्त होत नसे. त्यामुळे आजच्या काळात सर्वच भाषांमध्ये जसे विविध स्वरूपाचे भरपूर साहित्य निर्माण होत असल्याचे आपणास दिसते, तसे पूर्वी होत नव्हते. असाधारण प्रतिभाशाली व भक्तिवंत विद्वान, तीव्र अन्तःप्रेरणेमुळेच ग्रंथलेखनास प्रवृत्त होत. अशाप्रकारें अन्तःप्रेरणेने लेखनकार्यास प्रवृत्त झालेल्या लेखकांमध्येच विविध धर्माश्रमांतील विद्वान आपणास प्रामुख्याने दिसून येतात. त्यामध्ये **वैष्णव सम्प्रदायामध्ये** श्रीभाष्याचे लेखक रामानुजाचार्य (११वें शतक), अणुभाष्याचे लेखक श्रीवल्लभाचार्य, 'वैकुण्ठस्तव' व 'सुन्दरबाहुस्तव' याचे लेखक श्री वत्साङ्कमिश्र कुरत्तल्वार (११ वें शतक), 'हंससन्देश', 'यदुवदाम्', 'मारसम्भव', 'पादुकासहस्रम्' इत्यादि ग्रंथाचे लेखक श्रीवेंकटनाथ अथवा श्रीवेंकटदेशिक इत्यादि नावें चिरस्मरणीय आहेत. त्याच प्रमाणें **अहोबिल मठाच्या** अनुयायांमध्ये[1] 'नारायणचरितम्' इत्यादि आठ ग्रंथांचा लेखक श्रीनारायण (१५ वें शतक), 'नरसिंहस्तव'कर्ता पराङ्कुश (१६ वें शतक), 'वासन्तिकापरिणयम्' नाटकाचा लेखक शठगोप (१६ वें शतक); 'श्रीप्रपत्ति' 'नरसिंहमङ्गलाशसनम्' 'क्षीरनदीस्तव', 'विहगेन्द्रस्तव', 'देवराजस्तव', 'लक्ष्मीनरसिंहस्तव', 'वैकुण्ठविजयचम्पू' इत्यादि ग्रंथांचा लेखक पराङ्कुश रामानुज (अठरावें शतक), 'कविहृदयरञ्जिनी' व 'वेदगिरि वर्णनम्' याचा लेखक शठगोप रामानुज (१९ वें शतक), 'शारीरिक-सुप्रभातम्' व 'श्रीगोष्ठीनाथस्तव' याचा लेखक वीरराघव हे प्राचीन व अर्वाचीन लेखक अविस्मरणीय आहेत.

**माध्वसम्प्रदायामध्ये** प्रस्थानत्रयीचे भाष्यकार व यमकभारतादि ३७ ग्रंथांचे लेखक पूर्णप्रज्ञ श्रीमध्वाचार्य (१३ वें शतक)[2] व त्यांचा शिष्य उपाहरणम् काव्यकर्ता त्रिविक्रम[3] (१४ वें शतक), 'मध्वविजय', 'अणुमध्वविजय', व 'मणिमञ्जरी' याचा लेखक त्रिविक्रमपुत्र नारायण, 'जयतीर्थविजय' चा लेखक व्यासतीर्थ, 'जयतीर्थविजयाब्धिः' चा लेखक कृष्ण, 'व्यासयोगिचरितचम्पू' चा

२ क्र. २११। ३ क्र. २१४।

लेखक सोमनाथ[4], 'रुक्मिणीशविजय.', 'सरसभारतीविलासः', 'तीर्थप्रबन्ध.', 'एकीभावस्तोत्रम्', 'दशावतारस्तुतिः', इत्यादि ग्रथाचा लेखक वादिराज[5] (या वादिराजाला विजयनगरच्या राजसभेत मोठी प्रतिष्ठा प्राप्त झाली होती.); 'सत्यनाथाभ्युदयः' व 'सत्यनाथमाहात्म्यरत्नाकरः' याचा लेखक सर्कर्षण[6] 'सत्यनाथविलासः' ग्रथाचा लेखक श्रीनिवास 'सेतुरायविजयः' व 'सत्यबोधविजय.' याचा लेखक कृष्ण,[7] हे लेखक विशेष उल्लेखनीय आहेत.

**वीरशैव सम्प्रदायामध्ये** १२ व्या शतकात गुरुलिंगपुत्र सोमनाथ याने लिहिलेलें 'पण्डिताराध्यचरितम्', 'बसवपुराणम्' व 'बसवगद्यम्' हे तीन ग्रथ व शकराराध्याने लिहिलेले 'बसवराजीयम्' याव्यतिरिक्त आणखी उल्लेखनीय ग्रथ आढळत नाहीत. अर्वाचीन काळात बसवराजाचा हा सम्प्रदाय सस्कृत साहित्य निर्मितीच्या कामीं उदासीन झालेला दिसतो

बगालच्या **चैतन्य सम्प्रदायाने** भक्तिमार्गीयाना उपयुक्त वाटणारे व काव्यदृष्टया अतिश्रेष्ठ असें बरेच मोठें वाङ्मय सस्कृतात निर्माण केलेलें आहे. स्वत श्रीचैतन्यदेवानी (१५ वें शतक) 'गोपालचरितम्', 'प्रेमामृतम्', 'सक्षेपभागवतामृतम्', 'हरिनामकवचम्', 'दानकेलिचिन्तामणि.' इत्यादि सुप्रसिद्ध काव्यग्रथ निर्माण केले आहेत. चैतन्य सम्प्रदायातील दुसरे श्रेष्ठ लेखक म्हणजे श्रीरूपगोस्वामी हे होत. 'विदग्धमाधवनाटकम्', 'ललितमाधवनाटकम्', 'दानकेलिकौमुदी' (भाण), 'हसदूतम्', 'उद्धवसन्देशम्', 'पद्यावलिः' व 'उज्ज्वलचन्द्रिका' हे रूपगोस्वामींचे ग्रथ त्यांच्या सम्प्रदायात फार मान्यता पावलेले आहेत 'उज्ज्वलनीलमणि.' या साहित्यशास्त्रीय प्रबन्धामध्ये त्यानी भक्तिरसाचें स्वतत्र अस्तित्व तात्त्विकदृष्टया प्रतिपादन केलेलें असल्यामुळे त्या क्षेत्रातहि त्याना मोठी मान्यता आहे. याव्यतिरिक्त 'यमुनास्तोत्रम्', 'गन्धर्वप्रार्थनास्तोत्रम्', 'गौराङ्गस्तवकल्पतरु', 'कुसुमस्तबक.', 'मुकुन्दमुक्तावली', 'चाटुपुष्पाञ्जलिस्तव', 'उत्कलिकावल्लरी', 'लघुभागवतम्', 'आनन्दमहोदधि', 'मथुरामहिमा' इत्यादि रूपगोस्वामींची भक्तिस्तोत्रें त्याच्या सम्प्रदायात सर्वतोमुखीं झालेलीं आहेत. रूपगोस्वामीचा भाऊ सनातन याचें 'हरिभक्तिविलासः', 'भागवतामृतम्' हे दोन ग्रथ व पुतण्या वल्लभपुत्र जीवगोस्वामी (१६-१७ शतक) याचे 'गोपालचम्पू', 'माधवमहोत्सव', 'भक्तिरसामृतसिन्धु.' व 'गोविन्दविरुदावलि' हे ग्रथ प्रसिद्ध आहेत. चैतन्यसम्प्रदायातील कविकर्णपूर (१६ वें शतक) याने 'गौराङ्गगणोद्देशदीपिका' नावाच्या काव्यामध्ये आपल्या सम्प्रदायातील अनेक साधूचें रामावतार व कृष्णावताराच्या काळातील पूर्वजन्म वर्णिलेले आहेत. या कवि कर्णपूराने 'चैतन्यचन्द्रोदयम्' (नाटक), 'अलङ्

४. क्र. २१६। ५ क्र. २१७। ६. क्र. २२०। ७. क्र २२२।

पारकौस्तुभ ', 'चमत्कारचन्द्रिका', 'आनन्दवृन्दावनचम्पू ' हे ग्रंथ लिहिले आहेत.[८]

## गोस्वामी सम्प्रदायातील कांही लेखक[९]

श्रीदास – राधामुकुन्दस्तव.
रघुनाथ – विलापकुसुमाञ्जलि
गोविन्ददास – सङ्गीतमाधव व कृष्णामृतम् (१६–१७ शतक)
सनातन – भक्तिरसामृतसिन्धु
कृष्णदास – गोविन्दलीलामृतम्, कृष्णलीलास्तव

अशा प्रकार चैतन्य सम्प्रदायातील विद्वान् साधुसंतानी नाना प्रकारचीं कृष्णभक्तिपर काव्यें लिहून संस्कृत साहित्य समृद्ध केले आहे.

## वल्लभसंप्रदाय

या सम्प्रदायाचे प्रवर्तक श्रीवल्लभाचार्य यांनी आपल्या प्रस्थानत्रयीवरील विख्यात भाष्याव्यतिरिक्त 'प्रेमामृतम्', 'मधुरामाहात्म्यम्', 'यमुनास्तव' इत्यादि उत्कृष्ट काव्य लिहिलेलीं आहेत. त्यांचा पुत्र विठ्ठल याने 'कृष्णप्रेमामृतम्' 'रसार्णव' व 'गीतगोविन्दटीका' लिहून साहित्य सेवा केलेली आहे. वल्लभाचार्यांचा वधू रामचन्द्र याने 'कृष्णकुतूहलम्', 'गोपाललील', 'रसिकरञ्जनम्', रोमावली शतकम्' यासारखीं काव्यें लिहिलीं आहेत. याव्यतिरिक्त गोपालदासाचें 'वल्लभा ख्यानम्' व बाबू सीताराम शास्त्रीकृत 'वल्लभदिग्विजय' हे वल्लभसम्प्रदायातील ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत.[१०]

## परकालमठ

म्हैसूरच्या परकालमठाच्या अनुयायामध्ये अलंकारसंग्रहकर्ता श्रीनिवास (१९ व शतक) व 'रंगराजविलास', 'कार्तिकोत्सवदीपिका', 'श्रीनिवासविलास' हे तीन चम्पू आणि त्याव्यतिरिक्त 'च्वेगहतिस्तुति', 'उत्तरङ्गमाहात्म्यम्', 'रामेश्वरविजय', 'नृसिंहविलास', 'मदनगोपालमाहात्म्यम्', 'अलंकारमणिहार' इत्यादि साठपेक्षा अधिक ग्रंथांचा लेखक श्रीकृष्णब्रह्मतन्त्र परकालस्वामी (१९ वें शतक) हे दोघेजण विशेष उल्लेखनीय आहेत.

## जैन सम्प्रदाय

जैन सम्प्रदायातील संस्कृत लेखकांची परम्परा इ. स. ७ व्या शतकापासून *आढळते सातव्या शतकात आचार्य रविसेन, ८ व्यात जिनसेन, १४ व्यात*

८ कृ २२३। ९ कृ. २२४। १० कृ २२५।

जिनप्रभ, १५ व्यात कीर्तिराज व सोमकीर्ति, गुरुगुणरत्नाकराचा लेखक सोमचरितगणी, १६ व्यात पद्मसागरगणी, शुभचन्द्र व पद्मसुंदर, १७ व्यात रामचन्द्र अशी सामान्यत थोर लेखकाची परम्परा आहे. या रामचन्द्राने 'प्रद्युम्न–चरितम्' नावाचे १८ सर्गाचे महाकाव्य लिहिलें असून त्यामध्ये जैन साम्प्रदायिक कथेनुसार श्रीकृष्णपुत्र प्रद्युम्न याचें चरित्र वर्णिलेलें आहे. याव्यतिरिक्त १७ व्या शतकात झालेला मोठा लेखक म्हणजे सकलकीर्ति हा होय. त्याचें 'महावीरपुराणम्', 'सुदर्शनचरितम्' 'श्रीपालचरितम्', 'वृषभानुचरितम्', 'धान्यकुमारचरितम्', हे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. 'द्वादशविद्यापति' म्हणून प्रसिद्धी पावलेला १७ व्या शतकातील लेखक वादिराजसूरि याचे 'यशोधरचरितम्' व 'पार्श्वनाथचरितम्' हे दोन ग्रंथ उल्लेखनीय आहेत. याव्यतिरिक्त १७ व्या शतकामध्ये 'परमहंसचरितम्' चा लेखक नवरङ्ग व 'वर्धमानचरितम्'चा लेखक असङ्ग हे दोन महत्त्वाचे लेखक झाले. यानंतरच्या काळात जैनांच्या संस्कृत साहित्यात भर टाकणारे प्रसिद्ध लेखक फारसे आढळत नाहीत. जैन सम्प्रदायाच बहुतेक सर्व साहित्य साम्प्रदायिकांकडून मुद्रित झालेलं आहे व जे काय थोडें फार साहित्य अमुद्रित असेल ते लवकरच मुद्रित होण्याची शक्यता आहे.

आतापर्यंत काही जुन्या धर्मसम्प्रदायातील संस्कृत साहित्याचा परिचय दिलेला आहे. इंग्रजी साम्राज्याच्या स्थापनेनंतर भारतामध्ये आर्यसमाज, ब्राह्मसमाज, प्रार्थनासमाज, श्रीरामकृष्णाश्रम, रामतीर्थाश्रम, अरविन्दाश्रम इ. नवीन धर्मसम्प्रदाय किंवा धर्माश्रम उदयास आले. दयानंद सरस्वतींसारखे काही नवीन सम्प्रदा याचे प्रवर्तक अत्यंत श्रेष्ठ श्रेणीचे संस्कृत पण्डित होते. त्यामुळे आपल्या सम्प्रदाय प्रवर्तकाच्या अभिरुचीच्या अनेक विषयांपैकी त्या सम्प्रदायातील काही विद्वानांची संस्कृतावरहि मोठी भक्ति आढळते. पण संस्कृत साहित्यनिर्मितीच्या दृष्टीने या नवीन सम्प्रदायाच्या विद्वानांकडून विशेष भरीव कामगिरी झालेली दिसत नाही. श्री दयानन्दांच्या संस्कृत लिखाणामध्ये त्यांचे वेदभाष्य व सत्यार्थप्रकाश याव्यतिरिक्त विशेष उल्लेखनीय साहित्य नाही. श्रीदयानंदांच्या चरित्रावर मात्र दोन महाकाव्यें त्यांच्या भक्तांनी लिहिलीं आहेत. त्यांपैकी पहिलें 'दयानन्ददिग्विजय' श्रीअखिला नंद शर्मा यांनी लिहिलें असून त्यामध्ये एकूण २१ सर्ग आहेत.[११]

दुसरें महाकाव्य आचार्य मेधाव्रत यांनी लिहिलं असून त्यामध्ये एकूण २७ सर्ग (श्लोकसंख्या २७००) आहेत आचार्य मेधाव्रतांचें हें काव्य २ खण्डांमध्ये (खण्ड पहिला १२ सर्ग, खण्ड दुसरा १५ सर्ग) हिन्दी भाषान्तरासहित प्रकाशित झाले आहेत.[१२] कविरत्न मेधाव्रत यांनी **कुमुदिनीचन्द्र** या नावाची एक ३५०

---

११. इंडियन प्रेस प्रयाग येथे हिन्दी अनुवादासह मुद्रित।

१२ आर्यसुधारक प्रिंटिंग प्रेस, बडोदा

पानाची कादम्बरी आधुनिक तन्त्रानुसार लिहिली असून तिचा सर्वत्र बराच प्रचार झालेला आहे. याव्यतिरिक्त 'प्रकृतिसौंदर्यम्', 'दयानन्दलहरी', 'ब्रह्मचर्यशतकम्' हीं अशानर पुस्तकें त्यांनी संस्कृतांत लिहिलीं असून हिन्दी मार्फतहि त्यांची निर्माण केलेलें आहे.

## अरविन्दाश्रमाची संस्कृतोपासना

योगी अरविन्दांच्या पाँडिचरी येथील आश्रमामध्ये संस्कृत साहित्यसेवा थोड्या अधिक प्रमाणात दिसते. या आश्रमातील अरविंदांचे नामवंत शिष्य श्रीकपालीशास्त्री यांची संस्कृत साहित्यसेवा आधुनिक काळांत अद्वितीय आहे. श्रीकपाली शास्त्रींचे चरित्र सविस्तरपणें प्रस्तुत ग्रंथात पुढे दिलें आहे. त्यांनी लिहिलेले ग्रंथ पुढील प्रमाणे आहेत.

**ऋग्वेद-सिद्धाञ्जनभाष्यम्**—श्रीअरविंदांच्या तत्त्वज्ञानानुसार ब्रह्मश्री कपाली शास्त्री यांनी ऋग्वेदावर एक सहस्र पृष्ठांचा प्रचण्ड भाष्यग्रंथ लिहिला असून तो अरविन्दाश्रमातर्फे प्रकाशित झालेला आहे. या सिद्धाञ्जनभाष्याची प्रस्तावना ऋग्भाष्यभूमिका या नावानें स्वतन्त्र पुस्तकाच्या रूपात प्रकाशित झाली असून त्याचा इंग्रजींत अनुवाद अरविंदाश्रमाचे एक साधक श्री माधव पण्डित यांनी केलेला आहे.

**भारतीस्तव**—श्रीअरविन्दांनी प्रतिपादन केलेल्या राष्ट्रवादानुसार कपाली-शास्त्रींनी १५ ऑगस्ट १९४७ ( १५ ऑगस्ट हा योगी अरविंदांचा जन्मदिन आहे.) या स्वातंत्र्यप्राप्तीच्या दिवशीं—

> अद्य श्री दिनमद्य भारतकुलस्यात्मप्रदीक्षागुरो
> स्वाराज्यार्थदृशोऽरविन्दभगवत्सूरेर्जयन्तीदिनम् ॥
> अद्यास्तंगतमङगबहुलक्लेश च पूर्वं युग
> नूत्न सन्ततमद्य मङ्गलयुग जेजीयतां भूतले ॥

या सारख्या श्लोकांतून भारतमातेचें स्तवन केलें आहे.

**कवितान्जलि**—श्रीअरविन्दांनी लिहिलेल्या तीन इंग्रजी काव्यांचा संस्कृत पद्यानुवाद श्री कपाली शास्त्रींनी कवितान्जलीच्या रूपाने केला मूळ इंग्रजी कवितापेक्षाहि हा संस्कृतानुवाद अधिक सरस झाल्यामुळे इंग्रजी भाषेपेक्षा संस्कृत भाषा ही जास्त काव्यात्मक आहे, हें सिद्ध करणारें निदर्शन कवितान्जलीच्या रूपाने कपालीशास्त्रींना उपलब्ध करून दिलें, असें म्हणावेसे वाटतें.

**मातृतत्त्वप्रकाश** — श्री अरविंदांनी लिहिलेल्या Four Powers of the Mother या इंग्रजी काव्याचा अनुवाद कपाली शास्त्रींनी केला. हाहि अनुवाद कवितान्जलीप्रमाणेच सरस उतरलेला आहे

आह्निकस्तव :-या ग्रंथामध्ये 'श्रीमदरविन्दनिषदास्तवत्रयम्' या नावाचें कपालशास्त्रींनी लिहिलेलें एक आध्यात्मिक काव्य आहे. या आह्निकस्तवामध्यें 'सूक्तस्तव' या नावाचें आणखी एक काव्य आहे. ऋग्वेदाच्या प्रथम मण्डलातील १२ व्या अनुवाकामध्ये पराशर ऋषींचीं जीं अग्निस्तोत्रें आहेत, त्यातील भाव अरविंदांच्या तत्त्वज्ञानानुसार कपालीशास्त्रींनी यामध्ये आळविलेला आहे 'कुमारस्तव' या काव्यामध्यें हृदयातला दिव्य अग्नि म्हणजेच कुमार गुह होय, हा आशय व्यक्त केला आहे.

वासिष्ठवैभवम् — कपालीशास्त्रींचे एक गुरु वासिष्ठ गणपतिमुनि हे मोठे विद्वान् योगी पुरुष होते. कपालीशास्त्रींनी त्याचें चरित्र वासिष्ठवैभवम् या नावाने चरित्रलेखनाच्या आधुनिक तत्रानुसार लिहिलेलें आहे." चरित्रनायक श्री. गणपतिमुनि हेहि मोठे संस्कृत लेखक होते (याच सविस्तर चरित्र पुढे यथाक्रम येईलच). त्यानी लिहिलेल्या ग्रंथावर 'उमासहस्रप्रभा', 'रमणगीत-गीताप्रकाश' 'सर्वदर्शनभाष्यम्', 'अरुणाचलपञ्चरत्नदर्पण' हे टीकाग्रंथ कपालीशास्त्रींनी संस्कृतात लिहिले आहेत

कथामञ्जरी--अरविंदाश्रमाच्या संचालिका माताजी यानी Bells Histoires (बेल्जिस्त्वार) या नावाचें एक नीतिकथाचें पुस्तक फ्रेंच भाषेत लिहिलें आहे. त्याचा सरळ सुबोध संस्कृतानुवाद अरविंदाश्रमातील एक संस्कृतज्ञ श्रीजगन्नाथ यानी 'कथामञ्जरी' या नावाने केला असून त्यावर त्यानी स्वत च संस्कृत टिप्पणी लिहिली आहे. याच श्रीजगन्नाथ महाशयानी 'श्रीमातु सूक्तिसुधा' या नावाचा माताजींच्या फ्रेंच सुभाषिताचा संस्कृत अनुवाद केला आहे. त्यातील काही सुभाषितें पुढील प्रमाणे आहेत —

" स्मित शत्रौ प्रयुक्त सन्निरस्त्रीकुरुते हि तम । "
" ददाति भगवान् यत्ते गृह्यता तन्मुदा सदा । "
" चैत्य विना स्थिर किञ्चिज्जीवे नास्तीह पार्थिवे । "
" ईश्वरेच्छा त्वदिच्छा स्याद्रहस्य ह्येतदुत्तमम् । "
" जीवित स्यादशेष न प्रार्थनैव प्रभु प्रति । "

फ्रेंच भाषतील सुभाषिताचा संस्कृतात झालेला हा एकमेव अनुवाद होय.

पूर्णयोगसूत्राणि--अरविन्दाश्रमातले संस्कृत पण्डित प्रा श्री. अम्बालाल पुराणी यानी अरविंदाचें सर्व तत्त्वज्ञान प्रस्तुत पुस्तकात सूत्ररूपाने संग्रहीत केले आहे

१३ नन्दिनी मुद्रणालय, सिर्सी, उत्तर कॅनरा येथें मुद्रित

अरविंदाश्रमाने आजवर केलेली ही संस्कृत साहित्यसेवा इतर धार्मिक आश्रमानी अनुकरण करण्यासारखी आहे. विविध धर्माश्रमातून अशा प्रकारे निष्काम बुद्धीने संस्कृत साहित्याची निर्मिति सतत होत राहिली तर, संस्कृत भाषेची आजची प्रतिकूल दशा बदलण्याची बरीच आशा आहे

इ. स. १९५६ मध्ये भारत सरकारने भगवान् बुद्धाचा २५००वा जन्मदिनोत्सव प्रचण्ड प्रमाणात साजरा केला, त्यामुळे प्रेरणा मिळून बुद्ध व बौद्धधर्म या विषयी सर्वच भारतीय भाषातून भरपूर लिखाण त्या सुमारास प्रकाशित झाले. संस्कृत नियतकालिकात प्रकाशित झालेले लिखाण वगळता, दोन पुस्तके उल्लेखनीय आहेत. त्यापैकी कुरुक्षेत्र विश्वविद्यालयाचे प्राध्यापक इन्द्र यानी केलेला 'भगवद् (बुद्ध) गीता' नामक जो धम्मपदाचा संस्कृत अनुवाद त्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. दुसरे पुस्तक म्हणजे दिल्ली विश्वविद्यालयाचे संस्कृत प्राध्यापक डॉ. सत्यव्रतशास्त्री यानी लिहिलेले **श्रीबोधिसत्त्वचरितम्**[१४] हे होय. एक सहस्र श्लोकांचे हे काव्य अकरा सर्गात विभागलेले असून त्यामध्ये पाली भाषतील जातक कथामधून वर्णिलेल्या भगवान् बुद्धाच्या पूर्वजन्मातील काही कथा सरळ व सुश्लिष्ट पद्यात गुंफिलेल्या आहेत. डॉ. सत्यव्रत याची भाषा निर्दोष, सुबोध व प्रसन्न आहे. वरील दोन्ही लेखक बौद्ध सम्प्रदायी नसले तरी त्यांचे ग्रन्थ साम्प्रदायिक साहित्यात समाविष्ट होण्यासारखे आहेत.



१४ प्राप्तिस्थान–मोतीलाल बनारसीदास, बंगलो रोड, जवाहर नगर, दिल्ली. मूल्य ४ रु.)

# प्रकरण १८ वें

# नाट्यवाङ्मय

मागील प्रकरणातून अनेक लेखकांच्या अवान्तर साहित्याचा परिचय देताना त्यांच्या नाटकांचाहि उल्लेख अनुषंगिकपणे आलेला आहे. संस्कृत नाटकाची परंपरा किती प्राचीन आहे याची कल्पना संस्कृत नाट्यवाङ्मयाचा इतिहास वाचणाऱ्यांना आहेच. ही नाटकसाहित्यनिर्मितीची परंपरा कधीहि खंडित झालेली नाही. महाकाव्यांच्या परंपरेत पौराणिक विषयांचे प्राधान्य आढळून येतें, तसेंच नाट्यसाहित्यांतहि तें आढळतें; पण याबद्दल लेखकांना दोष देण्यात काहीच अर्थ नाही. 'नाटकं ख्यातवृत्तं स्यात्' या नाट्यशास्त्रीय दंडकाप्रमाणेच पौराणिक कथांपेक्षा अधिक प्रख्यात कथानकें न आढळल्यानें संस्कृत लेखकांनी तींच नाटकासाठी निवडलीं. बहुतेक सर्व नाटककारांनी नाट्यशास्त्राचे नियम व कालिदास भवभूति इत्यादि श्रेष्ठ नाटककारांनी निर्माण केलेले आदर्श गिरविण्याचा कसोशीने प्रयत्न केला आहे. पौराणिक कथाव्यतिरिक्त काही नाटकांतून क्वचित् ऐतिहासिक किंवा समकालीन राजपुरुषांच्या जीवनांतील प्रेमप्रकरणें 'अभिज्ञान-शाकुन्तलम्' व 'मालविकाग्निमित्रम्' या कालिदासाच्या नाटकांचा आदर्श पुढे ठेऊन चित्रित करण्याचा प्रयत्न झालेला दिसतो पण असलीं नाटकें अपवादात्मकच. संस्कृत नाट्यशास्त्रांत रूपक वाङ्मयाचे जे १० प्रकार उल्लेखिले आहेत ते सर्व अर्वाचीन कालखंडातील लेखकांनी मोठ्या कौशल्यानें हाताळलेले दिसतात. विशेष आश्चर्याची किंवा महत्त्वाची गोष्ट म्हणजे या अर्वाचीन कालखंडाच्या ज्या भागांत एकाहि प्रादेशिक भाषेमध्ये नाट्यसाहित्य निर्माण झालेलें दिसत नाही त्या सुमारास (म्हणजे १७, १८ व १९ पूर्वार्ध या अडीच शतकांत) संस्कृतांत मात्र देशभर नाट्यसाहित्य निर्माण होत होतें. १७ व्या व १८ व्या शतकांतील मराठी नाटक आज हुडकून देखील सापडत नाही; याचा अर्थ महाराष्ट्रांत त्या काळांत नाटकें होतच नव्हतीं असा नाही, पण त्या नाटकांचा दर्जा दशावतारापेक्षा किंवा तमाशापेक्षा अधिक वरचा नव्हता. मराठी, हिंदी, बंगाली इत्यादि प्रादेशिक भाषांतील नाट्यसाहित्यांतील परंपरा दो-सव्वाशे वर्षांपेक्षा अधिक प्राचीन नाही. इंग्रजी साहित्याच्या स्पर्शानें त्या नाटकांत एका अर्थी थोडें नावीन्य आलेलें दिसतें, पण हें नावीन्य या कालखंडांतील संस्कृत नाटकांत आलें नाही असे नाही. इंग्रजी विद्या शिकलेल्या संस्कृत लेखकांनी इंग्रजी काव्याप्रमाणे अनेक इंग्रजी व क्वचित् जर्मन, फ्रेंच इत्यादि नाटकांचे

संस्कृताचा अनुवादसुद्धा केलेले आहेत. संस्कृतातील हे अर्वाचीन नाट्यसाहित्य इतके विपुल आहे की त्याचा साकल्याने परामर्श या एका प्रकरणात येथे शक्य नाही; तथापि काही उल्लेखनीय नाटकांचा व नाटककाराचा परिचय आम्ही येथे देत आहोत. त्यापैकी बहुतेक नाटककारांनी महाकाव्ये लिहिलेली असल्याने महाकाव्याविषयक प्रकरणातून त्यांचा सविस्तर उल्लेख झालेला आहे.

अप्पय्य दीक्षिताच्या प्रचंड साहित्यसेवेचा परिचय मागील प्रकरणात आलाच आहे. त्यांनी **वसुमतीचित्रसेनविलासम्** या नावाचे एक नाटक लिहिलेले आहे. 'रत्नखेट' दीक्षिताने **भावनापुरुषोत्तमम्** या नाटकामध्ये जिंजीचा राजा सुराप्पा याचा पराक्रम चित्रित केला आहे. याच 'रत्नखेट' श्रीनिवास दीक्षिताने **दमयन्तीपरिणयम्** या नावाचे आणखी एक नाटक लिहिलेले आहे. रत्नखेटाचा मुलगा राजचूडामणि दीक्षित याने **आनंदराघवम्** व **कमलिनीकलहंसम्** ही दोन नाटके लिहिली. त्यांचा प्रयोग तंजावर येथे रघुनाथनायकाच्या राजसभेत झाला होता. १७ व्या शतकातील वर उल्लेखिलेल्या नाटकांव्यतिरिक्त अन्य दीक्षितांचे (नीलकण्ठ दीक्षिताचे) **नलचरितनाटकम्**, त्याचा भाऊ अतिरात्रयज्वा याचे **कुश कुमुद्वतीयम्** वेंकटाचार्यांचा पुत्र कुमार तातार्य याचे **पारिजातनाटकम्** (५ अंकी) यासारखी आणखी काही नाटके उल्लेखनीय आहेत. हा कुमार तातार्य रघुनाथनायक व विजयराघव या तंजावर-नरेशाचा पुरोहित होता.

**वासंतिकापरिणयम्**—अहोबिलमठाचे सातवे आचार्य शठकोपाचार्य यांनी हे ५ अंकी नाटक लिहिले आहे.[४] या नाटकात अहोबिल नृसिंहाचार्यांचा वासंतिका नावाच्या वनदेवतेशी विवाह झाल्याचे दाखविले आहे. प्रस्तुत लेखक शठकोपाचार्य हे शतावधानी पंडित होते व त्यांना 'कवितार्किककण्ठीरवाचार्य' ही पदवी लाभली होती. विजयानगरच्या मुकुंददेव गजपतीने यांचा मोठा सत्कार केला होता.

**धर्मविजयम्**—जम्बू येथील शुकदेव पंडिताचा पुत्र व श्रीकण्ठ दीक्षिताचा शिष्य भूदेव शुक्ल यानं सदाचाराचे माहात्म्य प्रतिपादन करण्यासाठी हे ५ अंकी नाटक लिहिले आहे.[५]

**धूर्तसमागमचन्द्रिका**—मिथिला येथील पीताम्बराचा पुत्र जगन्नाथ याने पतेहशाहा (१७ वे शतक) याच्या राजसभेत जमलेल्या राजपुरुषांच्या मनोरंजनासाठी हे नाटक लिहिले होते.[६]

१. कृ डी १४३। २. कृ १५१। ३ कृ डी ६५। ४. कृ ६९८।
५. मुंबई व वाराणसी येथे मुद्रित कृ ६९७। ६ कृ ७००।

**रतिमन्मथम्**--ले. जगन्नाथ (१७ वे शतक). तंजावर राज्याच्या मन्याचा हा पुत्र होता.

**राघवाभ्युदयम्**—ले. गंगाधर अमात्याचा पुत्र भगवत. याच भगवताने उत्तररामचम्पू हा आणखी एक ग्रंथ लिहिला आहे.

**कौतुकरत्नाकरम्**—ले वाणीनाथाचा पुत्र कवितार्किक. (१७ वे शतक).

**वसुमतीकल्याणम्** ले. रामानुजकवि ( १७ वे शतक ) या नाटकात उर्यूरनचीयार येथील क्षेत्रदेवता वसुलक्ष्मी हिचा भगवान् रंगनाथाशी विवाह झाल्याचे दाखविले आहे [7] हा कवि मद्रास जवळ निवेल्लोर येथे राहात होता प्रस्तुत नाटकाव्यतिरिक्त **वीरराघवरुक्मणवल्ली-विवाहम्, वार्धिकन्या—परिणयम्, रामायणचम्पू** व **वेदपादरामायणम्** [8] हे ग्रंथ रामानुज कवीने लिहिले आहेत

**कृष्णकुतूहलम्**—लेखक कृष्णसरस्वतीचा शिष्य व नारायणाचा पुत्र मधुसूदन.[9]

**जानकीपरिणयम्**—रामायणविषयक अनेक नाटकामध्ये, १७ व्या व १८व्या शतकात अत्यन्त लोकप्रिय झालेले हें नाटक रामभद्र दीक्षित याने लिहिले. हा कवि सरफोजी भोसल्याचा आश्रित होता. या नाटकात विद्युज्जिह्व, रावण व शरण याचे अनुक्रमें कौशिक, राम व लक्ष्मण याच्याशी व तारकेचे सीतेशी विलक्षण सादृश्य दाखविलें असून त्यामुळे प्रेक्षकाच्या अंत करणात संशयकल्लोळ निर्माण होतो नाटकाच्या शेवटी शूर्पणखा तापसी वेषाने प्रवेश करून भरताला रामाच्या मृत्यूची बातमी सांगते त्यामुळे भरत अग्निप्रवेश करावयास सिद्ध होतो. तोंच राम आपल्या परिवारासह तेथे प्रकट झाल्याने नाटकाचा शेवट सुखान्त होतो. उत्तररामचरिताप्रमाणे या नाटकात रावणाच्या राजसभेंत एक उपनाटक योजिलेंं आहे अशा प्रकारच्या वैशिष्ट्यामुळे हें नाटक बरेच लोकप्रिय झाले होते[10]. रामभद्र दीक्षिताने ' रामबाणस्तव ' ' रामचापस्तव ' ' रामाष्टप्रास ', ' रामभद्राष्टकम् ' व ' शृंगारतिलक ' (भाण) हीं काव्यें लिहिलीं आहेत. पतञ्जलिचरितम् नावाचे त्याचे ८ सर्गाचें त्याचें काव्य मुंबईमध्ये मुद्रित झालेलें आहे

**प्रद्युम्नविजयम्**—बुंदेलखंडाच्या श्रुतकीर्ति छत्रसालाचा नातू सभासुदर याच्या राज्याभिषेकानिमित्त, बालकृष्ण दीक्षिताचा पुत्र शंकर दीक्षित यानें हें नाटक लिहिलें.[11]

---

७ क्र ४०७। ८ विजागापट्टण येथ मुद्रित । ९ क्र ७०२। १० क्र ७०५ व ७७७। ११ क्र ७०७।

**शेवंतिकापरिणयम्**—ले. कोक्कनाथ ( १८ वे शतक ). प्रस्तुत नाटकात कवीने दक्षिण कॅनराचा राजा वसवराज व मल्लारची राजकन्या शेवतिका यांचा विवाह वर्णिलेला आहे.

**कान्तिमतीपरिणयम्**-वरील नाटकाप्रमाणेच चक्कोण नावाच्या कवीने ( १८ वे शतक) तंजावरचा राजा शहाजी याचा कांतिमतीशी विवाह प्रस्तुत नाटकात चित्रित केला आहे.

**चन्द्रशेखरविलासम्**-तंजावरच्या व्यंकोजीराजाचा पुत्र शहाजी ( १८ वे शतक ) याने हें नाटक लिहिलें आहे.

**रतिमन्मथम्** व **वसुमतीपरिणयम्**-हीं दोन नाटकें तंजावरच्या सरफोजी भोसल्याचा मंत्री बालकृष्ण याचा पुत्र जगन्नाथ याने लिहिलीं आहेत.[12]

**कलानन्दम्**-हें नाटक तंजावरच्या तुळाजीराजाच्या आदेशानुसार रामचन्द्र-शेखर नावाच्या कवीने[13] लिहिलें असून त्यामध्ये कलावती व नंदक यांच्या संयोग वियोगाची कथा रचिलेली आहे.

**कुवलयाश्वीयम्**—मिथिला येथील सदारामाचा पुत्र कृष्णदत्त याने प्रस्तुत ७ अंकी नाटकात कुवलयाश्व व मदालसा यांचा शृंगार रंगविलेला आहे. या कवीने **पुरञ्जनविजयम्** नावाचे (भागवतातील पुरञ्जनाच्या उपाख्यानावर आधारलेले ) व **सान्द्रकुतूहलम्** नावाचें नाटक लिहिले आहे. राधारहस्यम् या नावाचें २२ सर्गांचे महाकाव्यहि त्याने लिहिले आहे. 'गीतगणपति' नावाचे एक गीतगोविंदाच्या धर्तीचें काव्य व गीतगोविंदाची टीका या कृष्णदत्ताने लिहिलेली आहे.[14]

**कृष्णनाटकम्**-ले. मानवेद अर्थात् एरलपल्ली. /१८

**ललितराघवीयम्** व **पादुकापट्टाभिषेकम्** हीं दोन नाटकें रामपाणिवाद या १८ व्या शतकातील प्रसिद्ध लेखकाने लिहिलीं आहेत. रामपाणिवादाच्या इतर काव्यांचा परिचय इतर अवान्तर प्रकरणात आलेला आहे. **मदनकेतुचरितम्** नावाचे एक प्रहसनहि याने लिहिले आहे.

**कृष्णविजयनाटकम्**—ले. वरदराज ( १८ वे शतक ). या नाटकाच्या प्रस्तावनेत लेखकाने आपल्या पूर्वजांच्या काव्यांचा निर्देश केलेला आहे.

**रुक्मिणीपरिणयम्**—ले. विश्वेश्वरकवि. अल्मोडा येथे हा कवि रहात होता. ( १८ वे शतक ). याच कवीने **नवमालिका** नावाची एक नाटिका लिहिली असून त्यामध्ये कुन्तलांच्या नवमालिका व विश्ववसन यांचा शृंगार वर्णिलेला आहे.

---

१२ पृ. ७०८। १३ ७०८। १४ पृ ७०९।

इंदिरापरिणयम् नांवाचे याच स्वरूपाचें एक नाटक श्रीशैल नांवाच्या कवीनें लिहिलेलें आहे.

**बालमार्तण्डविजयम्**—हें ५ अंकी नाटक त्रावणकोरच्या मार्तण्डवर्मा (१७२९ ते १७५८) राजाचा सभापंडित शेषाद्रिसुत देवराज याने लिहिले असून त्यामध्ये मार्तण्डवर्म्याच्या शौर्य, औदार्य इत्यादि गुणांचे दर्शन घडविलें आहे. याच मार्तण्डवर्मा राजानें त्रावणकोरच्या विख्यात पद्मनाभ मंदिराची सुधारणा केली होती.[१५] मार्तण्डवर्म्याचा पुत्र रामवर्मवंची युवराज याने **रुक्मिणीपरिणयम्** व **शृंगारसुधाकरम्** हीं दोन नाटकें लिहिलीं. हा रामवर्मा अश्विनीमहाराज या नांवाने प्रसिद्धीस आला. इ. स. १७५८ ते १७८९ पर्यंत तो त्रावणकोरच्या गादीवर होता. 'कार्तवीर्यविजयचम्पूः', 'सन्तानगोपालचम्पूः' 'वंचीशस्तवः' यासारखे ग्रंथ ह्या रामवर्म्याने लिहिले आहेत.[१६]

**वसुलक्ष्मीकल्याणम्**—अप्पय्य दीक्षिताच्या वंशज वेंकटसुब्रह्मण्य याने त्रावणकोरचा उपरिनिर्दिष्ट राजा रामवर्मा याच्या सन्मानार्थ प्रस्तुत नाटक लिहिलें[१७] या नाटकांत सिन्धुराजकन्या वसुलक्ष्मी हिचा विवाह वर्णिलेला आहे.

**सुबालावज्रतुण्डम्**—मलबारच्या राजवंशातील रामकवीने हें ५ अंकी नाटक लिहिलें असून त्यांत वज्रतुंड नांवाच्या उदराचा सुबाला नांवाच्या रत्नांगद भुजंगाच्या बहिणीशीं विवाह वर्णन केलेला आहे.[१८]

**चन्द्रिकाकलापीडम्**—मलबारच्या रविवर्म राजाचा संबंधी रामवर्मा याने लिहिलेल्या या नाटकात चंद्रिका व कन्दर्पशेखर यांचा प्रणय वर्णिलेला आहे.[१९]

रामानुजाचार्यांच्या चरित्रावर आधारलेलें **यतिराजविजयम्** किंवा **वेदान्तविलासम्** या नांवाचें एक ६ अंकी नाटक काचीवरमच्या घटिकाशत सुदर्शनाचार्यांचा पुत्र वरदाचार्य याने लिहिलेलें आहे.[२०] रामभद्राने लिहिलेल्या 'शृंगारतिलकभाण' (अय्याभाण) या पुस्तकावर मात करण्यासाठी त्याने **वसंततिलकभाण**[२१] लिहिला.

**चैत्रयज्ञम्**—नडिया येथील विश्वनाथवाचस्पति भट्टाचार्य (१९ वें शतक) याने राजा ईश्वरचन्द्र याच्या आदेशानुसार हे नाटक लिहिलें.[२२]

**भोजराजाङ्कम्**—सिरुवल्लूर येथील कस्तूरी रंगनाथाचा पुत्र सुंदरवीरराघव याने प्रस्तुत नाटकांत भोजराजाच्या वधासाठी मुंज राजाने केलेले कपट चित्रित

१५ क्र. ७१२। १६ क्र ७१४। १७ क्र ७१७। १८ क्र. ७१६। १९ क्र. ७०६। २० मद्रास येथे मुद्रित। २१ मद्रास येथे मुद्रित। २२ क्र. ७२२।

केलेले आहे. याच सुंदरवीरराघवाने **अभिनवराघवम्** व **रंभारावणीयम्**[23] या नावाची आणखी २ नाटके लिहिलीं आहेत. रम्भारावणीयम् मध्ये रावणाने रंभेवर बलात्कार केला असताना तू दुसऱ्या कोणत्याहि स्त्रीवर असा बलात्कार करशील तर तुझ्या मस्तकाचे सहस्र तुकडे उडतील असा नलकूबराने ( रंभेच्या प्रियकराने ) शाप दिला, अशी कथा रंगविलेली आहे.

**रामराज्याभिषेकम्** ( ७ अंकी ) व **वल्लीपरिणयम्** ( ५ अंकी ) हीं दोन नाटके तंजावरच्या राजा शिवेंद्र ( इ. स. १८३५ ते १८६१ ) याच्या आश्रित कवि वीरराघव ( कामाक्षी व ईश्वर याचा पुत्र ) याने लिहिलीं आहेत.[24]

**ययातितरुणानन्दम्**-- विरिंचिपुर येथील नारायण पंडिताचा पुत्र वल्लीसहाय ( १९ वे शतक ) याने शर्मिष्ठा व ययाति यांच्या प्रणयकथेवर आधार लेलें हें ५ अंकी नाटक लिहिलें आहे.[25] **रोचनानंदम्** नावाच्या दुसऱ्या एका नाटकात रोचना व अनिरुद्ध यांचा विवाह दाखविला आहे. त्याने लिहिलेल्या 'आचार्य दिग्विजयचम्पू '[26] या शंकराचार्य चरित्रपर ग्रंथाचा उल्लेख मागे आलेला आहे.

**स्नुषाविजयम्**--नावणकोरमधील एलातूर गावच्या सुन्दरराजाचार्य ( इ. स. १८४१ ते १९०८ ) या विद्वानाने हे सामाजिक नाटक लिहिले. हा लेखक मोठा मार्मिक व विविधशास्त्र पारंगत होता. श्रावणकोरचा राजा केरळवर्मा याचा हा परममित्र होता. **पद्मिनीपरिणयम्, वैदर्भीवासुदेवम्, हनुमद्विजयम्, रसिकरंजनम्** हीं याचीं पौराणिक नाटके मुद्रित झालीं आहेत या नाटकांव्यतिरिक्त ' गोपालपरिणय ' ' कंसवध ' ' रामभद्रविजय ' ' श्रीनिवासदीक्षितविजय ' हे चार चम्पू या सुन्दरराजाचार्यांनी लिहिले आहेत त्यांचा निर्देश चम्पू प्रकरणात आलाच आहे. 'नीतिरामायणम्', 'रामभद्रस्तुति ', 'कृष्णार्यास्तुति ', करळवर्मकृत 'कंसवधम्' व स्वामिदीक्षितकृत 'वल्लीपरिणयम्' आणि 'गोपालपरिणयम्' एवढ्या ग्रंथांवर या सुन्दरराजाचार्यांनी टीका लिहिलेल्या आहेत[27] वरदराज नावाच्या यांच्या वंशजाने 'सुन्दरराजचरित्रचम्पू ' मध्ये त्यांचे चरित्र वर्णिलेले आहे.

**सुदर्शन विजयनाटकम्** – ले. वेंकटकृष्ण (नियमस्वामी) (१९ वे शतक).

**मन्मथविजयम्** – ले. वेंकटराघवाचार्य. हा कवि त्रिचनापल्लीमध्ये संस्कृत प्राध्यापक होता.

**चित्रकूटनाटकम्** – ले. विजयराघवाचार्य हा तिरुपति देवस्थानामध्ये ताम्रपट शिलालेख विभागाचा मुख्य अधिकारी. तंजावरच्या सरस्वतीमहाल या

---

२३ कृ ७२४। २४ कृ ७२३। २५ कृ ७२५। २६ मुद्रित। २७. कृ ७२१

ग्रथालयाचे प्रमुख अधिकारी रगनाथ ताताचार्य यांनी **न्यायसभा** नावाचे एक नाटक लिहिले असून **कुत्सितकुसीदम्** नावाचे त्याचे आणखी एक नाटक मजूषा मासिकात प्रकाशित झाले आहे.

**गोपीचन्द्रचरितम्** – हे ७ अंकी नाटक शास्त्रीय वेंकटाचलम् अय्या[28] याने लिहिले आहे.

**मणिमञ्जूषा** – याचा लेखक रामनाथशास्त्री हा मद्रासमध्ये संस्कृताध्यापक होता. प्रस्तुत ७ अंकी नाटकात अनेक संस्कृत गीते आहेत.

**दिल्लीसाम्राज्यम्** – मद्रासच्या पचैयप्पा कॉलेजचे प्राध्यापक म. म. लक्ष्मणसूरि यांनी 'दिल्लीदरबारच्या' घटनेवर आधारलेले प्रस्तुत नाटक लिहिले असून **पौलस्त्यवधम्** नावाचे एक पौराणिक नाटकहि लिहिलेले आहे.

**तार्टकप्रतिष्ठामहोत्सव.**[29] – ले कविरत्न पैंगनाडु पचपागेशशास्त्री.

**सौम्यसोमम्** - ले. श्रीनिवासशास्त्री. ('ब्रह्मविद्या' मासिकाचे संपादक.) ढाका येथील संस्कृत प्राध्यापक गुरुप्रसन्न भट्टाचार्य (राखालदास भट्टाचार्य यांचे चिरंजीव) यांनी **नाभागचरितम्** (६ अंकी) **मदालसा-कुवलयाश्वम्** व **भामिनीविलासम्** ही तीन नाटके[30] लिहिली आहेत.

आधुनिक संस्कृत नाटकलेखकात नारायणशास्त्री (सन १८६० ते १९११) सारखा अद्भुत लेखक दुसरा कोणी झाल्याचे दिसत नाही. संस्कृतातच काय पण इतर भाषांमध्ये सुद्धा नारायणशास्त्री इतकी विपुल व विविध साहित्यसंपत्ति दुसऱ्या कोणी लेखकाने निर्माण केली असेल असे वाटत नाही. हा नारायणशास्त्री तंजावर जिल्ह्यातील नडुकावेरी या गावचा राहणारा. **सौम्यसोमम्** या नाटकाचे लेखक व 'ब्रह्मविद्या' मासिकाचे संपादक श्रीनिवासशास्त्री यांचे नारायणशास्त्री हे बधु होते. त्यांना त्यांच्या पांडित्य व कवित्व गुणाप्रीत्यर्थ 'भट्टश्री' व 'बालसरस्वती' अशा पदव्या लाभल्या होत्या. त्यांचे वक्तृत्वहि असाधारण होते. मद्रासमध्ये त्यांच्या गीतामप्रवचनासाठी असख्य श्रोतृसमुदाय जमत असे. 'सुन्दरविजयम्' हे २४ सर्गांचे महाकाव्य 'गौरीविलासचम्पू', 'चिन्तामणि' ही आख्यायिका 'आचार्यचरितम्' हा गद्यग्रंथ, **नाट्यदीपिका** हा बारा भागांचा नाट्यशास्त्रीय प्रबंध, 'विमर्शः' नामक ६ भागांचा साहित्यशास्त्रीय प्रबंध व काव्यमीमांसा (२ अध्याय) हे त्यांचे अवान्तर लिखाण होय. त्यांचे मुख्य लिखाण नाटकात्मक होते. त्यांनी एकूण ९२ नाटके लिहिली असून त्यामध्ये पुराणातील बहुतेक रोचक विषय समाविष्ट

---

२८ कृ २५५ ए । २९. कृ २५४ एन्. । ३०. कृ. २५४ डब्ल्यू !

झालेले आहेत. त्यापैकी १० नाटकें मद्रास व चिदंबरम् येथें प्रकाशित झालीं आहेत.[31] **मैथिलीयम्** या १० अंकी नाटकात संपूर्ण रामायण कथा लिहिली आहे. त्याचप्रमाणे **कलिविधूननम्** या १० अंकी नाटकात संपूर्ण नलकथा समाविष्ट झालेली आहे. त्याच्या सर्व नाटकांची नामावली पुढील प्रमाणे आहे—

**१० अंकी नाटकें**—'मैथिलीयम्', 'चित्रदीपम्', 'बालचन्द्रिका' 'मुक्तमन्दारम्', 'कृतकयौवतम्', 'मधुमाधवीयम्', 'अवकीर्णकौशिकम्', 'माकंदमकरंदम्', 'ब्रह्मविद्या' व 'हरहरोहितम्'.

'त्रिपुरविजयम्' हे एकच नाटक १२ अंकी आहे

**९ अंकी नाटकें**—'मुग्धप्रबोधनम्', 'भद्रमाधवीयम्', 'बालचन्द्रिका', 'मृकण्डुमोदम्'.

**८ अंकी नाटकें**—'रक्तसारसम्', 'अमृतमथनम्', 'मैथिलीविजयम्' 'विश्ववीरव्रतम्' 'वीरवैदर्भानरम्'.

**७ अंकी नाटकें**—'शमतकौतिवल्लम्', 'मुदतीसगिरिजयम्', 'भामाभिपद्मम्', 'चितिनिग्रहम्' 'गूढकौशिकम्', 'मदालसा' 'मन्दारिकाविलासम्' 'मल्लिकाविलासम्', 'रत्नमाला', 'वरगुणोदयम्', 'हारहैमवतम्', 'कलिविजयम्', 'मुक्ताप्रवालम्', 'मग्नाशोकम्', 'अयस्चणकम्', 'घनकाशी', 'कांचनमाला', 'प्रौढपरतपम्', 'मारुतिमैरावणम्', 'लवणलक्ष्मणम्', 'क्लान्तकौन्तेयम्' 'व्यत्यस्तनन्त्रम्', 'विजययादवम्', ''जैत्रजैवातृकम्' 'सरमयूरम्'.

**६ अंकी नाटकें**—'मुग्धमन्थरम्' 'राजीविनी' 'शशिशारदीयम्', 'मञ्जुलमन्दिरम्', 'काममंजरी', 'सुभद्राहरणम्', 'मन्दारमाला', 'पुष्करराघवम्', 'शूरसापत्न्यम्', 'शिशुविनिमयम्', 'शिवदूतम्', 'विद्राणमाधवम्', 'बालप्राघुणिकम्'.

**५ अंकी नाटकें**—'मारग्रामन्तम्', 'सुरपाथेयम्', 'त्रिनटरम्', 'निल्हणीयम्', 'भीमरथी', 'प्रसन्नपार्थम्', 'कार्तीमती', 'भद्रराजीयम्', 'मृदकौशिकम्', 'सीताहरणम्', 'लब्धपाण्डवम्', 'क्लिष्टकीचकम्', 'प्लुष्टपाण्डवम्', 'धृष्टधौरेयम्', 'निरुद्धानिरुद्धम्', 'श्येनदूतम्', 'विद्धवेदनम्', 'विद्वन्धचापलम्', 'द्रुतवीरम्', 'मनोरमा', 'बद्धनादवम्', 'मुक्तामन्दरम्'.

---

३१ पृ. ७२७।

४ अंकी नाटकें—'मुक्तावली'.

३ अंकी नाटकें—'तरङ्गिणी' 'स्वैरचारः', 'मधुविध्ननम्', 'बहुल्यालिशम्'.

२ अंकी नाटकें—'शोभावती'.

एकांकी नाटकें—'शरमविजयम्', 'मुक्तवेशी', 'मणिमेखला' 'महिषासुरवधम्'.

**गोवर्धनविलासम्** – कोईमतुरचे ॲडव्होकेट पद्मनाभाचार्य यांनी आधुनिक पाश्चात्य तंत्रानुसार प्रस्तुत नाटक लिहिलें आहे. यामध्ये कथानक अंकांमध्ये विभागलें नसून प्रवेशांमध्ये विभागलेलें आहे.[३२] **ध्रुवतपः** नांवाचें आणखी एक नाटक या पद्मनाभाचार्यांनी लिहिलेलें आहे

'**सावित्रीचरितम्**, **भुजाभ्युदयम्**, **भद्रायुर्विजयम्**, **गोपालचिन्तामणिः**, **कृष्णाभ्युदयम्**, **वामनविजयम्** व **पार्वतीपरिणयम्** हीं पौराणिक नाटकें मोर्वीचे म. म. शंकरलाल (सन १८४४ ते १९१६) यांनी लिहिलीं. यांच्या वडिलांचें नाव महेश्वर असें होतें. 'रावजीविलासम्' नावाच्या काव्यांत शंकरलालनें मोर्वीवंशाच्या राजपुरुषाचें गुणवर्णन केलेलें आहे. याव्यतिरिक्त 'अनसूयाभ्युदयः', 'भगवतीभाग्योदयः' 'चन्द्रप्रभाचरितम्' व 'महेश्वरप्राणप्रिया' या कथा यांनी लिहिल्या आहेत. 'पाञ्चालीचरितम्', 'अरुंधतीविजयम्', 'प्रसन्नलोपामुद्रम्', 'कैशवङ्गपालेशलहरी', 'भोगवतीभाग्योदयम्', 'कैलासयात्रा', 'भ्रान्तिभयभञ्जनम्', 'भेवमार्थना' यासारखीं अवान्तर काही काव्यें यांनी लिहिलीं असून तीं सर्व त्यांच्या शिष्यांनी मुद्रित केलेलीं आहेत. श्री. शंकरलाल हे यावज्जीव मोर्वीच्या संस्कृत महाविद्यालयाचे मुख्याध्यापक होते. त्यांच्या स्मरणार्थ शंकरआश्रम नावाची संस्था मोर्वी येथे उभारली असून, तेथे धार्मिक विषयावर नित्य प्रवचन होत असतात.

नाट्यशास्त्रकारांनी रूपकवाङ्मयाचे नाटक, प्रकरण, भाण, व्यायोग, समवकार डिम, ईहामृग, अंक, वीथी, प्रहसन, नाटिका इत्यादि प्रकार वर्णिले आहेत व त्या सर्व प्रकारचें साहित्य अर्वाचीन लेखकांनी प्राचीन परंपरेनुसार निर्माण केलें. त्यांपैकी नाटकाव्यतिरिक्त कांहींचा निर्देश पुढे दिलेला आहे.

**शृंगारसुधार्णवभाणः**—मसलीपट्टम्च्या नोबल कॉलेजचे प्राध्यापक श्रीरामचंद्र यांनी हा भाण लिहिला[३३] असून त्या व्यतिरिक्त 'कुमारोदयचम्पूः व देवीविजयकाव्यम्' हीं दोन पुस्तकेंहि त्यांनी लिहिलेलीं आहेत.

---

३२. कोईमतुर येथें इंग्रजी भाषांतरासहित मुद्रित.
३३. मसलीपट्टम् येथें मुद्रित.

**शृंगारतरङ्गिणीभाण**:--कुम्भकोणंच्या गव्हर्मेंट कॉलेजचे संस्कृत प्राध्यापक श्रीनिवासाचार्य (इ. स. १८४८ ते १९१४) यानी हा भाण लिहिला. याच्या वडिलांचे नाव वेदान्ताचार्य असे होते. **उषापरिणयम्** नावाचे आणखी एक नाटक व 'हयग्रीवसम्' हे ५ सर्गांचे काव्य, 'श्रीकृष्णलीलायितम्' हे गद्यकाव्य, 'अमृतमथनम्' हे गेयकाव्य या 'शार्ङ्गकोपाख्यानम्' ही अवातर काव्ये त्यानी लिहिली आहेत. नागानंद व मृच्छकटिक याच्या टीकाहि त्यांनी लिहिल्या आहेत.[३४] (याचे वडील वेदान्ताचार्य हे निरवाहीन्द्रपुर या गावीं रहात असत. त्या गावात देशिकभट्ट वेदान्ताचार्य या नांवाचा एक कवि रहात होता. तो आमरण संस्कृत पद्यातच भाषण करीत असे.[३५])

**मदनानन्दभाण**:—ले. वैय्याकरणपंचानन पार्थसारथी. नुञ्जिड गावचा जमीनदार वेङ्कटाद्रि अप्पाराव हा या कवीचा आश्रयदाता होता. आर्तिसव. व स्वापप्रत्यय. ही दोन स्तोत्रकाव्ये[३६] या पार्थसारथीने लिहिली आहेत.

**शृंगारसर्वस्वभाण**:[३७]—ले. रत्नचूडामणि (१७ वे शतक)

**शृंगारकोशभाण**:[३८]—ले. गीर्वाणेन्द्र (१७ वे शतक)

**शृंगारकोशभाण**:[३९]—ले. अभिनव कालिदास.

**शृंगारतिलकभाण**:[४०](अय्याभाण)--(मुद्रित) ले. रामभद्र. हा तञ्जावरच्या सर्फोजी भोसल्याचा आश्रित कवि होता. मदुरेच्या भुवनेश्वराच्या शृंगारलीला यात वर्णिल्या आहेत.

**वसंततिलकभाण**:[४१] (अम्मालभाण)—ले. वरदाचार्य. रामभद्राच्या शृंगारतिलकभाणावर मात करण्यासाठी वरदाचार्यांनी हा भाण लिहिला. त्यामध्ये 'इंद्रजाल', 'सर्पमोहन' यासारखे अद्भुत प्रसंग वर्णिलेले आहेत. याने लिहिलेल्या यतिराजविजयम् या ६ अंकी नाटकाचा उल्लेख वर आलाच आहे.

**अनंगविजयभाण**:[४२]—ले. जगन्नाथ कवि (१८ वे शतक)

**रससदनभाण**:--कागनूरचा युवराज गोदवर्मा (१९ वे शतक) याने हा भाण लिहिला असून त्या व्यतिरिक्त 'रामचरितम्' 'मुररिपुस्तोत्रम्' 'सुधानन्दलहरी' इत्यादि याची काव्ये मुद्रित झालेली आहेत.

---

३४. याचे बहुतेक सर्व ग्रंथ मद्रास येथे प्रसिद्ध झाले. ३५ पृ. ७३० ३६. नुञ्जिड येथे मुद्रित । ३८. पृ. १५२ । ३९. पृ. १५४ । ४०. पृ. ७८७ । ४१. पृ. १६० मुद्रित ४२. पृ. ७१८ । ४३ पृ. ७८७.

**वेंकटभाणः**— ले. वेंकटपुत्र पेदसूरि (१९ वे शतक ).[४४] याने वसुमंगलम् नांवाच्या नाटकांत एका मूर्तिस्त्रीचा उपरिचर वसूशी विवाह झाल्याचे दाखविले आहे. 'रामचन्द्रविजयम्', 'भरताभ्युदयः व 'चकोरसंदेशः' ही अवान्तर काव्येंहि त्याने लिहिली आहेत.

**अनंगविजयभाणः** व विटराजभाणः हे दोन भाण त्रांगनूरच्या राजवंशांतील कविसार्वभौम कोचिन्नुतम्पुरान् म्हणून प्रख्यात असलेल्या युवराज रामवर्मा (सन १८५८ ते १९२६). याने लिहिले याने 'त्रिपुरदहनम्', 'वल्ल्युद्भवम्', 'विप्रसन्देशम्', 'देवदेवेश्वरशतकम्', 'उत्तररामचम्पूः', 'बाणायुधचम्पूः' 'देवीसप्तशतीसारः' हे अवान्तर ग्रंथ लिहिले असून ते सर्व मुद्रित झाले आहेत.

**लीलादर्पणभाणः**--ले. पद्मनाभ.[४५] हा कवि मूळचा आंध्रांतील राहणारा. याने काशीमध्ये प्रस्तुत शृंगारिक भाण लिहिला.

**किरातार्जुनीयव्यायोगः व जरासंधवधव्यायोगः**[४६] हे दोन व्यायोग त्रांगनूरच्या राजवंशातील कुन्चीकुट्टन् तम्बुरान् या नांवाने प्रसिद्ध असलेल्या रामवर्मा युवराज नांवाच्या कवीने (इ. स. १८६५ ते १९१३) लिहिले.

**त्रिपुरविजयव्यायोगः**-आंध्रांतील कोटिपल्ली गावाच्या सोमेश्वर मंदिराच्या महोत्सवाच्या प्रसंगी दाखविण्यासाठी कामशास्त्रीचा पुत्र पद्मनाभ[४८] (१९ वें शतक) याने हा व्यायोग लिहिला.

**पाण्डित्यताण्डवितम्**:-हिन्दुविश्वविद्यालयाचे प्राध्यापक श्री बटुकनाथ शर्मा यांनी हें प्रहसन लिहिले[४९]

**उन्मत्तकविकलशम्** अर्थात् *लम्बोदरप्रहसनम्*[५०]- तंजावर येथील शहाजी व सर्फोजी यांच्या आश्रयास असलेल्या वेंकटेश्वर नांवाच्या कवी ने हें प्रहसन लिहिले. हा कवि मनलूर येथे रहात असे. त्याने कवी 'राघवानन्दम्', 'नीलापरिणयम्' 'सभापतिविलासम्' हीं तीन नाटके व 'भोसलवंशावली'[५१] हें काव्य लिहिले आहे.

**चन्द्रलेखासट्टकम्**– ले. रुद्रदास.[५२] मानवेद नावाच्या कालिकतच्या राजाचे विलासी जीवन या सट्टकांत चित्रित केलेले आहे.

**वृषभानुजानाटिका**– ले. मथुरादास. याच्या गुरूचें नांव कृष्णदास असे होते. यमुनातीरावरील सुवर्णशेखरपुर हे याचे निवासस्थळ होते.[५३] प्रस्तुत नाटिकेत राधाकृष्णांचा प्रणय दाखविला आहे.

**मुक्तावलीनाटिका**– पीठापुर येथील सोडीभद्रादि रामस्वामी (इ. स. १८५६ ते १९१५) याने ही नाटिका लिहिली असून त्याने या व्यतिरिक्त 'शंबरासुरविजयचम्पूः' व 'रामविजयम्' हें काव्य लिहिले आहे.

---

४४. क्र. ७१४। ४५. क्र ७१९। ४६. क्र. ७२६। ४७. क्र. ७१५। ४८. क्र. ७२६। ४९. काराणसीत मुद्रित। ५०. मद्रासमध्ये मुद्रित। ५१ क्र.७०९। ५२. क्र. १७६।, क्र. ६५९। ५३ क्र. ७०१।

**मृगाङ्कलेखा** (नाटिका)—ले. विमालदेवसुत विश्वनाथ (१८ वें शतक); मृगाङ्कलेखा व कर्पूरतिलक यांची प्रणयकथा रत्नावली नाटिकेच्या धर्तीवर प्रस्तुत नाटिकेत दाखविली आहे. काशीमध्ये विश्वेश्वर मंदिराच्या एका महोत्सव प्रसंगीं या नाटिकेचा प्रयोग झाला होता.[५४] विश्वनाथ हा मूळचा आंध्रातील गोदावरी जिल्ह्यातला निवासी होता. पण तरुणपणींच तो काशींत राहावयास गेला. तेथेच त्याच्या आयुष्याचा अधिक काळ व्यतीत झाला.

**नवमालिका** (नाटिका)—ले. विश्वेश्वर कवि. (१८ वे शतक). हा अल्मोडा येथे राहत असे.[५५]

**शृंगारवाटिका**—ले. विश्वनाथ.[५५] अवन्तीचा राजा चंद्रकेतु याचा चम्पावती आणि कान्तिमती यांच्यासह शृंगार या नाटिकेंत दाखविला आहे.

**चन्द्रिका** (वीथी)—ले. रामपाणिवाद.[५६]

**वृत्तदासिचरितम्**—ले. पंडिता क्षमादेवी राव. मञ्जूषा मासिकाच्या १९५७ एप्रिलच्या अंकात हें नाटक प्रकाशित झालें.

**अब्दुल्लमर्दनम्**—ले. धारवाडचे सहस्रबुद्धे शास्त्री यांनी हे ऐतिहासिक नाटक लिहिलें असून त्यामध्ये हास्यरसाला प्राधान्य आहे. प्रस्तुत लेखकानें 'चहागीता' व 'काफदूतम्' हीं विडंबन काव्यें लिहिलीं आहेत.[५७]

**विक्रमाश्वत्थामीयम्**—ले. चिल्कुरी नारायणराव, एम्. ए., पीएच्. डी. प्रस्तुत लेखक अनंतपुरीमधील एका विद्यालयात संस्कृत व कानडी भाषेचा अध्यापक होता. हा व्यायोग यानें विद्यार्थ्यांसाठी मुख्यतः लिहिलेला असल्यामुळे ह्यात स्त्रीपात्र नाहीं. त्याची भाषाशैलीहि समास-विरहित आहे.

याचप्रमाणे विद्यार्थ्यांसाठी लिहिलेलें आणखी एक नाटक म्हणजे के. एस्. रामस्वामी शास्त्री यांचे **रतिविजयम्** हे होय.[५८] प्रस्तुत नाटक ५ अंकी असून तें कुमारसंभवाच्या कथेवर आधारलेलें आहे.* त्यात काहीं आधुनिक पद्धतींचीं गेय काव्येंहि आहेत. उदा.—

(पल्लवी) स्तुवे सदा राजराजेश्वरीम्

(अनुपल्लवी)—साम्राज्य प्रदायिनीम्। चतुरग पयोदरीम्॥ स्तुवे सदा॥ दीक्षितां दैत्यशमनीम्। सर्वलोकशंकरीम्। स्तुवे सदा॥ इ.

---

५४. पृ. ७१०। ५५ पृ डी ३१२। ५६ पृ. ७०७। ५७ पृ १७७। ५८ न चि केळकरकृत हास्यविनोद मीमांसा, प्रथम परिशिष्ट-पृ. ८१। ५९. श्रीरंगपट्टण यथील वाणीविलास मुद्रणालयांत मुद्रित.

* उज्जयिनी येथे इ. १९५७ मध्ये झालेल्या कालिदास महोत्सवानिमित्त गुजन यांनीं लिहिलेल्या 'शिवमङ्गलम्' या कुमारसंभवातील कथेवर आधारित गेय नाट्याचा (मुद्रित) प्रयोग झाला होता.

नागपूरचे श्री रुद्र शंकर खोत यांनीहि विद्यार्थ्यांसाठी 'लालवैद्यम्', 'ध्रुवावतारम्', 'अरघट्टघटम्' व 'हा हन्त शारदे' हीं लघुनाटकें लिहिलीं. तीं सर्व मुद्रित झालीं असून त्यांचे प्रयोग नागपूर व मुंबई येथे उत्सवप्रसंगीं झाले होते.

## ऐतिहासिक नाटकें

संस्कृत नाटककारांनी प्रायः प्राचीन पौराणिक विषयच सतत हाताळले. पौराणिक कथांची गोडी अवीट असल्याने प्रादेशिक भाषांतहि पौराणिक कथांवर आधारलेलीं सहस्रावधि नाटकं आजहि निर्माण होत आहेत. आधुनिक इंग्रजी व अन्य भाषीय साहित्याच्या प्रभावाने संस्कृत साहित्यिकांनी त्यांच्या सारखेच विषय नाटकासाठी निवडण्यास आरंभ केला. इंग्रजी भाषा जाणणाऱ्या संस्कृतज्ञांनी काही नाटकांचीं उत्कृष्ट भाषान्तरें संस्कृतांत केलीं. यांचा उल्लेख भाषान्तरित साहित्य विषयक प्रकरणात आलाच आहे. स्वतन्त्रपणे उल्लेख करण्यासारखीं आधुनिक नाटकें म्हणजे ऐतिहासिक नाटकें होत. या नाटककारांत बडोद्याचे श्री मूळशंकर माणिकलाल याज्ञिक यांचें स्थान फार श्रेष्ठ आहे. यांचा जन्म नडियाद येथे ३१ जानेवारी १८८६ रोजीं झाला. 'छत्रपतिसाम्राज्यम्'[60] या आपल्या दहा अंकी नाटकांत श्री. मूळशंकरजींनी पुण्यश्लोक शिवाजी महाराजांचे संपूर्ण जीवन चित्रित करण्याचा स्पृहणीय प्रयत्न केला आहे. त्यांनी 'प्रतापविजयम्'[61] नामक नऊ अंकी नाटकांतून वीरश्रेष्ठ प्रतापसिंहाचे जीवन व 'संयोगिता स्वयंवरम्' या नावाच्या तीन नाटकांतून पृथ्वीराज चव्हाणाचें जीवन रंगविलें आहे.[62]

उत्तर प्रदेशातील भगवन्तनगरचे निवासी महामहोपाध्याय मथुराप्रसाद दीक्षित (जन्म इ. १८५८) यांनी व्याकरण, आयुर्वेद या आपल्या आवडत्या विषयावर काही लिखाण केलें आहे. त्यांचें महत्त्वाचें कार्य म्हणजे त्यांचीं ऐतिहासिक नाटकें. वीरप्रतापम्[63], शंकरविजयम्, पृथ्वीराज, भक्तसुदर्शनम्, गान्धिविजयम् व भारत-विजयम् हीं सहा नाटकं त्यांनी आधुनिक तन्त्रानुसार लिहिलेलीं आहेत.

या ऐतिहासिक नाटकांच्या परम्परेत महामहोपाध्याय हरिदास सिद्धान्त वागीशरत्न (जन्म इ. स. १८७६) यांची मेवाडप्रतापम्, बंगीयप्रतापम् व शिवाजीचरितम् हीं नाटकें उल्लेखनीय आहेत. सिराजसरोजिनी, जानकीविक्रमम् व वसवधम् हीं अवान्तर नाटकेंहि सिद्धान्तवागीश यांनी लिहिलीं आहेत. याव्यतिरिक्त सुदर्शनपतिकृत सिंहलविजयम्[64] व पञ्चाननतर्क भट्टाचार्यकृत 'अमरमङ्गलम्'[65] या ऐतिहासिक नाटकाचा उल्लेख करण्यासारखा आहे.

६० १९२९ मध्ये बडोदा येथे मुद्रित। ६१ संयोगिता स्वयंवरम् मधील सेष कार्यांचा परिचय सेष काव्यविषयक प्रकरणात दिला आहे। ६२ १९३७ मध्ये लाहोर येथे मुद्रित। ६३, महरामपुर येथे १९५१ मध्ये मुद्रित। ६४. वाराणसी येथे १९३९ मध्ये मुद्रित।

रजपूतांच्या इतिहासातील विविध घटनांवर काही नाटकें लिहिण्यात आली ती अशीं—

| नाटक | | लेखक |
|---|---|---|
| प्रतिक्रिया | — | वी. के. थम्पी. |
| वनज्योत्स्ना | — | ,, |
| धर्मस्य सूक्ष्मा गतिः | — | ,, |
| कस्याहम् | — | सी. वरदराज शर्मा. |
| मनोहर दिनम् | — | ए. आर. हेबरे. |
| अरण्यरोदनम् | — | सीतादेवी. |
| अमर्षमहिमा | — | के. तिरुवेंकटाचार्य. |
| वाणिकुसुमा | — | सुरेन्द्रमोहन पंचतीर्थ. |

## हास्यरसात्मक नाटकें

संस्कृत नाट्यशास्त्रात प्रहसन हा स्वतंत्र एकांकी नाट्यप्रकार मानण्यांत आला आहे. पण तो प्राचीनकाळीं विशेष लोकप्रिय झाल्याचें दिसत नाही. अर्वाचीन काळात पाश्चात्य साहित्यातील एकांकिकाच्या प्रभावाने हा प्रकार एका अर्थी पुनरुज्जीवित झाला. एल्. वी. शास्त्री (मद्रास) कृत लीलाविलासम्[65] चामुण्डा व निपुणिका, एस. के. रामनाथशास्त्रीकृत दोलापञ्चालिकम् व मणिमञ्जूषा; वाय्. महालिङ्गशास्त्रीकृत कौण्डिन्यप्रहसनम्[66] व शृंगारनारदीयम्[67]; सुरेन्द्रमोहनकृत काञ्चनमाला; जीवन्यायतीर्थकृत पुरुषरमणीयम् व क्षुत्क्षेमम् व श्री. स्कन्द शंकर खोत (नागपूर) कृत कालमविष्यम् हीं सामाजिक व कल्पित विषयावरील प्रहसनें गेल्या दहा बारा वर्षांत ठिकठिकाणीं लिहिण्यात आलीं. संस्कृतांत हा प्रकार सर्वथा अभिनव आहे. यामध्ये के. के. आर. नायरचे आलस्यकर्मीयम्[68] (केसरी); यदुवनाथ शर्मांचे 'पाण्डित्यताण्डवम्'; काव्यतीर्थ मधुसूदनकृत पण्डितचरितप्रहसनम्; वाय्. महालिङ्गशास्त्रीकृत मर्कटमर्दलिका (भाण) व सुदर्शनशर्माकृत 'शृंगारशेखरः' (भाण) हीं पुस्तकें हास्यरसात्मक साहित्याच्या दृष्टीनें उल्लेखनीय आहेत. *अर्वाचीन वाङ्मयकालीन आरंभीच्या प्रहसनामध्ये* १७ *व्या शतकांतील* *कविताार्किक* कृत 'कौतुकरत्नाकरम्' व सामराज दीक्षितकृत धूर्तनर्तकम्, १८ व्या शतकातील घनश्याम (तंजावरच्या तुकोजीचा मंत्री) कृत 'डमरुकम्' हीं प्रहसनें उल्लेखनीय आहेत.

---

६५ पालघाट येथे १९३५ मध्ये प्रकाशित। ६६. मद्रास येथे १९२० मध्ये प्रकाशित। ६७ इ. स. १९५६ मध्ये मुद्रित। ६८. त्रिवेंद्रममध्ये १९४२ मध्ये मुद्रित.

प्रकरण १९ वे

# लाक्षणिक नाटकें

मागील प्रकरणांत रूपक वाङ्मयातील नाटक, प्रकरण, भाग, व्यायोग, नाटिका इत्यादि विविध प्रकारच्या साहित्याचा संक्षिप्त परिचय दिला. प्राचीन नाट्यलेखकांनी चोखाळलेले सर्व नाट्यप्रकार आजतागायत संस्कृतांत हाताळण्यात येत आहेत एवढें सिद्ध करण्यासाठी दिली एवढी माहिती पुरे आहे. व्याकरण, अलंकार इत्यादि शास्त्रांच्या निदर्शनासाठी संस्कृत महाकवींनी त्या त्या शास्त्रांना वाहिलेलीं महाकाव्ये लिहिल्याचें महाकाव्यविषयक एका प्रकरणात आपण पाहिलेंच आहे. त्याच परंपरेस अनुसरून नाट्यसाहित्यात एक वैशिष्ट्यपूर्ण संप्रदाय संस्कृत साहित्यात आढळतो. नाटकाच्या द्वारा आध्यात्मिक तत्त्वज्ञान लोकांच्यापुढे उभे करण्याचा प्रयत्न करणाऱ्या लेखकांनी आपल्या नाटकांतून काम, क्रोध, लोभ, मोह, श्रद्धा, दया, धृति यासारख्या तत्त्वांना पात्ररूपानें चित्रित केलें. अशा नाटकांतून ज्ञानयोग किंवा भक्तियोग जीवाच्या उद्धाराकरिता आवश्यक असतो हा सिद्धांत प्रतिपादन केलेला असतो. आध्यात्मिक शास्त्रांतील अत्यंत गहन सिद्धांत सुद्धा अशा नाटकामुळे सुगम झालेले दिसतात. दोन चार शास्त्रीय ग्रंथ धुंडून देखील जे सिद्धान्त एरव्ही सामान्य बुद्धीच्या लोकांना उमगणार नाहीत ते या नाटकामुळे सहज उमगू शकतात. मंद बुद्धीच्या राजकुमारांना राजनीतिशास्त्र शिकविण्यासाठी पंचतंत्रकारानें वाघ, सिंह, कोल्हे, लांडगे यासारख्या पशूंचे माणसासारखे व्यवहार वर्णन केले. अश्वघोष कवीनें आपल्या 'सारिपुत्र' प्रकरणात बुद्धि, कीर्ति, धृति यासारखे अव्यक्तभाव मानवीरूपानें चित्रित केले असून त्यांचा विवाद भगवान् बुद्धानें शमविला, असे दाखविलें आहे. ही लाक्षणिक वर्णनपद्धति वेदकाळापासून प्राचीन आहे. कृष्णयजुर्वेदामध्ये,

'अहमहमिकार्यां वाक् च मनश्चार्तीयेताम्। अहं देवेभ्यो हव्यं वहामीति वागब्रवीत्। अहं देवेभ्यः इति मन। तौ प्रजापतिं प्रश्नमैताम्। सोऽब्रवीत् प्रजापतिर्दूतीरेव त्वं मनसोऽसि। यद्धि मनसा ध्यायति तद् वाचा वदति, तद् मनः तुभ्यम्। न वाचा जुहुवन्नित्यब्रवीत्। तस्मान्मनसा प्रजापतये जुह्वति। (कृष्ण यजुर्वेद २-५-११४)'

यासारखे लाक्षणिक संवाद आढळतात. बृहदारण्यकोपनिषदाच्या ६ व्या अध्यायात सर्व इंद्रियांच्या विवादाची एक कथा आढळते. त्या कथेत लाक्षणिक पद्धतीनें सर्व इंद्रियांतून प्राणच श्रेष्ठ आहेत असें प्रतिपादन केलेलें आहे

या लाक्षणिक पद्धतीस अनुसरून उच्च विचार किंवा गहन तत्त्वज्ञान प्रतिपादन करण्यासाठी नाटक लिहिण्याचा पहिला यशस्वी प्रयत्न ११ व्या शतकात कृष्णमिश्र नावाच्या अद्वैतवादी यतीने केला. त्याच्या '*प्रबोधचन्द्रोदयम्*' या नाटकातील कथानक भागवतातल्या पुरंजन उपाख्यानावर आधारलेलें आहे. हें नाटक इतकें लोकप्रिय झालें की त्यावर रुद्रदेव, गणेश, सुब्रह्मण्यसुधी, रामदास, सदात्ममुनि, घनश्याम, महेश्वर न्यायालंकार, आर. व्ही. दीक्षित, आद्यनाथ, गोविंदामृत इत्यादि अनेक विद्वानांनी टीका लिहिल्या[1] आहेत. प्रबोधचन्द्रोदयाचा आदर्श पुढे ठेवून अनेक नाटकें लिहिण्यात येऊं लागलीं. त्यामध्ये कर्णपूरकवीचें **चैतन्यचन्द्रोदयम्** (या नाटकात चैतन्यमहाप्रभु हेच कृष्णाचा आविर्भाव झाल्याचें दाखविलें आहे.) वेदान्तदेशिक वेंकटनाथाचें **संकल्पसूर्योदयम्** (या नाटकात कृष्णमिश्राने प्रतिपादन केलेल्या सिद्धान्ताचें खंडन करण्याचा व विशिष्टाद्वैतमत प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला आहे.), यशःपालाचें (१४ वें शतक) **मोहपराजयम्**, भूदेव शुक्ल कवीचें (१६ वें शतक) **धर्मविजयम्** यासारखीं लाक्षणिक नाटकें मध्ययुगीन काळात लिहिलीं गेलीं. आधुनिक कालखंडातहि हा नाट्यप्रकार अनेकांनी सतत हाताळलेला आहे त्यांपैकी काहींचा परिचय पुढीलप्रमाणे आहे.

***श्रीरामचरितम्***—१७ व्या शतकांतील सामराज दीक्षित नावाच्या मथुरा येथे राहणाऱ्या कवीने दारिद्र्य व वैभव यांचे गुणदोष दाखविण्यासाठी हें ५ अंकी नाटक लिहिलें, त्यांत सुदामा ब्राह्मणाचें दारिद्र्य व त्याला झालेला आकस्मिक वैभवलाभ दाखविलेला आहे. बुंदेलखंडाचा राजा आनंदराय हा सामराज दीक्षिताचा आश्रयदाता होता. या सामराजाने त्रिपुरीस्तोत्रम्, 'धूर्तनाटकम्' व 'काव्येन्दुप्रकाश.' (साहित्यशास्त्रविषयक) हे आणखी तीन ग्रंथ लिहिलेले आहेत. त्याचा मुलगा कामराज याने 'शृंगारकलिका' काव्य, नातू प्रेमराज याने 'रसमंजरी टीका' व पणतु जीवराज याने 'रसतरङ्गिणी टीका' या प्रकारे ग्रंथलेखन केलेले आहे.

**चित्तवृत्तिकल्याणम्** व **जीवन्मुक्तिकल्याणम्** हीं दोन लाक्षणिक नाटकें भूमिनाथ उर्फ नल्ला दीक्षित (१७–१८ शतक) यांनी लिहिलीं आहेत. त्याच्या 'शृंगारसर्वस्वभाण', 'धर्मविजयचंपू', 'सुभद्रापरिणयम्' या अन्यान्य ग्रंथांचा परिचय प्रस्तुत ग्रंथांत तत्संबंधित प्रकरणांत आलेला आहे.

**सौभाग्यमहोदयनाटकम्**—१७ व्या शतकांत काठियावाडमध्ये झालेल्या जगनाथ नावाच्या कवीने प्रस्तुत लाक्षणिक नाटक लिहिलें. त्यामध्ये भावनगरच्या वखतसिंह राजाच्या सभेतील अधिकारीवर्ग चित्रित केलेला आहे.

---

१. *या सर्व टीका मुद्रित झालेल्या आहेत*

**विद्यापरिणयम्**—ले. वेदकवि (१८ वे शतक). या नाटकात विद्या आणि जीवात्मा यांचा विवाह लाक्षणिक पद्धतीने वर्णिलेला आहे लेखकाने हें नाटक तंजावरच्या सर्फोजी भोसल्याचा मंत्री आनंदराय मखी याला अर्पण केलें होतें; त्यामुळे आनंदराय मखी हाच या नाटकाचा लेखक होता असे मानले जाते.

**पूर्णपुरुषार्थचन्द्रोदयम्**—या नाटकाचा लेखक जयदेव (१८ वे शतक) याने सोमयाग केल्यानंतर संन्यास ग्रहण केला व त्यानंतर मलबारमध्ये वास्तव्य असताना हे नाटक लिहिलें. या नाटकांत दशाश्वराजाचा (१० इंद्रियरूपी अश्वाचा नियंता असलेल्या आत्म्याचा) आनंदपक्ववल्लीशी समागम वर्णिलेला आहे. हा समागम सुश्रद्धा व सुभक्ति यांनी घडवून आणला. श्रद्धा व भक्ति यांना विरोध करणारे राक्षसरूपी सर्व विकार पराभूत झाल्याचे कवीने दाखविलें आहे.

**शिवलिंगसूर्योदयम्**—ले. मल्लारी आराध्य (१८ वे शतक). हा कवि आन्ध्रप्रदेशांतील कृष्णा जिल्ह्यातला राहणारा होता. त्याच्या वडिलांचे नाव सरगणाराध्य असें होते. वीरशैव सम्प्रदायाचें श्रेष्ठत्व प्रतिपादन करण्यासाठी त्याने प्रस्तुत लाक्षणिक नाटक लिहिलें.

**अनुमितिपरिणयम्**–१८ व्या शतकाच्या आरंभीं मद्रास येथील ट्रिप्लिकेन विभागात राहणाऱ्या नरसिंह नावाच्या नैय्यायिक पंडिताने प्रस्तुत नाटक लिहिलें. त्यामध्ये परामर्शाची कन्या अनुमिति हिचा न्यायरसिकाशी विवाह झाल्याचें दाखविलें आहे. न्यायशास्त्रातला अनुमितिखंड सुबोध करण्याच्या हेतूने हे नाटक लिहिण्यात आलेलें आहे.

**मधुरसपिण्डीकरणनिरासम्**-ले. षट्‌शेषाचार्य (१९ वें शतक). मद्रास प्रांतामध्ये मंगलगड्डा येथे या आचार्याचें वास्तव्य होतें.

**नाट्यपरिशिष्टम्**-ले. कृष्णानंद वाचस्पति. नाटकद्वारा व्याकरणाचे पाठ देणें हा या नाटकाचा हेतु आहे.

**शिवनारायणमहोदयम्**-ले. नरसिंहकवि. मैसोरच्या राजाच्या सन्मानार्थ हें तत्त्वचर्चात्मक नाटक लिहिण्यात आलें.

**शुद्धसत्त्वम्**-अनंताचार्यांचा पुत्र मदभूषी वेंकटाचार्य (१९ वे शतक) याने विशिष्टाद्वैत मताच्या प्रचारार्थ प्रस्तुत नाटक लिहिलें.

**चित्तसूर्यालोकम्**–१९ व्या शतकांत आन्ध्रप्रदेशातील गोदावरी जिल्ह्यातला वेदगुमटल नांवाच्या गावीं, चिन्नानरसिंह नावाचा गणित, ज्योतिष इत्यादि शास्त्रें जाणणारा एक विद्वान होता. बराच काळपर्यंत तो विजयानगर येथे एका राजाच्या आश्रयास होता. आयुष्याच्या उत्तरार्धात संन्यास घेतल्यानंतर त्याने प्रस्तुत लाक्षणिक नाटक लिहिलें.

विद्वन्मोदतरङ्गिणी–१८ व्या शतकाच्या आरंभीं बंगालमध्ये झालेल्या रामदेव ( किंवा वामदेव ) नांवाच्या कवीने प्रस्तुत लाक्षणिक नाटक लिहिलें. त्यामध्ये विविध संप्रदायांच्या धार्मिक व अधार्मिक संवादांतून महत्त्वाचे सिद्धान्त कवीने प्रतिपादन केलेले आहेत. रामदेवाचा पिता राघवेन्द्र भट्टाचार्य हा शतावधानी म्हणून प्रसिद्ध होता. स्वतः रामदेवहि पुढे 'चिरंजीव' म्हणून प्रसिद्धीस आला. डाक्क्याचा नायब दीवान यशवंतसिंह याचा आश्रय या रामदेवाला लाभला होता. वृत्तरत्नावली नांवाच्या काव्यांत त्याने यशवंतसिंहाची स्तुति केलेली आहे शृंगारतटिनी, कल्पलता, शिवस्तोत्रम्, महादेवचम्पू व काव्यविलासः ( साहित्यशास्त्रविषयक ) हे ग्रंथ या रामदेवाने लिहिले आहेत.

चित्सूर्यालोकम्–ले. मुडुम्बी वेंकटराम नरसिंहाचार्य ( इ. स. १८४२ ते १९२८ ). याच्या आईचें नांव रङ्गाम्मा व वडिलांचें नांव वीरराघव असें होतें. विजयानगरचा गजपति विजयराम याचा हा कवि आश्रित होता. प्रस्तुत लाक्षणिक नाटकांत सूर्यग्रहणाची कथा त्याने रंगविली आहे. त्याने एकूण ११४ ग्रंथ लिहिले असून[१] त्यांपैकी 'गजेन्द्रव्यायोगः', 'राजहंसीयनाटकम्' 'वासवीपाराशरीयप्रकरणम्' 'रामचन्द्रकथामृतम्', 'भागवतम्', 'सत्यावहेलनम्', 'नीतिरहस्यम्' 'उज्ज्वलानन्दचम्पूः' 'काव्यालंकारसंग्रहः', यासारखे कांहीं ग्रंथ उल्लेखनीय आहेत.

प्रचण्डराहूदयम्–तंजावरच्या तुकोजीराजाचा मंत्री घनश्याम आर्यक याने प्रस्तुत लाक्षणिक नाटक वेदान्तदेशिक वेंकटनाथाच्या विशिष्टाद्वैतवादी 'संकल्पसूर्योदयम्' या नाटकातील सिद्धांतांचें खंडन करण्यासाठी लिहिलें. याव्यतिरिक्त 'गणेशचरितम्', 'मदनसञ्जीवनम्', 'कुमारीविजयम्', 'अनुभूतिचिन्तामणिः', 'आनन्दसुन्दरी' हीं नाटकें या आर्यक कवीने लिहिलीं आहेत. भवभूतीच्या महावीरचरिताचे अनुपलब्ध २ अंक याच कवीने लिहिले.

वर उल्लेखिलेल्या नाट्यकाव्यांव्यतिरिक्त

भर्तृहरिनिर्वेदम्—ले. हरिहर.
ब्रह्मविद्या—ले. नारायणशास्त्री.
ज्ञानसूर्योदयम्—ले. वादिचन्द्र.
सत्संगविजयम्—ले. वैद्यनाथ.
सन्मतनाटकम्—ले. जयंतभट्ट.
मुक्तिपरिणयम्—ले. सुन्दरदेव.

---

२. विजयानगर येथे मुद्रित । ३. इ. ३५६ ।

भक्तिवैभवम्—ले. जीवदेव.
विवेकचन्द्रोदयम्—ले. शिव.
विवेकविजयम्—ले. रामानुज.
शान्तिरसम्—ले. वैकुण्ठपुरी.
वेदान्तविलासम्—ले. वरदाचार्य.
मिथ्याज्ञानखण्डनम्—ले. रविदास.
शिवभक्तानन्दम्—ले. बालकवि.
गैर्वाणीविजयम्—ले. बालकवि.
स्वानुभूत्यभिधा—ले. अनंतराम.
जीवन्मुक्तिकल्याणम्—ले. मल्लासोमयाजी.
प्रमाणादर्शम्—ले. शुक्लेश्वर.

यासारख्या आणखी कांही लाक्षणिक नाटकांची नामावली देतां येईल. भारतीय तत्वज्ञानांतील अनेक जटिल सिद्धांत सामान्य जनतेपर्यंत पोचविण्याच्या प्रचारकी हेतूनेच हीं नाटकें लिहिण्यांत आलीं. त्यामुळे त्यांना शाकुन्तल, उत्तररामचरित यासारख्या रसनिष्ठ नाटकांची प्रतिष्ठा प्राप्त झाली नाही.

## प्रकरण २० वें

# गेय काव्यें

जयदेवाच्या गीतगोविंदापासून गेय काव्याचा एक अभिनव सम्प्रदाय संस्कृत साहित्यात १२ व्या शतकापासून सुरू झाला. 'गीतगोविंद' या नावाचें इतकें विलक्षण आकर्षण पुढील काळातील कवींच्या ठिकाणीं उत्पन्न झालेलें दिसतें की त्यानी जीं गेयकाव्य लिहिलीं त्याना त्यासारखींच नावें त्यानी दिलीं. उदा०

'गीतराघवम्'–ले. प्रभाकर (इ. स. १६७४)
'गीतराघवम्'–ले. हरिशंकर
'गीतराघवम्' व 'गीतगिरीशम्'–ले. रामकवि
'गीतगौरीपति'–ले. भानुदास[१]
'गीतवीतरागम्'–ले. अभिनवचारुकीर्ति
'गीतगंगाधरम्'–ले. कल्याणकवि
'गीतगंगाधरम्'–ले. नञ्ज राजशेखर (२० वे शतक)
'गीतगंगाधरम्' ले. चन्द्रशेखर सरस्वती
'गीतशंकरम्'–ले. मृत्युंजयपुत्र अनंतनारायण
'गीतदिगम्बरम्'–ले. रामचन्द्रसुत वंशमणि (१७ वे शतक)
नेपाळचा राजा प्रतापमल्ल याच्या तुलापुरुषदानोत्सवाच्या प्रसंगीं गाण्याकरिता हें काव्य लिहिलं. वंशमणि हा मैथिल ब्राह्मण होता. नेपाळेश्वर प्रतापमल्ल हाहि कवि होता. त्याने अनेक अष्टक लिहिलीं असून तीं नेपाळातील मंदिरावरावर कोरलेलीं आहेत.
'संगीतमाधवम्'–ले. गोविंददास. हा कवि बंगालमध्ये १७ व्या शतकात होऊन गेला.
'संगीतरघुनन्दनम्' ले.–विश्वनाथ
'संगीतसुन्दरम्' ले. सदाशिवदीक्षित
'संगीतराघवम्' ले. चिन्नाबोम भूपाल

---

१. मुंबईमध्ये मुद्रित.

'संगीतरघुनन्दनम्' ले. प्रियदास. हा कवि रेवा संस्थानातील विश्वनाथ
(१६ सर्ग) –सिंह नांवाच्या राजाच्या आश्रित होता. हा विश्वनाथ-सिंह वाघेला नावाच्या वंशांत जन्मास आला (१९ वे शतक) होता. त्याने स्वतः रामचन्द्राह्निकम्[१] या नांवाचें गेय काव्य टीकेसहित लिहिले आहे.

'संगीतसुन्दरम्'—ले. सदाशिव दीक्षित.

'गीतशतकम्'[२]—ले. सुन्दराचार्य.

'दयाशतकम्', 'मातृभूतशतकम्' व 'तारावलीशतकम्' हीं तीन गेय काव्यें श्रीधर वेंकटेश (१८ वें शतक) या कवीने लिहिलीं आहेत.[३]

—'शिवगीतमालिका'—ले. चण्डशिखामणि.

—'शिवाष्टपदी'—ले. वेंकटप्पा नायक. हा कवि १७ व्या शतकामध्ये म्हैसूरचा अधिपति होता.

'भजनोत्सवकौमुदी'—या ग्रंथांत अनेक संस्कृत कवींचीं गेय काव्यें संकलित केलीं आहेत.[४]

'गानामृततरङ्गिणी'—ले. टी. नरसिंह अय्यंगार. हा कवि 'कलिसिंह' या नांवाने प्रसिद्ध होता. बंगलोरमध्ये तो एका महाविद्यालयामध्ये प्राध्यापक होता. प्रस्तुत पुस्तकांत विविध विषयांवरील त्यांचीं गेय काव्यें संकलित केलेलीं आहेत.

—'शंकरसंगीतम्'[५]—ले. जयनारायण.

—'शंकरगीतिः'—ले. शार्ङ्गदेव.

—'शिवगीतिमालिका'—ले. श्रीचन्द्रशेखर-सरस्वती. १८ व्या शतकांत शंकराचार्यांच्या कांचीकामकोटी पीठाचे हे ६३ वे आचार्य होते. प्रस्तुत काव्यांत एकूण १२ सर्ग आहेत.[६] त्यांच्या 'गीतगङ्गाधरम्' या काव्याचा उल्लेख वर आलाच आहे.

'शहाजिविलासगीतम्'—ले. ढुंढिराज. (यांच्या अवांतर काव्यासंबंधी माहिती इतर प्रकरणांत आलेली आहे.)

गीतकाव्य लेखकांमध्ये पुदुकोट्टा येथील राज कॉलेजचे संस्कृत प्राध्यापक सुब्रह्मण्यसूरि (जन्म इ. १८५०, स्थान-कटायकुडी), यांचें कार्य बरेंच मोठें आहे.

---

२. इ. १०००। ३. मुंबईत मुद्रित। ४. वैद्य प्रेस, कुम्भकोणं येथे मुद्रित। ५. कुम्भकोणं येथे मुद्रित। ६. संस्कृत साहित्य परिषदेत मुद्रित। ७. इ. १००१।

त्यानी **रामावतारम्**, **विश्वामित्रयागम्**, **सीताकल्याणम्** हीं रामायणविषयक गेय काव्य व **रुक्मिणीकल्याणम्**, **विभूतिमाहात्म्यम्**, **हल्लीशमञ्जरी** व **दोलागीतानि** हीं आणखी चार गेय काव्य लिहिलीं आहेत. सुब्रह्मण्यसूरि हे विविध शास्त्र व कला यावरील प्रभुत्वामुळे व विशेषकरून वक्तृत्वामुळे दक्षिण भारतात अत्यंत प्रसिद्ध होते. प्रस्तुत गेय काव्याव्यतिरिक्त 'वल्लीबाहुलेयम्'[८] हें ७ अंकी नाटक, वल्ली व कार्तिकेय यांच्या विवाहासंबंधी दक्षिण भारतात प्रचलित असलेल्या कथेवर त्यानी लिहिलें आहे. 'शन्तनुचरितम्'[९] नावाचा एक गद्य ग्रन्थहि त्यानी लिहिलेला आहे याव्यतिरिक्त 'मन्मथमन्थनम्', 'बुद्धिसन्देशम्',* 'पद्यपञ्चरत्नम्', 'हरतीर्थेश्वरस्तुति', 'शुक्तिसुधारसायनम्' हीं काव्यें सुब्रह्मण्य सूरीने लिहिलीं आहेत.

**कृष्णलीलातरङ्गिणी**—१८ व्या शतकात गोदावरी जिल्ह्यातील कुचिमन्ची या गावीं राहणाऱ्या नारायणतीर्थ नावाच्या कवीने गीतगोविंदाप्रमाणेच १२ तरङ्गांचें हें गेय काव्य लिहिलें आहे.[१०] या काव्यात सर्वत्र संगीतविषयक सूचनाहि जयदेव कवीप्रमाणेच नारायणतीर्थानें दिल्या आहेत. बेल्लम्कोण्डरामराय यानेहि याचप्रकारचे व याच नावाचें एक गेय काव्य लिहिलें आहे. या सर्व गेय काव्यांचा आदर्श असलेलें गीतगोविंद हें कृष्णभक्तिपर असल्यानें तद्विषयक अनेक काव्यें संस्कृत कवींनी जयदेवाच्या पावलावर पाऊल टाकून लिहिलीं. त्यामध्ये विश्वनाथाचें **कृष्णभावनामृतम्**[११], वक्रेशाची **कृष्णामृततरङ्गिका** हीं दोन काव्यें विशेष उल्लेखनीय आहेत. 'कृष्णभक्तिचन्द्रिका', 'कृष्णानंदलहरी' व 'कृष्णलीलामृतम्' (अच्युतराय मोडक यांच्या टीकेसहित), यासारख्या काव्यांच्या लेखकांचीं नावें उपलब्ध नाहीत.

अशा प्रकार संस्कृतात गेयकाव्यांची काही वाण नाही पण सामान्यपणे गीतगोविंदातील अष्टपदींव्यतिरिक्त इतर गेय काव्य संस्कृतज्ञाना सुद्धा माहीत नाहीत. प्रस्तुत प्रकरणात काही उल्लेखनीय गेय काव्यें सहेतुकपणे निर्दिष्ट केलीं आहेत. त्यामध्ये मराठीचे सुप्रसिद्ध लावणीकार श्री. रामजोशी यांच्या संस्कृत-प्राकृत-मिश्रित (द्विभाषी किंवा चतुर्भाषी) लावण्या व संस्कृतात वाटेल त्या प्रकारचें गेय काव्य लिहिता येतें हे सिद्ध करण्यासाठी बद्धपरिकर होऊन प्रचंड लेखन करणारे जयपूरचे विख्यात पण्डित भट्टश्री मथुरानाथ शास्त्री (मञ्जुनाथ) यांची आधुनिक विषयावरील गेय काव्य व काही नाटकातील गेय काव्य आम्ही उद्धृत करीत आहोत. चित्तूर (कोचीन) चे वारयर कृष्णमेनन यांच्या गाथाकादम्बरींत मराठीतील लावणीप्रमाणेच मल्याळी

---

८ मुंबईत मुद्रित । ९ कृ ३०१ । *कृ ३५२ । १० कृ. ३०१ । ११. मुंबईमध्ये मुद्रित.

भाषेतील लोकप्रिय चालींचा नमुना पहावयास मिळेल. चांदोद (गुजराथ) येथील संस्कृत भाषा प्रचार मंडळाने गुजराथी चालीवर लिहिलेल्या संस्कृत नृत्यगीताचा एक संग्रह प्रकाशित केला आहे. त्यांतील काही नमुनेहि येथे पहावयास मिळतील.

**रामजोशीकृत लावण्या**—(*प्रकाशक-शंकर तुकाराम शालिग्राम*)

लावणी ३४

पुढील गीतात संस्कृत, मराठी, हिन्दी व कानडी या चार भाषा कवीने उपयोगांत आणल्या आहेत.

**संस्कृत**—याहि याहि निजभुवनम् । प्रतीका बोलशी मुद्दारा-मराठी ।
कानडी—निभमातना केळु दिल्ला । चल छोड पल्लो मेरा-हिन्दी ।
**संस्कृत**—देहि देहि पदमिदं मुरारे । उचित नव्हे तुजला—मराठी
कानडी—मी परगतिणी याक्क पकडता । यव क्यारे किने करमुला ।-हिन्दी
**संस्कृत**—पाहि पाहि निजजनक-यशस्वं । सोडी वाट मजला ।—मराठी
कानडी—नन पती निन मनमुणगीशी । क्यंचरे तुजे किने बोला ।-हिन्दी
धृ. ॥ **संस्कृत**—त्वं कथाविनोद कुरुषे । वेडे भूल ।—मराठी
कानडी—इनगडो माधव । ना शिरपर डारोगो धूल ।—हिन्दी
**संस्कृत**—त्वद्दर्शनं तत्सलु । उठतो मस्तकी शूल ।—मराठी
**संस्कृत**—मुञ्च मुञ्च चैलाधरमधुना । नंदाच्या पोरा ।—मराठी
कानडी—हिडनिन तंदिग मन्याग । पिय जन बहुत बुरा मेरा ।—हिन्दी
॥याहि॥ **संस्कृत**—तिष्ठ तिष्ठ सखी । इतुकि रागाने कागे बोली ।-मराठी
कानडी—ना गोकुळपति निन्न म्याल । सखी सुनरी अलबेली ।—हिन्दी
**संस्कृत**—अङ्गासङ्गमो मया सह तव । दैवदशा खुलली ॥—मराठी
कानडी—इष्टभालबी निज मनसा । गवळण मान भरनवाली—हिंदी
॥ चाल ॥ **संस्कृत**—यन्मयोदितं तत्सत्यं । निजमनी मान ।—मराठी
कानडी—नडो मुन्जगवळगे । मैं तुजे नहीं बेमान ।—हिन्दी
कानडी—दग दया माडकिशी । देख हमारी शान ।—हिन्दी
**संस्कृत**—किं रोषं कुरुषे । मागतसे तुज दान ।—मराठी
**संस्कृत**—*त्वं तु रमे मयोचिता । नको भाव धरू दुसरा ।—मराठी*
*कानडी—इष्ट मात निन केळु दिल्ला । सखी क्यौं उतरगया चेहरा ॥याहि॥* १

* * *

( लावणी ८८ ) संस्कृत-मराठी भाषांची संसृष्टि येथे दिसते.

( ॥ चाल ॥ पती गेले हो आज काठेवाडी । गिरनार अघूच्या पहाडी )
**नन्दात्मज मन्दं मन्दं मा याहि** । तुज अनरूप नाही ॥ धृ ॥

गेहादपसर त्वमितः कंसारे । जन जागति सारे ।
कान्तादेकान्तः किमु संसारे । हे नेणसि कारे ?
लोके निजजनकयशस्कं पाहि । स्वकुळाते पाहि ।
नन्दात्मज मन्द मन्द० ॥ १ ॥

दैवादिह जीवस्यहमतिगूढा । का नेणसि मूढा ।
स्वश्रू सम्प्रति मयि कोपारूढा । का भरसी हूडा ।
केपामपि करगा भवति नवोढा । किति होसिल वेडा ।
*सिंहादप्युग्रतरो मे भर्ता । सावध हो पुर्ता ।*
मन्ये त्वज्जीवनस्य मन्थनकर्ता । बोलावू आर्ता ।
मा भूत्ते जीवितसंशयवार्ता । वाचुनि जा पर्ता ।
जाने त्वं मदनादन्तर्दाही । कविराय असा ही ।
नन्दात्मज मन्द मन्द मा पाहि ॥ २ ॥

* * *

[ चाल—दामाजीपताची रसद । यवन वेदरचा अधिकारी । या मराठी गाण्याच्या चालीप्रमाणे चाल असलेलें हें शुद्ध संस्कृत भक्तिनिष्ठ गीत आहे.]

वन्दे श्रीगजमुखमगजनिवाल । विधुसुललितमाल ॥ धृ. ॥
चन्दनमण्डितशुण्डादण्ड । मदमर्दितगण्ड । सग श्रीविभवकरड ।
कुलदिति–कुलदण्ड । दूरीकृत–पदनत–भवजाल । वन्दे ॥ १ ॥
गौरीपरमेश्वर–सुतुराम । कृतविघ्नविराम । काम त्रिभुवनैकपूरितकाम ।
सुमवरदमभिराम । शरणागत–परिजन करुणापाल । वन्दे ॥ २ ॥
आद्य विद्यामृतपारावार विधिजगदाधार । कण्ठालम्बित–मणि–मुक्ता–हार ।
श्रितसम्पदगार । धीर कविरायपिकैकरसाल । वन्दे ॥ ३ ॥ (लावणी क्र. ५)

लावणी हा शृंगारिक गाण्याचा प्रकार महाराष्ट्रात अद्यापि सुद्धा अतिशय लोकप्रिय आहे. हा रामजोशी नावाचा कवि महाराष्ट्रसाहित्यात लावणीकार म्हणून फार प्रसिद्ध होता. त्याच्या मराठी लावण्या महाराष्ट्रसाहित्यात फार प्रसिद्ध आहेत. त्यांतील काही संस्कृत लावण्या या ठिकाणीं दिल्या आहेत.—

( लावणी क्र. ६ )

[ चाल—दामाजीपताची रसद । यवन वेदरचा अधिकारी ]

सुभग सखीय नितान्तचपला चलयति मम मानसम् ।
कदा मे चुम्बति सुमसारसम् ॥ धृ. ॥
गजपतिगति–रतिमानमृदुतरवर–मञ्जरी । तथेय भाति सुभग सुन्दरी ।
चन्द्रकमल–सुललित–वदनादतिसुरुकरी । निजकुच–सुललित–मणिमञ्जरी ।

चरण-रणित-निजनूपुर-चकिता यत्पुरतः पामरी । सुराणामपि रंभा सकरी ।
करिअरिपरी-सुरुचिर-कटिभागा-मतगुणजितगुर्जरी । सुरूपा पदपद्धति-कुञ्जरी
॥चाल॥ सा कथं भवति मो मदीय-रतभोगिनी ।
जनकेयं तरुणी नितम्बकुचशालिनी ।
सुरवर-किन्नर-चलन-चकित-कामिनी ।
कुच-विलिखित-मृगमद-लसित-सुरभामिनी ।
सुदूरतर-मृदुनलिन-दलायत-लोचनशरसाहसं । न सोढुं शक्नोम्यतिराजसम् ॥२॥

* * *

( रामजोशीकृत लावणी क्र. ७२ )

तरुणि तवेयं कुचतटमतिगुरु कुरु मम हृदि सादरं
मनो मे भवति मनोभवदरं ॥ ध्रु. ॥
अधर-मधुर-मधुरस-रसिकं मामुज्जीवय तावकम् ।
प्रिये मे शमय विरहपावकम् ॥
मुञ्चति मदनः स्वीकृतकदनो मयि विषमं सायकम् ।
निवारय तं सखि रतिनायकम् ।
दृगन्तं पाहि निजसेवकम् ।
जहि जहि मानं मात्रजमौनं अनुकुरुषे किं बकम् ।
त्वदीयं रूपितं सुखयति न कम् ।
॥ चाल ॥ किं कृतं मया वरमानिनि रुचिराधरे ।
कुरु कृपामरुणरुचि-पल्लव-कोमलकरे ।
साहसं किमिदमतिकोपभरे मन्थरे ।
मञ्जुलतर-मृदुसिञ्जित-मणिमय-मञ्जीर-द्युतिधरम् ।
नतोऽहं तावकपटपुष्करम् ॥ १ ॥

* * *

मूलशंकर याज्ञिक यानी संयोगितास्वयंवरम् या नाटकांत कांही गेय काव्यें रचलेलीं आहेत तशींच इतर कांही कवींनी आपल्या नाटकांत गेय पद्यरचना केलेली आहे. संयोगितास्वयंवरम् मधील पुढील गीत पहा.

[ वसंतराग, त्रिताल ]

वितरति नतिमयि रतिरमण
युवतिजनस्ते रतिरमण
नवसुमसायक वसन्तनायक ।
अलिकुलगायक रतिरमण ॥ वितरति ॥ १ ॥

वनितादारण रसिकनिधरण
भवसन्तरण । रतिरमण ॥ नितरति ॥ २ ॥
सुरगणवन्दित । निजरनिनन्दित ।
स्वमनानन्दित रतिरमण ॥ नितरति ॥ ३ ॥
वाञ्छितमर्पय मनासि तर्पय
स्वजनं दर्पय रतिरमण ॥ नितरति ॥ ४ ॥

[ केदार राग, त्रिताल ] [ पृ. ५१ ]

माधव यमुनातीरविहारी । मृदुराधाधरमधु–मधु–मधुकर
-नटवर गिरिवरधारी ॥ माधव ॥ १ ॥
राधायौवनवनवनमाली । गोपीजनमुदकारी ॥ माधव ॥ २ ॥
सुमतिमतिजनय नय जयशाली । त्वमु जयपथमविकारी ॥ माधव ॥ ३ ॥

* * *

साहित्यवैभवम् [ भट्टश्रीमथुरानाथशास्त्री ] नवयुगवीथि (पृ. ४८८)

रेलशकटिः— ( आगगाडी )

अन्जनबलेन दूरदेशानपि दर्शयन्ती
मार्गे लङ्घयन्ती योगमहिममहीयसी ।
नानाजातिलोकानिस्पङ्क्ती समावेशयन्ती
शासन्ती सुधारसचरितमश्रीयसी ।
रात्रिन्दिवं यान्त्या अपि शीघ्रगतेर्भेदो नास्ति
नित्यं लोहरेखोपरि गमनाद् गरीयसी
प्रायः मस्तीकृतमराळितरीतस्त्वपि
जयतीति सैषा धूमशकटी पटीयसी ॥ ५ ॥

* * *

वायुयानम्

उत्पतत्याद्या इव परिप्लवपक्षयो ।
याति निर्भयोऽनिलवेग गगनान्ते ।
मीनाऽऽकृतिमिष्यदेशमारोहन्ति यात्रिणो
भ्रमणशीलिनो नियुद्धे निपुणास्त्व ये ।

मञ्जुनाथ मन्त्रमिव लब्ध्वा बाष्पयन्त्रबलं
घुंकरोति घोरं व्योम्नि गमनजवोदये
वर्तमान-वैज्ञानिक-लोकस्याऽभिमानभूमि-
माकाशे विमानमयमानमवलोकये ॥ ७ ॥

* * *

अब्धियानम्—(जहाज) : [ साहित्यवैभवम् ( पृ. ४९० ) ]

यस्य पुरुपृष्ठमधिरुह्य शैलशृङ्गायितान्
सागरतरङ्गानिमानभितोऽभिवर्णये ।
मध्यतले भोजन-शयन सभा-शाला इमा
विशदविशालाऽऽक्रीडभूमिरपि निर्णये
नीचैस्तले नाविकनिवासा बाष्पयन्त्रगृहा
वारिप्रवाहाणि बहिर्देशेऽस्याऽवकर्णये
संमुखमुपेतं सर्वसामग्रीसमेतं सखे
पारावारपति--पोतमेतं बहु वर्णये ॥ ८ ॥

* * *

## ट्रामवे

धावति जवेन तडित्तन्त्रीमवलम्ब्य भृशं
गन्त्री मार्गमध्ये लोहनिर्मितसरण्याऽसौ ।
यस्याः शतमास्ते तल्द्वयेऽपि यात्रिजनाः
प्राप्यतेऽथ सर्वदोऽतिमुलभमरण्याऽसौ
मञ्जुनाथ मोहमयीमीक्षितुमभीप्ससि चे-
दवधर चेतसा समीहितहिरण्यासौ
क्वामपि किमद्य गिरिग्रामनिकटीकृतये
ट्रामशकटी ते पश्य पुरतः शरण्याऽसौ ॥ ९ ॥

* * *

कमलाविजयनाटकम् ( पृ. २ ) ले. वैंकटरंगणार्य

जयति वसन्तो विविधविलासै-
र्विहितसुमोदो बहुविधकरणैः ॥ १ ॥

गायति कोकिलमिथुनं मधुरं
पञ्चम-तान-सुशोभितगीतम्

कोविदबाला करधृतवीणा
क्वणति गुणान्वितरागविशेषा ॥ ४ ॥

पुष्णाति चूतो बहु मकरन्दं
वर्धति षट्पदवृन्दं नीडे ।
राजाविन्दुस्तपनसमानो
यूनां मानस-मर्म-विभेदात् ॥ ५ ॥

क्रीडति तोयाद् बालकदम्बं
विद्याशालाविरतिविधानात्
विहरति शैलेष्वात्तनिवासं
धनचयमिलितं राजकदम्बम् ॥ ६ ॥

प्रातर्गच्छति सेवकवर्गो । नियमितकार्यं विहितोद्योगम् ।
सुखरहितदाः शुभसरदिवसाः । साधुजनादृत-धर्मविशेषाः ॥ ७ ॥

## कमलाविजयनाटकम् ( पृ. ४ )

देवि दाक्षायणि ते नमो नमो ।
गौरि ! देवि दाक्षायणि ते नमो नमो ॥
आर्ये । पायाः ॥ ८ ॥ ( देवि )
मायातीते । मायाध्यक्षे ॥ ९ ॥ ( देवि )
अपर्णे प्रसन्ना । सदा त्वं भवेत्यम् ॥ १० ॥ ( देवि )
सर्वाधाराम् । शर्वाधाराम् । त्वामर्चामो युक्त्या भक्त्या ॥११॥ ( देवि )

शङ्करि नस्त्वं संसृतिदुःखम् ।
भञ्जनदुर्गे सन्ततु सौख्यम् ॥ १२ ॥ ( देवि )

भवतरणिनौ भवतरुणि त्वम् ।
भवतरणेऽस्मानव करुणाढ्या ॥ १३ ॥ ( देवि )

कुमारजननि त्वं सुमानय सदार्तान्
कुमानपरिभूतान् समानगुणदीप्तान् ॥ १४ ॥ ( देवि )

हरिसोदरि भवतोषिणि भयहरिणि कृपया ।
परिपालय भवदाश्रितजनतामिह गिरिजे ।
सुदतीमणि-परिसेवित-पदभूषितभवने ।
कमलाजयसुगुणावनपरिपोषकवरदे ॥ १५ ॥ ( देवि )

कमलाविजय नाटकात कवीने काही अगदीच नवीन गेय काव्याच्या चाली स्वतः सांगितल्या आहेत. त्या याप्रमाणे—

| अक्षरे | वृत्त | लक्षण | प्रस्तार | उदाहरणें अंक | उदाहरणें श्लोक |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीः | श्रीः | (—) | १ | ८ |
| २ | स्त्री | गौ स्त्री | (– –) | १ | ९ |
| ३ | सुधीः | सुधीर्यः | (u– –) | १ | १० |
| ४ | कन्या | म्गौ चेत्कन्या | (– – – –) | १ | ११ |
| ५ | पङ्क्तिः | भ्गौ गिति पङ्क्तिः | (–uu– –) | १ | १२ |
| ६ | शशिवदना | शशिवदना न्यौ | (uuuu– –) | १ | १३ |
| ७ | विद्युल्लेखा | विद्युल्लेखा मो मः | (– – – – – –) | ४ | २२ |
| ७ | कुमारललिता | कुमारललिता ज्सगाः | (u–uuu– –) | १ | १४ |

* * *

**गाथाकादम्बरी** = [ ले. वारवूर कृष्णमेनन, चित्तूर (कोचीन) ].

एव प्राय मृगयाघोषं । श्रुत्वा चकितस्तातोत्सगे
वाचं कृत्वा शान्तं घोषे । किं स्यादिमिति जातदिदृक्षो ।
नीडाप्रसृतशिरोधरमात्र–। स्तामेवदिशं प्रति कृतदृष्टि
र्यावच्चामवमद्राक्षं हो । गुञ्जामालालङ्कृतयूना ।
नायकरत्नेनारूढाग्र । काकश्यामलतनुमृत्सैन्य
गणनाया गुरु जात्वा शबर मागच्छन्त तावन्मन्दम् ।
आगत्यासौ गुञ्जामाली । अस्मदोकसो वृक्षस्याध ।
किंकरनिर्मितपल्लवतल्पम् । अध्यासीन. पम्पासरसा–।
स्त्वरयानीतैरम्बुबिसादिभि–। रपहृतमृगयाजातश्रान्ति. ।
सैन्यसमेतमगानिजमार्गम् । वृद्धस्त्वेकश्शबरः सैन्या–
च्छिथिलो भूत्वा वृक्षान्तरित । स्तिष्ठति पश्चादामूलाग्रं ।
वृक्ष पठति च माहिषचर्मो– रस्त्र धृत्वा दक्ष वृक्ष ।
आरोहत्यथ निष्ठुरहृदयः । कर्कशतलकरगतानि वयांसि ।
कूर कूर कण्ठेपेत्र । कार कार क्लृप्तवयांसि ।
निश्शेषीकृतपक्षिसमूहो । वृक्षादवरुह्याचानन्दम् ।
सञ्चितभाण्डो गच्छति मार्गम् । मारिततातस्योत्सगान्त ।
स्खलन्नोऽहं तेनादृष्ट–स्तातेन सह प्राप्तापातो ।
दैवाधीनादवकरनिकरे । किंचिज्जीव. स्तातं त्यक्त्वा ।
हा ! हा ! कष्ट ! मन्दं मन्दं । प्राप्य च मूलं निस्सरतरवो–।
र्गूढावासं कृतवांस्तत्र । शबरे याते जातविश्वास. ।

पपातीरं प्रति कृतयानो । मध्येमार्गं निर्मलसलिले ।
तस्मिन् सरसि स्नानं कर्तुम् । उद्दमुनिपुनैस्त्वरता हारी-।
ताख्येनाहं दृष्टः कृपया । सरलमीरं नीतो निज्कर ।
दत्तजलेन प्राणितशक्ति-। र्गतात्याहृयतत्तातम्य ।
प्राणितवान्मद्दाश्रमरत्नम् ।

*　　　*　　　*

सोऽहं मन्दिरस्य भजनम् । ॐ सोऽहं धाम, वद्रिकाश्रम, चान्दोद ( नर्मदा )

भवसमुद्रं तर्तुकाम, भजस्व त्व मन ॐ सोहम् ।
प्रकटयितु ब्रह्मज्योतिः, भजस्व त्व मन ॐ सोहम् ।
ॐ सोहम् इत्यादिस निगम, सम्पूर्ण विश्वमपि ॐ सोहम् ।
प्रकाशयितु निरचर्मम् । भजस्व त्व मन ॐ सोहम् ।
भजन्ति ब्रह्मविष्णुमहेशाः शक्तिरपि भजति ॐ सोहम् ।
नरात् नारायण भवितु । भजस्व त्व मन ॐ सोहम् ।
पर्यटनजातः पथभ्रम्यं, नास्ति पथप्रदर्शक कोऽपि ।
सरलं मार्गं गन्तुकामम् भजस्व त्व मन ॐ सोहम् ।
ॐ सोह यो महामन्त्रो वेदैः स्मृतिभ्नो गीतः ।
ॐ सोह इति भजन् वै ठाकोरः वक्ति भविष्यसि ॐ ॐ ॐ ।

*　　　*　　　*

[चान्दोद] संस्कृतभाषाप्रचारमण्डलाची **मण्डल गान-वल्ली**

**मुग्धा गुर्जररमणी**

मुग्धा गुर्जर रमणी, मण्डलगानाय चचाल
इतस्ततस्य हित्वा ध्यान, मण्डलगानाय चचाल । (२)
हो मण्डलगानाय चचाल । मुग्धा० ।
परिधाय हस्तगता शाटीम् । ससम्भ्रम चचाल ।
भुक्त नाभुक्त विचार्यैव, मण्डलगानाय चचाल ॥ मुग्धा०
श्वश्रूः रुष्टा चण्डी भूता, याता च वशीभूता
दृष्ट नादृष्ट कृत्वैव मण्डलगानाय चचाल ॥ मुग्धा० ॥
हो मण्डलगानाय चचाल । मुग्धा० ।
हसन्ती क्रीडन्ती सखिभिः समागता गानभूमौ
प्रघूर्णन्ती गृह्णन्ती ताल सर्वप्रिया सम्भूतासौ (२)
हो मण्डलगानाय चचाल । मुग्धा० ।

## प्रकरण २१ वें.

# गद्य साहित्य

संस्कृत न जाणणाऱ्या सर्वसामान्य आधुनिक सुशिक्षितांची समजूत अशी आहे की संस्कृतातले सर्वच साहित्य पद्यमय आहे. संस्कृताची तोंडओळख असलेल्या सुशिक्षितानासुद्धा बाण, दण्डी व सुबन्धु यांव्यतिरिक्त गद्यलेखकांची नांवे सुद्धा सहसा ठाऊक नसतात. परंतु संस्कृत गद्याची परंपरा इतर वाङ्मयप्रकारांच्या परंपराप्रमाणे वेदवाङ्मयाइतकी प्राचीन आहे. यजुर्वेद व अथर्ववेद यांमध्ये गद्य लिखाण प्रामुख्याने पाहावयास मिळते. कृष्णयजुर्वेदाच्या तैत्तिरीय, काठक व मैत्रायणी या संहिता सर्वथा गद्यमय आहेत. ब्राह्मणग्रंथ तर गद्यात्मकच आहेत. त्यातील गद्य समासविरहित व अति सरळ आहे. उदाहरणार्थ ऐतरेय ब्राह्मणाच्या शुनःशेप कथेतील पुढील गद्य पहा—" अथ ह विश्वामित्रः पुत्रानामन्त्रयामास। तस्य ह विश्वामित्रस्य एकशतं पुत्रा आसुः। पञ्चाशदेव ज्यायांसः मधुच्छन्दसः। पञ्चाशत् कनीयांसः। तत् ये ज्यायासः ते कुशलं न मेनिरे।ताननुव्याजहार। अन्तान् वः प्रजाभक्षीष्ट इति। त एते अंध्राः पुण्ड्राः शबराः पुलिन्दा मूतिबा इत्युदन्त्या बहवो वैश्वामित्रा दस्यूनां भूयिष्ठाः।" या उताऱ्यावरून ब्राह्मण ग्रंथातील गद्य किती सरळ व सुबोध होतें याची कल्पना येईल.

उपनिषदांतील गद्य सुद्धां असेंच सरळ व सुबोध आहे. छांदोग्योपनिषदांतील- "न्यग्रोधफलमत आहर इति। इदं भगव इति। भिन्धि इति। भिन्न भगव इति। किमत्र पश्यसि इति। अण्व्य इव इमा धाना भगव इति। आसामङ्ग एकां भिन्धि इति। भिन्ना भगव इति। किमत्र पश्यसीति। न किञ्चन भगव इति। तं होवाच यं वै सोम्य एतमणिमानं न निभालयसे एतस्य वै सोम्य एष अणिम्नः एव महान् न्यग्रोधस्तिष्ठति। श्रद्धत्स्व सोम्य इति। स य एष अणिमा ऐतदात्म्यमिदं सर्वं तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति।" या उताऱ्यावरून उपनिषदांच्या भाषाशैलीची यथार्थ कल्पना येईल. महाभारतांत उपमन्युकथेसारख्या कांही कथांत व पुराणांमध्ये ठिकठिकाणीं आढळणारें गद्य असेंच ब्राह्मण व उपनिषदांतील गद्याप्रमाणे सरळ व सुबोध आहे.

सूत्रग्रंथांचें विवरण करण्यासाठी भाष्यात्मक गद्य वाङ्मय उदयास आलें. या भाष्यग्रंथांचे प्रतिपाद्य विषयच कठीण असल्याने त्यांतील भाषेमध्ये कांहीसा

दुर्बोधपणा मानतो. तथापि पाणिनि, शंकराचार्य यांच्यासारख्या श्रेष्ठ भाष्यकारांनी सुबोध व प्रसन्न गद्यशैलीचा आदर्श निर्माण करून ठेवला आहे. तात्त्विक व विवेचनात्मक गद्यवाङ्मयाप्रमाणेच ललितमधुर गद्यवाङ्मयाची परंपराही फार प्राचीन आहे. पातञ्जलमहाभाष्यामध्ये वासवदत्ता, सुमनोत्तरा, भैमीरथी, या आख्यायिकांचा उल्लेख आहे. वाग्वर्चस्वी अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांना 'वाग्वर्चस्वि' अशी विशिष्ट संज्ञा मुद्दा रूढ होती. या आख्यायिकांव्यतिरिक्त वररुचिकृत चारुमती, श्रीपालिताची तरंगवती, रामिल सोमिलांची शूद्रककथा, त्याचप्रमाणे मनोवती, शातकर्णीहरणम्, इत्यादि आख्यायिका लिखित स्वरूपात प्रसिद्ध होत्या. हरिश्चंद्राची 'मालती', भोजाची 'शृंगारमंजरी' कुन्तलेश्वराची 'आश्चर्यमंजरी' रुद्राची 'त्रैलोक्यसुंदरी', अवन्तिसुंदरीची 'मृगाङ्कलेखा' या अवान्तर आख्यायिकांचा आदरपूर्वक निर्देश संस्कृत लेखकांनी केलेला आहे.

ललित गद्यलेखकांमध्ये बाणभट्ट, दण्डी व सुबन्धु या त्रिपानी जे लोकोत्तर प्रतिभासामर्थ्य व संस्कृत भाषेचे ऐश्वर्य व्यक्त केले त्याची कल्पना रसानुभवावाचून येणार नाही. त्यांच्या शैलीचे अनुसरण करू इच्छिणाऱ्या भूषणभट्ट (बाणभट्टाचा पुत्र व कादंबरीच्या उत्तरार्धाचा लेखक), चक्रपाणि दीक्षित (दशकुमारचरिताच्या उत्तरार्धाचा लेखक), आनंदधर[1], धनपाल[2], सोड्ढल[3], वादीभसिंह[4], विद्याचक्रवर्ती[5] अगस्त्य[6], वामन[7] (यालाच 'अभिनव बाणभट्ट' पदवी लाभली होती), देवविजयगणी[8] यांच्यासारख्या अनेक लेखकांनी बाण, दण्डी व सुबन्धु या श्रेष्ठ ललितलेखकांची परंपरा अखण्डित राखली. त्यानंतरच्या अर्वाचीन काळापर्यंतही ती परंपरा खण्डित झाली नाही. अर्वाचीन साहित्यिकांनी लिहिलेल्या गद्यग्रंथांचा व त्यांच्या गद्यशैलीचा सविस्तर परिचय प्रस्तुत प्रकरणात देण्यात येईल; त्यावरून संस्कृत गद्यामध्ये कसे स्थित्यंतर झाले याची थोडीशी कल्पना येऊ शकेल.

संस्कृत गद्यलेखकांनी गद्यरचनेचे नानाविध प्रकार प्रचारात आणले. त्यांची लक्षणेहि साहित्यशास्त्रकारांनी दिलेली आहेत. आजच्या काळात सरळ व सुबोध गद्य वाचकांना आवडत असल्याने या कृत्रिम प्रकाराविषयी त्यांना विशेष आस्था

---

१. 'माधवानल' कथेचा लेखक, १० वे शतक.
२ तिलकमंजरीचा लेखक, ११ वे शतक
३ 'उदयसुंदरी' कथेचा लेखक, ११ वे शतक
४. गद्यचिन्तामणीचा लेखक १२ वे शतक
५. गद्यकर्णामृताचा लेखक, १३ वे शतक.
६. कृष्णचरिताचा लेखक, १४ वे शतक
७. वीरनारायणचरिताचा लेखक, १५ वे शतक.
८. रामचरिताचा लेखक, १६ वे शतक.

घारणार नाही. साहित्यदर्पणकार विश्वनाथाने ' वृत्तबन्धोज्झित गद्यम् ' अशी गद्याची व्याख्या केली आहे. दण्डीने काव्यादर्शामध्ये 'ओज समासभूयस्त्वमेतद् गद्यस्य जीवितम् ' या वाक्यात गद्याचे प्राणभूत तत्त्व काय आहे तें सांगितलें विश्वनाथाने साहित्यदर्पणात **मुक्तक, वृत्तगन्धि, उत्कलिकाप्राय, चूर्णक** असे चार गद्याचे प्रकार सांगितले असून त्यांची लक्षणें व उदाहरणेंहि दिलेली आहेत तीं सर्व येथे उद्धृत करण्याची आवश्यकता नाही. १० व्या शतकापासून 'चम्पू' नावाचा एक गद्यवाङ्मय प्रकार संस्कृतात लोकप्रिय झाला. नलचम्पूकार त्रिविक्रमभट्ट, यशस्तिलक चम्पूकार सोमदेव व विश्वगुणादर्शचम्पूकार वेंकटाध्वरि यांची नावें संस्कृत साहित्यात अजरामर झालेली आहेत. चम्पूविषयक प्रकरणात, प्रस्तुत लेखनपरंपरा कशी अखण्डित चालू आहे तें आम्ही दाखविलेंच आहे

वृत्तरत्नाकरामध्ये **दण्डक** नावाचा एक लेखनप्रकार सांगितलेला आहे वृत्तरत्नाकराचा टीकाकार नारायण याने **सिंहविक्रान्त, मत्तमातङ्ग,** अनंग **शेखर, अशोकमंजरी, कुसुमस्तवक, कुसुमास्तरण, मेघमाला, उत्तरकाम, बाण,** इत्यादि दण्डकाचे प्रकार सांगितलेले आहेत. १२ व्या शतकात झालेल्या पुरातकाने[9] शामलादण्डक नावाचा आणखी एक प्रकार सुरू केला. १९ व्या शतका तील वाल्लुर कृष्णम्माचार्याने (' कचशतकम् ' व ' विधवाशतकम्' याचा लेखक)[10] शामलादण्डकासारखाच कोमलादण्डक नावाचा गद्यलेखनप्रकार सुरू केला या प्रकाराव्यतिरिक्त **चूर्णिका, तूणक, भुजङ्ग, खड्ग** यासारखे आणखीहि काही गद्यलेखनाचे प्रकार आढळतात. या सर्व प्रकारामुळे वेदोपनिषदांच्या काळात सरळ सुबोध असलेलें संस्कृत गद्य अत्यंत कृत्रिम व क्लिष्ट झालें.

बाणभट्टाच्या कादम्बरीचा सर्वच संस्कृत गद्यलेखनावर विलक्षण प्रभाव पडलेला दिसतो त्यामुळे दुंढीराज व्यासकृत अभिनवकादम्बरी (१८ वे शतक)[11] मणिरामकृत ' कादम्बर्यर्थसार ' काशीनाथकृत संक्षिप्तकादम्बरी, व्ही. अनंताचार्य कृत 'चन्द्रापीडचरितम्', आर. व्ही. कृष्णम्माचार्यकृत 'कादम्बरीसंग्रह व 'हर्षचरितसार ', म. म. डॉ. वा. वि. मिराशीकृत हर्षचरितसार (सटीक) व अहो बिल नरसिंहकृत अभिनवकादम्बरी[12], यासारखे कादम्बरीनिष्ठ गद्यग्रंथ संस्कृतात निर्माण झाले. त्यांतील काही बाणभट्टाचें अनुकरण करण्यासाठी तर काही बाण भट्टाच्या ग्रन्थाचा सारांश सांगण्यासाठी लिहिले गेले. अहोबिल नरसिंहाने आपल्या ' निर्मूर्तिकल्याणम् ' या ग्रंथाला **अभिनवकादम्बरी** हें नाव याच हेतूने दिलें होतें. बाणभट्टावर मात करण्याची त्याने प्रतिज्ञाच केली होती. या निर्मूर्तिकल्याणम् ग्रंथात त्याने आपला आश्रयदाता तृतीय कृष्णराज वोडियर राजा याचें चरित वर्णिलेलें आहे. लेखनाचा हेतु असफल झाला हें सांगावयास नकोच.

---

९ इ ५०४। १०. इ ५०४। ११. इ ४५६। १२ इ ४८६।

**श्रीकृष्णाभ्युदयम्**—बंगलोर येथील 'कर्नाटक-प्रकाशिका' वृत्तपत्राचे संपादक श्रीशैल दीक्षित यांनी हे श्रीकृष्णाचे गद्यचरित अत्यंत हृद्य भाषेत लिहिलें आहे. प्रस्तुत लेखकाला 'श्रीमदभिनव तिरुमलाचार्य' व 'कादम्बरी-तिरुमलाचार्य' अशा पदव्या मिळाल्या होत्या. प्रस्तुत गद्य ग्रंथाव्यतिरिक्त 'कावेरीगद्यम्' नांवाचा प्रवासवर्णनपर गद्यग्रंथ या लेखकाने लिहिला आहे. 'कॉमेडी ऑफ् एरर्स' या शेक्सपीयरच्या नाटकाची 'भ्रान्ती विलासम्' नामक कथा याच लेखकाने संस्कृत गद्यांत लिहिली आहे. (हनुमत्तरत्नमाला, वीराञ्जनेयशतकम् व गोपालार्या हीं स्तोत्रेंहि प्रस्तुत लेखकानें लिहिलीं आहेत.)

**सुशीला**—परवस्तु रंगाचार्यांचा पुत्र आर्. कृष्णम्माचार्य (इ. स. १८६९–१९२४) यांनी हिंदु स्त्रीचे आदर्श जीवन चित्रित करण्यासाठी प्रस्तुत गद्यकथा लिहिली. 'पातिव्रत्यम्', 'पाणिग्रहणम्' व 'वररुचिः' हे तीन लघित गद्यग्रंथ यांनी लिहिले असून 'सहृदया' या संस्कृत मासिक पत्रिकेचे संपादनकार्य त्यांनी केले. सहृदयेमध्ये आर्. कृष्णम्माचार्यांचे अनेक लघिलेख वाचावयास मिळतात.[13]

**मन्दारवती**—रंगनाथार्यांचा पुत्र कृष्णम्माचार्य याने आधुनिक कादम्बरीच्या पद्धतीने अनुष्टुप् हीं १८ प्रकरणांची कादंबरी लिहिली आहे.[14] विलासतरङ्गिणी व *रसार्णवतरङ्गभाणः हीं आणखी दोन पुस्तकें प्रस्तुत लेखकानें लिहिलीं आहेत. त्याच्या* भाषाशैलीची कल्पना पुढील उताऱ्यावरून येईल.

"अथ भगवानम्बरमणिरभ्युदयोन्मुखः। अमायिषुः कुलायान् पक्षिनिगुम्फनैस्तततनोयानि शाकुन्तकुलानि। अल्पकार्पुरगृहाङ्गणानि गोमयानुलेपनादिभिः परिचारिकाः। अजृम्भिरन् रथ्यासु पांसुक्रीडारतानामर्भकाणां कोलाहलाः। उदचालिषुरलरोमिभुग् निष्णाकाम्रो द्विजन्मानः। अनुशुश्रुवनिविकर्तानामीसिीन सैनिकाना सरोषसुभ्रमोत्साहः। अस्तारितानि विग्रहकेतनानि सर्वतः शोभाव याम्। अध्यारोपिता सन्धिपताका। अपावृतानि गोपुरद्वाराणि। प्रतस्थिरे राजगृहादुपायनहस्ताः पुरस्कृत्य पुरोधसं, दर्दुरकप्रमुखाः सन्धिकुशलाः सेनाशिबिरं प्रति"[15]।

प्रस्तुत लेखकाचे वडील रंगाचार्य यांचे वास्तव्य तिरुपति येथे होतें. त्यांनी 'गुणाविनशतकम्', 'शृंगारनायिकातिलकम्', 'पादुकासहस्रावतार-कथासंग्रहः', 'गोदाचूर्णिका', 'रहस्यत्रयसाररत्नावली', 'सन्मानिकल्पलता' व 'अलंकार-संग्रहः' हीं पुस्तकं लिहिलीं आहेत.[16]

---

१३ पृ ४८८। १४. वाविळ्ळ प्रेस मद्रास येथें इ. स. १९२९ मध्ये मुद्रित। १५. मन्दारवती, ३९ पृष्ठ। १६. पृ. ४९३,

**दिव्यदृष्टि**—वाराणसी येथील सरस्वतीभवन या सरकारी ग्रंथालयाचे उपाध्यक्ष व 'अमरभारती' या संस्कृत मासिकाचे संपादक श्री, नारायणशास्त्री खिस्ते यांनी अपक्व बुद्धीच्या वाचकासाठी सरळ संस्कृतात प्रस्तुत कथा लिहिली आहे.[१७]

***शैवलिनी व कुमुदिनी***—या दोन संस्कृत कादम्बऱ्या म्हैसूर विश्वविद्यालयातील संस्कृत विभागाचे अध्यक्ष चक्रवर्ती राजगोपाल यांनी लिहिल्या. 'विलासकुमारी' व 'सगरम्' या नावाच्या आणखी दोन दीर्घकथा यांनी लिहिल्या असून हें सर्व साहित्य मुद्रित आहे.

**जयन्तिका**—ले. कविवर जग्गु श्री बकुलभूषण. हा लेखक जग्गु अल्वार अय्यंगार या नावाने प्रसिद्ध होता. याच्या वडिलांचें नाव तिरुनारायण असें होतें. म्हैसूर प्रांतातील मेल्कोटे या नगरात त्यांचें वास्तव्य होतें. बाणभट्टाच्या कादंबरीचें अनुसरण करण्याच्या उद्देशाने त्याने 'जयन्तिका' ही कथा रचिली आहे.[१८] *'स्यमन्तक' व 'अद्‌भुतांशुकम्' हीं दोन नाटकें व 'करुणारसतरङ्गिणी' आणि 'हयग्रीवस्तुति' हीं दोन स्तोत्रकाव्यें त्याने लिहिलीं आहेत.*

**उदयनचरितम्**—मद्रासच्या पचैय्यप्पा कॉलेज्चे प्राध्यापक श्री व्ही. अनंताचार्य कोडनकम् यांनी १५ अध्यायांची प्रस्तुत आख्यायिका बालवाचकासाठी लिहिली आहे. याव्यतिरिक्त 'रघुवंशचरितम्', 'चन्द्रापीडचरितम्', 'हर्षचरितसार.' 'कथामञ्जरी', (गद्यपद्यमयी) व 'नाटककथासंग्रहः' हीं छात्रोपयोगी संस्कृत गद्यात्मक पुस्तकें श्री अनंताचार्यांनी लिहिलीं असून तीं सर्व मुद्रित झालीं आहेत.

**सरला**—आधुनिक कादंबरीतंत्राचे अनुसरण करण्यासाठी कलकत्त्याचे *महामहोपाध्याय हरिदास सिद्धान्तवागीश यांनी ही कथा लिहिली*[१९]

## निबन्धग्रन्थ

ललितकथाप्रमाणेच धर्म, इतिहास, तत्त्वज्ञान इत्यादि विविध विषयांवर संस्कृत गद्यलेखन आधुनिक लेखकांनी केलेलें आहे. त्यामध्ये पंडित श्री देवकृष्ण यांनी सतोजी महाराज कुकुरमुण्डकर यांच्या आदेशानुसार लिहिलेल्या धर्मादर्श या ग्रथाचा[२०] सविस्तर परिचय पुढील एका प्रकरणात दिलेला आहे, कालडीच्या रामकृष्णाश्रमाचे कार्यकर्ते स्वामी आगमानंद यांचा 'धर्म' हा ५ निबंधांचा संग्रह (पृ. सं. ७८), श्री

१७ मास्टर प्रिंटिंग प्रेस यांनी वाराणसी यथे १९३६ मध्ये मुद्रित। १८. पृ. ४९४। १९ प्राप्तिस्थान-श्री हरिदास सिद्धांतवागीश, ४१ देव लेन, कलकत्ता १४। २०. प्राप्तिस्थान : आत्मादास सिद्धांदास चौधरी, वडोदा, प. रा.

वासुदेवानंद सरस्वती टेंबे महाराज यांचा 'शिक्षात्रयम्' हा कारिका टीकात्मक ग्रंथ याखेरीज काही निबंधग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत.

म्हैसूर विश्वविद्यालयाचे श्री नवीनम् रामानुजाचार्य यांनी सरळ सुबोध रीतीने संस्कृत भाषेत निबंधलेखनाचा प्रचार व्हावा या उद्देशाने कित्येक वर्षांपासून एक संस्कृत निबंध लेखनस्पर्धा सुरू केली. दर तीन वर्षांनी ही स्पर्धा होत असते व त्यामध्ये उत्कृष्ट निबंधलेखनाला १०० रुपयांचे पारितोषिक देण्यात येते. इ. स. १९४४ मध्ये 'कर्मतत्त्वम्' या विषयावर निबंधलेखनाची स्पर्धा झाली. त्यामध्ये नागपूरचे श्री. न. ना. भिडे यांचा निबंध सर्वोत्कृष्ट ठरला. म्हैसूर विश्वविद्यालयाने इ. स. १९५० मध्ये तो ग्रंथरूपाने प्रकाशित केला. विद्यार्थ्यांच्या मार्गदर्शनासाठी **प्रबंधमञ्जरी** हा पंडित हृषीकेश भट्टाचार्यांच्या लेखाचा संग्रह श्री काशीनाथशर्मा यांनी प्रकाशित केला. भट्टाचार्यांचे हे निबंध त्यांच्या 'विद्योदय.' या संस्कृतातील आद्य मासिकात प्रकाशित झाले होते.

**संस्कृतनिबन्धप्रदीपः** हा ४०० पानांचा निबन्धसंग्रह[२१] लुधियाना येथील संस्कृत प्राध्यापक श्री हंसराज अगरवाल यांनी लिहिला. त्यात प्रथम प्रदीपामध्ये ग्रंथ कलेविषयी ६ निबंध, द्वितीय प्रदीपामध्ये साहित्यिक व सामाजिक विषयावरील विवेचनात्मक ३२ निबंध, तृतीय प्रदीपामध्ये वर्णनात्मक ८ निबंध, चतुर्थ प्रदीपामध्ये आख्यानात्मक ११ प्रबन्ध व पाचव्या प्रदीपात विविध विषयावरील २४ प्रबंध अन्तर्भूत झालेले आहेत. ग्रंथाच्या शेवटी निबंधोपयोगी सुभाषितांचा भरपूर संग्रह दिलेला आहे. या हंसराज अगरवालांनी **संस्कृतसाहित्येतिहास** या नावाचे दोन खंड लिहिले आहेत. संस्कृत साहित्याचा संस्कृत भाषेत इतिहास सांगणारे हेच पहिले ग्रंथ होत. त्यानंतर कविराज श्री द्विजेन्द्रनाथ शास्त्री यांचा **संस्कृतसाहित्य-विमर्श** हा व्यापक स्वरूपाचा ग्रंथ इ. स. १९५६ मध्ये प्रकाशात आला.[२२] विद्यार्थ्यांच्या मार्गदर्शनासाठी लिहिण्यात आलेल्या निबंधसंग्रहामध्ये वाराणसीचे डॉ. मंगलदेव शास्त्री यांचा **प्रबंधप्रकाश**, चारुदेव शास्त्री यांची **प्रस्तावतरङ्गिणी** व प्राध्यापक श्रुतिकांत यांची **लघुनिबंधमणिमाला** हे ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत. श्री चारुदेवशास्त्री यांनी **गान्धिचरितम्** नावाचे एक उपयोगी पुस्तकहि लिहिले आहे.

निबंधात्मक ग्रंथामध्ये विशेष उल्लेखनीय व वैचारिकदृष्ट्या अत्यंत क्रांति कारक असा ग्रंथ म्हणजे आर्यसमाजाचे महान् संस्थापक श्री दयानंद सरस्वती यांचा

२१ मुगा तर प्रेस, दिल्ली येथे मुद्रित। २२ न्यू इण्डिया प्रेस, दिल्ली येथे मुद्रित।

'ऋग्वेदादिभाष्यभूमिका' हा ग्रंथ होय. याची लेखनशैली अत्यंत सुबोध असून वैचारिक क्षेत्रामध्ये या ग्रंथाचा मोठा प्रभाव पडला आहे.

दयानन्दांनी विद्यार्थ्यांमध्ये संस्कृत भाषणाची क्षमता वाढावी या उद्देशाने 'संस्कृतवाक्यप्रबोध'[23] हे बालोपयोगी पुस्तक लिहिले आहे. दयानंदांच्या 'ऋग्वेदादिभाष्यभूमिका' या ग्रंथासारखा दुसरा महत्त्वपूर्ण आधुनिक निबंध ग्रंथ म्हणजे श्री कपालीशास्त्रीकृत '**ऋग्भाष्यभूमिका**' हा होय (कपालीशास्त्रींचे संपूर्ण चरित्र व वाङ्मयकार्य पुढे दिलेले आहे.) पाँडेचरीचे योगी श्री अरविंद यांच्या सिद्धान्तानुसार कपालीशास्त्री यांनी '**सिद्धाञ्जन**' नावाचे ऋग्वेदाचे प्रचंड भाष्य लिहिले, त्याची प्रस्तावना म्हणजेच प्रस्तुत प्रबंध होय. इ. स. १९५२ मध्ये अरविंदाश्रमातर्फे इंग्रजी भाषांतरासह प्रस्तुत ग्रंथ स्वतंत्रपणे प्रकाशित झाला आहे.

**काव्यात्मसंशोधनम्**–ले. म. म. मानवल्ली गंगाधरशास्त्री सी. आय्. ई. या आंध्र पंडितांचे वास्तव्य वाराणसी येथे होते. आधुनिक पद्धतीनुसार काव्यात्म तत्त्वाविषयीची चर्चा त्यांनी प्रस्तुत निबंधात केलेली आहे.[24] श्री गंगाधरशास्त्रींनी रसगंगाधराची टीका, राजारामशास्त्री व बाळशास्त्री या आपल्या गुरूंची पद्यबद्ध चरित्रे व वाक्यपदीय आणि तन्त्रवार्तिक या व्याकरणविषयक ग्रन्थांची संस्करणे या प्रकारचे अवांतर लेखन केलेले आहे.

**कीदृशं संस्कृतम्**–या नावाचा एक ५ अध्यायांचा (पृ. सं. १८०) प्रबंध आग्रा येथील आचार्य श्यामकुमार यांनी संस्कृत भाषेच्या सद्य परिस्थितीसंबंधी लिहिला आहे.[25]

चर्चात्मक निबंधांची पद्धति पाश्चात्य साहित्याच्या संपर्कानंतर भारतीय साहित्यात विकास पावली. जुन्या काळचे सर्व चर्चात्मक लिखाण टीका व भाष्य ग्रंथांच्या द्वारा झालेले आहे. पाश्चात्य संस्कृतीच्या संपर्काने अनेक नवीन विषय चर्चेसाठी किंवा समालोचनासाठी पुढे आले व त्यामुळे हे निबंधात्मक वाङ्मय विकास पावले. त्यामध्ये भाषाशास्त्राविषयी पुढील निबंधग्रंथ प्रकाशित झाले —

लघुपाणिनीयम्—ले. राजराजवर्मा[26]

भाषातन्त्रम्—ले. आर. श्यामशास्त्री

आर्यभाषाचरितम् व देवभाषा देवनागराक्षरयो: उत्पत्ति: हे दोन श्री द्विजेन्द्रनाथ गुह चौधरी यांचे निबंध त्यांच्या मंजिरात प्रकाशित झाले होते.

---

२३ वैदिक मुद्रणालय अजमेर येथे मुद्रित। २४ पृ. ४९६।
२५ भारत मुद्रणालय, विल्लापारडी येथे मुद्रित।
२६ त्रिचनापल्ली येथे मुद्रित

भाषाशास्त्रप्रवेशिनी[२७]—ले. आर. एस्. वेंकटरामशास्त्री.

भाषाशास्त्रसंग्रहः[२८]—ले. एस्. टी. जी. वरदाचारियर.

साहित्यचर्चाविषयक निबंधामध्ये पुढील निबंध उल्लेखनीय आहेत—

गीर्वाणभाषाभ्युदयः[२९]—ले. आर. श्रीनिवासराघवन्.

कविकायविचारः—ले. राजगोपालचक्रवर्ती.

पी. पी. एस्. शास्त्री व के. एल्. व्ही. शास्त्री या दोघांनी मॅक्डोनेलच्या 'हिस्टरी ऑफ् संस्कृत लिटरेचर' या ग्रंथातील वैदिक वाङ्मय विषयक प्रकरणाचे संस्कृतानुवाद केले आहेत.[३०]

आर. एस्. वेंकटरामशास्त्री यांनी लिहिलेला वैदिक वाङ्मय व निबंध साहित्यविषयक प्रबंध ग्रंथ मद्रासमध्ये प्रसिद्ध झाला आहे.

## धर्मशास्त्रविषयक निबंधः—

अग्निवीयान-मीमांसा[३१]—ले. काशी शेष वेंकटाचलशास्त्री.

विवाहसमयमीमांसा-अग्नियानविमर्शौ[३२]—ले. एन. एस्. वेंकटकृष्ण शास्त्री.

बालविवाहहानिप्रकाशः—ले. रामस्वरूप (एटा) (इ. स १९२२ मध्ये मुद्रित.)

ऋतुमतीविवाहविधिनिषेधप्रमाणानि.[३३] ले. ?

परिणयमीमांसा[३४]—ले. के जी. नटेशशास्त्री.

वयोनिर्णयः[३५]—ले पी. गणपतिशास्त्री.

उद्धारचन्द्रिका—ले. काशीचंद्र. समुद्रपर्यटनामुळे परधर्मांत गेलेल्यांना स्वधर्मांत परत घेणे योग्य आहे, हा पक्ष या निबंधात प्रतिपादन केला आहे.

---

२७. बालमनोरमा प्रेस, मद्रास येथे इ स. १९३८ मध्ये मुद्रित।

२८. चिद्‌दुगुडूर व मद्रास यथे मुद्रित इ. स. १९३३।

२९ सहृदया मासिकात मुद्रित।

३० पालघाट येथे १९२७ मध्ये मुद्रित।

३१. मुंबई येथे १९०३ मध्ये मुद्रित।

३२. १९१३ मध्ये मुद्रित।

३३ इ स १९१२ मध्ये मद्रास येथे मुद्रित।

३४ श्रीरंगम् येथे १९१३ मध्ये मुद्रित।

३५ कुम्भकोण येथे १९१० मध्ये मुद्रित।

**मानवधर्मसारः**—ले. डॉ. भगवानदास. (महाराष्ट्राचे राज्यपाल डॉ. श्रीप्रकाश याचे वडील.)

**आर्यविधानम्** अर्थात् विश्वेश्वरस्मृतिः—ले. म. म. विश्वेश्वरनाथ रेवू, जोधपुर.

**खिस्तधर्मकौमुदी-समालोचना**[36]—ले. व्रजलाल मुखोपाध्याय. डॉ. वॅलन्टाईन यानी खिस्तधर्मकौमुदी या ग्रथात हिन्दुधर्माची निन्दा केली होती. तिचा समाचार घेण्यासाठी प्रस्तुत निबध लिहिण्यात आला.

**शाङ्करभाष्यगाम्भीर्यनिर्णयखण्डनम्**[37]—ले. गौरीनाथशास्त्री.

**भाष्यगाम्भीर्यनिर्णयखण्डनम्**—ले. वेंकटराघवशास्त्री.[38] या दोघाहि लेखकानी शकराचार्यांच्या भाष्यग्रथातील सिद्धाताचे खडन करण्याचा प्रयत्न केला आहे.

**नूतनगीतावैचित्र्यविलास.**[39]—ले. भगवद्गीतादास.

**मूलाविद्यानिरासः**[40]— ले. वाय्. सुब्बाराव (बगलोर). या लेखकाने सन्यास ग्रहण करून 'सच्चिदानद-सरस्वती' हें नाव धारण केलें व त्या नावाखाली 'सुगम' नावाचा एक निबध शकराचार्यांच्या 'अध्यास' भाष्यावर लिहिला.[41]

**मार्गदायिनी**—ले. के. वेंकटरत्नम् पन्तलू. प्रस्तुत ग्रथात लेखकाने 'अक्षर साख्य' नावाचा नवीन सिद्धान्त प्रतिपादन करण्याचा प्रयत्न केला आहे. अप्पय्या चार्य नावाच्या विद्वानाने शनुभवाद्वैत नावाचा साख्य-योग-समुच्चयात्मक सिद्धान्त प्रतिपादन करण्यासाठी ग्रथ लिहिला.[42]

**ईश्वरस्वरूपम्**—ले एम्. ए. उपाध्याय, बडोदा. महात्मा गाधींच्या सिद्धान्तानुसार एक नवीन तत्त्वज्ञान प्रतिपादन करण्याचा प्रयत्न या ग्रथात केला असून त्यात जातिव्यवस्था, अस्पृश्यता व पुनर्जन्म याविषयीं प्रतिकूल मत व्यक्त केलें आहे.[43]

---

३६. कलकत्ता येथे १८९४ मध्ये मुद्रित.
३७. वाणीविलास प्रेस येथे मुद्रित. ३८. १९१३ मध्ये मुद्रित
३९. मद्रास येथे १९१७ मध्ये मुद्रित
४०. बगलोर येथे १९२९ मध्ये मुद्रित.
४१. होले नरसिपुर येथे १९५५ मध्ये मुद्रित
४२. कॉन्टेम्पोररी इडियन लिटरेचर पृ २२४।
४३. इ. स. १९५३ मध्ये बडोदा येथे मुद्रित

**पूर्णज्योति** —ले. स्वामी पूर्णानंद, हृषीकेश.[44] वैराग्य, भक्ति व योग या साधनमार्गांचा अखिल मानवजातीसाठी पुरस्कार या गद्यपद्यात्मक ग्रंथात केलेला आहे.

**चिद्विलास** —डॉ. संपूर्णानंद. (उत्तरप्रदेशाचे माजी मुख्यमंत्री.)[45] यांच्या तत्त्वज्ञानात्मक विविध लेखांचे संस्कृत अनुवाद प्रस्तुत ग्रंथांत संकलित केले आहेत.

**पाश्चात्यप्रमाणतत्त्वम् व मानसतत्त्वम्**-हे दोन पाश्चात्य तत्त्वज्ञानपर ग्रंथ डॉ. श्यामशास्त्री यांनी लिहिले व ते १९२९ मध्ये प्रकाशित झाले.

**सनातन-भौतिक-विज्ञानम्**[46]—ले. सी. वक्ररमणाचार्य प्राचीन भारतीय विज्ञानाचा परिचय प्रस्तुत ग्रंथात लेखकाने दिला आहे.

**प्रत्यक्षशारीरम्**[47] **व सिद्धान्तनिदानम्**[48]—ले. कविराज गणनाथ सेन.

**नेत्रचिकित्सा***—ले डॉ. बा. शि. मुंजे, नागपूर.

**रसजलनिधि** —ले. भूदेव मुकर्जी भारतीयांच्या रसायनशास्त्राचा परिचय यामध्ये दिला आहे.

**अनुग्रहमीमांसा**[49]—ले. व्ही एन्. नायर. जन्तु-सिद्धांताविषयीं प्रस्तुत ग्रंथात चिकित्सा केली आहे.

**आयुर्वेदीय-पदार्थविज्ञानम्**[50]—ले. चिं. ग. काशीकर, पुणे.

यासारखे शास्त्रीय विषयावरील अनेक गद्यग्रंथ गेल्या ५० वर्षांत विशेष प्रमाणात लिहिले गेले. अशा स्वरूपाचे अनेक निबंध सहाय्याच्या अभावीं मुद्रित होऊ शकले नाहीत. ( उदा.-विश्वेश्वर सिद्धान्त शिरोमणी यांचा 'नीतिशास्त्रम्' हा ग्रंथ.)

भाषांतर विषयक प्रकरणामध्ये अनेक गद्य ग्रंथांच्या अनुवादाचा परिचय दिलेलाच आहे. त्यापैकी कांहींचा पुनर्निर्देश अप्रस्तुत होणार नाही.

---

४४ इ स १९२९ मध्ये मुद्रित

४५ इ. स. १९५० मध्ये वाराणशीत मुद्रित.

४६ म्हैसूर येथे १९३९ मध्ये मुद्रित

४७ कलकत्ता येथे १९१९ मध्ये मुद्रित

४८. १९२२ मध्ये मुद्रित.

* प्रस्तुत ग्रंथाच्या मुद्रित प्रती आता दुर्मिळ झाल्या आहेत

४९ १९३८ मध्ये कालिकत येथे मुद्रित

५० १९५३ मध्ये मुद्रित.

| अनुवादग्रंथ | अनुवादक | मूळलेखक ( किंवा ग्रंथ ) |
|---|---|---|
| संसारचक्रम् | —पद्मनाभाचार्य | —जगन्नाथप्रसाद. |
| कपालकुण्डला | —हरिचरण भट्टाचार्य | —बंकिमचंद्र |
| दुर्गेशनन्दिनी<br>क्षत्रियरमणी | —श्रीशैल ताताचार्य | —बंकिमचंद्र |
| लावण्यमयी | —अप्पाशास्त्री राशिवडेकर | —बंकिमचंद्र. |
| रामकृष्णकथामृतम् | —जगन्नाथस्वामी | —महेन्द्रनाथ |
| दुःखोत्तरं सुखम् | —एम् अहमद | —(देहस्थानी)याचा 'जामे उल्लीकायात्' हा फारशी ग्रंथ व अल्मदयानी याचा 'अल्फरजादशिद्द' हा अरबी ग्रन्थ. |
| कथाकौतुकम् | —श्रीवर | —मूळ ग्रन्थ युसुफजुलेखा |
| आरब्ययामिनी | —जगद्बन्धु | —अरेबियन नाईट्स् हा मूळ ग्रंथ. |
| बलिदानम् | —लाटकरशास्त्री | —न. चिं केळकर |
| भारतीविलासम् | —कादम्बरी तिरुमलाचार्य | —शेक्सपीयरचे कॉमेडी ऑफ एरर्स. |
| "कण लुप्त गृहं दहति" | —को कृष्णसोमयाजी | —टॉल्स्टॉय (ए स्पार्क निग्लेक्टेड् बर्नस् दी हाऊस) |
| "धर्मपुस्तकस्य शेषांश" | —बंगदेशीयपंडिता | —बायबल |

— आधुनिक गद्य लेखकांमध्ये 'शिवराजविजय' या ग्रंथाचे लेखक महाकवि श्रीमदम्बिकादत्त व्यास यांच्या लेखनशैलीची प्रशंसा सर्व विद्वानांनी एकमुखाने केलेली आहे. जुन्या बाणभट्टानुसारी शैलीमध्ये शिवचरित्रासारख्या सापेक्षतः आधुनिक विषयाचें उत्कृष्ट वर्णन करून आधुनिक लेखकामध्ये त्यांनी मोठी प्रतिष्ठा प्राप्त केलेली आहे. त्यांच्या लेखनशैलीचा परिचय येण्यासाठी शिवराजविजयातील अफझुलखान प्रकरणातला काही भाग पुढे उद्धृत केला आहे — (पृ ५४)

अथ तौ त्वरित गच्छन्तौ, सपदेव परःशत श्वेतपटकुटीरैः शारद-मेघ-मण्डलायितम्, दीपमाला-विहित-बहुल-चाकचक्यम् "अफजलखान"—शिबिर दूरत एव पश्यन्तौ, यावत्समीपमागच्छतस्तावत् क्वचन कौमुदच्छवि-वसनखण्ड-

वेष्टितमूर्द्धा, कटिपर्यन्त-सुनद्धकाक-श्यामाङ्गरखिक, कर्बुराधोवसन, शोण-श्मश्रु, निजयपुराधीश-नामाङ्कित-वर्तुल-पित्तल-पट्टिका-परिष्कृत-वाम-वक्षःस्थलः, स्कन्धे भुशुण्डीं निधाय, इतस्ततो गतागतं कुर्वन् सावष्टम्भमुदूभापयोवाच, "कोऽयमिति?" ततो गौरसिंहेनापि "गायकोऽहं श्रीमन्त दिदृक्षे" इति समार्दव व्याख्यायि। ततो "गम्यतामन्येऽपि गायका वादकाश्च सम्प्रत्येव गताः सन्ति" इति कथयति प्रहरिणि, "धूतेन स्नातु भवद्रसना" इति व्याहरन् शिबिर-मण्डलं प्रविवेश।

तत्र न काचित् गद्दासु पर्यङ्केषु चोपविष्टान्, खगडगडायमान ताम्रक-धूममाकृष्य, मुखात् कालसर्पानिव श्यामान् निस्सारयतश्चरित्र., स्वहृदय-कालिमानमिव प्रकटयतः, स्वपूर्वपुरुषोपार्जित-पुण्यलेशानिव फूत्कारैर्निःसारयत् कुर्वतः, मरणोत्तर मप्यतिदुर्लभं सुरापानसंयोगं जीवन-दशायामेवाऽऽकल्पयतः प्राप्ताधिकारखण्डिता सर्वगर्वान्, "क्वचिद्-हरिद्रा, हरिद्रा, ल्शुन ल्शुनम्, मरिचम् मरिचम्, चुक्र चुक्रम्, चिनुकं चिनुकम्, शृङ्गवेरं शृङ्गवेरम्, रामठ रामठम्, मत्स्यण्डी मत्स्यण्डी, मत्स्या मत्स्या, कुक्कुटाण्ड कुक्कुटाण्डम्, पल्ल पल्लम्" इति कल-कलैर्गालिना निद्रां विद्रावयतः, समीप-समाश्रित-कुक्कुटप-बर्बरी-कम्बोल-कट-कराह-चम्किडम्बान्, उग्र-गन्धानि मांसानि शूलाकुर्वतः, नवसम्पचा यवागूः स्थालिकासु प्रसारयत, हिङ्गुगन्धीनि तेमनानि तिन्तिडीरसैर्मिश्रयतः, परिष्टिष्टेषु कलशेषु जम्बीर-नीरं निश्च्योतयत, मध्ये मध्ये समागच्छतस्ताम्रचूडान् व्यजन-ताडनैः परामुखयत, प्रपुञ्जितेषु ताम्र-भाजनेष्वारनालं परिवेषयतः सूदान्;

क्वचिद्रक्तप्रसाधित-काकपक्षान्, मद-व्याघूर्णित शोणनयनान्, समारसरिक-कण्ठमद पर्यस्त, यौवन-चुम्बित-शरीरान्, सखौन्दर्य-गर्व-भारेणैव मन्दगतीन्, अनवरताऽऽश्लिष्ट-कुसुमपुराणरिव कुसुमैर्भूषितान् वसनातिरोहिताङ्गच्छटान्, विविध-पटवासवासितानपि चिरास्नान-महामलिन-महोत्कट-स्वेदपूतिगन्धप्रसरीकृतनाप्रैर्यतान् यवन-युवकान्;

क्वचिद् "अहो! दुर्गमता महाराष्ट्रदेशस्य, 'अहो! दुराधर्षता महाराष्ट्राणाम्, अहो! वीरता शिववीरस्य, अहो! निर्भयतैतन्सेनानीनाम्, अहो! त्वरितगतिरेतद्योधानाम्, आ! किं कथयामो इत्थमेव चमत्कार शिववीर-चन्द्रहासस्य? न वयं पारयामो धैर्यं धर्तुम्, न च शक्नुमो युद्ध-स्थाने स्थातुम्, यो नाम दिशि दिशि य शिवन योद्धु गच्छेत्?, कस्य नाम प्राणाः पराङ्मुखैरपि छलात निरुध्यात्? वयं वन्नि, अस्माकीना महती सेना, तथापि न जानीम किमिति कम्पत इव क्षुभ्यतीव च हृदयम्? यवनानां पराभवो भविष्यति अपरत्र रात्रो विनङ्क्ष्यतीति न विद्मः को ज्ञातीय वर्णं?, अम्बानीव सम्मुखे, शिवनीर चान्तारणे, मा स्म भो! मैव स्यात्, रम भो रम, जगदीश्वर! अथवा यमोभयीतिमप्येमति योऽयमस्मान सेनापति-पद-विडम्बकोऽपि शिवेन योरये,

किञ्चियदीह समय प्रचलेत् युद्धत्यमेषा हि हिन्दुकुलक्षम च नैव शिष्यात् ।
आश्चर्यमेतदखिल विपुल च देश यन्मुष्टिमेय-यवना नत शाश्वतीमम् ॥ ३५
स्वीयार्थसाधनमिद न महत्त्वहेतुरेव विमर्शमतिरस्ति तदाभिशस्य ।
अस्मान् प्रतारयति कीदृगसौ दुरात्मा वक्त्रे च दर्शयति नैकविधान् विकारान् ॥३६
अस्माकमेव दृढशृङ्खलयाऽस्मदीयान् बध्नाति हन्त चरणाञ्छलबुद्धिरेष ।
खड्गैश्छिनत्ति निशितै शतशोऽस्मदीयैरस्माकमेव च शिरांसि दुराशयेन ॥ ३७
तस्माद् वय सपदि हिन्दुजनस्य हिन्दुधर्मस्य हिन्दुविषयस्य च रक्षणार्थम् ।
काष्ठा परा प्रयतनस्य सहैकमत्या वीरेश साम्प्रतमये करवाम धैर्यात् ॥ ३८
कार्य प्रयत्नगरिमा ननु निश्चितार्थैरस्माभिरद्यदृढयुक्तिचयोऽपि योज्य ।
देशस्य रक्षणकृते सकलानुपायान् आवश्यकाश्च बहुधा विदधीत वीर ॥ ३९
उल्लासनीयमधुना वरवीरवृत्ति-शाणेन खड्गपटल यतनैश्च दैवम् ।
तुर्काधिपाय कपटे पटवे प्रदेय तुर्कीययुक्तिनिचयैरुचितोत्तर च ॥ ४०
सगच्छते यदि भवान् जसवतसिंह-वीरेण तत्परिराजविषादनोत्क ।
एकीभवेच्च रणकोविद राजसिंहराणेन तर्हि महदेव भवेद्धि कार्यम् ॥ ४१
युध्यध्वमाशु रभसात् सकलासु दिक्षु विच्छिन्त दुष्टभुजगस्य शिर शिलाभि ।
शश्वत् तदा स विमृशेत् स्वकृतेर्विपाक स्याद्दक्षिणे कपटजालमृती न शक्त ॥ ४२
वीरैर्युतश्च प्रकचद्दृढभल्लहस्तैर्नि पातयाम्यहमिह प्रसभ समूलम् ।
नून विपुरजयपुरादिलशाहभूप तैर्गोलकुण्ड-सुल्तान-कुतुबशाह च ॥४३॥
धाराधरैरिव खड्गिरिहासिधारा-तीर्थेषु पापकलुषान् यवनान् भवैनै ।
सस्नापयामि रभसादिखलाभधर्म-लक्ष्माणि दक्षिणदिशि क्षपयामि मक्षु ॥४४॥
कर्तव्यदक्ष-वरमल्लविराजिनीरैरल्लोलसूर्मिपटल च गभीरघोषा ।
स्रोतस्विनीव ननु दक्षिणशैलमध्यात् सम्प्राप्नुया समतमोत्तरदेशभूमिम् ॥४५॥
शीघ्र समेत्य तनुया भवदीयसेवा प्रख्याम्यरि किल भवत्सहकारमूल्यम् ।
युध्यामहे चतमृपूत दिशासु सर्वे सकोचयाम समराङ्गणमेव तस्य ॥४६॥
सेनानिलोल्लहरीनिकरेण दिल्लीं सम्प्लावयाम रिपुजीर्णदुदग्रहर्म्यम् ।
सिंहासने स्वपगते हि निरस्प्रशोभ 'औरङ्गजेब' इति नाम वृथैव भूयात् ॥४७॥
(औरङ्ग — सिंहासन । जेब — शोभा, भूषण । औरगजेब — सिंहासनस्य भूषणम्)

दीनो भवेन् क्वचिदमुष्य निर्हिसरदृग उत्पादित कपटजालमपि क्षण स्यात् ।
शुद्धो च शोणितनदीं भुवि वाहयाम तस्या च नाकनिकृर्नांश तर्पयाम ॥४८॥
न्यायविदस्य च जगन्नुविदु भवादाद् भूमेरप खलरिपोर्निदधाम धाम ।
कार्य त्विद न कठिन हृदयाद्दिदरूो सम्मेलिते सुहृदुदार मिथोऽनुकूलम् ॥४९॥

नांवाने केला. फारसी अनुवादांत देहिल्लानीने आणखी कांही कथांची भर टाकली. या फारसी अनुवादाचें प्रस्तुत संस्कृत भाषान्तर मुंबईच्या विल्सन कॉलेजचे फारसी भाषेचे प्राध्यापक एम्. अहमद यांनी केलें. या संस्कृत अनुवादामध्ये व्यास, वाल्मीकी इत्यादि संस्कृत लेखकांच्या सुभाषितांचा उपयोग प्रा. अहमद यांनी केला आहे. हा अनुवाद लिहिण्याचा त्यांचा हेतु प्रस्तुत ग्रन्थांत पहिल्याच प्रकरणांत उद्धृत केला आहे."

श्री. आप्पाशास्त्री राशिवडेकरांनी 'अल्लादीन अँड हिज् वंडरफुल लॅम्प', या अरेबियन नाईट्स् मधील सुप्रसिद्ध कथेचें संस्कृतांत भाषान्तर केलें." The Sanskrit translation of Rashivadekar excells the original in narration." असा या अनुवादासंबंधीं अभिप्राय श्रीकृष्णमाचार्यांनी आपल्या इतिहासग्रंथांत दिला आहे.

झैनी नांवाच्या फारसी कवीने लिहिलेल्या 'युसुफ झुलेखा' या कथेचा संस्कृत अनुवाद १५ व्या शतकामध्ये श्रीवर नांवाच्या कवीने **कथाकौतुकम्** या नांवानें लिहिल्याचा उल्लेख आढळतो.

'जयसिंहराजं प्रति श्रीमच्छत्रपतेः शिवप्रभोः पत्रम्'—छत्रपति शिवाजी महाराजांनी जयसिंहाला उद्देशून फारसी भाषेमध्ये एक छंदोबद्ध पत्र पाठविलें होतें. त्या पत्रामध्ये शिवाजी महाराजांची अव्याज राष्ट्रभक्ति उत्कटपणे प्रकट झाली आहे. या पत्राचे हिन्दी, मराठी इत्यादि प्रादेशिक भाषांमध्ये उत्कृष्ट अनुवाद झालेले आहेत. त्याचा ६० श्लोकांमध्ये संस्कृत अनुवाद 'कविराज' हें नांव धारण करणाऱ्या एका अज्ञात कवीने केलेला आहे. उत्कृष्ट अनुवादाचा एक दुर्मिळ नमुना म्हणून हें संपूर्ण पत्र आम्ही येथे उद्धृत करीत आहोत."

**॥ जयसिंहराजं प्रति श्रीमच्छत्रपतेः शिवप्रभोः पत्रम् ॥**

**अनुवादकः—कविराजः ।**

राजाधिराज ! वरमाण्डलिकप्रणेतः रम्यस्थितिप्रसव ! भारतपुष्पवाट्याः ।
श्रीरामचन्द्रमहितांश ! तव प्रभावाद् नूनं समुन्नतशिरो रजपूतजातिः ॥१॥
शौर्यश्रियैव तव बाबरवंशराज्यलक्ष्मीरियं प्रबलतामयते नितान्तम् ।
भाग्यैः शुभैरनुपमैस्त्व तयाऽस्मनोऽस्मासादिता विजयहेतुसहायता ते ॥२॥

३४. इ. स. १९२५, विरजानन्द प्रेस, लाहोर येथे प्रकाशित ।

३५. क्र. ४३९ ।

३६. स्वाध्याय मंडळ किल्ला पारडीतर्फे प्रकाशित. मुद्रित प्रति दुर्मिळ आहेत.

तारुण्यदीप्त ! जयसिंह ! कुशाग्रबुद्धे ! भाग्याभिवृद्ध ! बल वीर्यसमृद्धिशालिन् ।
आशीर्मयीं लघुरीकुरु मे प्रणामरूपां श्रिया निरुपमां च मदीयसेवाम् ॥३॥
पायात्सदैव स जगज्जनको भवन्तं न्यायस्य धर्मसहितस्य दिशेच्च मार्गम् ।
संश्रूयते किल मयाऽद्य मदाक्रमार्थं जेतुं च दक्षिणदिशं स भवानुपेतः ॥४॥
हिन्दोर्जनस्य हृदयेक्षणरक्तधारा-सेकेन रक्तमुपगतं त्वयकेऽधिगन्तुम् ।
कृत्येन तेन वदन तव कज्जलाभिर्लिप्तं भवेदिति न वेत्सि परं हि दुःखम् ॥५॥
यस्मात्तवैव जननावनिभारतेऽस्मिन् धर्मे च पावनतमे महती विपत्तिः ।
सञ्जायते स्म बत ते ह्यनया च कृत्या जानासि नैव तदिदं परमं विचित्रम् ॥६॥
अन्तर्दशा यदि विचारयसि क्षणं त्वं स्वारब्धकर्मविषये महनीयकीर्ते ।
हस्तं निजं च कवचस्य पुरोविभागं संपश्यसीह यदि तर्हि तवैव भायात् ॥७॥
तद्रक्तिमा कुशल! यस्य जनस्य रक्तात् जातः स बान्धवगणो ह्यथवा परः स्यात् ।
तद्रक्तवर्णपरिणामवदान्यबुद्धे ! लोकद्वये किमरुणो भविताथ कृष्ण ॥८॥
धीर ! स्वयं त्वमधीनतयाऽऽगमिष्यो जेतुं यदि प्रबलदक्षिणदेशमेनम्
तर्ह्यास्तृतं समकरिष्यमहं मदीयं नेत्रं च मस्तकमिदं तव पादमूले ॥९॥
भास्वत्तुरङ्गमतुमृत्य तवाहमेव सैन्येन वीर, महता सहसाऽऽगमिष्यम् ।
सर्वाञ्च दक्षिणदिशं त्वदधीनभूतां हन्तावरिष्यमहमेव नितान्तहर्षात् ॥१०॥
औरङ्गजेबनृपतेर्यवनेश्वरस्य धर्मद्रुहः सकलसाधुविहिंसकस्य ।
जाले स्वयं कपटकूटमये पतंस्त्वम् अस्मानपीह बत पातयितुं समागाः ॥११॥
क्रीडामि केन विधिना भवता किलाहं जानामि नाहमधुना वरवीर ! किञ्चिद् ।
किं सङ्गतः शुभवता भवता मयापि नास्त्येव तर्हि परमः पुरुषार्थलाभः ॥१२॥
सेवां न वीरपुरुषः समयस्य कुर्यात् सिंहः कदापि मनुते न शृगालवृत्तिम् ।
तीक्ष्णो कृपाणपरशू यदि चोपयुञ्ज्यां भूयान्भवेदुभयपक्षगहिन्दुनाशः ॥१३॥
सन्दृश्यते मम मनो नितरामनेन त्वक्त्वार्थितं यवनशोणितसारपानम् ॥
आत्मीयलोक-रुधिरक्षरणाय कोशान् निःसारयेय करवालमहो करालम् ॥१४॥
यद्याहवाय यवनाः स्वयमापतिष्यन् अस्माकमद्य परमोच्चपराक्रमाणाम् ।
युद्धाटवी-मृगयुवृत्तिमुपाश्रितानां नूनं शरव्यपदवीं सहसाऽभविष्यन् ॥१५॥
स्वार्थैकसाधनपरः परहिंसनार्थे यद्वादरश्च करुणाकणिकाविहीनः ॥
न्याय्याच्च धर्मपथयादवरङ्गजेबः भ्रष्टो भृश क्षितितले नरराक्षसोऽसौ ॥१६॥
स्वर्यो यदा पडुलखानपराक्रमोऽभूत् शाहिस्तखानकृतमप्यपलं यदासीत् ॥
योद्धुं भवानिह तदा प्रहितोऽस्ति तेन सोढुं क्षमो न हि मदाक्रमणं स भीरुः ॥१७॥
आग्येष्यिष प्रहरणक्षतसिंहवृन्द यथा लसन्तु वनराजपद प्रपन्नाः ।
भूयाश्च कोऽपि भुवि हिन्दुसमाजमध्ये वीरोऽवशिष्ट इति तस्य दृढा दुराशा ॥१८॥

चेतोद्रय हि मिलित गिरिमभ्युदग्रं द्राक् पाटयेज्जलनिधिं नु विशोषयेच्च ।
वक्तव्यमस्ति बहु मे विषये त्विलास्मिन् तल्लेखन समुचितं मम नैव पत्रे ॥५०॥
आवामुभौ च मिलितौ बहु सवदावेतीच्छामि यच्छ्रमयुचौ न वृथा भवेताम् ।
याच्छास्ति चेत् तव समक्षमुपेत्य वक्ष्ये श्रोष्यामि च त्वदुदितं प्रणयेन सर्वम् ॥५१
वार्तावधूमनवगुण्ठित–चारुवक्त्रामावां रहो नु करवाव चिराय बन्धू ।
तस्याः कचे जटिलितामपसारयिष्ये सौहार्दत सपदि कङ्कतिका–सहायः ॥५२॥
यत्नस्य साधु करवाम परा नु काष्ठामुन्मत्तरक्षसि तथा युनजाव मन्त्रम् ।
अन्विष्य सिध्युपनय च तथाप्यमुन किं चेह नाम करवाम समुज्वल नौ ॥५३
खड्गं शपामि तुरग च शपामि देश धर्मं शपामि मम सङ्गमनेन नूनम् ।
नैवापतेत् त्वयि विपत्तिलवोऽपि माभूराशङ्कितोऽस्त्वकुशलस्तानवघप्रसङ्गात् ॥५४॥
मन्मारणाय हुबशी–कुलसादिलोकैः सार्धं द्विपद्शतमितै स समगतोऽत्र ।
न प्राहरिष्यमहमेव पुरा हि तस्मिन् कस्तेऽलिलिखिष्यदिदमाशयवेदि पत्रम् ॥५५॥
नाह निमेमि भवतो मम नास्ति वैरी वीर स्वय हि जयसिह कुतोऽपि हेतोः ।
यत्युत्तर प्रहिणुया उचित तदोपस्थास्यामि ते निर्मि निरस्तभयोऽहमेकः ॥५६॥
शाहिस्तखानरिपु–कञ्चुकपेटलब्ध–पत्र रहस्यमयमेप निदर्शयेयम् ।
सिञ्चेयमक्षियुगले तव सत्यशाम्भो दूरीभवेत्तव ततः सुखमोहनिद्रा ॥५७॥
स्वप्नस्य वास्तवफल तव दर्शयिष्ये प्रक्ष्याम्यह सपदि वीर तदुत्तर त्वाम् ।
भूयान्मनोमतमिद यदि तन्न पत्र सैन्य भवेत् तव मदीय–कृपाणलक्ष्यम् ॥५८॥
सच्छादयेन्निजमुख भगवान् दिनेशः सन्ध्या–पटाञ्चल–वशादवशो यदा स्वः ।
खड्गस्तदा मम निरावरणो हि भूयात् स्वस्त्यस्तु विश्वर ते रजपूतवीर ॥५९॥

* * *

## इंग्रजी ग्रंथाचे संस्कृत अनुवाद

इंग्रजी भाषेचे अध्ययन आवश्यक झाल्यापासून भारतीय साहित्यक्षेत्रात फार मोठी क्रांति झाली. शेक्सपीयरसारख्या परमश्रेष्ठ आग्ल कवींची नाटकें वाचून त्यांची भाषांतरें करण्याचा किंवा त्यांचे अनुकरण करण्याचा मोह विविध-भाषीय भारतीय साहित्यिकाना झाल्याचें दिसून येतें. संस्कृतच्या अभ्यास करणाऱ्या इग्रज पंडितानी ज्याप्रमाणे अनेक संस्कृत ग्रथाचे इग्रजी अनुवाद केले; त्याप्रमाणे इग्रजी शिकलेल्या संस्कृत पंडितानी इग्रजी न जाणणाऱ्या संस्कृतज्ञासाठी इंग्रजी काव्यनाटकादिकाचे संस्कृत अनुवाद केले. टेनिसच्या Cup (कप्) नामक नाटकाचा संस्कृत अनुवाद करताना प्रस्तावनेमध्ये अनुवाद लेखक श्री वेंकटरमणाचार्य म्हणतात.

"आङ्ग्लभाषात्मके वाङ्मयप्रपंचे यानि दिव्यानि रत्नानि सन्ति तानि संस्कृतभाषागारे संकलय्य, सरस्य, तन्प्रदर्शनेन भारतीयाना चित्ताकर्षणद्वारा हर्षनर्गण प्रवर्णनीयम् इत्यादि सदुदारोद्देशसंपन्नेन मित्रवर्येण प्रेरितोऽयं जनः आल्फेड-टेनिसन-नामक-कविना विरचितम्-......कम्-नामकं नाटकं संस्कृतभाषया निरूपयितुम् उद्युक्तः।"

इंग्रजीतून संस्कृतात अनुवादित झालेल्या ग्रंथांमध्ये बायबलच्या विविध अनुवादाची संख्या बरीच मोठी आहे. हे अनुवाद करणाऱ्याचा हेतू उघड करून सांगण्याची आवश्यकता नाही. हिन्दु समाजाच्या अन्तःकरणामध्ये संस्कृत भाषेविषयीं नितान्त श्रद्धा असल्याने त्या भाषेत आपल्या धर्मग्रथाचे अनुवाद केल्यास त्याचा विशेष परिणाम होईल, अशा कल्पनेनेच हे अनुवाद करण्यात किंवा करविण्यात आलेले आहेत. आश्चर्याची गोष्ट ही की मूळ बायबलची भाषा इतकी सुंदर असताना त्याचे संस्कृत अनुवाद मात्र काहीसे क्लिष्ट व नीरस झालेले आहेत. त्यामुळेच अनुवादांना संस्कृतज्ञाच्या समाजात विशेष मान्यता मिळाल्याचें दिसत नाही. Modern Sanskrit Writings या आपल्या निबंधात डॉ. राघवन् यानी बायबलच्या संस्कृत अनुवादाची व खिस्ती सम्प्रदायविषयक कांही संस्कृत ग्रथाची एक प्रदीर्घ यादी दिली आहे. तीच येथे आम्ही उद्धृत करीत आहोत.

(1) The New Testament of our Lord & Saviour Jesus Christ; Translated into Sanskrit language from the original Greek by the Missionaries at Serampore (Under the superintendance of William Carey) 3 vols, Scrampore 1808-1811.

(2) The Holy Bible containing the old & New Testaments, translated into Sanskrit langauge from the original by the Missionaries at Serampore 1821.

(3) The Book of Genesis and part of exodus in Sanskrit, translated from the Hebrew by the Calcutta Baptist Missionaries, 1843.

(4) 'The Book of the Prophet Isaiah in Sanskrit'. The Baptist Mission Press, Calcutta 1845.

(5) The Proverbs of Soloman in Sanskrit, School Book Society's Press, Calcutta 1842.

(6) The Proverbs of Soloman in Sanskrit, (Translated from Hebrew) Baptist Mission Press, Calcutta 1846.

(7) खिस्तीय-धर्म-पुस्तकान्तर्गतो हितोपदेशः— Baptist Mission Press, Calcutta, 1877.

(8) The Psalms — 'ईश्वरीय-स्तवार्थक-गीतसंहिता' Baptist Mission Press, Calcutta, 1877.

(9) The New Testament of our Lord & Savior Jesus Christ in Sanskrit. Translated from the Greek by the Baptist Missionaries with native assistants. Baptist Missionary Society, Calcutta 1841.

(10) The four Gospels with the acts of the apostles in Sanskrit, The Baptist Mission, Calcutta 1844.

(11) खिस्तचरितम् अर्थतः मिथि-मार्क-लूक-योहनैर्-विरचितं सुसंवाद-चतुष्टयम्, Baptist Mission Press, Calcutta. 1878

(12) मिथिलिखितः सुसंवादः Baptist Mission Press, Calcutta. 1877.

(13) मार्कलिखितः सुसंवादः Baptist Mission Press, Calcutta. 1878.

(14) सत्यधर्मशास्त्रम्-मार्कलिखितसुसंवादः अर्थतो येशुखिस्तीयचरितदर्पणम्- Baptist Mission Press, Calcutta. 1884.

(15) लूक-लिखित-सुसंवादः Baptist Mission Press, Calcutta. 1878.

(16) The Bible for the Pandits. The first three chapters of Genesis, "diffusively and unreservedly commented" in Sanskrit and English by J. R. Ballantyne, London 1860.

(17) The Gospel of St. John in Sanskrit.=योहानलिखितः सुसंवादः।

(18) ईश्वरोक्तशास्त्रधारा-(The course of Divine Revelation by John Muir, Baptist Mission Press, Calcutta 1846.

(19) परमात्मस्तवः—A christian hymn in sanskrit verse. Mission Press, *Allahbad,1853.*

(20) पौलचरितम्—A short life of the Apostle Paul, in Sanskrit verse, Calcutta 1850.

(21) ख्रिस्तसङ्गीतम्—(The Sacred history of our Lord Jesus Christ, in Sanskrit verses) Calcutta 1842.

(22) ख्रिस्तधर्मकौमुदी—Christianity as contrasted with *Hindu philosophy, by J. R. Ballantyne, London* 1859.

(23) ख्रिस्तधर्मकौमुदीसमालोचना–A Critical review of Dr. J. R. Ballantyne's ख्रिस्तधर्मकौमुदी, by *व्रजलाल मुखोपाध्याय* Calcutta 1894.

(24) ख्रिस्तयज्ञविधिः—The ordo Missae translated in Sanskrit, Translated from Latin, by Ambrose Sureshachandra Roy, Calcutta 1926.

डॉ. रावननच्या नामावलीत नसलेला आणखी एक बायबलचा अनुवाद म्हणजे, "धर्मपुस्तकस्य शेषांशः अर्थात्. प्रभुणा यीशुख्रीष्टेन निरूपितस्य नूतन धर्मनियमस्य ग्रन्थसङ्ग्रहः हा होय. न्यू टेस्टामेंटचा हा संस्कृत अनुवाद इंग्रज व बंगाली पण्डितांनी मिळून मूळ बायबलच्या आधारे केला. ६३६ पानांचा हा ग्रन्थ, १९१० साली कलकत्त्याच्या ब्रिटिश फॉरेन् धर्मसमाजातर्फे प्रथम मुद्रित करण्यात आला. त्यानंतर १९२२ साली बॅप्टिस्ट प्रिन्टिंग प्रेस, कलकत्ता येथे फोटोमापी पद्धतीने त्याचें पुनर्मुद्रण करण्यांत आलें, या अनुवादाचा पुढील नमुना पाहिला असता पाद्यांना ख्रिस्ती मिशनऱ्यांनी केलेल्या किंवा करविलेल्या संस्कृत लिखाणाची कल्पना येईल.

यीशोः क्रुशारोपणं मृत्युश्च—

ततः स स्वक्रुशं वहन् कपालस्थानमित्यभिधम् अर्थात् इब्रीयभाषया गल्गथेति नामकं स्थानं प्राप्य । तत्रैव ते तस्य तेन सार्धमन्यौ द्वौ च क्रुशान्यारोपयामासुः तौ द्वौ तस्य

पार्श्वयोर्यीशुञ्च मध्यस्थाने। पीलातस्तापराधविज्ञापक पत्र लेखयित्वा क्रुशेऽर्पयामास। तत्र लिखितमासीत्, यिहूदीयाना राजा नासरतीयो यीशुरिति। अत एव बहवो यिहूदीयास्तत् पत्रमपठन्, यतो यीशुर्यत्र क्रुशमारोपितस्तत् स्थान नगरस्य निकटस्थ, तत् पत्रञ्च इब्रीयैर्यूनानीयै रोमीयैस्त्वाक्षरैर्लिखितमासीत्। अत एव यिहूदीयाना मुख्ययाजका पीलातमवादीषु यिहूदीयाना राजेति मा लिख्यता, प्रत्युतेद लिख्यताम् अय कथितवान्, यिहूदीयाना राजाहमिति। पीलात प्रतिरभाषे, अह यल्लिखितवांस्तदेव लिखितवान्। सैनिकजनास्तु यीशु क्रुशमारोप्य तस्य वासासि गृहीत्वा एकैकस्य सैनिकस्य निमित्तमेकैकभागमिति चतुरोंऽशान् कृत्वा निभेजिरे, तस्याङ्गाच्छादकमपि आददुश्च। तदङ्गाच्छादकन्तु सीवनरहितम् ऊर्ध्वमान्तमारभ्याखिलमूतमासीत्। ततस्ते परस्परमवदन्, मैव छिद्यतामिद प्रत्युतेद कस्य भविष्यति गुटिकापात कृत्वा तन्निश्चीयताम्। अनेन शास्त्रीयमिद वच सिद्ध बभूव,

मामकीनानि वस्त्राणि स्वमध्ये विभजन्ति ते।
मम परिच्छदार्थञ्च गुटिका पातयन्ति हि॥

त सैनिकजनास्तदेवाकार्षु।

आसन्तु यीशो क्रुशस्य समीपे तिष्ठन्त्यस्तस्य माता, मातुर्भगिनी क्लोपा भार्य्या मरियम्, मग्दलीनी च मरियम्। यीशुस्तदा स्वमातर सन्निधौ तिष्ठन्त स्वप्रिय शिष्यञ्च विलोक्य स्वमातरमाह, नारि, पश्याय तव पुत्र। तत पर स त शिष्यमाह, पश्येय तव माता। तस्मात् दण्डादारभ्य स शिष्यता निजगृह नीत्वाग्रहीत्।

तत पर शास्त्र यथा सिद्ध भवेत् तथा सर्व्वमिदानीं समाप्तमिति ज्ञात्वा यीशुरभाषे पिपासामि। तत्र त्वम्लरसेन पूर्ण पात्रमेकमासीत्। ततो जना स्पञ्जमेकमम्लरसेन पूरयित्वा तुलसीण्डे बद्ध्वा च तस्य मुखान्तिकमनैषु। अम्लरस त मुक्त्वा योशुर्व्याजहार, समाप्तमिति, शिरो नमयन्नात्मान समर्पयामास च।

तद् दिन सज्जतादिन तदुत्तरविश्रामवारश्च महादिन, तत्कारणाद् यिहूदीया विश्रामवारे तेषा शवाना क्रुशोपरिस्थान निवारयितुमिच्छन्त पीलात तदीयजङ्घाना भञ्जन तेषाञ्च स्थानान्तरीकरण ययाचिरे। अत एव सैनिकजना आगत्य तेन सार्द्ध क्रुशारोपितयो प्रथमस्य जङ्घे तदन्यतरस्य जङ्घे च अभञ्जु, यीशुमुपस्थाय तु यदा त सम्प्र मृतमपश्यस्तदा ते तस्य जङ्घे न बभञ्जुरेकस्तु सैनिको दीर्घशल्येन तस्य पार्श्व निर्व्याध, ततस्तत्क्षण शोणित तोयञ्च नि सृत। यो द्रष्टवान् स साक्ष्य दत्तवान्, तस्य साक्ष्यञ्च सत्य, स च जानाति य त् सत्य भाषते यूय यथा विश्वसिथ, यत सर्व्वमिदमेतदर्थ सम्भूत यदिय शास्त्रीयोक्ति सिद्धा भवेत्, तस्यैक मौस्थ

मपि न मद्वक्तव्यमिति । पुनरत्रान्या शास्त्रीयोक्तिरियं, ते च विद्वन्तस्तमुद्दिश्य हक्पात करिप्यन्तीति । ( पृ. २१२–२१३ )

* * *

**भ्रान्तिविलासम्**—मंगलोरचे संस्कृत पंडित श्रीशैल दीक्षित ( १८०९ ते १८७७ ) यानी शेक्सपीयरच्या 'कॉमेडी ऑफ एरर्स' या नाटकाच्या कथेचा संस्कृत गद्यानुवाद केला. हा लेखक श्रीभाष्याचा विशेषज्ञ असल्याने त्याला 'श्रीभाष्य तिरुमलाचार्य' अशी पदवी व कादम्बरीच्या पाण्डित्यामुळे 'कादम्बरी तिरुमलाचार्य' अशी पदवी विद्वानानी दिली होती. 'हनुमनक्षत्रमाला', 'वीराञ्जनेयशतकम्', 'गोपालार्या' यासारखीं स्तोत्रकाव्यें या प्रस्तुत कवीने लिहिलीं असून त्याव्यतिरिक्त 'कावेरीगद्यम्' या नावाचा प्रवासवर्णनात्मक गद्यप्रबंध त्याने लिहिला आहे. 'कर्नाटकप्रकाशिका' या नावाच्या कानडी वृत्तपत्राचें संपादकत्वहि त्याने कित्येक वर्षे सांभाळलें होत.[३७] ( श्रीशैल दीक्षिताचा उल्लेख पूर्वीच्या प्रकरणात आलाच आहे.)

**कनकलता**—शेक्सपीयरच्या ल्युक्रेस ( Lucrece ) या काव्याचा प्रस्तुत संस्कृत अनुवाद मद्रासचे पी. के. कल्याणराम शास्त्री यानी केला आहे.[३८]

**शम्भुचर्योपदेश** — श्री. के एस्. वेंकटरमण यानी A day with Shambhu या नावाचं एक इंग्रजी पुस्तक लिहिलें होतें. त्याचा संस्कृत अनुवाद श्री महालिंगशास्त्री यानी केला.[३९] । श्री महालिंगशास्त्रींनी इंग्रजी भाषतील पुढील काव्याचा संस्कृतानुवाद केला असून ते सर्व अनुवाद त्यांच्या 'किङ्किणीमाला' नामक काव्य समूहात प्रसिद्ध झालेले आहेत.

Shakespeare's Sonnet No. 29 = प्रेयसीस्मृति *

Shakespeare's Sonnet No. 73 = विरहिवैक्लव्यम् *

Wordsworth's Sonnet beginning with "Earth has nothing more face to show = प्रभातवेला*

Shelley—"The Cloud" = अभ्रग्राह *

Shakespeare's 'As you Like it, Act II Sc. VII, 139 to 166 = वयोधिरोहणनि श्रेणिका *

---

३७ पृ ४८४ । ३८ मुद्रित ।

३९. श्रीनिवास प्रेस, तिरुवय्यारु येथे मुद्रित ।

* किङ्किणीमाला, अनुक्रमें पृ २४, पृ २६, पृ. ३७, पृ ४०, पृ ६१.

Shakespeare's Macbeth, Act V, Sc.V 11.19 to 28 जीवयाना.*

Shakespeare's Hamlet, Act III, Sc. III, 59 to 80 = आत्मोपदेशः*

Shakespeare's Hamlet, Act I, Sc. I, L(66 to 82)= जीवनजुगुप्सा.*

Dr. Johnson's letter to Lord Chestorfield = ज्ञानसेनस्य चित्रापीडमहोदय प्रति लेखः ।*

*　　　*　　　*

महालिंग शास्त्रींनी केलेल्या या अनुवादा व्यतिरिक्त कांही उल्लेखनीय अनुवादग्रन्थ पुढील प्रमाणे आहेत:—

इंग्लंडीय-व्याकरणसारः-Principles of English Grammer for the use of the natives of India : by M.W.Wollaston

या इंग्रजी व्याकरणाच्या पुस्तकाचा मधुसूदन तर्कालंकारांनी केलेला हा संस्कृत अनुवाद इ. १८३५ मध्ये प्रकाशित झाला.

इंग्लण्डीयभाषाव्याकरणम्ः-Elements of English Grammer नांवाच्या इंग्रजी व्याकरणविषयक पुस्तकाचा वाराणसी महाविद्यालयातील संस्कृत विभागासाठी केलेला हा संस्कृत अनुवाद इ. स. १८४७ मध्ये मिर्झापुर येथे मुद्रित झाला.

| इंग्रजी ग्रंथ | संस्कृतात अनुवाद | अनुवादक |
|---|---|---|
| As you like it, by Shakespeare | 'पुष्पदग्धासप्तकम्' | -रामचंद्राचार्य |
| A wish, by Roger | 'सुमनोरथा' | ,, |
| Hamlet ,, | 'पितुरुपदेशः' | ,, |
| All's right with the world by Browning | 'साधुवादमञ्जरी' [४०] | ,, |
| A mid-summer nights Dream, by Shakesplare | 'वासंतिकास्वप्नः' | -आर्. कृष्णमाचार्य [४१] |

* जिज्ञविणीमाला अनुक्रमें पृष्ठ ६३, पृ. ६३, पृ. ६४, पृ. ६१.

४०. रामचन्द्राचार्यांचे अनुवादित ग्रंथ मद्रासच्या लघुकाव्यमालेमध्ये इ. स. १९२४ मध्ये प्रकाशित झाले.

४१. १८९२ मध्ये कुम्भकोणं येथे मुद्रित.

As you like it, by Shakespeare — 'यथाभिमतम्' – आर. कृष्णमाचार्य[४२]

Amelia Galetti, by Lessing (जर्मन कवी) — डॉ. श्यामशास्त्री यानी केलेला प्रस्तुत काव्याचा संस्कृत अनुवाद म्हैसूरच्या महाराजा संस्कृत कॉलेजच्या जर्नलमध्ये १९३१ साली प्रकाशित झाला.

'Othello', by Shakespeare — त्रिवेन्द्रमच्या राजराजवर्मा या पंडिताने प्रस्तुत इंग्रजी नाटकाचा संस्कृतानुवाद केला[४३]

Principles of Human knowledge by Berkeley — 'ज्ञानसिद्धान्तचन्द्रिका' या नावाने काशीच्या एका अप्रसिद्ध पंडिताने प्रस्तुत ग्रंथाचा अनुवाद केला.[४४]

Eassay concerning Human understanding by Lock. — 'मानवीयज्ञानविषयकशास्त्रम्।' वाराणसीच्या एका अप्रसिद्ध पंडिताने प्रस्तुत अनुवाद केला असून तो प्राचीन ग्रंथमालेत प्रकाशित झाला आहे.

जर्मन कवि गटेच्या 'फाऊस्ट' या विख्यात नाटकाचे 'विश्वमोहनम्' या नावाचे भाषांतर पुण्याचे श्री ताडपत्रीकर यांनी केले.

Novum Organum by Bacon — 'बेकनीयसूत्रव्याख्यानम्'–विठ्ठल नावाच्या पंडिताने प्रस्तुत अनुवाद केला असून तो इ. १८५२ मध्ये वाराणसीत प्रथम मुद्रित झाला.

Poetics by Aristotle–पुण्याच्या एका अप्रसिद्ध पंडिताने प्रस्तुत ग्रंथाचा अनुवाद केला असून तो अद्यापि अप्रसिद्ध आहे.

प्रेमराज्यम्—'व्हिकार ऑफ वेकफिल्ड' या सुप्रसिद्ध इंग्रजी कादम्बरीच्या आधारें तंजावरच्या प्रसिद्ध कवि रघुनाथपुत्र रंगाचार्य (जन्म इ. स. १८९४) यानें हें संस्कृत नाटक लिहिलें आहे.[४५] अशाप्रकारे प्रसिद्ध इंग्रजी ग्रंथाच्या आधारे कांही ग्रंथ संस्कृतात निर्माण झाले आहेत. हिन्दी मराठी यासारख्या प्रांतीय भाषांमध्ये सुद्धा अशा प्रकारचें परसाहित्योपजीवी वाङ्मय या काळात निर्माण झालेले दिसते. शब्दशः भाषांतरापेक्षा अशा प्रकारच्या वाङ्मयामध्ये अधिक सजीवपणा दिसतो.

---

४२. उद्यानपत्रिकेमध्ये प्रकाशित.

४३. त्रिवेन्द्रम् येथे मुद्रित। ४४. मुद्रित। ४५. पृ. ३८६।

**कौमुदी**—गोल्डस्मिथच्या 'हर्मिट्' नामक काव्याचा प्रस्तुत अनुवाद काङ्गनोर येथील राजवंशीय कवि रामवर्मा याने केला आहे.[४६]

**अन्धबालक**—मिल्टनच्या 'दी ब्लाईंड बॉय' या करुणमधुर काव्याचा प्रस्तुत संस्कृत अनुवाद म्हैसूर येथील ए. व्ही. नारायण याने केला आहे.[४७]

**पद्यपुष्पाञ्जलि**—मदुरा येथील आर. डी. संस्कृत महाविद्यालयाचे प्राचार्य व्ही. सुब्रह्मण्य अय्यर यांनी केलेले काही इंग्रजी काव्यांचे अनुवाद प्रस्तुत पुस्तकात संकलित केलेले आहेत.

**कमलाविजयनाटकम्**—अल्फ्रेड् टेनिसन्च्या 'दी कप्' (The Cup) या दोन अंकी प्रेक्षणकाचा प्रस्तुत अनुवाद चित्तरायपत्तन येथील श्री वेंकटरमणाचार्य यांनी केलेला आहे. श्री. वेंकटरमणाचार्य हे म्हैसूर राज्यात संस्कृत विद्यालयांचे इन्स्पेक्टर (अधिक्षक) होते हा अनुवाद लेखकाने १९०९ मध्ये लिहिला. त्या नतर तो १९३८ मध्ये प्रकाशित होऊ शकला.[४८] हें नाटक भाषान्तरात्मक असलें तरी कवीने त्यामध्ये भारतीय संस्कृतीच्या अनुसार काही परिवर्तन केलेलें आहे. तें असें— "भारतीयनाटकसम्प्रदाय-रचनानुसारेण एतन्नाटक सुखान्तात्मकम् आपादयितु यथा सन्दर्भे सम्मेलयितु च तत्र तत्र स्वमतिकल्पितान् नूतन-विषयान् गर्भीकृत्य पञ्चमाङ्कस्य यावत् कथावस्तु स्वमतिभोन्मेषेण निर्माय सुसविधानेन पञ्चाङ्कात्मक पतिव्रता-विजयप्रधान धर्मबोधक · रचितवान्।" याच कवीने लिहिलेल्या 'उमादर्श या भाषान्तरात्मक काव्याचा परिचय वर आलाच आहे.

इंग्रज समाजाच्या सम्पर्कामुळे इंग्रजी भाषेवर प्रभुत्व मिळविणाऱ्या अनेक भारतीय विद्वानांनी इंग्रजी भाषमध्ये अतिश्रेष्ठ साहित्य निर्माण केलें. विवेकानंद, अरविंद, महात्मा गांधी यांसारख्या अनेक थोर पुरुषांनी आपले विचार इंग्रजी भाषेतच ग्रंथरूपाने संकलित केलेले आहेत. तुलनेच्या दृष्टीने पाहता गेल्या शतकामध्ये कोणत्याहि एका भारतीय भाषेपेक्षा इंग्रजी भाषेमध्ये भारतीय लेखकांतर्फे अधिक साहित्य निर्माण झालेलें आहे. या भारतीय लेखकांच्या इंग्रजी ग्रथांचे निरनिराळ्या प्रादेशिक भाषामध्ये आजवर अनुवाद झालेले आहेत. या कामीं संस्कृत पडितहि काही उदासीन नव्हते. त्यांनी केलेल्या अशा प्रकारच्या आङ्ग्लभाषीय ग्रंथाच्या अनुवादाचा संक्षिप्त परिचय पुढे दिलेला आहे.

**कवितांञ्जलि**—योगी अरविंदांनी लिहिलेल्या तीन प्रदीर्घ इंग्रजी कवितांचा प्रस्तुत पद्यात्मक संस्कृत अनुवाद त्यांचे विद्वान् शिष्य विश्वेश्वरपुत्र कपालीशास्त्री यांनी

४६ कृ ५४४।

४७ जर्नल ऑफ दी महाराजा संस्कृत कॉलेज, म्हैसूर (१९३०)

४८ म्हैसूर राजकीय शाखा मुद्रणालय

केलेला आहे. अरविंदाच्या Four Powers of the Mother या इंग्रजी ग्रंथाचा कपालीशास्त्रींनी "मातृतत्त्वप्रकाशः" या नावाने पद्यात्मक संस्कृतानुवाद केलेला आहे. श्री कपालीशास्त्रींनी 'आह्निकस्तवः' हा काव्यसंग्रह, 'भारतीस्तवः' (शतक) "वासिष्ठवैभवम्" (गद्यात्मक चरित्र), 'सिद्धाञ्जनभाष्यम्' ऋग्वेदाचे हे संस्कृत ग्रंथ व उमासहस्रप्रभा, रमणगीताप्रकाश, सद्दर्शनभाष्यम्, अरुणाचलपञ्चरत्नदर्पणः हे संस्कृत टीकाग्रंथ लिहिलेले आहेत.

रवीन्द्रनाथ टागोरांच्या Renunciation या इंग्रजी काव्याचा संस्कृत पद्यानुवाद तिरुपतीजवळ तानपल्ली येथे राहणाऱ्या नारायणसुत वरदाचार्य नावाच्या पंडिताने केलेला आहे.

**गांधीसूक्तिमुक्तावली**—भारताचे माजी अर्थमंत्री श्री. चिं. द्वा. देशमुख यानी केलेल्या महात्मा गांधींच्या १०० सुभाषितांच्या प्रस्तुत पद्यानुवादासंबंधी मागे उल्लेख आलाच आहे.[४९] महात्माजींची प्रस्तुत इंग्रजी सुभाषिते श्री. एम्. के. कृष्णन् यानी "Thus spake the Mahatma" या पुस्तकांत संग्रहीत केलेली होती. श्री. देशमुखांच्या प्रस्तुत अनुवादासंबंधी आम्ही त्याना अभिप्रायार्थ पाठविलेले पद्यात्मक संस्कृत पत्र पुढीलप्रमाणे आहे.

स्वैरप्रयुक्तं वचनं सतां यन्मतं तदेवोपनिषन्निभं मे ।
या भारतीमाश्रयते वचस्तत्तामेव मन्ये भुवि देववाणीम् ॥
पालीं समाश्रित्य जगाद बुद्धो मोहम्मदस्त्वारबदेशवाणीम् ।
खिस्तः स हिब्रूमितरेन्यभाषा गान्धिर्महात्माङ्ग्लगिरं तथैव ॥
तामेव गान्धीरितसुप्रबोध-मुक्तावलीं संस्कृतवाग्गुणाक्तां
कृत्वा भवद्भिः प्रकटीकृता सा महात्मभक्तिश्च कवित्वशक्तिः ॥
महात्मनो सूक्तिशतं पवित्रं यदाङ्ग्लभाषं भवता पुनस्तत् ।
पद्यैरनूद्यात्र फलं परात्तं शतक्रतूनां हि वचोमयानाम् ॥
आङ्ग्लप्रभावेण हतप्रभायाः गीर्वाणवाण्याः ननजीवनाय
शतानुवादो भवतोऽयमस्तु नवीनसञ्जीवनमन्त्रकल्पः ॥
गीर्वाणवाणीसमुपासका ये ते मे हि गीर्वाणवदेव पूज्याः ।
विशेषतो लोकधुरन्धरा ये महादरास्ते तु तदग्र्यपूज्याः ॥

४९. National printing works, Delhi तर्फे प्रकाशित. प्राप्तिस्थान, सस्ता साहित्य मंडल, कनाट सर्कस, दिल्ली ।

काव्येषु नाम्येषु रसातिरेकान्निर्वेदमाप्येव गिरा हि देवी।
महात्मवाङ्निर्झरिणीं प्रविश्य स्नानं सुशुद्ध्यै चरतीव मन्ये ॥

त्रिसत्यपूता महता रसेन समाश्रिता सा ललिताऽपि वाणी । -
विभाति वह्निस्वपूतवेदी-स्थितेव गौरी तप आचरन्ती ॥

*    *    *

जळगाव ( खानदेश ) चे वकील प्रभाकर दामोदर पंडित यानी 'टाईम्स ऑफ इण्डिया'तील दैनिक सुभाषिताचा 'सूक्तिरत्नावलि'[५०] नामक जो शतश्लोकी अनुवाद केलेला आहे, त्यासंबंधी माहिती पूर्वी आलेलीच आहे.

कोचीनमधील त्रिचूर गावचे निवासी श्री वरकरकृष्ण मेनन यानी **गाथा-कादम्बरी** या नावाने बाणभट्टाच्या कादम्बरीचे संस्कृत पद्यामध्ये रूपान्तर केले. त्यामध्ये Thomsons Address to Diety या इंग्रजी प्रार्थनेचा संस्कृत अनुवाद एका ठिकाणीं गोवला असून, शुकनासोपदेशाच्या ठिकाणीं The Golden vrses of Pythagoras या इंग्रजी काव्याचा अनुष्टुप् छन्दोबद्ध अनुवाद गोवलेला आहे[५१]

**चोरचत्वारिंशीकथा**—अरेबियन् नाईट्स् मधील, 'अलीबाबा अँड फॉरटी थीव्हज्' या सुप्रसिद्ध कथेचें हितोपदेशासारखे संस्कृत भाषांतर पुण्याचे श्री गोविंद कृष्ण मोडक यानी केलेलें आहे.[५२]

**कथामञ्जरी**—अरविंदाश्रमाच्या माताजींनी लिहिलेल्या 'बेल्स जिस्त्वार' ( Bells Histores ) या फ्रेंच कथापुस्तकाचें संस्कृत भाषांतर अरविंदाश्रमाच श्री जगन्नाथ यानी केलेलें आहे. याच जगन्नाथाने "श्रीमातु सूक्तिसुधा" या नावाच माताजींच्या फ्रेंच सुभाषिताच पद्यात्मक भाषांतर केलेलें आहे.

**कण लुप्त गृहं दहति**—टॉलस्टॉयच्या 'A spark neglected burns the house' या कथेचे प्रस्तुत संस्कृत भाषांतर गुटूरचे श्री पो. कृष्ण सोमयाजी एम् ए डी लिट्. यानी केलें असून तें सर्वज्ञ संस्कृतमालेद्वारा प्रकाशित झालें आहे. प्रस्तुत भाषांतराच्या प्रस्तावनेमध्ये विद्वान् लेखकाने संस्कृत भाषेचे श्रेष्ठत्व अनेक प्रकारच्या युक्तिवादांनी व प्रमाणांनी सिद्ध केलेलें आहे.[५३]

---

५० श्री यावजी मुद्रणालय, जळगाव.
५१ सरस्वती प्रिंटिंग हाऊस, त्रिचूर, कोचीन
५२. कर्नाटक प्रिंटिंग प्रेस, मुंबई २, ( ई स १९३४ )
५३ प्राप्तिस्थान को कृष्णसोमयाजी संस्कृत सेरवयमाज मंत्री राजदवरीपुर, गुटूर (आंध्र)

**उमादर्शः**— म्हैसूर राज्यांतील संस्कृत पाठशाळांचे पर्यवेक्षक के. ए. कृष्णस्वामी यांनी Uma's Mirror या नांवाचें इंग्रजी काव्य लिहिलें आहे. त्याचा संस्कृतानुवाद 'श्री वेंकटरमणाचार्य यांनी इ. स. १९३७ मध्ये केला[५४]. श्री वेंकटरमणाचार्य हे म्हैसूरच्या संस्कृत पाठशाळेमध्ये प्राध्यापक होते. प्रस्तुत २ सर्गाच्या (श्लोक संख्या १३५) अनुवाद काव्यामध्ये पहिल्या सर्गात श्लो. ३५ ते ६९ पर्यंत वर्णिलेला भारतीय व यूरोपीय जीवनांतील भेद वाचनीय आहे. ते श्लोक पुढीलप्रमाणे आहेत —

हा श्वेतवर्णा मनुजा धरेशा वर्णेतरान् सर्वजनान् विजित्य ।
विशेषलुब्धा विभवानवाप्य स्वायत्तभूरक्षणदक्षकार्याः ॥ ३५

पुण्ये कुले दिव्यमुरुपजाता गाम्भीर्यभूषा व्यवहारयोग्याः ।
शूरास्सुधीरा नयकोविदस्ते सर्वत्र सर्वे न गुणा मिलन्ति ॥ ३६

आकारसंसूचितपौरुषेड्याः पराक्रमोपेतमुमेधसस्ते ।
अमानुषस्वीयकृतार्थकृत्याः स्तुत्याशयादश्रेष्ठसुलक्ष्यदीप्ताः ॥ ३७

छन्दूलभूतं लघुवर्त्म तीर्त्वा सन्देहबन्धान् सुचिरं विलङ्घ्य ।
उदारबुध्येव निरङ्कुशास्ते राजन्ति लोके धृतधीरभावाः ॥ ३८

तथापि कीर्तिक्षयहेतुभूतो विषादमूलो वसति मनोऽन्तः ।
स्वोद्देशनिर्वाहगतिक्रमेभ्यो दुरामहो दुःखकरा दुराशा ॥ ३९

भाग्येन किं भौतिकतत्त्वबोधप्रचारसंपादितकीर्तिभाजा ।
ज्ञानेन किं शब्दविजृम्भणात्तप्राज्ञप्रतिष्ठापरबोधनेन ॥ ४०

अहं ममेति प्रतिभेदभावो न चेन्महत्तत्सुभागधेयम् ।
आत्मावबोधो यदि यस्य न स्यात्तस्यास्ति काऽऽशा भगवत्प्रसादे ॥ ४१

येऽन्द्रियार्थेषु विमोहितास्ते नित्यात्मबुद्धिं न कदापि कुर्युः ।
क ईदृशां जन्ममृतिस्वभावं संसारदुःखं विपहं तरेयुः ॥ ४२

धीशक्तिपाण्डित्यवतां हि तेषां न प्रेरणं चेत्परतत्त्वलक्ष्ये ।
हीना जना तद्गुणजातभाग्यैः कथं विजानीयुरथात्मतेजः ॥ ४३

स्वरूपमेतेषु मनोगुणेषु स्वाशङ्कितं सिन्चिदवेक्षमाणा ।
दयोल्लसत्साराद्भुतपारण या प्राग्भारताख्ये भुवने पुराणे ॥ ४४

महानुभावं पितरं प्रणम्य हिमालयं भूपविधेषु तस्य ।
विलोक्य दुर्दर्शनश्रीमदेदं विचिन्तयामास विमूढनेत्राः ॥ ४५

५४. विजयलक्ष्मी विलास प्रेस, बंगलोर.

संसारकूपे पततां नराणां स्वशोकमोहौ विपदो विलोक्य ।
वशीकृतस्यास्य बभूव चिन्ता तमोमयी साश्रुभरेति मेने ॥ ४६
हा नाथ मे तात तमः किमेतत् हृत्क्षोभमोहो बत ते कुतोऽभूत् ॥
किं भारतोर्वीस्थितिजातचिन्ता यद्वाप्यवर्गानिह मुञ्चसि त्वम् ॥ ४७
ध्रुवं घृणा तत्स्थिति वीक्षणेन कठोरचेतस्यपि जायते हा ।
महर्षिभूमिर्यदिय पवित्रा विद्याकलादया जगति प्रसिद्धा ॥ ४८
स्पर्धा वसिष्ठेन समं पराऽभूद्यत्र प्रसिद्धा मुनिकौशिकस्य ।
तपांसि यस्या जगदद्भुतानि चक्रुः पवित्राणि गुहावनानि ॥ ४९
श्रीरामवीर्याप्तजयान्विता या श्रीकृष्णलीलामहिमाचवेषा ।
कर्णादरिश्चन्द्रकथाविशेषा धर्मिष्ठकार्यादृतसत्यभूषा ॥ ५०
सब्राह्मणा यत्र लिलङ्घिरे न स्वधर्मरक्ता स्मृतिवेदोदितोक्तीः ।
विगर्ह्य सर्वे धनमानगर्वं जनप्रशंसा परवसेवकानाम् ॥ ५१
सदाग्निहोत्रैर्विहिताग्निपूजास्सन्ध्यापरास्सूर्यकृते सकाले ।
परात्मजीवात्मसमर्पणार्थास्स्वतन्त्रचेष्टानिजतुष्टिभाजः ॥ ५२
सा ब्राह्मणस्यात्र दशाऽद्य भिन्ना दम्भाभिमानो धनलुब्धचेताः ।
अन्तःस्थतेजोभिमवात्स भाति भग्नोरवेर्दुर्ग इवास्तकाले ॥ ५३

---

प्रकरण २३ वे

# अन्यभाषीय शब्दांचें संस्कृतीकरण

मागील प्रकरणात अन्यभाषीय ग्रथाच्या सस्कृतानुवादाविषयीं भरपूर माहिती दिली आहे. हे सस्कृतानुवाद करताना लेखकाच्या पुढे विविध प्रकारच्या अडचणी निर्माण झाल्या. सस्कृत भाषा अत्यंत समृद्ध असली तरी प्रत्येक भाषेच अशं काही वैशिष्ट्य असतें की त्यातील काही शब्द सस्कृतात योग्य रीतीने अनुवादित करता येत नाहीत त्यामुळे अनेक लेखकाना अनेक प्रकारचे नवीन शब्द निर्माण करण्याची आवश्यकता वाटू लागली. मराठीमध्ये पाण्डे, आपटे, मोघले, रानडे यासारखीं एकारान्त आडनावे आहेत, त्यांची सस्कृतात विभक्तिरूपे कशीं करावीत असा प्रश्न उत्पन्न होतो. कारण सस्कृत व्याकरणात एकारान्त नावे चालविण्याची प्रक्रिया आढळत नाही. नेपोलियन्, विल्यम्, जॉर्ज्, यासारख्या यूरोपीय नावाचीं विभक्तिरूपें करताना देखील सस्कृत लेखक बुचकळ्यात पडलेले दिसतात या अडचणींतून वाट काढण्यासाठी आपापल्या अनुवादग्रथात लेखकानी विविध प्रकारचे सस्कृत शब्द निर्माण केलेले आहेत. असे नवनिर्मित शब्द सस्कृतज्ञाना देखील दुर्बोध झालेले आहेत. मोठाहि सस्कृत पण्डित असला तरी त्याला भाषातरित सस्कृत ग्रथात वापरलेल्या यदुवृद्ध, व्यक्तोजा, आग्यव्रत, वलियम, ग्लाध्वनि, कर्पूरद्वीप, यासारख्या नवनिर्मित सस्कृत शब्दाचे खरे अर्थ कळणे अशक्य आहे. असले शब्द प्राचीन सस्कृत वाङ्मयात कोठेहि वापरलेले नाहीत. नवीन विषयावर लिहिताना किंवा अन्य भाषीय ग्रथाचे सस्कृतानुवाद करताना बऱ्याच आधुनिक लेखकानी अगदी कहर केला आहे. त्यानी हवे ते नवीन शब्द (शक्य तोवर व्याकरणाच्या प्रक्रियेस अनुसरून) आपापल्या ग्रथात सर्रास उपयोगात आणलेले आहेत. आपल्या नवनिर्मित शब्दाची व्याकरणानुकूलता देखील अनेक लेखकानी तळटीपामध्ये पाणिनीय सूत्रें उद्धृत करून दिलेली आहे काही लेखकानी तर रेकॉर्ड, ग्रामोफोन, यासारखे इंग्रजी शब्द सस्कृतच असल्याचं युक्तिवादानी सिद्ध केलें आहे. आधुनिक सस्कृत लेखकामध्ये वाढत असलेली ही प्रवृत्ति पाहून व त्यानी स्वच्छन्दपणे निर्माण केलेल्या नवीन सस्कृत शब्दाच वैचित्र्य पाहून या सबधात एखाद्या विद्वत्परिषदेने काही निश्चित नियम ठरविण्याची आवश्यकता निर्माण झाली आहे असे आम्हास वाटते. व्यक्तींच्या विशेषनामाचे सस्कृतीकरण करण्याची काय आवश्यकता? 'यदुवृद्ध' या शब्दातून एडवर्डचा किंवा

'व्यक्तोर्जा' या शब्दातून व्हिक्टोरियाचा बोध कसा होणार? पद्यलेखकानी छंदोभंगाचे दोष टाळण्यासाठी असल्या विशेषनामामध्ये काही थोडेफार परिवर्तन केलें तर तें एकवेळ क्षम्य ठरेल, पण गद्यलेखकाना तसें करण्याची काही आवश्यकता नाही. पद्यलेखकानी सुद्धा मूळ नामात काही परिवर्तन केल्यास तळटीपेमध्ये त्याचा निर्देश करावयास हवा, नाही तर अर्थबोधामध्ये फारच मोठा अंतराय निर्माण होतो.

आधुनिक लेखकानी निर्माण केलेल्या काही वैशिष्ट्यपूर्ण शब्दाचा परिचय मूळ अवतरणासहित आम्ही पुढे दिलेला आहे. त्यावरून संस्कृत भाषेमध्ये निर्माण झालेल्या नवीन समस्येची किंचित् कल्पना येऊ शकेल.

पर्णाल्पर्वतग्रहणाख्यानम् या शिवकालीन ग्रथामध्ये काही नामाचें संस्कृती करण पुढीलप्रमाणें केलेलें आढळतें--

पर्णाल = पन्हाळा.

नागजित् = नागोजी. ( परितः पर्यटन्नागजित् सर्वलेखकः ) ( १-४७ )

पनाल = पन्हाळा. ( शिवधरणिमहीन्द्रस्त पनालाख्यमेव । ) ( १-५३ )

ताम्र = मोगल. ( ततो जातं महद्युद्ध ताम्रै' सालेरिपर्वते ) ( २-५ )

फैरंगिण: = फिरंगी । श्यामास्य: = हबशी । सिन्धुमध्यजः = इंग्रज.

( फैरंगिणश्च वार्णाटाः श्यामास्याः सिन्धुमध्यजाः । ) ( २-१३ )

शास्तिखान = शाइस्तेखान. ( तत' स शास्तिखानोऽपि च्छद्मना केन निर्गत. )

* * *

रामावतार शर्मा यानी 'भारतीयम् वृत्तम्' या नावाचा एक पद्यात्मक इतिहासग्रंथ लिहिला आहे. त्यामध्ये अनेक परकीय शब्दाचीं नवनिर्मित संस्कृत रूपें भरपूर प्रमाणामध्ये वापरलेली आहेत. ती अशीं--

नेपोलियन = नयपाल्यः । ( नयपाल्योऽभवद्वीरः सम्राड् फ्रान्सनिवासिनाम् । )

व्हिक्टोरिया = व्यक्तोर्जा । ( आङ्ग्लवसुधरा राज्ञी व्यक्तोर्जा वसुधामयात् । )

( पृ. ५१ )

वाप्पानस् = रेल्वे ट्रेन । ( वाप्पानसा च चैतैश्च सुगमाला सुखोऽभवत् । ) (पृ.५२)

टेलिग्राफी = विद्युत्सवादशैली ।

आद्यव्रत = एडवर्ड । ( आद्यव्रतेन राज्ञाश्च व्यक्तोर्जासूनुनाभवत् । ) (पृ. ५२ )

कर्पूरद्वीप = जपान । ( समयेऽस्याऽभवद्युद्ध कर्पूरद्वीपवासिनाम् । )

रुप्य = रशियन । ( जिगीषूणा सम रुप्यै रुप्या यत्र पराजिताः ॥ ) (पृ. ५२)

दार्मण्य. = जर्मन.

बल्यिम=विल्यम् । ( शर्मण्यानां बलियमो रूप्याणां निचुलो नृपः । )
कुलुम्बः = कोलंबस. ( कुलुम्बो भारतान्वेषी प्राप्तो पन्चदश शते । )
तुङ्गाब्धिः = अटलांटिकसागर । तुङ्गाब्धेरपरे पारे धीरः प्रापदमेरिकाम् ॥ (पृ.४८)
वस्का = वास्को डि गामा । ( वस्काभिधः पुर्तुगयामिन्वस्थ ततः परम् ।
आगाद् भारतमन्विष्यन् दक्षिणाम्बुनिधेस्तटम् ॥ )
तिमुरः = तैमुरलंग । मुद्गल = मोगल । ( अत्रान्तरे च तिमुरो मुद्गलाधिपतिर्निरैत् । )
( पृ. ४८ )
अक्बरः=अकबर ( बभूव दिल्लीनृपतिर्मुद्गलोऽक्बराभिधः । ) ( पृ. ४८ )

भारतीय संविधानाचा संस्कृतानुवाद करण्यास केंद्रिय सरकारने एक समिति नियुक्त केली होती. या समितीने बरेच नवीन शब्द उपयोगांत आणलेले आहेत. व त्या संबंधी आपली भूमिका समितीने "भारतीयसंविधानस्य प्राक्कथनम्" या आरंभीच्या लेखात स्पष्ट केली आहे. संविधानाच्या अनुवाद समितीने वापरलेले शब्द पुढील प्रमाणे आहेत.

प्रतिबन्ध = शर्त । सर्वस्वम् = आस्तियाँ । स्वीकृतिः = मन्जूरी । स्वत्वम् = हक । परिपृच्छा = जाँच । ऋणशोधनाशक्तः = दिवालिया । पुरःप्रस्तवनम् = सिफारिश । नियोजनम् = नौकरी । अर्घः मान वा = दर । समयः = करार । कर्मान्तम् = कारखाना । हितम् = फायदा । अभ्यर्थना, मनस्वावेदन वा = दावा । वृद्धिः = व्याज । परिकल्पनम् सज्जीकरण वा = तैयार करना । सङ्क्रमणकालीन = Transitional । प्राप्तवयस्कः = Adult । आन्ताराज्यिक = Interstate । आन्ताराष्ट्रिक = Inter National । परन्तुक = Proviso ।

संस्कृत नियतकालिकांनी सुद्धा अनेक नवीन शब्द निर्माण केले असून त्यांचा भरपूर प्रचार केलेला आहे. उदा० —

मार्तण्डयानम् = Motor । मृतरी = ( मृदि तरति इति ) = Motor । अन्तिमोत्तरम् = Ultimatum । कलाशाला, महाविद्यालयो वा = College । वाक्कीलः, विविदः वा = वकील । पारदृश्वा = Ph. D. । द्राक्तारः = डॉक्टर । माध्यमिकशाला = मिडल् स्कूल । अर्थसङ्कल्प = बजेट ।

अशा प्रकारचे शेकडों संस्कृत शब्द प्रादेशिक भाषांतल्या वृत्तपत्रांनी सुद्धा आवश्यकतेनुसार निर्माण करून प्रचारांत आणलेले आहेत. हे सर्व शब्द त्यांनी संस्कृत व्युत्पत्तीच्या आधारावर केलेले असून त्यामुळे संस्कृतच्या शब्दकोशांत बरीच भर पडलेली आहे. मात्र निरनिराळ्या प्रांतात एकाच अर्थाचे वेगवेगळे शब्द रूढ झालेले दिसतात. उदा०—

कॉलेज या अर्थी महाराष्ट्रांत 'महाविद्यालय' हा शब्द वापरण्यांत येतो, तर दक्षिणेमध्ये सर्वत्र त्याच अर्थी 'कलाशाला' हा शब्द प्रचारांत आला आहे. कल्चर (culture) या अर्थी महाराष्ट्रांत 'संस्कृति' या शब्दाचा प्रयोग होतो तर तामिळनाड मध्ये कल्चर सारखाच व अधिक चपखल असा 'कलाचार' हा शब्द रूढ झालेला आहे. अशल्या शब्दांचे संकलन करून एक अधिकृत कोश निर्माण करण्याची आवश्यकता आता निर्माण झालेली आहे. हें काम केंद्रीय शासनाच्या सहाय्यावाचून होणें अशक्य आहे.

श्री. एम्. वेंकटरमणाचार्य यांनी लिहिलेल्या 'षेक्सपियरनाटककथावली'[1]त अनेक नवनिर्मित संस्कृत शब्दांचा वापर झाला आहे. त्यामध्ये टेंपेस्ट = 'झन्झावातः' या नाटकांत वापरलेलीं पात्रांचीं संस्कृत नांवे पहा—

Old Hamlet = आह्लाद । Young Hamlet = अनुह्लाद ।
Claudius = क्लोतः । Gertrude = जरिनी ।
Aoratio = होराशयः । Marcellus = मारशीलः ।
All's well that ends well = सुखान्तं सर्वं सुखम् । या नाटकांत :—
Bertram = भरतः । Rousellon = राशिल्देशः ।
Laton = लापनः । Paris = परेशनगरी । Florence = फलारण्यपुरम् ।

ए. गोपाल अय्यंगार यांनी लिहिलेल्या यदुवृद्धसौहार्दम् या काव्याचा विषय इंग्लंडांतीलच आहे. त्यामुळे त्यामध्येहि अशामसारख्या संस्कृत शब्दांचा भरणा भरपूर प्रमाणांत झालेला आहे. त्यांपैकी कांहीं शब्द पुढीलप्रमाणे आहेत.

एडवर्ड = यदुवृद्धः । ज्यूलया = जुवे ( श्लो. ५ ) । कुबेरः = लॉर्ड । (श्लो. ९) अधिराज्यसमितिः = पार्लमेंट ( श्लो. ८ ) । वैश्रान्तिकालिकी यात्रा = हॉलिडे जर्नी । मारलीमयूर = मार्लिमोर (श्लो. २५) । बालध्वनिः = बाल्डविन (श्लो. ५७) । ज्याराज्य = जॉर्ज (श्लो. ६२) । इलासपली = एलिझाबेद (श्लो. ६४) । इंग्लो गरिष्ठः = ग्रीसस् ख्राईस्ट ( श्लो. ७० ) । दिवस्मरः = डिंसर ( श्लो. ७१ ) । राज्यकार्यसमितिः = पार्लमेन्ट. ( श्लो. ८६ ) । तमसा = थेम्स । ( श्लो. १०० )

भारतपारिजातकालीन नवीन संस्कृत शब्द—

निरर्थनी = टिकेट । ( क्रीता मयैयं हि निरर्थनी यदा ) (५-१६)
पुलीश = पोलिस. ( नूनं त्वयोग्यं पुलिशैः स मोहनः ) (५-१७)
रेलरथाधिकारी = रेल्वे ऑफीसर (ऊरुक्तिरो रेलरथाधिकारिणिः । (५-१८)

१. वाणीविलास प्रेस, हॉस्पिटल पेट, मद्रास, येथे १९३३ मध्ये मुद्रित.

तार = टेलिग्राम । रेलीययान = रेल्वे । समाचार = Information :
( कल्ले स तारेण महाप्रबन्धकम् रेलीययानस्य गमार्थमूल्लम् ।
धीमं समाचारमजीहयत् तथा नातान्त्रिकं तं यवनं धनाधिपम् ॥ ( ५-२६ )
वाष्पप्रतुदः = रेल्वे ट्रेन. ( वाष्पप्रतुदो न च गच्छति स्म ह । ) ( ५-२५ )
( फ्रास्कोटमुत्कृष्टतमं कलेवरे शीर्णे च वङ्गोपमनुल्लणौजसी । )
( श्रीभारतेन ग्रुटिशं स्वयमांधितायाः । ) ( २२-२९ )

या श्लोकांत चक्क इंग्रजी शब्दांचा वापर कवीने केला आहे. अशाप्रकारे संस्कृतांत इंग्रजी शब्दांचा वापर कांहीं संस्कृत वृत्तपत्रांनी मोठ्या प्रमाणांत केला आहे. गोलसंसद् = राऊंड टेबल कान्फरन्स. ( ता गोलसंसदुपपादितयोपगोष्ठी । मिः संस्कृता व्यवसितीर्विनिवेदनानि । २३-२५ )

इंग्रजी नांवांप्रमाणे देशी नांवांचेंहि संस्कृतीकरण क्वचित् आढळतें. उदाः--मुनदः पियारलल्ल पण्डितः परम् । निखिलाः स्वदेशहितवर्धना इमे ॥ ( २५-३४ ) ( पियारलल्ल = प्यारेलाल. )

श्री. वेंकटरमणाचार्यांनी उमादर्श नांवाच्या आपल्या अनुवादकाव्यामध्ये--

आस्येऽमरौके च्छिरोपदेशो हीराकरादेव च तथाऽपरौके ।
द्राक्षाकदम्बे सतत परीते प्रत्यन्तरीपेऽच्छरिष्टुमाख्ये ॥ ( १-३३ )

या श्लोकांत बरेच नवीन शब्द वापरलेले आहेत ते असे--

आस्य = आशिया । अमरौक = अमेरिका । इरोप = यूरोप । अपरौक = आफ्रिका । यांतील अमरौक व अपरौक या शब्दांचें समर्थन तळटीपेमध्यें पाणिनीय सूत्रांच्या आधारें केलेलें आहे. तें असें--

अमरौकः अपरौकः इत्यत्र समासान्तः नपुंसकलिङ्गः अपि ओकस्शब्दः संज्ञावाचकत्वात् अकारान्तः । पुल्लिङ्गप्रयोगः न दुष्टः । अथवा लिङ्गतत्त्वविचारे "ओक" इति अदन्तपुल्लिङ्गप्रयोगोऽपि वर्तते । यथा ओकम् । क्ली० उपरि गमथ लक्षणे के गुणः । कुत्वात् च 'ओक उच्चः के' ( पाणिनीय सूत्र ७-३-६४ । ) इति निपात्यते । इति लघुशब्दौघकल्पद्रुमः । ओकः = गृहम्, आश्रयः इति अमरटीकायां भरतादयः । "ओक उच्चः के" इति निपातनाददन्तोऽपि इत्यमरसुधा । 'ओकम् आश्रयमात्रे च मन्दिरे च नपुंसकम्' इति मेदिनी । ओकः सदाश्रयस्त्वौका. पदः क्षीरम् पयोम्बु च । ओकः अदन्तोऽप्ययम् । "ओक उच्चः के" इति निपातनात् आश्रयमात्रम् । इति गुरुबालप्रबोधिका "ओकः सत्याश्रयमात्रे स्यात्" इति हैमः ।

ग्रामोफोन व रेकॉर्ड यासारख्या इंग्रजी शब्दांचे संस्कृतपण शास्त्रदृष्ट्या सिद्ध करण्याचा प्रयत्न जयपूरचे नारायणशास्त्री काकर यानी केलेला आहे.[१] **ग्रामोफोन**= ग्रामस्य (स्वरस्य) ऊः (रक्षणं) इति ग्रामो । ग्रामः स्वे सवसथे वृन्दे शब्दादि पूर्वकः । इति विश्वः । 'रक्षणे चापि ऊकारः । ऊकारो ब्रह्मणि स्मृतः' इति एकाक्षरकोशः । ग्रामो इत्यस्य फ । (निष्फलभाषणम्) इति ग्रामोफः । "फूत्कारे च फ प्रोक्तः तथा निष्फलभाषणे ।" इति एकाक्षरकोशः । ग्रामोफम् ऊनयति । (परिजहाति नियमयति, नियन्त्रयति वा इत्यर्थः) इति ग्रामोफोनः । चौरादिकाद् ऊन परिहाणे धातोः पचाद्यच् ।

**रेकार्डम्**—रेणकं रेक = ज्ञानम् । 'रेकृ' = 'गतौ' । गतिः ज्ञानम् । रेकम् अर्दति (गच्छति, प्राप्नोति वेति) रेकार्दः । 'अर्द गतौ याचने च धातो पचाद्यच् सवर्णसन्धिः ।

गाथाकादम्बरीतील संस्कृतशब्द —

तोमसण् = थॉमसन् । (तोमसण् इति दमसूनुसमनाम्नः आङ्ग्लेय कवेः ।)
पैत्तागरस्—पायथागोरस (Pythagoras)

(पैतागरर्षि-प्रोक्त यवनाभ्याम् ।
मुखरीकरोति माम मूकमन्यथा ।।)

सर्वकलाशाला = युनिव्हर्सिटी
जॉनसन् = ज्ञानसेन । चेस्टरफील्ड = चित्रापीड ।
(Dr Johnson's letter to Lord Chestoıfield.= ज्ञानसेनस्य चित्रापीडमहोदय प्रति लेखः ।)[२]

* * *

Rurrious = रोपायणीय ।[३]
सेक्युलर स्टेट = स्वकुलारिराष्ट्रम् । (मञ्जूषा' ऑगष्ट १९५७)
उरगजिह्वः = औरङ्गजेब. (अभूदुरगजिह्वाख्य. कुलैडवेश्वरभूपते. ।
(भारतीयम् इतिवृत्त, पृ. ४९)

---

२ संस्कृत-भवितव्यम् 'विश्वपरिषद्विशेषाङ्क' (पृ. ७५) (२४-४-१९५४)

३. महालिङगशास्त्रीकृत किङ्किणीमाला, पृ. ६५ ।

४. मञ्जूषा, १९५३ डिसेंबर.

अलिकचन्द्रः = अलेक्झांडर । ( नन्दानां यवनाध्यक्षोऽलिकचन्द्रः प्रशासने ।
विजित्य पौरवं कंचित् गन्धारानजयत् बली ॥ )[5]

जरामणिरौप्य = जर्मनसिल्व्हर ।
( द्विताणक–रूप्यानि तानि जरामणिरौप्यनिर्मितानि अलंकरणानि । )[6]

गीतमञ्जूषा = फोनो । अनन्तचरितम् । = ( पृ. २० )
( नासिकापणे प्रोच्चैररौद् गीतमञ्जूषायङ्गीतम् श्रुतिसुखम् । )

गिरीग्राम = गिरगाव.

श्री. अम्बिकादत्त व्यास यांच्या शिवराजविजयम् या प्रसिद्ध पुस्तकांत पुढील संस्कृतीकृत शब्द उपयोगात आलेले आढळतात.—

अफजलखानः = अफझलखान । महामदः = महमूद ।
गजिनी = गझनी । गजिनीस्थाननिवासी महामदः । ( पृ. १९ )
अवरङ्जीवः = औरङ्गजेब । ( पृ. २२ ) मोद्गल = मोगल ।
शास्तिखान = शाहिस्तेखान । ( पृ. २२ ) तुरुष्क = तुर्क ।
गोरण्ड = इंग्रज. । पाठीन = पठान. ( पृ. २०३ )

श्री. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर यांनी लिहिलेलें 'क्रान्तियुद्धम्' हें पुस्तक १९५७ मध्ये प्रसिद्ध झालेलें आहे. त्यात त्यांनी पुढील संस्कृत शब्दांची भर टाकलेली दिसते.

आग्नेयगोलः = तोफची गोळी । आग्नेयचूर्णम् = बारुद ।
गुल्मविष्टनम् = काडतुस । गोलप्रक्षेपणी बृहन्नालः वा = तोफ ।
जर्जरम् = जरीपटका ( झेंडा ) । टोपी तातार्यः = तात्या टोपे ।
पेशवे नानार्यः = नानासाहेब पेशवे । पेशवारायः = रावसाहेब पेशवे ।
बृहन्नाल्वाहिनी = तोफखाना । लोहवाडी, लोहमुषिः वा = बन्दुक ।

अशाप्रकारे गेल्या शंभर वर्षांत ( क्वचित् त्यापूर्वीहि ) संस्कृत भाषेला अपरिचित असलेले बरेच शब्द निर्माण झालेले दिसतात. त्यामध्ये कोणताहि एकसूत्रीपणा दिसत नाही. असल्या शब्दांची भर यापुढेहि संस्कृत साहित्यात सतत पडत राहणार; कारण नवीन जगातील व्यवहारांना उपयोगी पडतील असे शब्द पूर्वीच्या कोशात किंवा साहित्यात वापरलेले आढळत नाहीत. म्हणून या नवनिर्मित शब्दांच्या संबंधात काहीतरी निश्चित नियम ठरविले जाणें अत्यंत आवश्यक झालेलें आहे.

---

५. भारतीयम् इतिवृत्त, पृ. १० ।
६. श्री. भा. वा. लाटकर शास्त्रीकृत "अनन्तचरितम्" । पृ. ५५

भिन्न संस्कृतीतील अर्थाचें संस्कृत अनुवाद करणाऱ्या आणि आधुनिक विषयावर स्वतंत्र लेखन करणाऱ्या संस्कृत लेखकाना जी नवशब्दनिर्मितीची कसरत करावी लागते ती पाहून असं वाटतें की, आधुनिक संस्कृत लेखकाना मार्गदर्शन करण्यासाठी काही नवीन नियम पंण्डितपरिषदानी करून द्यावयास हवेत. पण त्यामध्ये पाणिनीच्या शास्त्राला किंवा वैय्याकरणाना सम्मत असलेल्या त्रिमुनि-प्रामाण्याला बाधा येणार नाही अशी दक्षता घ्यावयास हवी शास्त्रप्रामाण्य झिडकारून बहुमत प्रामाण्य मानण्याची काही प्रादेशिक साहित्यिकाची प्रवृत्ति त्यानाच लखलाभ असो! त्यांच्या बहुमतप्रामाण्याने त्यांच्या भाषाचा ढहा वीस वर्षातच कसा निचरा होणार आहे याची चर्चा करण्याचें हें स्थल नव्हे. एखाद्या शास्त्रीय विषयात असलग्र अनभिज्ञाचें एकमत असलें आणि शास्त्रज्ञाला दुजोरा मिळण्या इतकाहि पाठिंबा नसला तरी सरतेशेवटीं शास्त्रज्ञाचच मत विरोधी अनभिज्ञाना शिरसावंद्य मानावें लागते याचीं हवीं तेवढीं उदाहरणे विज्ञानाच्या इतिहासात नमूद आहेत. देशकालपरिस्थितीच्या परिवर्तनाने भाषा-क्षेत्रात काही समस्या निर्माण झाल्या तर त्या सोडविण्यासाठी व्याकरणशास्त्राची कास सोडता कामा नये. संस्कृत भाषेचें अविकृत स्वरूपात आजवर ज्यानी संरक्षण केलें त्यानी आधुनिक संस्कृतज्ञापुढे भव्य दिव्य आदर्श निर्माण करून ठेवलाच आहे. अशा परिस्थितींत आधुनिक लेखकाच्या मार्गदर्शनासाठी काही नवीन नियम पण्डित परिषदानी करावयास हवेत असें आम्ही म्हणतो त नवीन संस्कृत लेखनात शास्त्रनिष्ठता असावी एवढ्याचसाठी!

या दिशेने आम्हास एक व्यापक स्वरूपाचा नियम सुचवावासा वाटतो. तो असा की, सर्व संस्कृतप्रेमी आणि प्राचीन परम्पराभिमानी लोकाना प्रमाणभूत असलेले रामायण, महाभारत, (विशेषत महाभारतान्तर्गत भगवद्गीता), श्रीमद् भागवत, मन्वादि काही स्मृतिग्रंथ रामरक्षादि लोकप्रिय स्तोत्रें, यामध्ये अपाणिनीय शब्दप्रयोग आढळतात. त्याना केवळ अपाणिनीय म्हणून नवीन लेखनात बहिष्कार्य न मानता पङ्क्तिपावन करून घेण्यात यावें उदा. श्रीमद्भगवद्गीतेंत काही परस्मैपदी धातूचे आत्मनेपदी व आत्मनेपदी धातूचे परस्मैपदी प्रयोग केलेले आहेत जसे:—

"मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्त परस्परम् ।
कथयन्तश्च मा नित्य तुष्यन्ति च रमन्ति च ॥ १०-९ ॥

येऽप्यन्यदेवता भक्ता यजन्ते श्रद्धयान्विता ।
तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ ९-२३ ॥

सतत कीर्तयन्तो मा यतन्तश्च दृढव्रता ।
नमस्यन्तश्च मा भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ ९-१४ ॥"

या श्लोकात रमन्ति, यजन्ति, यतन्तः या ठिकाणी पाणिनीय व्याकरणानुसार, रमन्ते, यजन्ते, यतमानाः हे आत्मनेपदी प्रयोग हवेत.

गीतेच्या स्तोत्रांतील सर्वसाधारण माणसाच्या तोंडी असलेल्या —

'य ब्रह्मावरुणन्द्ररुद्रमरुतस्तुन्वन्ति दिव्यैः स्तवै ।'

या श्लोकातील 'स्तुन्वन्ति' हें क्रियापद 'स्तुवन्ति' असे हवें.

रामरक्षा स्तोत्र आबालवृद्धांच्या तोंडी असते. त्यात 'सीतायाः पतये नम' या पङ्क्तींत आलेले 'पतये' हे विभक्तिरूप पाणिनीय नियमाप्रमाणे 'पत्ये' असे हवें.

श्रीमद्भागवतकारानी छन्दोदोष टाळण्यासाठी बरेच व्याकरणदोष (पाणिनीय दृष्ट्या) केले आहेत ते दोष पाहता भागवतकाराना व्याकरणदोषापेक्षा छन्दोदोष अधिक आक्षेपार्ह वाटत असावेत असें मानावें लागतें. भागवतातील अपाणिनीय रूपाचीं उदाहरणें पुढीलप्रमाणें आहेत:—

"माधावलर्के **शतधन्व**'[1]नुरन्तिदेव ।" (२-७-४४)

तस्मिन् **बिन्दुसरे**'[2]वात्सीत् भगवान् कपिल किल । (३-२९-५)

'**जानूरुमध्योर**'[3]शिरोधरासा' । (५-१२-५)

छन्दांस्यनन्तस्य शिरो गृणन्ति ।

दंष्ट्रा यम. स्नेहकला **द्विजानि**'[4] ॥ (२-१-३१)

तिर्यग्जना अपि **किमू**'[5] श्रुमधारणा ये । (२-७-४६)

धर्मोऽर्पित **करिहिचिद्**'[6] म्रियते न यत्र । (३-९-१३)

मुक्ताश्रय **यरहि**'[7] निर्विषय निरक्तम् ॥ (३-२८-३५)

निन्देत ते **तरहि**'[8] सर्वमनीपितार्थम् । (१२-८-४४)

| | | | |
|---|---|---|---|
| १ शतधनु | येथें | शतधनुस् रूप | हवें। |
| २. बिन्दुसरे | ,, | बिन्दुसरसि | ,, |
| ३ उर | ,, | उरस् | ,, |
| ४ द्विजानि | ,, | द्विजा | ,, |
| ५ किमू | ,, | किमु | ,, |
| ६ करिहिचिद् | ,, | कर्हिचिद् | ,, |
| ७. यरहि | ,, | यर्हि | ,, |
| ८. तरहि | ,, | तर्हि | ,, |

गीता–भागवतासारख्या* परमप्रमाणभूत ग्रंथातील असल्या असंख्य अपाणिनीय रूपाचा आधुनिक परिस्थितींत थोडा निराळ्या दृष्टीने विचार व्हावा असे आम्हास वाटते.

प्राचीन वैय्याकरणानी त्रिमुनिप्रामाण्याच्या नियमानुसार अनेक अपाणिनीय प्रयोगाना पक्तिपावन करून घेतले होते. उदा. 'भूतपूर्व' हे रूप, पाणिनीने आपल्या 'भूतपूर्वे च चरट्' या सूत्रात 'भूतपूर्व' असा शब्दप्रयोग केल्यामुळे मान्य झाले. 'पापे अभिनिवेश.' यात पापे या सप्तमीऐवजी 'अभिनिविशश्च' या सूत्रानुसार द्वितीया हवी. पण भगवान् पतञ्जलीने 'पापेऽभिनिविष्टानाम्' असा प्रयोग केल्यामुळे सप्तमीचा प्रयोग 'मण्डूकप्लुति' करून ग्राह्य ठरविण्यात आला.

वैयाकरणाची ही शब्दशुद्धता ठरविण्याची पद्धति स्वीकारून व प्रमाणभूत ग्रन्थाची व्याप्ति वर उल्लेखिल्याप्रमाणे वाढवून अनेक अपाणिनीय शब्दप्रयोगाना अर्वाचीन संस्कृत लेखनात मान्यता देण्यात यावी. त्यासाठी तज्ज्ञानीच विशेष नियम ठरवावेत. त्यामध्ये संस्कृत भाषेच्या कुलाबाहेरील पारिभाषिक शब्द व सर्वतोमुखी झालेले अन्यभाषीय शब्द याच्या रचनातहि मार्गदर्शन असावे म्हणजे संस्कृत भाषेची शास्त्रपूतता स्थिर राहील; नाहीतर विकृतता वाढीस लागण्याचा संभव आहे.

---

* भागवतातील अपाणिनीय प्रयोगाची भरपूर उदाहरणे, चित्राव अभिनन्दन ग्रन्थातील श्री. म. म. फके याच्या लेखात (पृ. ७२ ते ७९) पाहा.

प्रकरण २४ वे

# ग्रन्थसूची व शब्दकोश

आधुनिक कालखंडात नवीन संस्कृत साहित्याची सतत व सर्वतोमुखी निर्मिति होत असता त्यामध्ये अनुवादात्मक संस्कृत साहित्य निर्माण करून नवीन वाङ्मयोपासकांनी जशी अभिनव कामगिरी आरंभिली, त्याप्रमाणे आणखी एका नवीन प्रकाराने संस्कृतज्ञानी कामगिरी आरंभिली आहे. यामध्ये नवनिर्मितीचा भाग नाही पण त्यांच्या या कामगिरीने संस्कृत विद्येचें क्षेत्र मात्र विशाल होत आहे. ही कामगिरी म्हणजे देशभर विखुरलेल्या हस्तलिखित ग्रन्थांचें संकलन. संस्कृत हस्तलिखितांचा नाश ज्ञानद्रोही व धर्मद्रोही आक्रमकांच्या दुष्टपणामुळे फार मोठ्या प्रमाणात झाला. तरी देखील आजवर सुरक्षित असलेला हस्तलिखित ग्रन्थनिधि फार मोठा आहे. देशोदेशीच्या विद्वानांनी प्राचीन काळापासून भारतातून हस्तलिखितांच्या प्रतिलिपि करून नेल्या, त्यामुळे जगात कोणत्याहि मोठ्या ग्रन्थालयात संस्कृत हस्तलिखितांचा भरपूर संग्रह आढळतो.

विख्यात जर्मन पण्डित मॅक्समुल्लर (इ. स. १८२३ ते १९००) यांनि 'इंडिया व्हॉट कॅन इट टीच अस्' या आपल्या सुप्रसिद्ध ग्रन्थातून संस्कृत हस्तलिखितांकडे विद्वानांचें लक्ष केन्द्रित केलें. मॅक्समुल्लरच्या मतें भारत हाच एक पृथ्वीच्या पाठीवर असा देश आहे की जेथे हस्तलिखित ग्रन्थांच्या रूपाने विपुल ज्ञान साठवून ठेवलेलं आहे. मॅक्समुल्लरच्या प्रेरणेमुळे पाश्चात्य पण्डितांची दृष्टि भारतीय संस्कृत-हस्तलिखितांकडे केन्द्रित झाली.

इ. स. १७८४ मध्ये रॉयल एशियाटिक सोसायटीची स्थापना होऊन संस्कृत हस्तलिखितांचें संकलन सुरू झालें. या सोसायटीच्या द्वारा सर विल्यम जोन्स व त्यांच्या पत्नी लेडी जोन्स यांनी इ. स. १८०७ मध्ये संस्कृत ग्रन्थसंग्रहाची प्रथम सूची प्रकाशित केली. सर विल्यम जोन्स यांनी त्या काळात संस्कृत भाषेचें अध्ययन ज्या पद्धतीने केलं त्याची कहाणी मोठी मनोरंजक व स्फूर्तिप्रद आहे.

---

टीप—प्रस्तुत प्रकरणासाठी आम्ही गोळा केलेल्या माहितीमध्ये वाचस्पति गैरोला यांच्या नुकत्याच प्रकाशित झालेल्या, 'संस्कृत साहित्यका इतिहास' या ग्रंथातील माहितीमुळे काहीशी महत्त्वाची भर टाकता आली वाचस्पति गैरोला यांचे आम्ही आभारी आहोत.

इ. स. १८०७ मध्ये हेन्री टॉमस कोलब्रुक हे 'एशियाटिक सोसायटी ऑफ बेंगॉल' या संस्थेचे अध्यक्ष झाले. कोलब्रुक साहेबांनी संकलित केलेली सर्व हस्तलिखिते लंडनच्या इंडिया ऑफिसात आहेत. या कार्यासाठी त्यांनी स्वतःची फार मोठी वैयक्तिक संपत्ति सुद्धा खर्ची घातली, असें म्हणतात. या सोसायटीतर्फे १८१७ ते १८३४ या काळात प. हरिप्रसाद शास्त्री यांच्या नेतृत्वाखाली ग्रन्थसूचींचे प्रथम सात भाग तयार झाले. १९३९-४० मध्ये श्री. चिन्ताहरण चक्रवर्ती व पुढील दोन भागांचे संपादन १९४५ मध्ये श्री चन्द्रसेन गुप्त यांनी केलें.

डॉ. बूल्हर (इ. स. १८३७ ते १८९८) यांनीं पॅरीस, लंडन, ऑक्सफोर्ड इत्यादि ठिकाणीं संस्कृत हस्तलिखितांची माहिती गोळा केली. पुढे मॅक्समुल्लरच्या प्रेरणेने ते भारतात आले. मुंबई राज्यात शिक्षण खात्यातील उच्चाधिकारावर त्यांची नेमणूक होताच त्यांनी 'बॉम्बे संस्कृत सीरीज्' या ग्रंथमालेचे प्रकाशन सरकारी सहाय्याने सुरू केलें. या ग्रन्थमालेचा संस्कृत पण्डितांना फार मोठा लाभ झाला. इ. स. १८६६ मध्ये मुंबई, मद्रास व बंगाल या सरकारातर्फे संशोधनकार्याला चालना मिळाली. बूल्हर साहेब मुंबई राज्यातील संशोधन संस्थेचे अध्यक्ष झाले. त्यांनी एकूण २३०० महत्त्वाच्या हस्तलिखितांचें संशोधन केलें. तीं एल्फिन्स्टन कॉलेज, बर्लिन विश्वविद्यालय व इंडिया ऑफीस लंडन येथे सुरक्षित आहेत. गुजराथ, काठियावाड व सिंध या प्रांतातहि डॉ बूल्हर यांच्या नेतृत्वाखाली संस्कृत हस्तलिखितांचें संकलन व संशोधन झालें. १८७१ ते १८७३ या काळात मुंबईहून त्यांचें एक सूचीपत्र प्रकाशित झालें. १८७५ मध्यें संस्कृत ग्रंथांच्या संशोधनासंबंधी बूल्हर साहेबांचें एक महत्त्वपूर्ण प्रतिवृत्त प्रकाशित झाले काश्मीर, राजपुताना व मध्यभारतातील काही संस्थानांतून बूल्हर साहेबांनी संस्कृत हस्तलिखितासंबंधी इतिवृत्तें मागवून इ. स १८८७ मध्ये त्यांचें प्रकाशन करविलें. डॉ. बूल्हरच्या प्रेरणेमुळे हें कार्य अनेक विद्वानांनी हातीं घेतलें. श्री. राजेन्द्रलाल मित्र यांनी 'नोटिसिस् ऑफ संस्कृत मॅन्युस्क्रिप्टस्' या नावाचे नऊ खण्ड प्रकाशित केले. त्यांच्यापुढील दोन खण्डांचें प्रकाशन हरप्रसाद शास्त्री यांनी केले.

विंटरनिट्झने बॉडलियन लायब्ररीच्या संग्रहाची सूची करण्याचें कार्य आरंभिलें. ते डॉ. कीथने इ. स. १९०५ मध्ये तडीस नेले डॉ. कीथने डॉ. रॉन यांच्या इंडियन इन्स्टिट्यूट, (ऑक्सफर्ड) येथे सुरक्षित असलेल्या संग्रहाची सूची तयार केली, ती १९०३ मध्ये ऑक्सफर्ड येथील क्लॅरेन्डन प्रेसमध्ये मुद्रित झाली. बॉडलियन लायब्ररीच्या पालि ग्रन्थांची सूची करण्याचे कार्य फॅंकफर्टर याने इ. स. १८८२ मध्ये पूर्ण केलें.

डॉ. वेबर (इ. स. १८२५ ते १९०१) यांनी बर्लीनच्या राजकीय पुस्तकालयांत असलेल्या संस्कृत हस्तलिखितांची एक मोठी सूची तयार केली व डॉ. बूल्हरकडून बर्लीन पुस्तकालयाकडे आलेल्या ५०० जैन हस्तलिखितांचा अभ्यास करून जैन साहित्यावर मोठा प्रकाश टाकला.

इ. स. १८६९ मध्ये केंब्रिजच्या ट्रिनिटी कॉलेजांतील संग्रहाची सूची ऑफ्रेट या विद्वानाने तयार केली. १८७० मध्ये 'जेम्स डी अलीज्' याने कोलम्बो मध्ये भारतीय संस्कृत ग्रन्थांची उत्तम सूची प्रकाशित केली. १८७० मध्ये एन्. सी. बर्नेल याने लंडनच्या इंडिया ऑफिसांतील संस्कृत ग्रन्थांच्या सूचीचें संपादन व प्रकाशन केलें. १८८० मध्ये "ए क्लासीफाईड इंडेक्स टु दि संस्कृत मॅन्युस्क्रिप्टस् इन द पॅलेस ऑफ् तंजोर" हा खण्ड बर्नेलने लंडन येथे छापला. ज्यूलीयस एग्लिंग याने इ. स. १८८७ व १८९६ मध्ये लंडन येथे दोन सूची प्रकाशित केल्या. १९३५ मध्ये कीथ आणि थोमस यांची सूची व शेवटीं १९४२ मध्ये ओरडेनबर्गची सूची लंडनहून प्रकाशित झाली. लंडनच्या इंडिया ऑफिसांत आजहि हें कार्य चालू आहे.

१८८३ मध्ये जोसिल बेंडाल व राइस डेव्हिडस् यांनी केम्ब्रिज युनिव्हर्सिटी लायब्ररीच्या संस्कृत व पाली ग्रन्थांच्या सूची प्रकाशित केल्या.

इ. स. १८७४ मध्ये मध्यभारतांतील संस्कृत ग्रन्थांची सूची प्रकाशित करण्याचें कार्य एफ्. कीलहॉर्न यांनी केलें. १८७७-७८ मध्ये सरकारने विकत घेतलेल्या हस्तलिखितांची सूची कीलहॉर्नने तयार केली.

इ. स. १८८० ते ८१ मध्ये श्री. काशीनाथ कुंटे यांनी मुंबई राज्यांतील हस्तलिखितांची प्रचण्ड सूची तयार केली होती. तिचें प्रकाशन इ. स. १८८१ मध्ये कीलहॉर्नने करविलें. बूल्हर व कीलहॉर्न यांच्या नंतर पीटर्सनने १८८३ व १८९८ या काळांत सहा खण्ड प्रकाशित करून हस्तलिखितांवर अधिक प्रकाश टाकला. या व्यतिरिक्त पीटर्सनने इ. स. १८९२ मध्ये अल्वर महाराजांच्या संग्रहाची सूची तयार केली. पीटर्सननंतर मुंबई राज्यांत डॉ. रामकृष्ण गोपाळ भाण्डारकर यांनी तें कार्य हातांत घेतलें. त्यांचें यासंबंधीचें प्रतिवृत्त इ. स. १८९७ मध्ये मुंबईहून प्रकाशित झालें. १९१६ ते १९३९ या काळांत डॉ. भांडारकर यानी ओरिएन्टल लायब्ररी पुणे, येथील हस्तलिखितांच्या सात सूची प्रकाशित केल्या. श्री. ह. दा. वेलणकर यांनी तयार केलेल्या मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या शाखेतील संग्रहाच्या सूची १९२६, २८ व ३० मध्ये प्रकाशित झाल्या.

इ. स. १८८० मध्ये बर्नेलने तंजावरच्या सरस्वती महालातील हस्तलिखितांची सूची प्रकाशित केल्यानंतर ते कार्य पी पी. एस्. शास्त्री यांनी हातीं घेतले व १९ खण्डामध्ये प्रचण्ड सूची तयार केली. आज तंजावरच्या सरस्वती महालात २५००० संस्कृत हस्तलिखितें सुरक्षित आहेत.

दक्षिण भारतात व्यक्तिगत संग्रहाची सूची करण्याचे कार्य गुस्ताव ओपर्ट यांनी सुरू केलें इ. स १८८० व ८५ मध्ये गुस्तावचे दोन खण्ड प्रकाशित झाले. म्हैसूर व कुर्ग येथील ग्रन्थाच्या सूची करण्याचे कार्य ल्यूईस् राईस यांनी केलें. १८८४ मध्ये त्याची सूची बंगलोरहून प्रकाशित झाली. मद्रास सरकारच्या ओरिएंटल मॅन्युस्क्रिप्ट लायब्ररीतर्फे १८९३ मध्ये प्रथम सूची प्रकाशित झाली. त्यापुढे तें कार्य शेषगिरी शास्त्री व ए. शंकरन्. इत्यादि विद्वानांच्या नेतृत्वाखाली चालू होतें. आजपर्यंत या लायब्ररीतर्फे २९ खण्ड प्रकाशित झाले आहेत.

अड्यार येथे थिऑसफीकल् सोसायटी या जागतिक संघटनेचे केन्द्र असून या केन्द्राचा फार मोठा संस्कृत हस्तलिखित संग्रह आहे. इ. स. १९२६ मध्ये 'ए कॅटलॉग ऑफ दि संस्कृत मॅन्युस्क्रिप्ट्स्' या नावाचा एक खण्ड अड्यार लायब्ररीने प्रकाशित केला. १९२८ मध्ये दुसरा खण्ड प्रकाशित झाल्यावर डॉ. सी. कुन्हन् राजा यांच्या मार्गदर्शनाखाली के माधवकृष्ण शर्मा यांनी १९४२ मध्ये वैदिक भागाची व १९४७ मध्ये प. व्ही. कृष्णम्माचार्य यांनी व्याकरण भागाची सूची तयार केली. हल्डज यांने दक्षिण भारतातील हस्तलिखितांच्या सूची १८९६ व १९०५ मध्ये प्रकाशित केल्या.

इ स. १८९५ ते १९०६ या काळात कलकत्ता संस्कृत लायब्ररीच्या हस्तलिखितांची सूची प. हृषीकेशशास्त्री व शिवचन्द्र गुई यांनी तयार केली. कलकत्ता विश्वविद्यालया तर्फे इ. स. १९३० मध्ये 'आसामीज् मॅन्युस्क्रिप्ट' नावाने २ सूची खण्ड प्रकाशित झाले त्यात संस्कृत हस्तलिखितांचा भरपूर उल्लेख आहे.

रायबहादुर हीरालाल शास्त्री यांनी मध्यप्रदेश वऱ्हाडमधील हस्तलिखिताचे इतिवृत्त तयार केलें होतें. ते इ. स. १९२६ मध्ये नागपुरात प्रकाशित झाले.

वाराणसीच्या सरस्वतीभवन पुस्तकाल्यात सराधरी सव्वालक्ष हस्तलिखितांचा संग्रह आहे. त्यांपैकी १६०० ग्रन्थाच्या सूची इ. स. १९५३ ते १९५८ या काळात आठ खण्डात प्रकाशित झाल्या आहेत.

## संस्थानातील हस्तलिखितें

भारतातील जुनी संस्थानें हस्तलिखितांची मोठी भाण्डागारे होती. बहुतेक मनुस संस्थानानी हस्तलिखित संग्रहालये आपल्या राज्यात ठेवली होती. त्यांपैकी

तंजावरच्या विख्यात सरस्वती महाल या पुस्तकालयाचा उल्लेख पूर्वीच्या प्रकरणांतून व प्रस्तुत प्रकरणातहि आला आहे. म्हैसूर व कुर्ग संस्थानांतील लेवीज राईस यांच्या सूचीचा व अल्वार संस्थानच्या पीटर्सनकृत सूचीचा निर्देश वर केलेलाच आहे. त्याच्या व्यतिरिक्त जम्मू-काश्मीरच्या रघुनाथ मन्दिर ग्रंथालयांतील हस्तलिखितांची सूची डॉ. स्टीनने तयार केली; ती इ. स. १८९४ मध्ये मुंबईत प्रकाशित झाली. डॉ. स्टीनने राजतरङ्गिणीच्या प्राचीनतम प्रतीचा शोध करतांना काश्मीरांतील कांही महत्त्वपूर्ण ग्रंथांचा संग्रह केला. तो सध्या ऑक्सफर्डच्या इंडियन इन्स्टिट्यूटमध्ये आहे. जम्मू काश्मीर नरेशाच्या पुस्तकालयाची एक सूची प. रामचन्द्र काक व हरभट्टशास्त्री यांनी तयार केली. ती इ. स. १९२७ मध्ये पुण्यांत प्रकाशित झाली.

राजस्थान व मध्यभारतांतील ग्रन्थांचे प्रतिवृत्त श्री. श्री. रा. भाण्डारकरांनी तयार केले; ते इ.स. १९०७ मध्ये मुंबईत प्रकाशित झाले. शिंधिया भवन आरा, येथील संग्रहाची सूची इ. स. १९१९ मध्ये प्रकाशित झाली. मद्रास संट्रल लायब्ररींतील ग्रन्थांची सूची जी. के. गोडेकर व के. एस्. रामस्वामीशास्त्री यानी तयार केली; ती इ. स. १९२५ मध्ये गायकवाड ओरिएण्टल सीरीज्तर्फे प्रकाशित झाली. मिथिलेच्या हस्तलिखितांची सूची डॉ. काशीप्रसाद जायस्वाल व ए. बॅनर्जी यानी तयार केली. ती चार खण्डांत इ. स. १९२७ ते ४० च्या कालखण्डांत बिहार-उडीसा रीसर्च सोसायटीने प्रकाशित केली. उज्जयिनीच्या ओरिएण्टल मॅन्युस्क्रिप्ट लायब्ररीतर्फे इ. स. १९३६ व १९४१ मध्ये दोन सूची प्रकाशित झाल्या. पाटण येथील जैन ताडपत्राची सूची करण्याचे कार्य श्री. सी. डी. दलाल यांनी आरंभिले; ते एल्. बी. गान्धी यानी पूर्ण केले. इ. स. १९३७ मध्ये गायकवाड ओरिएण्टल सिरीज्ने बडोद्यांत या सूचीचे प्रकाशन केले. बडोद्याच्या ओरिएंटल इन्स्टिट्यूटची एक सूची इ. स. १९४२ मध्ये प्रकाशित झाली. इ. स. १९४७ मध्ये बीकानेर संस्कृत लायब्ररीच्या संग्रहाची एक सूची प्रकाशित झाली. याव्यतिरिक्त जयसल्मीर संस्थानच्या ग्रन्थभाण्डाराची सूची (गायकवाड ओरिएंटल सीरीज्तर्फे) व त्रिवेंद्रमच्या सरकारी पुस्तकालयाची सूची (आठ भागांत) प्रकाशित झाली आहे.

## कॅटेलॉगस कॅटेलागोरम्

१९ व्या शतकापर्यंत भारतांत जितक्या हस्तलिखिताच्या विविध सूचि तयार झाल्या त्या सर्वांची गुणयुक्त व एकत्र सूची तयार करण्याचे महान कार्य डॉ. ऑफ्रेट यांनी प्रथम केले. ही आपली बृहत् सूची शक्य तोवर परिपूर्ण करण्यासाठी डॉ. ऑफ्रेट यांनी स्वतंत्र स्वतःची हस्तलिखिते शब्द व महानिर्देशांक संग्रह हाताळले. आपली ही एकत्र सूची 'कॅटेलॉगस कॅटेलोगोरम्' या नांवाने डॉ. ऑफ्रेट यांनी तीन

खण्डात इ. स. १८९१, १८९६ व १९०३ या वर्षी क्रमशः लिप्झिग् येथे प्रकाशित केली.

डॉ. आफ्रेच्या सूचीची सुधारून वाढविलेली आवृत्ति तयार करण्याचें काम इ. स. १९३५ पासून मद्रास विश्वविद्यालयानें हातीं घेतलें असून डॉ. कुन्हन् राजा व डॉ. वे. राघवन् यांच्या संपादकत्वाखाली 'न्यू कॅटेलॉगस कॅटेलॉगोरम्' हा प्रचण्ड सूचीखण्ड तयार होत आहे. मद्रास युनिव्हर्सिटीच्या संस्कृत सीरीज तर्फे इ. स. १९४९ मध्ये त्याचा प्रथम खण्ड प्रकाशित झाला आहे. या खण्डात केवळ अकारादि नावाच्या हस्तलिखिताचा समावेश झाला आहे. यावरून या कार्याच्या व्यापाची कल्पना येईल

हस्तलिखिताची सूची करण्याचे कार्य सर्वथा आधुनिक आहे. प्राचीन काळापासून राजे, महाराजे, मठाधिपति, महंत, शास्त्री, पण्डित यांनीं असंख्य हस्तलिखितें देशभर संगृहीत केलीं, पण त्या सर्वांची सूत्रबद्ध नोंद करण्याचा व्यापक प्रयास त्यांना करता आला नाही. त्यामागे औदासी यापेक्षा अशक्यतेचा भाग अधिक आहे. या हस्तलिखिताच्या विविध व बृहत्तर सूचींनीं संस्कृत वाङ्मयमहोदधीचा अनवलोकित भाग किती अफाट आहे याची कल्पना येऊन मन थक्क होतं. आजवर संस्कृत साहित्याचें पर्यालोचन करणाऱ्यांनी उपेक्षिलेले किंवा न उल्लेखिलेलें प्राचीन वाङ्मय किती मोठें आहे याचीहि या सूचीवरून कल्पना येते. आम्ही प्रस्तुत ग्रन्थात ज्या कालखण्डातील साहित्याचा संक्षेपतः परिचय देण्याचा प्रयत्न केला आहे तें प्रायः मुद्रित आहे. या कालखण्डातील अमुद्रित ग्रन्थांची स्वतंत्र सूची व तीहि विषयानुक्रमानें तयार करण्याचें कार्य एखाद्या संस्कृतनिष्ठ संस्थेनें हातीं घेणें नितान्त आवश्यक आहे. कोणत्याहि एकाकी कार्यकर्त्याकडून तें होणें सर्वथा अशक्य आहे.

हस्तलिखिताची सूची तयार करणाऱ्या बहुतेक प्रमुख संस्थांचा व विद्वानांचा उल्लेख वर आलाच आहे. त्याव्यतिरिक्त ज्या आणखी काही विद्वानांनी हें कार्य केलें असून त्यांचा निर्देश न करणं अयोग्य होईल. त्यांचीं नावें पुढीलप्रमाणे आहेत एग्. जॅकोबी, व्हीं. फासबोल, जॉन्. डी. मॅन्सफील्ड, पॅट्रीक लेवीज् या पाश्चात्य पण्डिताच्या तोडीचे भारतीय विद्वान म्हणजे म. म. गौरीशंकर, हीराचंद ओझा, प. देवीप्रसाद, डॉ. श्यामसुन्दरदास, डॉ. पीताम्बरदत्त, डॉ. प्रबोधचन्द्र, मुनि जिनविजय, रामशास्त्री, बागची, डॉ. रघुवीर, आचार्य विश्वबन्धुशास्त्री, डॉ. धर्मेंद्र ब्रह्मचारी, प. राधाकृष्ण, एच्. आर्. रंगस्वामी अय्यंगार, के. भुजबली शास्त्री इत्यादि.

## संस्कृत शब्दकोश

हस्तलिखित बृहत्सूचीप्रमाणेच आधुनिक काळात संस्कृत शब्दकोश निर्माण करण्याच्या कार्याला विशेष चालना मिळाली आहे. अमरकोश हा प्राचीन शब्द

कोशांपैकी सर्वांत अधिक मान्य कोश. इ. स. च्या सहाव्या शतकापूर्वी या कोशाचा चिनी अनुवाद देखील झाला होता. आजपर्यंत या कोशावर पन्नासपेक्षा अधिक टीकाहि लिहिण्यांत आल्या आहेत. इ. स. च्या अकराव्या शतकांत लिहिण्यांत आलेली क्षीरस्वामीभट्टाची टीका व सतराव्या शतकांतील भानूजीभट्टाची 'रामाश्रमी' या अमरकोशावरील टीका सर्वमान्य आहेत.

## अमरकोशानंतरचे कांही प्रमुखकोश

| कोश | लेखक | | काळ |
|---|---|---|---|
| त्रिकाण्डशेष (अर्थात् हारावली) | —श्री. पुरुषोत्तम देव | . . | ७ वें शतक |
| धनंजयनिघण्टुः (नाममाला) व अनेकार्थनाममाला | धनंजय —(जैनाचार्य) | . . | ९ वे शतक |
| अभिधानरत्नमाला | —हलायुध | . . | १० वें शतक |
| वैजयन्ती | —यादवप्रकाश | . . | ११ वें शतक |
| शब्दकल्पद्रुमः | —केशवस्वामी | . . | १२ वें शतक |
| विश्वप्रकाशः | —महेश्वर | . . | १२ वें शतक |
| नानार्थरत्नमाला | —अभयपाल | . . | १२ वें शतक |
| अभिधानचिन्तामणिः | —हेमचन्द्र | . . | १२ वें शतक |
| नानार्थरत्नमाला | —इरुगप्प दण्डाधिनाथ | . | १४ वें शतक |
| शब्दचन्द्रिका व शब्दरत्नाकरः | —वामनभट्ट | . . | १५ वें शतक |
| सुन्दरप्रकाशशब्दार्णव | —पद्मसुन्दर | . | १६ वें शतक |
| कल्पद्रुम | —केशवदैवज्ञ | . . | १७ वें शतक |
| नामसंग्रहमाला | —अप्पय्य दीक्षित | . | १७ वें शतक |

या कोशांमध्ये संस्कृत शब्दांचे भाषांतरीय पर्याय दिलेले नाहीत. याचे कारण केवळ संस्कृत शब्दांचे स्पष्टीकरण करणे हेच या कोशांचे उद्दिष्ट होते. अन्य भाषेशी संस्कृतचा संबंध जोडणारा पहिला उल्लेखनीय कोश म्हणजे कर्णपूरकृत संस्कृत-पारसिकप्रकाशः हा होय. यानंतर अन्य भाषांशी संबंधित असलेले अनेक संस्कृत शब्दकोश निर्माण झाले, याचे कारण त्यांची आवश्यकता विशेष प्रमाणात वाटूं लागली. या प्रकारच्या संस्कृत कोशांचा थोडक्यात निर्देश पुढीलप्रमाणे आहे.

| कोश | लेखक | मुद्रणस्थान व वर्ष |
|---|---|---|
| डिक्शनरी ऑफ बेंगाली ॲण्ड संस्कृत | ग्रेव्ज हाग्टन | लंडन, इ. स. १८३३ |
| संस्कृत-इंग्लीश डिक्शनरी | बेनफे | लंडन इ. स. १८६६ |
| संस्कृत ॲण्ड इंग्लिश डिक्शनरी | रामजसन. | लंडन, १८७० इ |
| प्रॅक्टिकल संस्कृत डिक्शनरी | आनन्दराम बरुआ. | कलकत्ता, १८७७ |
| संस्कृत-इंग्लिश डिक्शनरी | केपलर. | ट्रान्सबर्ग, १८९१ |
| संस्कृत-इंग्लिश डिक्शनरी* | मोनिअर विल्यम्स. | ऑक्सफोर्ड, १८९९ |
| सरस्वतीकोश | जीवराम उपाध्याय. | मुरादाबाद, १९१२ |
| स्टुडण्टस इंग्लिश संस्कृत डिक्श. | वा. शि. आपटे. | मुंबई, १९१५ |
| संस्कृत-हिन्दी कोश | द्वारिकाप्रसाद चतुर्वेदी. | लखनऊ, १९१७ |
| प्रॅक्टिकल संस्कृत-इंग्लिश डिक्शनरी$ | वामन शिवराम आपटे. | मुंबई, १९२४ |
| संस्कृत-हिन्दी कोश | विश्वम्भरनाथ शर्मा. | मुरादाबाद, १९२४ |
| प्रॅक्टिकल संस्कृत डिक्शनरी | मॅक्डोनेल. | लंडन, १९२४ |
| पद्मचन्द्रकोश | गणेशदत्त शास्त्री. | लाहोर, १९२५ |
| संस्कृत-गुजराथी शब्दादर्श | गिरिजाशंकर मेहता. | अहमदाबाद, १९२४ |
| संस्कृत-इंग्लिश डिक्शनरी | विद्याधर वामन भिडे. | पुणे, १९२६. |

सार्थवेदाङ्गनिघण्टु—(वैदिक मराठी कोश)—प शिवरामशास्त्री शिंत्रे, (मुंबई)
श्री. शिंत्रे शास्त्री यांनी 'श्रीभारतीशतकम्' हें काव्य लिहिलें आहे. (प्राप्तिस्थान-मुंबई, न्यू सरस्वती बुक डेपो, ठाकुरद्वार, मुंबई.)

| | | |
|---|---|---|
| आधुनिक संस्कृत-हिन्दी कोश | —फणीश्वर भट्ट, | आग्रा, १९५५ |
| संस्कृतशब्दार्थकौस्तुभ | —द्वारिकाप्रसाद शर्मा व तारिणीश झा | प्रयाग, १९५७ |
| आदर्श हिंदी-संस्कृत कोश | —रामस्वरूपशास्त्री, | वाराणसी, १९३६. |

* या कोशाच्या सुधारलेल्या आवृत्त्या १९५६ मध्ये दिल्ली व १९५७ मध्ये लखनऊ येथून प्रकाशित झाल्या

$ श्री आपटे यांच्या प्रस्तुत कोशाची सुधारून वाढविलेली आवृत्ति तयार करण्याचे कार्य प्रसाद प्रकाशन, पुणे या संस्थेने १९५९ मध्ये पूर्ण केले इ. स १९५७ मध्ये प्रथम व १९५८ मध्ये द्वितीय खण्डाचे प्रकाशन झाले यांच्या संपादक मंडळात विख्यात संशोधक पी के गोडे व श्री चि. ग. कर्वे हे प्रमुख संपादक होते सहायक संपादक म्हणून श्री ये द्वी अम्यंकर, एम्. डी साठे, डॉ व ग राहुरकर व डी जी पाध्ये यांनी काम केले

संस्कृत मराठी कोशामध्ये पहिला कोश इ. स. १८५३ मध्ये श्री. अनंतशास्त्री तळेकर यानी तयार केला. त्यामध्ये बहुतेक सर्व शब्द अमरकोशातून घेतलें असून ते वर्णानुक्रमाने संकलित केले आहेत. "आबालवृद्धास अमरकोशाचा अर्थ सुबोध होऊन, जो पाहिजे तो शब्द झटकन मिळावा या दृष्टीने आपण हा कोश तयार केला." असें लेखकाने प्रस्तावनेंत सांगितलें आहे.

दुसरा संस्कृत–मराठी कोश म्हणजे माधव चन्द्रोबाचा 'शब्दरत्नाकर'. सतत नऊ वर्षे परिश्रम करून इ. स. १८७० मध्ये त्यानी तो प्रकाशित केला. त्याची पृष्ठसंख्या ७०० असून शब्दसंग्रहहि मोठा आहे. या कोशात वनस्पति व वैद्यक या विषयींचे शब्द व अवांतर माहिती वरीच आहे.

नारो अप्पाजी गोडबोले व गोपाळ शिवाजी केळकर यानी एक संस्कृत–मराठी कोश तयार करण्याचा प्रयत्न केला. पण त्यात नवनीतातील जुन्या मराठी शब्दांचेहि पर्याय दिले आहेत. त्यानंतर श्री. वासुदेव गोविंद आपटे यानी एक लहानसा संस्कृत–मराठी कोश तयार केला. पूर्वीच्या कोशातील दोष लक्षात घेऊन अधिक उपयुक्त व कोटेकोर संस्कृत कोश करण्याचे कार्य श्री. जनार्दन विनायक ओक यानी गीर्वाणलघुकोश तयार करून केले. इ. स. १९१८ मध्ये गीर्वाण लघुकोशाची प्रथम आवृत्ति प्रकाशित झाली. त्यानंतर इ. स. १९५५ मध्ये दुसरी आवृत्ति प्रकाशित झाली, पण तिच्यात अनेक दोष राहिल्याने ती सर्व आवृत्ति रद्द करून इ. स. १९६० मध्ये नवीन आवृत्ति तिसरी आवृत्ति म्हणून प्रकाशित करण्यात आली.

नागपूरचे श्री. सदाशिव नारायण कुळकर्णी यानी आजवर प्रकाशित झालेल्या अनेक कोशाहून निराळ्या स्वरूपाचा कोश* इ. १९५१ मध्ये प्रकाशित केला. हा 'व्यवहारकोश' तयार करताना त्यानी आधुनिक समाजाच्या नित्य उपयोगात येणाऱ्या शब्दांची व्याप्ति लक्षात घेऊन शब्दांचे वर्गीकरण अमरकोशाप्रमाणे निरनिराळ्या वर्गांत केलेले आहे. कोशाच्या पहिल्या भागात हिंदी-संस्कृत मराठी इंग्रजी अशा चार भाषांतील पर्यायशब्द संकलित केले आहेत. उदाहरणार्थ वनस्पति वर्गातील वृक्षवर्ग पहा —

| | | | |
|---|---|---|---|
| आम – | आम्र, रसाल, सहकार, चूत | –आंबा | – Mango. |
| कल्मी आम – | राजाम्र | कल्मी आंबा | –Grafted Mango. |
| जामुन – | जम्बु, जम्बू, जम्बुल | –जांभूळ | –Jambu, Jamboo |
| बेर – | बदर, रिरी, रिका, | –बोर | – Berrytree. |
| लसोडा – | श्लेष्मातक | –भोकर | – Gumberry. |

* व्यवहारकोश: (दिव्वकपम, नागपूर २ येथे मुद्रित, मूल्य ९ रु.)

अशा पद्धतीने शब्द संकलित केले आहेत. आपल्या इंग्रजी प्रस्तावनेंत शब्दाचे वर्गीकरण वर्गशः करण्याचें महत्त्व व उपयुक्तता श्री. कुळकर्णी यानी पुढील शब्दात सांगितली आहे. तशी अशी, ' The alphabetical arrangement is decidedly timesaving, provided we know the word for the idea and then the dictionary helps to make the meaning clearer or more exact. If one does not know or remember the word for the idea lurking in one's mind the best dictionary in the world is useless to lead one to the word. .. . . .... The topic or group-arrangement helps one to locate the word from the idea in one's mind, though a little time may be expended in finding out the group in which the word wanted for the idea occurs, but when once the word is traced a whole mine of words in which one is interested is struck flooding one with ideas that may perhaps not occur to one (पृ. ३२)

व्यवहारकोशाच्या दुसऱ्या भागात आधुनिक व्यवहारात नित्य उपयोगात येणाऱ्या इंग्रजी शब्दाचे संस्कृत पर्याय दिलेले आहेत प्रस्तुत कोशाचा हाच भाग विशेष महत्त्वाचा आहे यातील अनेक संस्कृत शब्द जुन्या शब्दकोशात दिसत नाहीत. ते स्वत कोशकाराने अपरिचित पण अर्थगर्भ संस्कृत धातूपासून साधलेले आहेत. उदाहरणार्थ—

Engine — गत्र, बत्र (बद् १ प. गती) (पृ. २११)
Mobil oil — वगन-(वग् १ प.) (पृ. ३११)
Bolt — नर' (नृ. ९ प. नये) (पृ ३१६)
Exercise book — वही (वह् उ प्रापणे) (पृ ३२२)
Auction — निलाव (नि+लू ९ छेदने)

पहिल्या भागातहि अपरिचित संस्कृत धातूपासून तयार केलेले किंवा व्यवहारात रूढ असलेले पण मुळात अपरिचित संस्कृत धातूपासून उत्पन्न झालेले असे अनेक शब्द व्यवहारकोशात आढळतात. उदा०

घट्टा (घट् १० उ. हिंसाया) (पृ. २४९)
गुंड (Ruffian) (गुड् १ प. चूर्णने) (पृ २४८)
पक्कु' (पाड्) (पक्क् १० उ. व्यपने) (पृ २५८)

स्वस्त ( Cheap ) ( सु+अस् ४ प. क्षेपणे+क्त ) (पृ. २५९)
दर: ( Rate ) ( दृ. ९ प. विदारणे ) इत्यादि.

आजच्या काळात औद्योगिक, राजकीय, यांत्रिक, व्यवहारात असंख्य इंग्रजी शब्द जसेच्या तसे सर्व भाषांत वापरण्यांत येतात, त्यांचे प्रादेशिक पर्याय शब्दहि क्वचित् रूढ झालेले आहेत. हिंदीला इंग्रजी भाषेचें स्थान देण्याच्या अपेक्षेने हिंदीतील अचूक पर्याय वृत्तपत्रादींच्या द्वारा प्रचलित करण्यात येत आहेत. त्या सर्वांमध्ये एकात्मता राखण्यासाठी सर्व भाषांना समान असलेल्या संस्कृत भाषेच्या व्युत्पत्तिप्रक्रियेची कास धरणें सर्व दृष्टींनी उचित होईल. श्री. कुळकर्णी यांनी आपल्या व्यवहारकोशाच्या द्वारा या दृष्टीने फारच मोलाचें मार्गदर्शन केलें आहे. त्यांनी दुसऱ्या भागात दिलेले अनेक संस्कृत शब्द स्वभाषेचा अभिमान बाळगणारांनी आत्मसात् करण्यासारखे आहेत.

## डॉ. रघुवीर यांचे कार्य

आधुनिक संस्कृत कोशकारांमध्ये डॉ. रघुवीर यांचें कार्य फार मौलिक स्वरूपाचें आहे. निरनिराळ्या संस्कृत कोशांतील व काव्यनाटकादि विविध ग्रन्थांतील शब्दांची अकारविल्हाने व्यवस्था लावून त्यांचे इंग्रजी, हिंदी, मराठी इत्यादि वेगवेगळ्या भाषांतील पर्यायशब्द देण्याचें किंवा श्री. वामन शिवराम आपटे यांनी आपल्या सुप्रसिद्ध इंग्लिश-संस्कृत डिक्शनरींत जसे इंग्रजी शब्दांचे संस्कृत पर्याय दिले तसे निरनिराळ्या प्रादेशिक भाषांतील शब्दांचे संस्कृत पर्याय देण्याचें कार्य काही कोशकारांनी केलें आहे पण डॉ. रघुवीर यांनी निरनिराळ्या भौतिक व सामाजिक शास्त्रांचा अर्वाचीन काळात अत्यंत झपाट्याने विकास झाल्यामुळे जे असंख्य पारिभाषिक शब्द पाश्चात्य भाषांत निर्माण झाले त्यांना भारतीय पर्यायशब्द नसल्याने भारताच्या भाषिक क्षेत्रात जी समस्या निर्माण झाली ती सोडविण्यासाठी संस्कृत भाषेची नवशब्दप्रसवशक्ति व तिचें अखिल भारतीय भाषांशीं असलेले जिव्हाळ्याचे नातं लक्षात घेऊन, सर्व अर्वाचीन पाश्चात्य शास्त्रांतील पारिभाषिक शब्दांचा बृहत्कोश करण्याचें कार्य अंगावर घेतलें. त्यासाठी त्यांनी स्वतः अनेक भाषांचा सखोल अभ्यास केला. जगातल्या निरनिराळ्या राष्ट्रांनीहि (विशेषतः चीनरूस) नवीन उत्पन्न झालेल्या पारिभाषिक शब्दांनी आपल्या भाषेतील समस्या दूर करण्यासाठी जे काही कोश तयार केले, त्यांचाहि त्यांनी तौलनिक व मूलग्राही पद्धतीने अभ्यास केला. वीस-पंचवीस वर्षे अशा स्वरूपाचा सतत परिश्रम करून डॉ. रघुवीरांनी आंग्लभारतीय महाकोश हा नवीन पारिभाषिक शब्दकोश निर्माण केला. त्या कामी त्यांना आवश्यक तें शासनसाहाय्य मिळालें. या कोशातील पारिभाषिक शब्द कोणत्याहि दृष्या सदस्यांकोशांत आढळत नाहीत. तथापि ते सर्व

संस्कृत धातूंपासूनच साधलेले असल्याने तत्वतः संस्कृतच आहेत. सर्व प्रादेशिक भाषांमध्ये या शब्दांचा वापर व्हावा व उठल्यासुटल्या पदोपदी सुशिक्षितांच्या लेखन भाषणांत येणाऱ्या परकीय शब्दांचे उच्चाटन व्हावे अशी डॉ. रघुवीर यांची अपेक्षा आहे. ती केव्हा व कशी फलद्रूप होईल तें सांगणें कठीण आहे. तथापि त्यांच्या या कोशानें संस्कृतची शब्दसंपदा निश्चित भरपूर प्रमाणांत वाढली आहे.*

## अवान्तर कोश

या विविध शब्दार्थ कोशाव्यतिरिक्त विविध शास्त्रीय कोष अर्वाचीन काळांत निर्माण झाले हे कोश म्हणजे त्या विशिष्ट शास्त्रांचे ज्ञानकोशच होत. त्यापैकी विशेष उल्लेखनीय कोश पुढील प्रमाणे आहेत

| कोष | कर्ता |
|---|---|
| धातुरूपचन्द्रिका – | व्ही. व्ही. उपाध्याय |
| धातुरत्नाकरः ( आठ भाग ) – | |
| अष्टाध्यायी शब्दानुक्रमणिका – | म. म. श्रीधरशास्त्री पाठक |
| महाभाष्यशब्दानुक्रमणिका – | ,, |
| संस्कृत धातुरूपकोशः – | कृ. भा. वीरकर |
| संस्कृतशब्दरूपकोशः – | ,, |
| विद्वत्तार्णवतरंगिकोशः – | |
| न्यायकोशः – | भीमाचार्य झळकीकर |
| मीमांसाकोशः ( चार भाग ) – | केवलानन्दसरस्वती ( मूल्य १३५ रु. ) |
| निघण्टुमणिमाला अर्थात् वैदिककोषः – | पं. मधुसूदन विद्यावाचस्पति |
| गो-ज्ञानकोष (गोविषयक वेदमंत्रांचा कोष)– | पं. श्री. दा. सातवळेकर |
| ऐतरेय ब्राह्मण आरण्यक कोश – | केवलानन्दसरस्वती |
| कौशीतकी ब्राह्मण-आरण्यक विषय कोष – | |
| वैदिक कोष (ब्राह्मण वाक्यांचा संग्रह ) – | हंसराज |
| सामवेदपदानाम् अकरादिवर्णानुक्रमणिका – | स्वामी विश्वेश्वरानन्द व स्वामी नित्यानंद |
| धर्मकोशः (व्यवहारकाण्डम् ) (३ भाग)– | तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी |
| धर्मकोशः। (उपनिषत्काण्डम् ) (चार भाग) – | ,, |

*डॉ रघुवीर यांनी तयार केलेले बाकी पारिभाषिक शब्दकोश पुढील प्रमाणे आहेतः—(१) अर्थशास्त्रशब्दकोश, (२) आंग्लभारतीय पक्षिनामावली, (३) आङ्ग्लभारतीय प्रशासनशब्दकोश, (४) खनिज अभिज्ञान, (५) तर्कशास्त्रपारिभाषिक शब्दावली, (६) वाणिज्य शब्दकोश, (७) सांख्यिकी शब्दकोश, इत्यादि.

स्मृतितत्त्वम् ( २८ स्मृतींचा संग्रह ) – रघुनन्दन भट्टाचार्य
स्मृतीनां समुच्चयः (२७ स्मृतींचा संग्रह) –
बृहत्स्तोत्ररत्नाकर (५०० स्तोत्रांचा संग्रह)–
जैनस्तोत्ररत्नाकरः –
पुराणविषयअनुक्रमणिका – यशपाल टण्डन
पुराणशब्दानुक्रमणिका ( ३ भाग ) – डी. आर्. दीक्षितर्
महाभारतानुक्रमणिका –
गणितीयकोषः– डॉ. ब्रजमोहन
भरतकोषः (नाट्यसङ्गीत पारिभाषिक शब्दकोष)
भारतीयराजनीतिकोष (कालिदासखण्ड) –वेंकटेशशास्त्री जोशी
वैदिकपदानुक्रमकोश ( सात भाग ) – विश्वबंधुशास्त्री
सर्वतन्त्रसिद्धान्तपदार्थलक्षणसंग्रहः –
वैदिकशब्दार्थपारिजात. –
कौटिलीय अर्थशास्त्रपदसूची ( ३ भाग ) –
महावतरत्नाकरः ( संस्कृत हिंदी इंग्रजी म्हणींचा कोश )
पुरातन जैनवाक्यसूची –

कोशनिर्मितीच्या क्षेत्रात इ. १९४२ च्या ऑक्टोबर महिन्यापासून पुण्याच्या डेक्कन कॉलेजने अभूतपूर्व उपक्रम आरंभिला आहे. डॉ. सु. म. कत्रे या विख्यात भाषाशास्त्रज्ञाच्या मार्गदर्शनाखाली पन्नास विद्वान् हा कोश निर्माण करीत आहेत. यूरोपातील व जपानमधील अनेक संस्कृतज्ञ या कोशनिर्मितीच्या कामी निर्वेतन सहकार्य करीत आहेत. हा संपूर्ण कोश एकूण वीस भागात पूर्ण व्हावयाचा असून प्रत्येक भागाची पृष्ठसंख्या १२०० इतकी राहील. ख्रिस्तपूर्व १४ व्या शतकापासून इ. स. १८०० पर्यंत संस्कृतात निर्माण झालेल्या सर्वाङ्गीण साहित्यातील सरासरी दोन सहस्र ग्रन्थातील पाच लक्ष शब्द या कोशांत समाविष्ट होतील. प्रत्येक शब्दाची व्युत्पत्ति, त्याचे विविध अर्थ, प्रसङ्गानुरूप झालेले अर्थाचे पार्थक्य, निरनिराळ्या कालखंडातील ग्रन्थामध्ये त्या शब्दाचा उपयोग, शब्दाचा साहित्यात प्रथम व शेवटी झालेला प्रयोग आणि आधुनिक काळी होणारा त्याचा प्रयोग इत्यादि विविध दृष्टींनी या कोशात शब्दाचे स्पष्टन व्हावयाचे आहे. कोशाचे संपूर्ण खण्ड प्रकाशात आणण्याचे कार्य निर्विघ्नपणे चालू राहिल्यास इ. स. १९८२ साली पूर्ण होईल असा तर्क आहे शब्दकोशाचे हे अभूतपूर्व महान् कार्य पूर्ण करण्यासाठी १ कोटी रुपयांचा वित्तकोश खर्ची येईल असे अनुमान आहे.

---

## प्रकरण २५ वे

# नियतकालिक साहित्य

यूरोपीय संस्कृतीच्या संपर्कामुळे व यंत्रयुगाच्या प्रभावामुळे १९ व्या शतकाच्या उत्तरार्धात भारतीय साहित्यात वाङ्मयाचे विविध प्रकार सुरू झाले. त्या सर्वांची प्रेरणा यूरोपीय वाङ्मयातूनच होती. इंग्रज प्रशासकांच्या सद्‌गुणांचे किंबहुना दुर्गुणांचे सुद्धा अनुकरण करण्यामध्ये भारतातील नवशिक्षित समाजात एक प्रकारें स्पर्धाच सुरू झाली होती. १९व्या शतकाच्या उत्तरार्धात इंग्रजी नियतकालिकांचा प्रभाव व समाजजागृतीच्या कामीं त्याचा उपयोग पाहून, भारतातील मोठमोठ्या कार्यकर्त्यांनी निरनिराळ्या प्रांतात वृत्तपत्रें व मासिकं सुरू केलेली दिसतात. या काळातले संस्कृत पंडित सुद्धा या स्पर्धेमध्ये मागे राहिलेले दिसत नाहीत. त्यांनीहि संस्कृत भाषेच्या उद्धारासाठी व संरक्षणासाठी ठिकठिकाणी संस्कृत नियतकालिकें सुरू केलीं.

### विद्योदयाचा उदय

संस्कृतातलें पहिल मासिक ' विद्योदय '! पंजाबमध्ये वास्तव्य करणाऱ्या हृषीकेश भट्टाचार्य नामक बंगाली पंडिताने हें मासिक पंजाबात सुरू केलें. हृषीकेश भट्टाचार्यांचा जन्म इ. स. १८५० मध्ये बंगालात भट्टपल्ली या गावीं एका पंडित कुळात झाला. कुलपरंपरागत संस्कृत विद्येचें भरपूर अध्ययन झाल्यानंतरहि हृषीकेशाची विद्याभिलाषा अतृप्तच राहिली. इंग्रजी भाषा शिकण्याची मनस्वी इच्छा होती. पण हृषीकेशाच्या वडिलांचा म्लेच्छभाषा म्हणून इंग्रजीला विरोध होता. या संघर्षात वयाच्या १६ व्या वर्षी गृहत्याग करून हृषीकेश पंजाबात लाहोर येथे गेला. लाहोरमध्ये संस्कृत विद्यालयात हृषीकेश भट्टाचार्याला प्राध्यापक पद मिळालें. पंजाब विश्वविद्यालयाचे अधिकारी डॉ. लिटनर् यांनी प्रोत्साहन दिल्यामुळे हृषीकेश भट्टाचार्य यांनी इ. स. १८६९ सालीं ' विद्योदय ' हें मासिक सुरू केलें. या मासिकाच्या असाधारण वैशिष्ट्यामुळे त्याला भारतात प्रसिद्धी मिळाली. कांही दिवसांनी वडिलांची वार्धक्यांतील दुःखपूर्ण अवस्था कर्नी आल्यामुळे हृषीकेश भट्टाचार्य लाहोरचं प्राध्यापकपद सोडून कलकत्ता येथे परत आले. तेव्हापासून तं मासिक कलकत्त्यात प्रसिद्ध होऊ लागलें. हृषीकेश भट्टाचार्यांनी प्रयत्नांची व त्यागाची शर्थ करून सतत ४५ वर्षेपर्यंत हें मासिक चालू ठेवलें. त्यांच्या निधनानंतर त्यांच्या मुलानेंहि विद्योदयाचा अस्त

होऊ दिला नाही. पण ५ वर्षांनंतर आर्थिक अडचणींमुळे हे मासिक बंद करण्याची पाळी त्याच्यावर आली.

चित्रोदयामध्ये थोर पुरुषांची चरित्रे, कथा, आख्यायिका, इंग्रजी काव्यांचे अनुवाद यासारखे वेगवेगळ्या स्वरूपाचे वाङ्मय प्रकाशित होत होते. संस्कृत ही केवळ पूजापाठाची किंवा श्राद्धपक्षाची भाषा नसून लोकव्यवहाराची भाषा होण्यास सुद्धा सर्वतोपरी समर्थ आहे, हे महत्त्वाचे तत्त्व हृषीकेश भट्टाचार्यांच्या मासिकाने अखिल भारतीयांना पटवून दिले. स्वतः हृषीकेश भट्टाचार्य हे श्रेष्ठ प्रतीचे संस्कृत लेखक होते. चित्रोदयामध्ये प्रकाशित झालेले त्यांचे काही वैशिष्ट्यपूर्ण लेख पण्डित पद्मसिंह शर्मा यांनी 'प्रबन्धमञ्जरी' नामक पुस्तकात प्रकाशित केले आहेत.

## मञ्जुभाषिणी

काञ्चीवरमच्या प्रतिवादिभयंकर मठाचे अधिपति श्री अनन्ताचार्य यांनी 'मञ्जुभाषिणी' नावाची एक मासिकपत्रिका आपल्या मठाचे मत प्रचारांत आणण्यासाठी सुरू केली होती.[1] हे अनन्ताचार्य सर्व शास्त्रांत पारंगत होते. वैष्णवमताचा प्रचार करण्यासाठी व आपल्या साम्प्रदायिकांची संघटना करण्यासाठी त्यांनी अखिल भारतात परिभ्रमण केले होते. 'मञ्जुभाषिणी'मध्ये अनन्ताचार्यांनी न्याय, वेदान्त यासारख्या गहन शास्त्रावर अनेक लेख लिहिले. "वाल्मीकीय-भावप्रदीपः" नांवाच्या आपल्या एका प्रबन्धांत त्यांनी वाल्मीकीय रामायणाचा आध्यात्मिक भावार्थ प्रतिपादन करण्याचा यशस्वी प्रयोग केलेला आहे. गोल्डस्मिथच्या 'हरमिट्' (Hermit) या काव्याचें 'एकान्तवासी योगी' या नांवाने काव्यात्मक भाषांतरहि त्यांनी केलेले आहे. पण्डित जगन्नाथप्रसाद यांनी लिहिलेल्या 'सुखायन' नामक हिन्दी कादम्बरीचे त्यांनी केलेले संस्कृत भाषान्तर व 'वासिष्ठचरितम्' हें पुस्तक मञ्जुभाषिणी मध्ये क्रमशः प्रकाशित झालेले आहेत.

## सहृदया

पयोनिधाच्या धाराच्या धोरणी मद्रासचे आर. कृष्णमाचार्य यांनी 'सहृदया'[2] ही मासिकपत्रिका सुरू केली. पौरस्त्य व पाश्चात्य विद्यांचा समन्वय करणे हे या मासिक पत्रिकेचे उद्दिष्ट होते. श्री कृष्णमाचार्य हे मद्रास सरकारच्या संस्कृत विभागाचे अध्यक्ष होते. प्राचीन व नवीन विद्यांचा उत्कृष्ट समन्वय संस्कृताच्या द्वारेच होणे शक्य आहे असे कृष्णमाचार्यांचे ठाम मत होते व त्या अनुरोधाने त्यांनी आपल्या मासिकपत्रिकेतून विविधप्रकारे प्रयत्न केला. शेक्सपिअरच्या कृतींना

---

१. पृ. ४८९। २. पृ. ४८८।

परिचय सहृदयेंतून संस्कृत पण्डितांना देण्याची योजना प्रत्यक्षात आली. 'सुशीला' नावाच्या कादम्बरींतून हिन्दु महिलांचा जीवनादर्श श्रीकृष्णम्माचार्यांनी उत्कृष्टपणे चित्रित केला. ही 'सुशीला' कादम्बरी याच्या मासिकांतून क्रमशः प्रकाशित होत होती. 'पातिव्रत्यम्', 'पाणिग्रहणम्', 'वररुचिः' यासारखे त्यांचे उत्कृष्ट निबंध सहृदयामध्ये क्रमशः प्रकाशित झाले. २५ वर्षांनंतर या मासिकाचा अस्त झाला.

## संस्कृतचन्द्रिका

हें मासिक आरंभीं कलकत्त्यात प्रकाशित होत होते. त्यामध्ये कोल्हापूरचे पण्डित आप्पाशास्त्री राशिवडेकर यानी संस्कृत लेखनास आरंभ केला. पुढे त्या मासिकाचें संपादकत्व श्री. राशिवडेकरांना लाभले व त्यामुळे 'संस्कृतचन्द्रिका कोल्हापुरातून प्रसिद्ध होऊ लागली. आप्पाशास्त्रींच्या असाधारण भाषाप्रभुत्वामुळे व पाण्डित्यामुळे संस्कृतचन्द्रिकेचें यश भारतात सर्वत्र पसरलें. प. अम्बिकादत्त व्यास यानी लिहिलेले 'शिवराजविजयम्' हें विख्यात गद्यकाव्य संस्कृतचंद्रिकेमध्ये क्रमशः प्रकाशित झाले. श्री आप्पाशास्त्रींचें उत्कृष्ट लिखाण मात्र आजवर पुस्तक रूपाने प्रकाशित होऊ शकले नाही, ही खेदाची गोष्ट आहे. (श्री. आप्पाशास्त्री राशिवडेकरांचा सविस्तर परिचय पुढील प्रकरणात येईल.)

## सूनृतवादिनी

श्री. आप्पाशास्त्री राशिवडेकरानी संस्कृतचन्द्रिके बरोबरच 'सुनृतवादिनी' हें साप्ताहिक वृत्तपत्र सुरू केलें. तत्कालीन मराठी वृत्तपत्राप्रमाणेच निरनिराळ्या प्रचलित विषयावर सूनृतवादिनीमध्ये लिखाण प्रकाशित होत असे. इ. स. १९१३ मध्ये श्री. आप्पाशास्त्री दिवंगत झाले व त्यानंतर हीं दोन्हींहि नियतकालिक बंद पडलीं.

**चित्रवाणी**—हें मासिक काशीमध्ये प्रकाशित होत असे. रवीन्द्रनाथ टागोरांच्या अनेक काव्यांचा संस्कृत अनुवाद व कालीपद तर्काचार्यांचे महाकाव्य या चित्रवाणीमध्ये क्रमशः प्रकाशित झालें.

**शारदा**—साहित्याचार्य चन्द्रशेखरशास्त्री यानी प्रयागमध्ये हें मासिक सुरू केलें. ऐतिहासिक कथा व स्थलवर्णनें हें या मासिकाचें वैशिष्ट्य होय.

**मित्रगोष्ठी**—शान्तिनिकेतनाचे संस्कृताध्यापक विधुशेखर भट्टाचार्य हे या मासिकाचे संपादक होते. सामाजिक विषयावरील रुचिर लेख व कविता हें या मासिकाचें वैशिष्ट्य होतें.

**संस्कृतभारती**—हें मासिक वाराणसीमध्ये प्रकाशित होत होतें. रवीन्द्रनाथ टागोरांची 'गीताञ्जली' संस्कृत अनुवादाच्या रुपानें प्रस्तुत मासिकांत प्रथम प्रकाशांत आली. अनेक गद्य व पद्य प्रबंधहि या मासिकांत सतत प्रकाशित होत होते. याव्यतिरिक्त वाराणसीमध्ये 'सुप्रभातम्', 'अच्युतम्', 'अमरभारती', 'सूर्योदयः' (भारतीय धर्ममण्डळाचें मुखपत्र) यासारखीं आणखी कांहीं नियतकालिकें उन्मास येऊन कालांतरानें विलयास गेलीं. 'अमरभारती' चार वर्षेपर्यंतच प्रकाशित झाली पण तेवढ्या काळांतच तिची कीर्तिप्रभा दूरवर फांकली. 'सूर्योदय' मासिक गेलीं ३०-३५ वर्षें नियमितपणें प्रकाशित होत होतें.

**संस्कृतरत्नाकरः**—अखिल भारतीय संस्कृत साहित्यसंमेलनानें हें मासिक कित्येक वर्षेपर्यंत जयपुरांतून प्रकाशित केलें. वेद, दर्शनें, आयुर्वेद इत्यादि विषयावर वेळोवेळीं मोठमोठे विशेषांक काढून संस्कृतरत्नाकरानें संस्कृत साहित्याची फार मोठी सेवा केली. आजहि हें मासिक नियमितपणें प्रकाशित होत आहे. देवर्षि भट्टश्री मथुरानाथशास्त्री हे या मासिकाचे पहिले संपादक होते.

**संस्कृतम्**—इ. स. १९३० पासून पं. कालिकाप्रसाद त्रिपाठी यांनी प्रस्तुत साप्ताहिक मोठ्या नेटानें चालविलें असून तें अयोध्येमध्यें प्रकाशित होत असतें. 'अस्यामेव शताब्द्यां संस्कृतं राष्ट्रभाषा भवतु' हें या साप्ताहिकाचें ब्रीदवाक्य आहे. संस्कृत वाक्यामध्यें इंग्रजी शब्दांचा सर्रास उपयोग करावा, असें या साप्ताहिकाचें मत आहे व तदनुरोधानें यांतील लिखाण होत असतें. अखिल भारतीय विद्वत् समितीतर्फे 'संस्कृतसाकेत.' हें वृत्तपत्र अयोध्येत प्रकाशित होत होतें.

**मधुरवाणी**—१९३७ पासून बेळगांवमध्यें ही मासिक पत्रिका पं. रामाचार्य गलगली यांच्या संपादकत्वाखालीं नियमितपणें प्रकाशित होत असते.

**वैदिकमनोहरा**—श्री. अण्णगाचार्य यांच्या संपादकत्वाखालीं कान्चीवरम मध्यें ही मासिकपत्रिका प्रकाशित होत होती.

**संस्कृतप्रचारक**—श्री. रामशरण भारती यांनी दिल्लीमध्यें हें वृत्तपत्र चालविलें होतें.

**मनोरमा**—श्री अनन्त त्रिपाठी (ब्रह्मपुर, उत्कल) यांच्या संपादकत्वाखालीं हें मासिक प्रकाशित होत होतें. याव्यतिरिक्त काशीच्या धर्मसंघाची 'प्रतिभा' बंगलोरचा 'अमृतोदय.', पाटणा येथील संस्कृतसञ्जीवन समाजाचें 'मित्रम्', काशीच्या विद्वन्मण्डलाचें मुखपत्र 'सुप्रभातम्' व काशी येथील 'वल्लरी', अखिल भारतीय पण्डित परिषदेची 'पण्डितपत्रिका', कलकत्ता येथील 'पत्रवाणी' व 'संस्कृत-साहित्य परिषद् पत्रिका' आर्य समाजाचें प्रयाग येथील 'आर्यसिद्धान्त'

हें मासिक, ब्राह्म समाजाचीं कलकत्ता येथून प्रकाशित होणारी 'श्रुतप्रकाशिका', मुंबईत प्रकाशित होणारी 'सुरभारती', सिन्ध हैद्राबाद येथील 'कौमुदी', त्रिवेन्द्रमच्या महाराज संस्कृत महाविद्यालयाच 'श्रीचित्रम्', बिहारच्या संस्कृत अकादमीचें 'संस्कृतसञ्जीवनम्' मुंबई येथील वैद्यरामस्वरूप शास्त्रींचें 'बालसंस्कृतम्', पंढरीनाथाचार्य गलगली यानी बागलकोट येथे चालविलेली, 'साप्ताहिक-वैजयन्ती', बंगलोरच्या एम्. रामकृष्णभट्ट यानी चालविलेली 'अमृतवाणी', त्रिचूरम् येथील 'महाविद्या', श्रीपेरम्बेदूर येथील 'विचक्षणा', फतेहगढच्या स्वामी चिन्मयनन्दाची 'भारती विद्या', राजापुर (बांदा) येथील तुलसीस्मारक विद्यालयाचे शास्त्री श्री देवनारायण पाण्डे याची 'संस्कृत साहित्य सुषमा', तिरुवायुरु येथील तालाचार्यांची 'उद्यानपत्रिका', पट्टाम्बी येथील संस्कृत महाविद्यालयाचे आचार्य पन्नशेरि नीलकण्ठ शर्मा याचा 'विज्ञान चिन्तामणी', हीं काही वर्षे चालून बंद पडलेलीं संस्कृत नियतकालिकें विशेष उल्लेखनीय आहेत. याव्यतिरिक्त 'विद्वत्कला', 'संस्कृतभारती', 'संस्कृतभास्कर' (मथुरा), 'संस्कृतकादम्बिनी', 'विद्योदयम्' (भरतपुर), 'अमृतभारती' (कोचीन), 'वेंकटेश्वरपत्रिका' (मद्रास), 'उषा', 'आर्यप्रभा', आन्ध्रसाहित्यपरिषत् पत्रिका', 'म्हैसूर संस्कृत कॉलेजपत्रिका' यांचींहि नावें लक्षात ठेवण्यासारखी आहेत. आज चालू असलेल्या संस्कृत वृत्तपत्रांमध्ये वाराणसीच्या संस्कृत महाविद्यालयद्वारा प्रकाशित होणारी 'सारस्वती सुषमा' ही त्रैमासिक पत्रिका, नागपुरच्या संस्कृत भाषा प्रचारिणीचें इ. स. १९५० पासून प्रा. श्री भा. वर्णेकर याच्या संपादकत्वाखाली सुरू झालेलें 'संस्कृतभवितव्यम्', भट्ट मथुरानाथ शास्त्री याच्या संपादकत्वाखाली पं. गिरिराज शर्मा यांनी चालविलेलें 'भारती' मासिक, आचार्य वासुदेव द्विवेदी (काशी) याची 'सार्वभौमप्रचारमाला' ही मासिक पुस्तकमाला, सिमला येथील आचार्य दिवाकर दत्त शर्मा यानी १९५५ पासून चालविलेलं 'दिव्यज्योति' हे मासिक डॉ ग बा. पळसुले याच्या संपादकत्वाखाली इ. स. १९५७ पासून निघणारें पुणें येथील संस्कृतसभेचें पाक्षिक मुखपत्र 'भारतवाणी' व श्री वसन्त अ. गाडगीळ याच्या संपादकत्वाखाली इ स. १९६० पासून निघणारें संस्कृत-साहित्य परिषदेचें पाक्षिक 'शारदा' याचें संस्कृतप्रचाराचे कार्य मोठ्या आवेशाने व धडाडीने चालू आहे. इ स. १९६० पासून नेपाळमध्ये 'जयतु संस्कृतम्' नांवाचें मासिक श्री. केशव दीपक यांच्या संपादकत्वाखाली सुरू झालें असून (प्रतिष्ठान भोगाहिटी, काठमांडो, नेपाळ) त्यांत मुख्यत नेपाळी संस्कृतज्ञांचेच लेख असतात. नेपाळमध्ये चाललेल्या संस्कृतसंबंधी हालचालींची थोडी माहिती यांतून मिळते

संस्कृत ही केवळ धार्मिक व्यवहाराची भाषा नसून तिच्यामध्ये अद्ययावत् लौकिक व्यवहार करण्याचीहि क्षमता आहे, हें सिद्ध करण्याच्या महत्त्वाकांक्षेने पं.

हृषीकेश भट्टाचार्य यांनी आपल्या विद्योदय मासिकाच्या द्वारा जो अभिनव उपक्रम संस्कृत साहित्य क्षेत्रात सुरू केला, त्याचा विस्तार राजाश्रय किंवा लोकाश्रय नसताहि अशाप्रकारें सर्वत्र झाला. या उपक्रमातून संस्कृतच्या व्यवहारक्षमतेसंबंधीचा भ्रम पार म्हणून निरसलेला आहे. आता तर भारत सरकारच्या साहित्य अकादमीने डॉ. राघवन् यांच्या संपादकत्वाखाली 'संस्कृतप्रतिभा' हें षाण्मासिक सुरू करण्याची तत्परता दाखविलेली आहे.

प्रादेशिक भाषामध्ये निघणाऱ्या कित्येक नियतकालिकांतून संस्कृत लिखाण भरपूर प्रमाणात प्रकाशित होत असते. कलकत्त्याचे जितीशचन्द्र चट्टोपाध्याय यांनी इ. स. १९४६ पासून "मञ्जूषा" हें मासिक चालविलेले आहे. त्यामध्ये तर इंग्रजी लिखाणापेक्षा संस्कृतगद्य अधिक प्राधान्य असत. हें इंग्रजी लिखाण या मासिकात प्रकाशित झाले नसतें तर मञ्जूषेचे नाव संस्कृत नियतकालिकांच्या यादीतच दाखवा आलें असत.

'द्वैमासिकम्' (बंगाली), 'भारतविचार.' व 'बहुश्रुता' (गुजराथी-स्थान बडोदा), 'मिथिलामोद' (मैथिल), 'लोकानन्ददीपिका' (इंग्रजी, स्थान-मद्रास), 'संस्कृत जर्नल्' (इंग्रजी, स्थान-पुदुकोट्टा), 'संस्कृतभारती' (हिंदी, स्थान-बरद्वान), 'एकता' (मराठी, स्थान-पुणें), या प्रादेशिक भाषांतील वृत्तपत्रांतून आजवर नेहमी संस्कृत लिखाण प्रकाशन येत आहे. संस्कृत प्रचाराच्या कामीं या लिखाणाने फार मोठें साहाय्य केलेलें आहे. मुंबईच्या भारतीय विद्याभवनातून अधून मधून संस्कृतविश्वपरिषत्-पत्रिकाहि प्रकाशित होत असते. तीन परिषदेच्या कार्यासंबंधीच वृत्त संस्कृत, इंग्रजी व हिन्दी भाषांतून प्रसिद्ध होत असतें. बहुतेक सर्व महाविद्यालयांच्या वार्षिक पत्रिकामध्ये एक संस्कृत विभाग असतोच व त्यामध्ये होतकरू लेखकांचे लेख प्रकाशित होत असतातच.

संस्कृतनियतकालिकांची ही प्रदीर्घ नामावली पाहून या काळातील संस्कृत पंडिताची आकांक्षा योग्य प्रकारें लक्षात येते इतर प्रादेशिक भाषाप्रमाणे संस्कृतात देखील लौकिक विषयावर अभिनिवेशयुक्त, उपहासगर्भ, सरळ व ललित लेखन करतां येत, संस्कृत भाषादेखील इतर भाषाप्रमाणेच सरळ व सुबोध आहे, किंबहुना भारतातील सर्व भाषांची तीच प्राणशक्ति असल्यामुळे भारताची राष्ट्रभाषा होण्यास देखील संस्कृतच योग्य आहे हे सिद्धान्त या सर्व नियतकालिकांनी आपापल्या परीने प्रतिपादन केले. परन्तु राजाश्रयाच्या व लोकाश्रयाच्या अभावीं वर उल्लेखिलेली सर्व नियतकालिकें दिर्घायुष्य गेलीं. आज जीं काही हाताच्या बोटावर मोजण्याइतकीं संस्कृत नियतकालिक चालताना दिसतात तीं सुद्धा केव्हाना केव्हा तरी द्रव्याच्या अभावीं दिल्यास जातील, हें उघड आहे. तथापि संस्कृत भाषेच्या ऱ्हासकाळी

पंडित हृषीकेश भट्टाचार्य, प. अनंताचार्य, प. कृष्णमाचार्य, प. आप्पाशास्त्री राशिवडेकर यासारख्या थोर पंडितांनी अर्थनाश व मनस्ताप सहन करून संस्कृत वाङ्मयामध्ये यूरोपीय संस्कृतीच्या संपर्काने आलेला हा नवीन वाङ्मयप्रकार प्रवर्तित करण्यात असाधारण कर्तृत्व व्यक्त केलें याबद्दल समाजाने त्यांचे निरंतर ऋणी राहिलें पाहिजे.

या सर्व संस्कृत नियतकालिकामध्ये ज्या वैविध्यपूर्ण विषयावर नवलेखकांनी लेखन केलें, त्यापैकी काही विषयाची संक्षिप्त माहिती आम्ही पुढे देत आहोत. यावरून नवीन संस्कृत लेखकांची विचारप्रवृत्ति कोणत्या दिशेने वाहत होती याची सुस्पष्ट कल्पना येऊ शकेल. नियतकालिकातील सर्वच विषयाचा सविस्तर परामर्श घेऊन त्याचं मूल्यमापन करणें हें एका स्वतंत्र ग्रंथाचें कार्य आहे.

**सारस्वती सुषमा** – संपादक प. कुबेरनाथ शुक्ल, एम्. ए., व्याकरणाचार्य. काशीच्या राजकीय संस्कृत महाविद्यालयाची ही अत्यंत लब्धप्रतिष्ठित मासिक पत्रिका असून त्यामध्ये मोठमोठ्या विद्वानांनी वेळोवेळीं फार महत्त्वपूर्ण विषयावर लिखाण केलेलें आहे. त्यातील काही लेखकांचा व त्यांनी लिहिलेल्या लेखांचा पुढीलप्रमाणे परिचय देता येईल—

| लेखक | लेख |
|---|---|
| १. श्री. युधिष्ठिर मीमांसक, प्राच्यविद्याप्रतिष्ठान, काशी | — भागवृत्ति-संकलन परिशिष्टम् |
| २. श्री. रघुनाथ शर्मा, व्याकरणाचार्य, काशी | – 'गौडपादीयम् दर्शनम्'। |
| ३. श्री आनन्द झा, न्यायाचार्य, काशी | – 'चार्वाकदर्शनरहस्यम्'। |
| ४. श्री अवधबिहारी त्रिपाठी, ज्यौतिषाचार्य, काशी | – 'लग्नस्वरूपविमर्श'। |
| ५. श्री अनंतशास्त्री फडके, व्याकरणाचार्य, काशी | –'कामीयम्'। |
| ६ श्री. द्विजेंद्रनाथ मिश्र, साहित्याचार्य, काशी | –'पाश्चात्यसाहित्यसिद्धान्त'। |
| ७. श्री. मुरलीधर मिश्र, व्याकरणाचार्य, काशी- | 'मोकाटेगणपतिशास्त्रिणा जीवनेतिवृत्तम्'। |
| ८. श्री. बटुकनाथशास्त्री खिस्ते, साहित्याचार्य, काशी | —'म. म. खिस्ते नारायण शास्त्रिणा जीवनेतिवृत्तम्'। |
| ९ डॉ. दशरथलाल शर्मा, एम्. ए., डी. लिट्., दिल्ली | –'राजशेखरीय-काव्य मीमांसाया रचनास्थानम्'। |
| १०. पण्डितराज राजेश्वरशास्त्री द्रविड, काशी | —'नवभारते वर्णाश्रमव्यवस्था आवश्यकी न वा?' |
| ११. श्री. रामाज्ञा पाण्डेय, व्याकरणाचार्य, काशी | –'प्राचीन-पाठनिर्णयपञ्जिका'। |

| लेखक | लेख |
| --- | --- |
| १२. पण्डिता क्षमादेवी राव, मुम्बई | –'मायाजालम्' (आख्यायिका)। |
| १३. श्री शांतिभिक्षुशास्त्री, शांतिनिकेतन, | –'वेदान्तावतारः'। |
| १४. श्री अजयमित्रशास्त्री, काशी | –संस्कृतभाषायाः नमिको न्हासः। |
| १५. श्री श्रीकृष्णशास्त्री मोकाटे, व्याकरणाचार्य, | –'समासवृत्तिविचारः'। |
| १६. श्री मुरलीधर मिश्र, व्याकरणाचार्य | –'शक्तिस्वरूपविचारः'। |
| १७. श्री रघुनाथशर्मा, व्याकरणाचार्य | –'हिन्दुधर्मसंहिताविमर्श.'। |

अशाप्रकारे या सारस्वती सुषमेमध्ये नामवंत पंडितांनी गहन व गंभीर विषयावर सतत लेखन केलेले आहे. सर्व लेखकांचा निर्देश या एकाच प्रकरणात करणें शक्यहि नाही व योग्यहि नाही.

## 'संस्कृत–रत्नाकरांतील' गद्यलेखक, (ऑक्टोबर, नोव्हेंबर, १९५६)

| | |
| --- | --- |
| १. श्रीकेदारनाथ शर्मा सारस्वत, संपादकीय लेखक | – महाकवि: गुणाढ्यः बृहत्कथा च। |
| २. भारतरत्न डॉ. भगवानदास, एम्. ए. डी लिट् | – भारतीयसंस्कृतेः प्रधानम् अङ्गम्। |
| ३ श्री गिरिधरलालशास्त्री व्यास, उदयपुर, | – भाषाविज्ञानस्य रूपरेखा |
| ४. विद्यामार्तण्ड डॉ. मंगलदेवशास्त्री, | –'वर्तमानसंस्कृतशिक्षाविमर्श'। |
| ५. श्री. गणेशराम शर्मा, साहित्यरत्न, | –'हिन्दीमनु संस्कृत रमय्यताम्।' |

डिसेम्बर–जानेवारी १९५६–५७.

| | |
| --- | --- |
| १. श्री. केदारनाथ शर्मा सारस्वत | –'संस्कृतकवीनाम् उपनामानि।' |
| २. भारतरत्न डॉ. भगवानदास | –'महाभारत पुराणानि च।' |
| ३. श्री रामशङ्कर भट्टाचार्य, व्याकरणाचार्य | –'स्कंदपुराणस्य अध्ययनम्।' |
| ४. श्री इन्द्र विद्यावाचस्पति | –'कालिदासकाव्येषु करुणो रस.।' |

संस्कृत भवितव्यांच्या पहिल्या चार वर्षामध्ये सम्पादक प्रा. श्री भा वर्णेकर यांनी (म्हणजे प्रस्तुत ग्रन्थकारांनं) लिहिलेल्या संपादकीय लेखांची नामावली

### (प्रथम वर्ष)

(१) मध्यप्रदेशस्य प्रथम संस्कृतसाप्ताहिकम्। (२) संस्कृतप्रचारस्य प्रसादचिह्नानि। (३) संस्कृत भाषाप्रचारार्थं विदर्भकेन्द्रस्थापना। (४) विदर्भसाहित्यसंघस्य त्रयोदशम विवेशनम् (संस्कृतभाषाया· अनादरः नैव कार्यः।) (५) श्रीशंकराचार्य–जन्मोत्सव·। (६) विमर्शमत्रापि परभाषादास्यम्? (७) अखिलभारतीयसंस्कृतपरिषद्।

(८) राष्ट्रभाषाप्रचारकाणां संस्कृतविरोधः । (९) संस्कृतभवितव्यस्य नीतिः । (१०) स्वातन्त्र्यवीर-सावरकर-महोदयानां जन्मदिनोत्सवः । (११) अमरभाषा । (१२) प्रधानमन्त्रिणः राष्ट्रभाषाविद्रोहः । (१३) संस्कृतभाषाप्रचारार्थे लोककर्तव्यम् (एकूण १४ लेखांची माला)। (१४) विजयदशमीदिने सुवर्णदानम्। (१५) तत्र का परिदेवना ? (संस्कृत परिषदेचीं व्याख्यानें इंग्रजी मधून झालीं त्याबद्दल निषेध) । (१६) तमसो मा ज्योतिर्गमय (दीपावली महोत्सवाच्या निमित्तानें ) । १७ भारतीयानां ज्ञानविषये स्वावलम्बनम्। (१८) निर्वाचनवीराणां कर्तव्यम्। (१९) मानवनिर्माणार्थं संस्कृताध्ययनमावश्यकम् ( राष्ट्रपतींच्या भाषणाला अनुलक्षून ) । (२०) विद्यालयेषु गीताध्यापनम्। (२१) राष्ट्रभाषायाः अनादरः (पुण्याच्या विद्यार्थ्यांच्या बेशिस्त वागण्याला उद्देशून ) (२२) बालेषु संस्कृतभाषाप्रचारः । (२३) अर्वाचीन धर्मयुद्धम् (निर्वाचन पद्धतीला उद्देशून ) । (२४) ज्ञानं विज्ञानसहितम्। (२५) संस्कृतपाठशालायाः परिचयः । (२६) स्वराज्यमन्त्रिणां पात्रापात्रत्वम्। (२७) हस्तलिखितनियतकालिकानि । ) (२८) भवितव्यग्राहकाणाम् अपरिहार्यं दायित्वम्। (२९) मातृभाषामाध्यमविरोधः (पुणें विद्यापीठाच्या नीतीची निन्दा। (३०) संस्कृताध्ययनम् अपरिहार्यतां नेतव्यम्। (३१) पण्डितवर्य-पुणताम्बेकर-महाभागानां देहावसानम्। (३२) अनुकरणीयः नवोपक्रमः (संस्कृत निमन्त्रण पत्रिकांना उद्देशून) (३३) राजाराम-वाचनालयस्य अभिनन्दनीयः उपक्रमः (शिवाजीच्या जन्मोत्सवानिमित्त संस्कृत भाषण ठेवले म्हणून) ।

### संस्कृत भवितव्यांतील सम्पादकीय लेख- (द्वितीय वर्ष-१९५२)

१) नववर्षारम्भः । २) शासनाधिकारिणां कर्तव्यम् (संस्कृत पण्डिताच्या सम्मानाला उद्देशून) । ३) चारित्र्यस्पर्धा प्रवर्तनीया न स्पर्धा । ४) शठे शाठ्यं समाचरेत्। ५) श्री मुन्शीमहोदयं प्रति प्रार्थना ( इंग्रजी भाषेच्या पक्षपाती धोरणाबद्दल ) । ६) अयं स कालः सम्प्राप्तः । ७) न नित्यं श्रेयसी क्षमा । ( पाकिस्तानचा भारताशीं द्रोह ) । ८) प्रसादचिह्नानि पुरःफलानि । (डॉ. राजेन्द्र-प्रसादांना अध्यक्षपदाची प्राप्ति ) । ९) निरोधभक्तिः ( स्वातन्त्र्यवीर सावरकरांचें भाषाशुद्धिप्रचाराचें कार्य.) । १०) भाषानिष्ठ-प्रान्तरचना । ११) संस्कृतप्रचारे शासनाधिकारिणां जागृतिः । १२) काले खलु समारब्धाः फलं बध्नन्ति नीतयः । १३) प्रारब्धस्यान्तगमनम्। ( संस्कृत विद्यार्थ्यांना उद्देशून ) । १४) शिष्यापराधे गुरोर्दण्डः (राजनैतिक) । १५) निर्वाणाद्भयमुत्सन्न मूलान्यपि निहन्तति (राजनैतिक) १६) अरण्यान्मरणं श्रेयः । १७) नागपुर नभोवाणी-केन्द्राधिकारिणाम् अभिनन्दनम्। १८) भगवत्पूज्यपाद-श्रीशङ्कराचार्याणां प्रवचनानि । १९) युद्धप्रकरनिरोध. । २०) दाक्षिणात्यानां हिन्दीविरोधः । २१) श्रीकृष्णसेवा । २२) बुद्धिभेदः ( नागपुरशासनाचें दृष्टचापंचें सदन ) । २३) आगामिनः उत्कर्षस्य अग्रदूती

(भारद्वाजसहिता लाभाला उद्देशून)। २४) सिन्धुपुत्राणां सस्कृतोपासना। २५) मातृभाषाशुद्ध्यर्थं स्वातन्त्र्यवीराणां प्रयत्ना। २६) पण्डितवर्य-रामप्रतापशास्त्रिणा निधनम्। २७) विजयादशमीमहोत्सवसन्देश। २८) गोरक्षणम्। २९) गोरक्षणमेव सस्कृतिरक्षणम्। ३०) हिन्दीसाहित्यिकानां प्रमाद। ३१) सस्कृतविश्वपरिषद आयोजनम् (राष्ट्रपतींचे भाषण सस्कृतातूनच व्हावें)। ३२) प्राचीनभारते विमानविद्या। ३३) आयुर्वेदोपदेशेषु विषय. परमादार। ३४) सस्कृतभाषाया विश्व प्रचार। ३५) परस्पर भावयन्त श्रेय परमवाप्स्यथ। ३६) विद्यापीठदीक्षान्त विधे. शुद्धीकरणम्। ३७) विद्द्र इमा नियामिस्ताम्। ३८) अखिलभारतीय शिक्षणपरिषद्। ३९) सस्कृतज्ञेभ्यान् प्रति प्रार्थना (दुर्बोध सस्कृतलेख हि नयेत)। ४०) नागपुरे आधुनिकसस्कृतनाटकप्रयोग। ४१) म. म. कृष्ण शास्त्रिघुले महाभागाना निधनम्। ४२) सस्कृतपण्डितानाम् आर्थिकसमस्या। ४३) भारतीयानाम् इतिहासलेखनपरम्परा। (लेखमाला-५ लेख)। ४४) वेदमन्दिरम्। ४५) स्तालिनमहाशयस्य निधनम्।

## संस्कृत भवितव्यांतील संपादकीय लेख-(तृतीय वर्ष-१९५३)

१) शिशूना सांस्कृतिकशिक्षणम्। २) भारतीयभाषाविकासपरिषद्। ३) तेनसिंगविजयम्। ४) भाषाभिमानविचार (आश्रयासियाचा हिन्दीविरोध)। ५) ज्ञानमन्दिरगत वाणिज्यम्। ६) आयुर्वेदीय-प्रयोगशालानाम् आवश्यकता। ७) प्राचविद्यापरीक्षा। ८) त्वर्यताम् त्वर्यताम् सस्कृतज्ञका! (अखिल भारतीय सस्कृत कथास्पर्धेला उद्देशून)। नागपुर-नमोवाणीकेन्द्रस्य पन्चमो वार्षिको त्सव। १०) उत्तरप्रदेशस्य राज्यभाषा (उर्दूभाषीयांच्या प्रयत्नाला उद्देशून) ११) पुण्यपत्तनविद्यापीठस्य अग्रगामित्वम् (सस्कृतातून दीक्षान्तविधि केल्याबद्दल)। १२) मङ्गलमूर्ते मङ्गलोत्सव। १३) सैनिकशिक्षणम्। १४) आङ्ग्लभाषाया समुच्चाटनम्। १५) सस्कृतनाम्यवाङ्मयम् (कम्युनिस्ट नेता डाग, यांचे मनखण्डन)। १६) मन्दिरेषु ज्ञानप्रचार क्रियताम्। १७) पुण्यपत्तनविद्यापीठस्य दीक्षान्तविधि। १८) आन्ध्रराज्यसम्भव। १९) प्रशासनशब्दकोश। २०) विश्वपुनर्निर्माणसंघ। २१) स्वतन्त्रभारते गोरक्षणम्। २२) राष्ट्रभाषाप्रचारसम्मेलनम्। २३) जीवन-मरणसमस्या। २४) नागपुर-विद्यापीठे सस्कृताध्ययनम्। २५) भारतीयशिक्षणस्य ध्येयम्। २६) स्वाध्यायमण्डलस्य रजतमहोत्सव। २७) आयुर्वेदस्य राष्ट्रीय महत्त्वम्। २८) भारतीयसस्कृते स्वरूपम् (लेखमाला-७ लेख)। २९) सस्कृत वाङ्मयस्य विमर्शवर्धनम्। ३०) मुम्बापुरीशासनस्य नवादश। ३१) राष्ट्रगुरु श्रीसमर्थरामदास.। ३२) उत्तरप्रदेशे उर्दूप्रचारान्दोलनम्। ३३) मध्यप्रदेशीय सस्कृतविश्वपरिषद्। ३४) सस्कृतकथास्पर्धा।

## संस्कृत भवितव्यांतील संपादकीय लेख-(चतुर्थ वर्ष १९५४)

१) संस्कृतपण्डितानां चरित्राणि। २) श्रीरामजन्मोत्सवः। ३) शिक्षणक्रमे भाषाविवेकः। ४) संस्कृतविश्वपरिषदः नागपुरीयम् अधिवेशनम्। ५) संस्कृतस्य राष्ट्रभाषात्वं निःसन्दिग्धम् उद्घोष्यताम्। ६) मध्यप्रदेशे समाजशिक्षणम्। ७) प्रातीयताविरोधिनी परिषद्। ८) पाकिस्थाने अन्तःकलहः। ९) शत्रोरपि गुणाः वाच्याः। (लेखमाला-बायबल ग्रंथाच्या संस्कृतानुवादाला अनुलक्षून ६ लेख) १०) टण्डनमहाशयस्य विवेकविधुरत्वम्। ११) मुन्शीमहोदयस्य महान् प्रमादः १२) श्रीगणेशोत्सवः १३) भारते संस्कृतज्ञाना सख्याल्पत्वम् (३ लेख)। १४) भारतशत्रव। १५) संस्कृतद्रोहिणा कर्कशाक्रोशः। १६) प्राचीनभारते शिशुशिक्षणम् (३ लेख)। १७) भारतीयसमाजे जातिव्यवस्था। १८) आधुनिकभारते विद्यापीठानि (३ लेख)। १९) वेदरक्षणम् (३ लेख)। २०) विश्वशान्त्यर्थम् आध्यात्मिकी साधना (३ लेख)। २१) चारित्र्यविकासः। २२) श्रीराजगोपालाचार्याणां हितोपदेशः (विद्यालयात धार्मिक शिक्षण)। २३) गणराज्यदिनोत्सवः। २४) भारतीयस्वातन्त्र्येतिहासः। २५) संस्कृतोद्धारार्थं सत्याग्रहः।

श्री. स. प. गानू यांनी संस्कृत भवितव्यात लिहिलेले संपादकीय लेख

२६) संस्कृत भवितव्यस्य नूतनव्यवस्था। २७) स वो मनांसि जानताम्। २८) संस्कृतभाषाप्रचारकार्यस्य सूत्रम्। २९) कथं तूष्णीं सह्यः। (केवलानन्द सरस्वतींचे महाप्रयाण)। ३०) विनाश्रयं न शोभन्ते पण्डिता वनिता लताः।

## संस्कृत भवितव्यांतील संपादकीय लेख-(पञ्चम वर्ष १९५५)

संपादक- श्री. भा. वर्णेकर आणि स. प. गानू

१) संस्कृतभवितव्यस्य पञ्चमवर्षारम्भ। २) लालयेत् पञ्चवर्षाणि। ३) संस्कृतप्रचारे लेखकसाहाय्यम्। ४) दोषोऽपि निर्मलधिया रमणीय एव। ५) तृणैर्गुणत्वमापन्नैर्बध्यन्ते मत्तदन्तिनः। ६) १० मे (स्वातन्त्र्ययुद्धाला उद्देशून) ७) प्रारब्धस्यान्तगमनम्। (लेखमाला-४ लेख)। ८) अर्के चेन्मधु विन्देत किमर्थं पर्वतं व्रजेत्? (आकाशवाणीवरून होणाऱ्या संस्कृत प्रचाराला उद्देशून)। ९) संस्कृते आधुनिक वाङ्मयम् (४ लेख)। १०) नमस्ते हुतात्मन्! (गोवामुक्ति आन्दोलनात मृत्यु पावलेल्या अमीरचन्दाला उद्देशून) ११) भवो हि लोकाभ्युदयाय तादृशाम्। १२) स्वाध्यायान्मा प्रमदः। १३) परित्राणाय साधूनां (लेखमाला ८ लेख)। १४) उत्तीर्णं शिरः सादनम्। १५) मध्यप्रदेशशासनस्य पुरोगामित्वम्। १६) संस्कृतविश्वपरिषदः चतुर्थम् अधिवेशनम्। १७) न-इह-रुः= नेहरुः (प. जवाहरलाल नेहरुंच्या ६७ व्या वाढदिवसानिमित्त)। १८) दुर्गं पथस्तत्

कवयो वदन्ति। १९) पद हि सर्वत्र गुणैर्निधीयते (म. म. मिराशींच्या सत्कार समारंभाला अनुलक्षून)। २०) परिवृत्यलङ्कार। (शृङ्गेरीच्या भाषणाला उद्देशून) २१) अपदे पदमर्पयन्ति हि (गोवामुक्तीच्या युद्धविरोध्याना उत्तर)। २२) सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज। २३) हिन्दी संस्कृतनिष्ठत्वम् इष्टम् अनिष्टम् वा। २४) ऊर्ध्वबाहुर्विरौम्येषु न च कश्चिच्छृणोति माम्। (राजनैतिक लेख) २५) मकरसंक्रमणम्। २६) द्वाक्यभूतामभिनन्द्यसत्त्वो (नागपुर विश्व विद्यालयाच्या कुलगुरुपदाचे निर्वाचन)। २७) पूर्वं एवाभवत् पक्ष (गोवा मुक्तीचें आन्दोलन)। २८) अल्पस्य हेतोर्बहु हातुमिच्छन् (संस्कृतच्या उपेक्षेला उद्देशून)। २९) पङ्को हि नभसि क्षिप्त क्षेप्तु पतति मूर्धनि (अ. भारतीय माध्य मिक शिक्षामण्डलाकडून होणारा संस्कृतविरोध पाहून-४ लेख)। ३०) कथमपि भुवनेऽस्मिंस्तादृशा सम्भवन्ति (विद्वद्रत्न केशव लक्ष्मण दप्तरी यांचें निधन)। ३१) प्रजास्तत्र न मुह्यन्ति नेता चेत्साधु पश्यति। ३२) मित्रीयन्ते न घण्ाभिर्गावं क्षीरविवर्जिता (अमेरिकेच्या पाकिस्तान व पोर्तुगाल याना अनुकूल नीतीला उद्देशून) ३३) अभिनन्दनार्ह उपक्रम (जनाब महम्मूद अहमद याच्या संस्कृतानुकूल भाषणाला उद्देशून)।

## संस्कृत भवितव्यांतील सम्पादकीय लेख—(वर्ष ६ वें)

संस्कृतसाहित्यसम्मेलनस्य त्रयोविंशतितमम् अधिवेशनम् (८ लेख)। २) परा यत्तेयुत्कण्ठा न कार्या (गोवामुक्ति आन्दोलनासदर्भी) ३) नास्ति रत्नमखण्डितम् (इतिहासाच्या अध्यापनाला उद्देशून) ४) पं नेहरुमहाशयस्य विदेशयात्रा। ५) नभोवाण्या अभिनव उपक्रम। ६) प्रतिपन्नार्थनिर्वाह सहज हि सतां मतम् (लो टिळकांचा शताब्दीमहोत्सव)। ७) हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ('वृत्तपत्रस्वातंत्र्य' या विषयावर)। ८) संस्कृतिनिष्ठा इष्यते (दोन लेख)। ९) रक्षाबन्धनम्। १०) राष्ट्रैक्यं प्रवर्धताम्। ११) प्रसादचिह्नानि पुर फलानि (श्री चिं. द्वा. देशमुखाची विद्यापीठ अनुदान समितीच्या अध्यक्षपदीं नियुक्ति)। १२) त्वया जगन्ति पुण्यानि त्वय्यपुण्या जनोक्तय। (संस्कृत भाषेच्या दूषणाला उत्तर)। १३) राजा कालस्य कारणम् (संस्कृतोद्धारासाठी २ लेख)। १४) योगक्षेमस्तत्र दुर्लभ (नेहरूंच्या भाषणाला उत्तर) १५) खले कपोतन्याय प्रवर्तताम्। (संस्कृतनाट्यस्पर्धेला उद्देशून)। १६) बुद्धिर्बुद्धिमतोल्लृप्ता इत्याद्राय सराजकम् (राष्ट्रधुरधराच्या सारासारविचारहीनत्वाला उद्देशून)। १७) ब्रह्म उपास्व। १८) कर्म कृष्णस्तु मानुषा। १९) एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति। २०) वेदो नित्यमधीयताम् (वेदसन्देशासाठी)। २१) बालबोध वेदान्त। २२) गीता सुगीता कर्तव्या (गीताजयन्ती)। २३) प्रचलितशिक्षापद्धति।

२४) संस्कृतविश्वपरिषदः पञ्चमम् अधिवेशनम्। २५) आचार्य द्विजेन्द्रनाथशास्त्री 'संस्कृतसाहित्यविमर्शः' (ग्रंथपरिचयात्मक लेख) २६) अन्धाना ज्ञानदाता लुई ब्रेल महाशयः (२ लेख)। २७) ज्ञानेन्द्रियविरल ज्ञानोपासिका। २८) मद्रास विश्वविद्यालयस्य शतसांवत्सरिकमहोत्सवः (२ लेख)। २९) मुम्बापुरी विश्वविद्यालय.। ३०) श्रीरामकृष्णकथामृतम् (ग्रंथपरिचय-श्रीरामकृष्णपरमहंस जन्मोत्सवानिमित्त।) ३१) भारतीयशासनस्य संस्कृतायोग'। ३२) संस्कृतायोगस्य प्रश्नावली। (१६ लेख) ही लेखमाला "प्रश्नावलिविमर्श." या नावाने पुस्तकरूपाने प्रकाशित झाली. ले. श्री. भा. वर्णेकर, पृष्ठसंख्या ६०, मूल्य १ रुपया।

* * *

## संस्कृत भवितव्यांतील निबन्ध (प्रथम वर्षातील)

| निबन्ध | लेखक |
|---|---|
| १. वर्षप्रतिपद् | -प्रा. स. गो. सोमलवार, (नागपूर) |
| २. संस्कृतभारतीं प्रति भारतीयाना दायित्वम्। | -प्रा. सरस्वतीप्रसाद चतुर्वेदी, (नागपूर) |
| ३. मृतप्रायमपि अमृतीकर्तुं प्रभवति सुरभारती। | -कुर्तकोटी शंकराचार्य. |
| ४. रामादिवद् वर्तितव्यम् न रावणादिवत्। | -प्रा. स. गो. सोमलवार |
| ५. साप्ताहिकी समीक्षा (तात्कालिक राजनैतिक विषयाना धरून) | —'समीक्षक' |
| ६. संस्कृतनिष्ठा एव हिन्दीभाषा भारतस्य राष्ट्रभाषा भवितुं समर्था। | म.प्र. संस्कृताध्यापक संघाच्या पाचव्या अधिवेशनात प्रा.स.प्र. चतुर्वेदी यांचे अध्यक्षीय भाषण. |
| ७. ईशानदेवो समुत्पन्नः स्नेहमूलकः वैराग्निः | -श्री. भा. वर्णेकर |
| ८. श्रीमन्नरसिंहावतारः | -प्रा. स. गो. सोमलवार |
| ९. अधार्मिकतायाः पराकाष्ठा | -'मन्दराचल' |
| १०. नृसिंहावताररहस्यम् | -श्री. हरिहर वामन देशपांडे, अमरावती |
| ११. प. जगन्नाथस्य गङ्गालहरी | -प्रा. दि. वि. वऱ्हाडपांडे |
| १२. जगद्गुरुः शङ्कराचार्यो विजयतेतराम् | -आचार्यपादपांसुः। |
| १३. दशहरामहोत्सवः | -श्री. स. प. गानू, नागपूर |
| १४. उपेक्षिताः भारतीयाः वन्यजातयः | -श्री. नारायण बापट (आदिवासि सेवामण्डलाचे कार्यवाह) |
| १५. विश्वस्वरूपम् (लेखमाला) | -श्री. श. ना. कुळकर्णी |
| १६. आत्मतुष्टा भारतीयाः वनवासिनः | -श्री नारायण बापट |
| १७. विश्वस्वरूपम्। प्राणु निगुदण पार्वतीपरमेश्वरौ | -श्री. स. ना. कुळकर्णी |

| | निबंध | लेखक |
|---|---|---|
| १८ | वन्यजातीनाम् आचारविचारा | –श्री नारायण नागर |
| १९ | अफ्रिकदेशस्य वर्णभेदादिनियम | –श्री यमुनादास शास्त्री |
| २० | अयोध्यानगरे त्रिभीषणस्य नवावतार | –श्री भा वर्णेकर |
| २१ | लोकमान्याना पुण्यस्मरणम् | –श्री केशवशास्त्री जोशी |
| २२ | सस्कृतनिबन्धपरिषद प्रयोजनानि | –प्रा दि वि वऱ्हाडपाडे |
| २३ | नायमात्मा बलहीनेन लभ्य | –केशव रामराव जोशी |
| २४ | मध्यप्रदेशस्य नगरग्रामसङ्घनस्य समानोपकारक कार्यम् | –हरिहर वामन देशपाडे (अमरावती) |
| २५ | सेवानिवृत्युत्तरसमाजसेवा | –श्री स ना कुळकर्णी |
| २६ | आगामि निधिमण्डलनिर्वाचनम् | –श्री भा के टोक, छिंदवाडा |
| २७ | स्वाध्यायोऽध्येतव्य | –राजा सोमसेतु दीक्षित, चिदम्बर |
| २८ | सस्कृतव्याकरणस्य सुबोधीकरणम् | –प्रा दि वि वऱ्हाडपाडे |
| २९ | सस्कृति चारित्र्य च | –प्रा दि वि वऱ्हाडपाडे |
| ३० | विदर्भेषु उपेक्षितानि ऐतिहासिकस्थानानि | –श्री ना म पिम्पले, जबलपूर |
| ३१ | राष्ट्रसेवाकल्पनासु परिवर्तन कुरुत | –श्री के रा जोशी |
| ३२ | भौतिकविज्ञानस्य राजनीतेश्च पारस्परिक सम्बन्ध – ? | |
| ३३ | सामाजिकम् अनुशासनशैथिल्यम् । | –श्री ना म पिम्पले, जबलपूर |
| ३४ | सेवानिवृत्ताना सामाजिक दायित्वम् | –श्री दे गो लाडगे |
| ३५ | मानवजीवने सस्कृतिमाहात्म्यम् । | –श्री. शा गो गर्दे |
| ३६ | अमेरिकाया वेदान्तसार | –प्रा दि वि वऱ्हाडपाडे |
| ३७ | सस्कृतभाषाया राष्ट्रभाषात्वेन गौरवम् | –श्री शा गो गर्दे |
| ३८ | न मे भक्त प्रणश्यति | –श्री अम्बादासशास्त्री पाण्डे |
| ३९ | अहिंसाया तात्त्विकविवेचनम् | –श्री म भा वर्णेकर, अमरावती |
| ४० | मिथिला–सस्कृत–विद्यापीठे अध्यक्षीय भाषणम् | –श्री मा श्री अणे, (राज्यपाल-बिहार) |
| ४१ | तत्त्वज्ञान तथा औषधिविज्ञानम् | –प्रा दि वि वऱ्हाडपाण्डे |
| ४२ | क्रीडामाहात्म्यम् | –श्री म भा वर्णेकर, अमरावती |
| ४३ | नैतिकी सास्कृतिकी च शिक्षा | –प्रा दि वि वऱ्हाडपाण्डे |
| ४४ | भवसागरतरणम् | –श्री विनायकशर्मा जोशी |
| ४६ | का नाम सस्कृति कानि च तदङ्गानि | – आयुर्वेदाचार्य पा ह देशपाडे, धुळ |
| ४७ | विद्याधन सर्वधनप्रधानम् | –कुमारी सुभद्रादेवी |
| ४८ | रत्नलाभार्थं भवसागरमन्थनम् । | –प श्री दा सातवळेकर |

| निबन्ध | लेखक |
|---|---|
| ४९ संस्कृतवाक्विलासमण्डलस्य वार्षिकोत्सवे अध्यक्षीय भाषणम् । | –साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास |
| ५० संस्कृत पाठशालानाम् अल्पपरिचय | –श्री वि भा वाईकर |
| ५१ भासकवे नाटककर्तृत्वम् | –श्री हंसराज अग्रवाल |
| ५२ कालिदासकालनिर्णय | – ,, |
| ५३ न हि ज्ञानेन सदृश पवित्रमिह विद्यते | –कु सुभद्रादेवी उपासनी |
| ५४ समावर्तनसंस्कारस्य आधुनिक संस्करणम् | –प्रा द्वि वि वऱ्हाडपांडे |
| ५५ लोहयात्रावर्णनम् (आधुनिक पारिभाषिक शब्दानी युक्त) | ––श्री स ना कुळकर्णी |
| ५६ महाकवि भारवि | –श्री हंसराज अग्रवाल |
| ५७ नागपुरे भीषण विमानापघात | –श्री स ना कुळकर्णी |
| ५८ आङ्ग्लशब्दानां स्थाने भारतीयशब्दाना रूढीकरणम् | –श्री स ना कुळकर्णी |
| ५९ सत्येन धार्यते पृथ्वी सत्ये सर्व प्रतिष्ठितम् | –श्री शा गो गर्दे |
| ६० नवसमाजमुद्रणालय | –श्री स ना कुळकर्णी |

## संस्कृत भवितव्यातील निबन्ध (चतुर्थ वर्ष)

१ सघगणराज्यानि – श्री वासुदेवशास्त्री बागेवाडीकर, (सोलापूर)
२ वाद्यमेव वर स्थौल्यात् (४ लेख) – श्री शा गो गर्दे
३ अध्यक्षीय भाषणम् –श्री कन्हैयालाल मुन्शी (स वि प कार्याध्यक्ष)
४ अध्यक्षीय भाषणम् – राष्ट्रपति राजेन्द्रप्रसाद (स वि परिषदेचे अध्यक्ष)
५ ऋग्वेदकालीना भारतीया संस्कृति – श्री हनुमन्ताचार्य होसूर (मुनिराबाद)
६ अभिनव शब्दकोश – श्री शा गो गर्दे
७ मधुनिशुद्धि (मतखण्डनात्मक लेख) – प वासुदेवशास्त्री बागेवाडीकर
८ निद्रद्भूषणम् (अप्रकाशित काव्याचा परिचय) – स्वामी लक्ष्मणशास्त्री, नागोर
९ सुबोधसंस्कृतम् – श्री श्री घ पण्डित (अमळनेर)
१० भर्तृहरिविरचितमहाभाष्यदीपिका – श्री का वा अभ्यंकर (पुणे)
११ कौटिलीयम् अर्थशास्त्रम् (३ लेख)–श्री वासुदेवशास्त्री बागेवाडीकर (सोलापूर)
१२ ब्रह्मचर्यव्रतम् – डॉ शंकरलाल शर्मा (सिंधुनगर)
१३ भारते सुरभारतीप्रचार (२ लेख) – श्री हनुमन्ताचार्य होसूर
१४ विचारलहरी – श्री का द समुद्र (कल्याण)
१५ महाकविभासस्य स्वप्नवासवदत्ते प्रधानहेतु – श्री श्याम अभ्यंकर
१६ संस्कृतसाहित्ये ध्वनि (लेखमाला)– श्री. मध्येश्वर मिश्र (रावहार)

| निबन्ध | लेखक |
|---|---|

१७. पञ्चनदप्रान्ते संस्कृतज्ञाना स्थितिः – श्री. जयपालसिंह शास्त्री
१८. आयुर्वेदशास्त्रे वर्णिताः षड्रसाः – श्री. शा. गो. गर्दे
१९. देवीपूजा—कु. सुभद्रा उपासनी ( साकुरी )
२०. संस्कृतभाषा एव राष्ट्रभाषा भवितुम् अर्हति-काशी पाण्डुरङ्ग शर्मा ( जडचर्ला )
२१. द्वैताद्वैतम्—श्री हनुमन्ताचार्य होसूर ( मुनिराबाद )
२२. विद्यापीठाधिकारिणा कर्तव्यम्—श्री. के रा. जोशी ( नागपूर )
२३. मैथिलभाषायाः संक्षिप्तेतिहास—आचार्य परमानन्द शास्त्री ( पटना )
२४. पण्डितराजो जगन्नाथ (३ लेख) –श्री वासुदेवशास्त्री बागेवाडीकर
२५. सुसस्कृताः विद्यार्थिन' (लेखमाला) — श्री अनन्त गोविन्द उपाध्ये
२६. भारतीयः द्राविडसमाजः ( ३ लेख )— श्री. के पिचुमणि अय्यगार
२७. भारतीयाना मानवबिन्दवः – श्री. न. ना. भिडे, नागपूर
२८. प्रत्यक्षतः दृष्टम् इत्यपि न प्रमाण महत् (लेखमाला)–श्री शा गो गर्दे
२९. श्रीमद्भगवद्गीता — श्री श्रीनिवास अनन्तभट्ट ( व्यासाश्रमवासी )
३०. अपि संस्कृत जीवति — श्री य. महालिङ्गशास्त्री
३१. अजन्तायाः द्विचक्रयात्रा (प्रवासवर्णनम्)— प्रा गोपाल गुप्त
३२. वर्णव्यवस्था — श्री हनुमन्ताचार्य होसूर ( मुनिराबाद )
३३ पञ्चाङ्गनिर्णयः — श्री या रा जोशी ( नान्देड )
३४ ज्ञानप्रसारस्य नूतना दिक् — डॉ वा दि वर्तिलङ्गे
३५. परिभाषिकशब्दाना निर्माणम् ( डॉ. रघुवीरचे सिद्धात) (३ लेख)-शा. गो. गर्दे
३६ मॉरिशसद्वीपसमाचारः — प्रा. वा वि विष्णुदयाल ( मॉरिशस )

## संस्कृत भवितव्यांतील निबन्ध ( वर्ष पाचवे )

१ संस्कृतभाषाप्रयोग —श्री स. ना कुळकर्णी
२. विविधविषय वाङ्मयं संस्कृते अद्य आवश्यकम् – श्री शा. गो गर्दे
३ मन.पूत समाचारेत् — श्री प्रभाकर उपाध्ये. ( मुंबई )
४. भाषानुसारि प्रान्तनिर्मितिः संस्कृत च — श्री. क. रा. देशपांडे (नागपूर)
५. न विना ज्ञानविज्ञाने मोक्ष फलति कस्यचित् — शा. गो. गर्दे
६. हुत च दत्त च तथैव तिष्ठति । —श्री का. ट. समुद्र ( कल्याण )
७. मानवस्य जीवने वेदान्तशास्त्रस्य स्थानम् — श्री श्यामकान्त कुळकर्णी
८. अफगाणिस्तान–पाकिस्तानयोः विवादः — श्री घनश्यामसिंह गुप्त
९. संस्कृतभाषायाः अध्ययनाध्यापनयो' विकासविस्तरयो. योजना — ?
१०. भारतीयगणितसुषमा ( २ लेख ) –श्री. सत्येन्द्रनाथ

| निबन्ध | लेखक |
|---|---|

११ अस्माकम् आरोग्यम् – प्रा गोपाल गुप्त
१२ चीनभारतयो. सांस्कृतिक सम्बन्ध – श्री श्री गो गर्दे
१३ आचार्य-रघुवीरमहाशयाना चीनपर्यटनम् – श्री श्री गो गर्दे
१४ महात्मागान्धी विनोबा च – लक्ष्मीनारायण भारतीय, वर्धा
१५ किमिद विज्ञान नाम ? – श्री ति न आत्रेय (शिवदासपूर)
१६ मिस्रदेशीया स्तूपा – श्री सत्येद्रनाथ (दिल्ली)
१७ 'मानस 'प्रणेता श्रीतुलसीदास – श्री. महावीरप्रसाद अग्रवाल (बानल)
१८ संस्कृतभाषा एव भारतस्य राष्ट्रभाषा भवतु–श्री श गो डबीर (वाशीम)
१९ प्रजाराज्ये राजनैतिकपक्षा – नीर्पाजे भीमभट्ट (कल्याण)
२०. दशानोऽस्ति हा हा गता भारती मे – श्री महावीरप्रसाद अग्रवाल (बानल)
२१ संस्कृतविश्वपरिषद ४ अधिवेशनम्, कांचन रचना – श्री स ना कुलकर्णी
२२ देवी सम्पद् – श्री हनुमन्ताचार्य होसूर (मुनिराबाद)
२३ शान्तात्स्तीर्थस्य परिचय – कैलासचन्द्र नैथानी शास्त्री
२४ तस्माद् भावो हि कारणम् – श्री रा ग. पण्डित. (इन्दौर)
२५ अस्माक देश अस्माक जनास्त्र — कु विजया अपरजी (अकोला)
२६. संस्कृतकवीनाम् आत्मस्मृति. — श्री. गोवर्धनाचार्य गलगलीकर (धारवाड)
२७ अपि द्राविडा अन्ये (३ लेख)—श्री व्ही सुब्बारायन् (मद्रास)
२८ विज्ञान न दूष्यम् — श्री शिवनारायण शर्मा

## संस्कृतभवितव्यातील निबन्ध ( वर्ष सहावे )

१ आफ्रिकाप्रवास — प्रा के एम् रामकृष्णभट्ट
२. राज्यपुनर्घटना राष्ट्रभाषा च – श्री श गो डबीर (वाशीम)
३ रसगङ्गाधर — श्री मथुरानाथ भट्ट
४ अस्माकं राष्ट्रभाषा — श्री प्रभाकरशास्त्री
५ संस्कृतस्य राष्ट्रभाषात्वेन उपयोग — श्री श्या गो रायळे (नागपूर)
६. भगवान् — श्री मा काशीनाथन् (यादगीर)
७ संस्कृतसाहित्यसम्मेलने संस्कृतनाम्नप्रयोगा — विदूषक
८ चिन्तामणिर्विचारार्थो दृष्टोऽपि त्यज्यते जनै — निर्गुण ।
( श्री चिन्तामणि देशमुख याच्या मन्त्रीपदत्यागाला उद्देशून )
९ पृथ्वीविनाशविषये २००० वर्षेभ्य पूर्वतन प्रयास — श्री ग श्री. वारे
१० भारतस्य एक वैदिकधर्ममण्डल भवतु — श्री श गो डबीर (वाशीम)
११ संस्कृतभाषा एव माध्यम भवतु.

| निबन्ध | लेखक |
|---|---|

१२. द्राविडाः अपि आर्याः – श्री. शिवनारायणजी शर्मा, कलकत्ता
१३. मद्यनिषेधः – श्री. के. ग. पाण्डे ( अमरावती )
१४. विश्वभाषा संस्कृतम् – स्वामी लक्ष्मणशास्त्री, नागौर ( राजस्थान )
१५. धिक् जीवनं मद्यपानाम् – श्री. स. ना. कुळकर्णी.
१६. युद्धसूक्तम् – पं. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर ( सोलापूर )
१७. जागतिकम् ऐक्यम् – श्री. ना. भू. जवादीनार
१८. महाभारतान्तर्गतं राज्यशासनम् ( लेखमाला ) – पं. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर
१९. मालविकाग्निमित्रे विदूषकः – श्री. सुधाकर देशपांडे
२०. काव्येषु नाटकं रम्यम् – श्री. श्या. गो. रावळे ( नागपूर )
२१. शालासु धर्मशिक्षणम् देयं न वा । – श्री. वा. ना. औदुम्बरकर ( धारवाड )
२२. मृच्छकटिकस्य रसग्रहणम् – पं. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर.
२३. भारतस्य भाषिकनीतिः – ' यथार्थदर्शी '
२४. राष्ट्रभाषायाः रूढं लक्षणम् – ' यथार्थदर्शी '
२५. बहुभाषिकेषु राष्ट्रान्तरेषु राष्ट्रभाषासमस्यासमाधानम् – ' यथार्थदर्शी '
२६. भारते संघभाषा दृश्यते, का च सा ? – ' यथार्थदर्शी '
२७. संस्कृतस्य तथाकथितं काठिन्यम् – ' यथार्थदर्शी '
२८. भारतस्य नूतनं राष्ट्रीयं पञ्चाङ्गम् – प्रा. दि. वि. वऱ्हाडपांडे
२९. मानवस्य उत्क्रान्तिः – श्री. स. ना. कुळकर्णी
३०. भारतीयराष्ट्रसंघस्य सामान्यभाषायाः कार्यक्षेत्रम् – ' यथार्थदर्शी '

* * *

## संस्कृत भवितव्यांतील चरित्रें (प्रथम वर्ष)

१. धनाधिक्यनिरभिमानधारी श्री टक्करबाप्पा – श्री नारायण वापट ( मंडला )
२. कविकुलगुरुः श्रीकालिदासः – श्री प्रभाकर शर्मा ( नडीयाद )
३. जगद्गुरुः श्रीमद्भगवत्पूज्यपादाः आद्यशङ्कराचार्याः (लेखमाला) –कुमार काटे
४. श्रीसमर्थरामदासस्वामिनः – श्री. दे. वा. धर्माधिकारी ( मोमीनाबाद )

## (चतुर्थ वर्ष)

१. छत्रपतिः शिवराजः – पं. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर
२. श्रीमत्सत्यप्रमोदतीर्थाः – ,,
३. श्रीमान् वामन-सूरः – श्री. शा. गो. गर्दे
४. पञ्जिनवृषो लगनायः – पं. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर

५. भूदानयज्ञस्य अध्वर्युः (आचार्य विनोबा भावे)–प्रा शरच्चंद्र परांजपे, भोपाळ
६. भगवान् गौतमबुद्धः (२ लेख) – श्री शा. गो गर्दे
७ महामहोपाध्याय यज्ञेश्वरशास्त्री – श्री दे. बा. धर्माधिकारी

## (पाचवें वर्ष)

१. कूर्मदेवी – श्री. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर
२. पण्डित–वासुदेवशास्त्री – विमल बागेवाडीकर
३. शासकादर्शः हैदरअली – श्री. अनन्त गोविन्द उपाध्ये, ब्रह्मनाल
४. दामाजिः – श्री. वि. के. छत्रे, कल्याण
५. दत्तात्रेय विष्णु पलुस्करः – ?
६. बाजि–प्रभुः – श्री. वि. के. छत्रे, कल्याण
७. महर्षि वाल्मीकिः – ,,
८. न्यायनिष्ठुरः रामशास्त्री – ,,
९. वीर-गायधनी – ,,
१०. वीरनारी चानम्मा – श्री. सत्यनारायण राव, जडचर्ला
११. अहल्यादेवी – श्री. वि. के. छत्रे, कल्याण
१२. नेताजिः सुभाषचन्द्रः– ,,
१३. साधुः तुलसीदासः – ,,
१४. भ्रुशुण्डेः अल्पचरितम् – श्री. माईणकरशास्त्री
१५. स्वातंत्र्यवीरः सावरकरः – श्री. वि. के. छत्रे
१६. कविवरः बोपदेवः – श्री. ग. श्री. वारेशास्त्री
१७. भगवान् गौतमबुद्धः – श्री. वि. के. छत्रे
१८. तामिलकविः कुरळरचयिता तिरुवल्वारः – श्री. वि. के. छत्रे
१९ बालरामदास – श्री. दत्त जगदीवार.
२०. समदर्शी एकनाथः – श्री. वि. के. छत्रे.
२१. जिजामाता – ,,
२२ श्री साईनाथः – ,,

## (सहावे वर्ष)

१. यतिश्रेष्ठः श्रीमद्राघवेन्द्रगुरुः – विमल रा. अपरजी, अकोला
२. श्रीसमर्थः रामदासः – श्री. वि. के. छत्रे
३. लक्ष्मणरावः किर्लोस्कर – ,,
४. श्री रंगमहोदयानां स्वल्पचरितम् – पं. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर

## संस्कृत भवितव्यांतील लघुकाव्यें (प्रथम वर्ष)

१. श्रीसोमनाथस्तोत्रम् – कवि ज. ह. दवे, मुंबई
२. संस्कृतभवितव्यस्य प्रशस्तिः – श्री शंकराचार्य कुर्तकोटी
३. ,, – श्री. शंकर रामचंद्र कुळकर्णी, पनवेल
४. ,, – श्री. पाण्डुरंगशास्त्री डेग्वेकर, ठाणें
५. ,, – श्री. नारायणशास्त्री खिस्ते, काशी
६. ,, – श्री. बाळकृष्णशर्मा शेवाळकर
७. ,, – श्री. गणेश रामचंद्र सावडे, सातारा
८. ,, – म. म. कृष्णशास्त्री घुले, नागपूर
११. द्वारकाप्रसादमिश्रः – मध्यप्रदेश संस्कृताध्यापक संघ सदस्य.
१२. सोमनाथप्रतिष्ठाष्टकम् – श्री. गणेश रामचंद्र सावडे, सातारा
१४. नागपुरीय-निशावर्णनम् – श्री. श्री. भा. वर्णेकर
१५. श्री शिवराजस्तवनम् – ,,
१६. उद्दण्डगोष्ठी-प्रहसनम् – मायादत्त पाण्डेय शास्त्री, पटनगर
१७. सुरभारती – विद्याधरशास्त्री
१८. हरहरीयम्–( द्व्यर्थी काव्य ) – म. म. कृष्णशास्त्री घुले
१९. अये ! स्वातन्त्र्य ते स्वागतम् – शनैश्चर साधु, काशीम
२०. वातः – श्री. बाळकृष्ण गणेश पानसे, अकोला.
२१. श्रीदुर्गानिद्राभ्यर्पणस्तवः – श्री. वसंत त्र्यम्बक शेवडे, नागपूर
२२. श्रीमाधिवारस्य आर्तिक्यम् – श्री. शिवदास कृष्ण वार्लिंग, नागपूर
२३. विद्वद्रत्न केशव लक्ष्मण दप्तरी महाशयस्य स्तुति – ,,
२४. पण्डित जवाहरलाल स्तुतिपद्यदशकम् – श्री. ग. रा. सावडे, सातारा
२५. लोकमान्यतिलकः – श्री. धर्मदेवो विद्यावाचस्पतिः, दिल्ली
२६. कः पातु मे भारतम् – श्री शनैश्चर साधु, काशीम
२७. श्रीमद्भगवद्गीतामप्रशस्तिः – श्री. नरहरि दामोदर शास्त्री, धुळें.
२८. नैवास्ति किञ्चन् ( अष्टकम् ) – श्री. अनन्त नारायण शास्त्री, पुणें
२९. गणराज्यदिनप्रार्थना – श्यामशर्मा वावळे, नागपूर
३०. मार्गस्था निआर्थिनी कामिनि – श्री सुरेन्द्रनाथ तिवारी, प्रयाग
३१. शिवदेवनम् – श्या. शो. वावळे, नागपूर
३२. भगवद्गीतामिषाष्टकम् – श्री दत्तात्रेय नारायण देशपांडे, काशी
३३. गुणाः – श्री सुरेन्द्रनाथ तिवारी, प्रयाग.
३४. सत्यामो सुरर्षयधिः – प्रा. टि. वि. वरडपांडे

## संस्कृत भवितव्यांतील लघुकाव्यें (द्वितीय वर्ष)

१. नन्दनसंवत्सरस्वागतपञ्चकम् – श्री माधव श्रीहरि अणे, (बिहार-राज्यपाल)

[मा. बापूजी अणे हे प्रतिवर्षी नवीन वर्षाच्या आरंभीं संवत्सरप्रशस्तिपर एक लघुकाव्य पाठवीत असतात.]

२. शारदास्तवनम् (गीत) – श्री वि ह. निजसुरे, धुळें

,, – श्री. गणेश रामचन्द्र सावडे, (सातारा.)

४. केशव-बळीराम-हेडगेवार-महोदयाना चरितम् – श्री सखाराम धुंडीराज माहुरकर, नागपूर

५ श्री सत्यनारायणार्तिक्षयम् – श्री. मुरलीधरशास्त्री मुसमुले

६. श्री लोकमान्यस्तवनम्। – श्री. ना म. पिम्पळे

७. ,, – श्री ग रा. सावडे, सातारा

८. ,, – श्री वि. कृ पेशवे, यवतमाळ

९ श्रीकृष्णलीलास्तवनम् – श्री. शास्त्री रेवाशंकर मेघजी देल्वाडकर

१०. भारतस्य अर्थमन्त्रिणः चिन्तामणि देशमुखस्य स्तुतिः (५ श्लोक) –श्री मा. वर्णेकर

११. विनोबा भावे महाभागाना स्वागतपुष्पाञ्जलिः – काशीचे वैदिक पण्डित

१२ श्रीगणेश प्रति प्रार्थना – श्री नरहर दामोदर शास्त्री

१३ राधिकास्तवनम्-(अश्वधाटी) – श्री. विनायक बाळकृष्ण प्रभाकर

१४. हर्षक्षणा – श्री. वि. के. छत्रे

१५. वर्षाकाल' – श्री पाण्डुरंगशास्त्री डेग्वेकर.

१६. श्रीदेव्यन्नपूर्णार्तिक्षयम् – श्री. करमरकरशास्त्री, इंदूर

१७. धेनु मातर वन्दे – श्री. केशवचन्द्र चक्रवर्ती, कलकत्ता

१८. श्री राजेन्द्रप्रसादमहोदयानां सुस्वागताभिनन्दनपत्रम् – काशीस्थविद्वत्परिषद्

१९. श्री भगवद्गीताप्रशस्तिः – श्री नरहरी दामोदर शास्त्री, धुळें

२०. अये सुरभि सम्भवे!— श्री. ग. व्य देशपांडे, (अमरावती)

२१. पोट्टि-श्रीरामलुमहोदयस्य पवित्र बलिदानम्—श्री वर्णवीर नागेश्वरराव

२२. शरत्समयः — श्री पाण्डुरंगशास्त्री डेग्वेकर

२३ श्रीशङ्कराचार्यः — श्री धर्मदेव विद्यावाचस्पति, दिल्ली

२४. मेघाराममहोदयेभ्यः श्रद्धाञ्जलिः — दुर्गारामशर्मा उपाध्ये

२५. श्रीतुलसीस्तवपञ्चकम् — स्वामी लक्ष्मणशास्त्री, नागौर

२६. श्रीरामदासचरितम् — श्री. यशवन्त कुलकर्णी

२७. गणतन्त्रनिगमङ्गलत्रयम् — श्री. दया गो. रानडे

(चवथे वर्ष)

१ कवीन्द्राय रवीन्द्राय समर्पिता काव्यदक्षिणा – सर चिन्तामणि देशमुख
२ जयगीतम् (गेयकाव्य) – श्री. भा. वर्णेकर
३ दशावतारस्तोत्रम् – श्री कुळकर्णी, मिरज
४ अवतारमङ्गलाष्टकम् – श्री. भा वर्णेकर
५ मङ्गलसप्तकम् – श्री रावजीशास्त्री पाध्ये
६ श्रीविष्णुचतुर्विंशत्यवतारस्तोत्रम् – स्वामी लक्ष्मणशास्त्री, नागौर
७ संस्कृतभक्तिव्यस्य प्रशंसा — एम् रामकृष्णभट्ट, अमृतवाणी-संपादक
८ श्यामाप्रसाद: – श्री वसन्त गाडगीळ
९ श्रीकालिदासप्रशस्ति – श्री महालिङ्गशास्त्री, तिरुवाल्गढु
१०. श्रीकालिदासकरोपहार – श्री लक्ष्मीनारायण शानभाग, मुंबई
११ स्वातन्त्र्याभास – प कळमकरशास्त्री, इंदूर
१२ श्रीगणेशस्तुति – श्री चन्द्रशेखर शर्मा ताडिकोंडा
१३ कवीन्द्रो रवीन्द्र – श्री. धर्मदेव विद्यावाचस्पति
१४ स्तुतिपनम् (महाराष्ट्रातील श्रेष्ठ मराठी लेखक पडके याना उद्देशून) —
– श्री. रा. न. कीर्तने, लोणंद
१५. गायत्रीस्तोत्रम् – श्री विष्णुशर्मा दीक्षित, गुहागर
१६ मङ्गलार्तिक्यपद्यानि – श्री दत्तात्रेय वासुदेव शेण्डे, पुणे
१७ सद्गुरु-श्रद्धाञ्जलि (शृंगेरीपीठाचार्य श्री चन्द्रशेखरभारती याच्या महा प्रयाणाला उद्देशून)— श्री एम् रामकृष्णभट्ट
१८ कन्यापितृत्व खलु नाम कष्टम् — श्री स ना कुळकर्णी
१९ गीतागीतम् — श्री जगन्नाथशर्मा वसिष्ठ, जम्मू
२०. विजयते स्वातन्त्र्यसूर्योदय — श्री रमाकान्त शुक्ल

(संस्कृत भवितव्यांत प्रकाशित झालेल्या इतर काव्यांचा निर्देश सन्दर्भानुसार इतर प्रकरणातून याच प्रबंधात केलेला आहे)

## मधुरवाणीतील लेख

### जानेवारी १९५७

रसोत्पत्ति — श्री वासुदेव नागेश औदुम्बरीय, धारवाड
अनुशासनपालनम्—श्री मधुसूदन झा, विद्यावाचस्पति
कविताकिंकरीट-सर्वतन्त्रस्वतन्त्र-वेदान्तदेशिक-श्री. वरदनाथाचार्य, (वरिदबेन्न)
रहस्यम् (ज्योति शास्त्रविषयक) —प. केशवशर्मा गल्गली, (धारवाड)

### मार्च-एप्रिल १९५७

काव्यशास्त्रविनोदः—श्री. के. राजन्नशास्त्री, धर्मपुरी
श्रीमान्नीलकण्ठमखीन्द्रः
संस्कृते गूढभाषायाः उपयोगः—कालिकाप्रसादशास्त्री
साहित्याचार्य मम्मटः—
साहित्यविदा योगः (ज्योतिषशास्त्रीय)—पं. केशवशर्मा गल्गली, धारवाड
उद्यानसंवर्धनम्—ए. एन्. शर्मा, अगल्पाडि (कासरगोडवासी)
मूकमहिलामठः—श्री. रामाचार्य गल्गली, (पूर्वीचे मधुरवाणीचे संपादक, व 'विद्या'-सम्पादक)

### मे १९५७

संस्कृतकाव्येषु प्रगतिशीलित्वम्—श्री. बलदेव उपाध्याय, वाराणसी
रीतिविमर्शः—श्री मुकुन्दशास्त्री खिस्ते, वाराणसी
कालिदासकाव्ये वारि—श्री. प्रमुदत्तशास्त्री, वाराणसी

### "संस्कृतरत्नाकर" मासिकांतील लेख

पद्मनाभशास्त्री कविचक्रवर्ती (लष्कर-ग्वाल्हेर)-यमुनाष्टकम्।
विनायकशास्त्री टिल्लू—जय जय वीर जवाहर रे!
श्रीरामशंकर भट्टाचार्य (वाराणसी)—चेतः समुत्कण्ठते (हास्यरसात्मक)
श्री. जनमेजयविद्यालंकार – 'नगरग्रामौ' (विनोदी दीर्घकाव्य)
गुरुदयाल शर्मा (दिल्लीनिवासी व्यापारी) – 'भगवतीस्तवराजः' (हास्यकाव्य)

### कुराणग्रंथाचा संस्कृतानुवाद

[हैद्राबाद येथे राहणारे भूतपूर्व न्यायाधीश श्री. गुण्डेराव हरकारे यांनी कुराणग्रंथाचा संस्कृतानुवाद केला पण तो अद्यापि प्रकाशित झालेला नाही असा उल्लेख संस्कृत-रत्नाकराच्या १९५७ फेब्रुवारी-मार्चच्या अंकात आहे.]

### संस्कृतरत्नाकर (डिसेंबर-जानेवारी १९५७)

शम्भुनाथशास्त्री, साहित्याचार्य – हरति चेतः कीदृश रे। (गीत)
म. रामकृष्णभट्ट कविताचतुर — राष्ट्रध्वजः (अष्टक)
महामहोपाध्याय परमेश्वरानन्दशास्त्री — परभृतपञ्चकम्।
साहित्याचार्य जयशंकर त्रिपाठी — शरद्गीतम्।
रुद्रदेव त्रिपाठी (भिवानिवासी) — आगता दीपावली।

**'परित्यजन्ति – समस्यापूर्ति'**

गणेशशास्त्री शेण्डे (पुणे)
विद्यावाचस्पति विद्याधरशास्त्री (अलीगढ)
केदारनाथ ओझा (वाराणसी)
शिवचरण झा (झांशी)
आशुकवि नित्यानन्दशास्त्री (जोधपुर)
कविरत्न श्यामकेशवशास्त्री (होशियारपुर)
म. म. विद्यावाचस्पति प्रभुदत्तशास्त्री (दिल्ली)
साहित्याचार्य लालशास्त्री (कोटा)
वैद्य नन्दलालशर्मा (मुंबई)
रामगोपाल साहित्याचार्य (जयपुर)
सत्यानन्द मिश्र (जयपुर)
राजवैद्य नरहरिभट्ट (जयपुर)
इतक्या लेखकांनी ही समस्या पूर्ण केली

**संस्कृत रत्नाकरांतील काव्यें (पौष, २०११ विक्रम संवत्सर)**

कविशेखर केदारकवि — यमुनास्तव (पञ्चक)
मुनि नथमल्ल — चन्द्राला उद्देशून केलेलें सप्तक
मुनि बुद्धमल्ल — 'मधुरस'विषयक

**'भारती' पत्रिकेंतील काव्यें**

मातृसन्देश (१५ श्लोक) — गणेशप्रसाद गौतम, संस्कृत महाविद्यालय, नेपाळ (वर्ष ४, अंक १०)
आनंदीनंदनी (१२ श्लोक) — म. म. दशरथशास्त्री, सुरक्षेत्र, एग (व. ५, अं. २)
विद्याभूषण प. श्री गणराम शर्मा, (झालवाड)कृत 'कविकान्दिशस्य कविता' (गजलगीत) (व. ७, अं. २)
शतपथ, विद्याप्रवीण, कुकुटण्डा, गन्जाम (ओरिसा) या कवीचें 'कृपाशी' हृ गण्डकाव्य (व. ७, अं. ३)

*कविरत्न मधुरशास्त्री, साहित्याचार्य, साहित्यरत्न, राजकीय संस्कृत महाविद्यालयाचे प्रधानाध्यापक, भरतपुर (व ७, अं ३) या कवीचें 'मौनाह्वानम्'* हें काव्य 'अश्रुरसमय' या काव्यग्रंथांतून उद्धृत केलेले आहे. याची चाल 'मन डोले मेरा तन डोले' या चित्रपटगीताच्या चालीप्रमाणे आहे उदाहरणार्थ–

'न हि श्रवेऽह न हि श्वने सहयते
गगनञ्चाश्रुतो मां कोऽप्य मौन समयन् ॥

विशद्–विशद–विधुभावविमुग्धो विस्वो विस्मयशाली।
वितरति लोचनपक्ष्मसु राग स्वप्नो मधुरिमशाली।
मनोज्ञ स्वप्नो मधुरिमशाली। . ...

रुद्रदेव त्रिपाठी ( मन्दसौर ) कवींचें 'नित्य संस्कृत पठन्तु'—हे गेयकाव्य—'मेरा जता है जापानी' या चित्रपटगीताच्या चालीवर आहे. (व ७, अ. ४)

हीरालाल पाण्डे, भोपाळचे कवि 'जागृतिगीतम्' गेय कविता (७ ५)

गजाननशास्त्री मुसलगावकर यांचें 'कुचस्तोत्रम्' (१८ श्लोक) हें काव्य शृंगार व हास्यरसयुक्त आहे (७ ५)

सत्यव्रतशास्त्री यांचें १५ श्लोकांचें 'पङ्क्तुवर्णनम्' काव्य (७ ६)

कविभूषण ज्वालापति लिङ्गशास्त्री ( ईमनि-आंध्र ) यांचें 'श्रीभवभूति' हें १२ श्लोकांचें काव्य.

योधपुरचे कालूरामव्यास यांचें 'सुजनम् उद्दिश्य' हें ११ सुभाषिताचें काव्य (७ ८)

आचार्य वासुदेव द्विवेदी यांचें ५२ श्लोकांचें 'सुरभारतीसन्देश' हें काव्य. (७ ९)

श्यामनन्दनशास्त्री कवींचें 'प्रीतौ दीनत्व महुकरणम्' गेयकाव्य (७ ११)

श्यामनन्दनशास्त्री ( गुरुकुलमहाविद्यालय, देवघर क्षेत्र ) यांचें 'पावसगानम्' हें गेयकाव्य. (७ १२)

कालूरामव्यास यांचें ७ श्लोकांचें 'शिशिरमुद्दिश्य' हें काव्य. (८ ३)

## भारतीपत्रिकेतील विविध लेख

लक्ष्मीनारायण पुरोहित, साहित्याचार्य, महाराणा संस्कृत कॉलेजातील साहित्याचे प्राध्यापक ( उदयपुर )—संस्कृतशिक्षा ( प्रबंध ) ( ४, १० )

देवर्षिमित्र प्रो सत्यदेव वर्मा (अमृतसर) यांचा 'श्रमिकपक्षपात' ही कविता (४,१०)

कलानाथशास्त्री, साहित्याचार्य यांचा 'विचित्रो विच्छेद' हा प्रबन्ध (५, २)

श्री माणीलाल मिश्र (नेछवा) यांचा 'भारतस्य ससद्भवनम्' हा निबंध (५, २)

श्री शिवदत्तशर्मा चतुर्वेद यांचा 'वैदिकराजनीति' हा निबंध (७ १२)

श्री द्विजेन्द्रलालशर्मा पुरकायस्थ (जयपुर) यांचा 'क्षमानन्दम्' हा नाट्यप्रबंध (७, १२)

श्री वैद्यनाथशर्मा वकील, कलकत्ता, यांचे 'भारते भगवान् विष्णु' हें व्यंगचित्र (७, १२)

श्री राधारमणगुप्त यांचा 'अभिनवभारते संस्कृतम्' हा निबंध (५, २)

श्री घण्टारण गुरुघण्टाकर्णाचार्यस्वरूप याचा 'घण्टागौरव' हा हास्यरसप्रधान निबंध (५, २)

प देवकीनन्दनशर्मा, शास्त्री, राजकीय संस्कृत विद्यालयातील प्रधानाध्यापक, शाहपुरा याचा 'शिक्षा शिक्षार्थिनश्च' हा निबंध (५, २)

'मनस्थलनिरोधस्य समस्या'—१ (५, २)

श्री वि भा मुसलगावकर (गुणा, मध्यभारत) याचा 'काव्येषु नाटक रम्यम्' हा निबंध (५, २)

## 'भारती' पत्रिकेतील लेखक

हलिबुराय श्री सीतारामाचार्य (दक्षिण कर्नाटक) याच 'भैमीनिपधीयम्' हें एकांकी नाटक

श्री वासुदेवशास्त्री (नागौर) याची 'महाकवि कालिदास' ही आख्यायिका,

श्री. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर याचा 'मृच्छकटिकनाटकपरीक्षणम्' हा परीक्षणात्मक लेख (७-२, ३)

श्री दीनानाथ त्रिवेदी 'मधुप' याचा 'अमेरिकाया राष्ट्रपतेर्निर्वाचनम् –निर्वाचन पद्धतिश्च।' हा लेख (७-२)

श्री वासुदेवशास्त्री बागेवाडीकर याचा 'शुद्धाद्वैतमते पुष्टिभक्ति' हा लेख

श्री शिवचरण झा (झाशी) याची 'पनिन्' ही गेय कविता (८, १)

डॉ रसिकबिहारी जोशी याचा 'ऐतरेय ब्राह्मणे पशुयागस्य लाक्षणिक अभिप्राय' हा निबंध (८, १)

श्री. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर – याचा 'अजातशत्रु राजेन्द्र' लेख (७, ४)

श्री हीरालाल पाण्डे (भोपाळ) याचा 'मेघदूते देशप्रेम्णो गौरवम्' लेख (७, ४)

श्री. उदयवीरशास्त्री (बीकानेर) याचा 'संस्कृतभाषा शिक्षणावस्था' हा निबंध (७, ४)

श्री. कृष्णलाल 'नादान' दिल्लीनिवासी याच 'प्रतिकार' एकांकी नाटक (७, ४)

श्री जगदीशचन्द्र शर्मा, बी एस्सी. याच 'यूनेस्को–संयुक्तराष्ट्रीयशिक्षा विज्ञान' हें परीक्षण (७, ४)

श्री. श्रीधरप्रसादपन्त (पीलीभीत) याचा 'नार्यो न विस्मरन्तु स्वकीय स्वरूपम्' हा लेख (७, ४)

श्री मल्लिनाथ चौमाल याचा 'भारतीय इतिहास' हा निबंध (७, ६)

श्री गणेशराम शर्मा (झालावाड) याचा 'विचित्ररूपा खलु चित्तवृत्तय' हा निबंध (७, ६)

श्री रामनारायण दीक्षित (कनौज) याच 'गुरुदक्षिणा' हें एकांकी नाटक (७, ६)

श्री. रामेश्वरप्रसादशास्त्री ( डीडवाना ) यांचा ' नलोदयः ' हा टीकाकार-परिचयात्मक लेख (७, ६ )

[ नलोदयकाव्याची टीका राजस्थानांतील नागौर विभागातील डीडवाना या गावीं राहणाऱ्या रामऋषि नांवाच्या विद्वानाने १७ व्या शतकांत लिहिली होती. ]

श्री. चन्द्रशेखर ताम्बे ( जबलपूर ) यांची ' तात्पर्यमवधार्यताम् ' ही कथा (७, ५)

श्री. एन्. बी. भुजंगाचार्य (मद्रास) यांचें 'प्रतिभाविलासः' हें एकांकी नाटक (७, ५)

श्री. वासुदेव नागेश औदुम्बरकर ( धारवाड ) यांचा ' शालासु धर्मशिक्षणं देयं न वा ? ' हा निबंध (७, ५)

स्वामी लक्ष्मणशास्त्री ( नागौर ) यांनी लिहिलेला, 'श्रीविद्वद्भूषणम्' या नांवाचा, १७०० विक्रम संवत्सरांतील श्रीमद् आत्रेयकृष्णभट्ट यांनी रचलेल्या ११ प्रकरणांच्या द्व्यर्थी चित्रकाव्याचा परिचयात्मक लेख (७, ५)

श्री. वासुदेवशास्त्री वागेवाडीकर यांचें 'स्वराज्यं वयं भूषयामो गुणौघैः' हें अष्टक (७,९)

श्री. मांगीलाल मिश्र ( होशियारपुर ) यांचा 'संस्कृतभाषा-एकम् अध्ययनम्' हा लेख (७, ९)

श्री अनन्तनारायणशास्त्री (पुणें) यांचें 'सुवर्णनिष्क्रयः' हें ३ अंकी नाटक (७, ९)

श्री. मल्लादि सूर्यनारायणशास्त्री (आंध्र विश्वविद्यालय) यांची ' काश्मीरराजकविरत्नावलिः ' ही कविता (७, ९)

पं. रामनिवास शर्मा (झालावाड) यांचा 'आर्यसंस्कृति-संस्कृतवाङ्मयपरको विनम्रो दृष्टिकोणः' हा नवीन दृष्टिकोणातून लिहिलेला लेख (७, ११)

श्री गणेशराम शर्मा (झालावाड) यांचा 'ताम्बूलम्' हा निबंध (७, ११)

श्री. अग्निहोत्री अलेवरू सीतारामाचार्य यांचें 'वीरराघवी' हें एकांकी नाटक (७,११)

श्री. वासुदेवशास्त्री वागेवाडीकर यांचा ' राज्ञी लक्ष्मीः ' हा निबंध. (७, ११)

श्री. देवर्षि कलानाथशास्त्री यांचा 'संस्कृतभाषायाः नवीना स्थितिः हा लेख.(७, ११)

## ' मञ्जूषा ' मासिकांत प्रकाशित झालेले अनुवादात्मक लेख

कविवर्य रवीन्द्रठाकुरांच्या कवितेचा ' स्वर्णमृगः ' हा अनुवाद ( डिसेंबर १९५३)

रवीन्द्र ठाकुरकृत 'उर्वशी'-अनुवादक उड्डाली सुब्बारामशास्त्री (मार्च १९५४)

रवीन्द्र ठाकुरकृत ' प्रार्थनातीतदानम् '-अनुवादक श्री. फटिकलालदास (मार्च १९५७)

रवीन्द्र ठाकुरांची कथा ' पुरातनो भृत्यः ' अनुवादक श्री. फटिकलालदास ( फेब्रुवारी १९५७)

Gray's Elegy written in a Country churchyard—

या सुप्रसिद्ध शोककाव्याचा संस्कृत पद्यानुवाद श्री. विष्णुपदशर्मा भट्टाचार्य यानी १९५७ फेब्रुवारीच्या अंकात केला * उदाहरणार्थ पहिलेंच कडवें पाहा—

The curfew tolls the knell of partig day
The lowing herd wind slowly over the sea
The ploughman homeword plods his heavy way
And leaves the world to darkness and to me.

धर्मागारस्य घण्टा क्वणति मुहुरह शेषमायोपयन्ती
गोयूथः शाद्वलेऽतिस्त्यजुग्लिमातिर्याति शब्दायमान ।
श्रान्त्या दीर्घायमाण श्रयति गृहपथ साम्प्रत कैरिकोऽसौ
दत्त्वा ध्वान्ताय सर्वं भुवनतलमिद न्यासरूप तथा मे ॥ १ ॥

श्रीमद् अमिताभभट्टाचार्याच नाटक ' मरमासुर ' या नावाने फटिकलालदासानी अनुवादित केलें (मार्च १९५७)

रवीन्द्रनाथ टागुरकृत 'पादुकाविष्कार ' अनुवादक श्री फटिकलालदास (मार्च १९५७)

Shelley's cloud ह्या काव्याचा 'कादम्बिनी ' नावाचा पद्यानुवाद श्री विष्णु पद भट्टाचार्य यानी केला (जून १९५७)

Longfellow's—a Psalm of life चा अनुवाद श्री फटिकलालदास यानी केला (ऑगस्ट १९५७)

'राजविचार ' हा रवीन्द्रनाथाच्या लेखाचा अनुवाद श्री फटिकलालदास यानी केला (सप्ट १९५७)

'मानी ' हा अनुवाद श्री फटिकलालदासाचा आहे (सप्टेंबर १९५७)

Shelley's to Night-अनुवादक श्री श्रीजीवन्यायतीर्थ (सप्टेंबर १९५७)

रवीन्द्रनाथकृत 'स्वामिलाभ ' अनुवादक श्री फटिकलालदास

'परमहंसकथावलि ' हा अनुवाद शिरोमणि सन्निधानम् सूर्यनारायण शास्त्रींनी केला. (डिसेंबर १९५७)

* * *

---

* याच काव्याचा उत्कृष्ट पद्यानुवाद नागपूरचे म म केशव गोपाळ ताम्हन यानीहि केला आहे (अप्रकाशित)

## संस्कृत नियतकालिकांची भाषाशैली

पाश्चात्य संस्कृतीच्या संपर्काने भारतीयांच्या सांस्कृतिक जीवनात एक नवीन युग अवतरलें. पाश्चात्यांनी प्रवर्तित केलेली जीवनप्रणाली नवशिक्षित भारतीयांनी मोठ्या आदराने अंगीकारिली. त्यामुळे प्राचीन ऋषिमुनींनी प्रवर्तित केलेली शिष्टाचारपद्धति व सनातननीति हळूहळू शिथिल होऊं लागली. पण आर्यांचें आर्यत्वच लोप पावूं लागलें. अशा प्रकारचें सांस्कृतिक संक्रमण पाहून प्राचीन संस्कृतीच्या अभिमानाने उद्दीपित झालेले, प्राचीन शास्त्रामध्ये निष्णात असलेले मोठमोठे संस्कृत पंडित प्राचीन परंपरेचा अभिमान जनतेमध्ये उद्दीपित करण्यासाठी व आपले विचार समाजाच्या कानीकपाळी ओरडून सांगण्यासाठी सिद्ध झाले. पाश्चात्य संस्कृतीने दिलेलें वैचारिक संघर्षाचें व प्रचाराचें प्रसर साधन जें वृत्तपत्र, त्याचा संस्कृत पंडितांनी आश्रय घेतला. संस्कृतात निरनिराळीं वृत्तपत्रे कशीं सुरू झालीं व त्यांनी किती विविध स्वरूपाचें वाङ्मय संस्कृतात निर्माण केलें हें आपण वर पाहिलेंच आहे. स्वधर्म, स्वसंस्कृति व सनातन परंपरा यांच्याविषयीं नितान्त अभिमान जनतेमध्ये उद्दीपित करणें हेंच सर्व संस्कृत नियतकालिकांच्या उदयाचें व त्यांत प्रकाशित झालेल्या साहित्याचें परम प्रयोजन होतें. पाश्चात्य संस्कृतीच्या संपर्कानें अंकुरित झालेले, परंपरेशी विसंगत असे नवविचार भारतातील अनेक प्रादेशिक नियतकालिकांनी प्रसृत केले. पण एकाहि संस्कृत नियतकालिकाने असले काही परंपराविरुद्ध विचारांचें प्रवर्तन केलेलें नाही ही अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. तथापि या संस्कृत वृत्तपत्रांतून नव मताचा समाचार घेत असताना असे अनेक विचार प्रकट झालेले दिसतात की जे इंग्रजी राज्यापूर्वीच्या संस्कृत वाङ्मयात कोठेहि आढळत नाहीत. नवीन भाषेच्या संस्काराने व नवीन विचाराच्याहि संस्काराने संस्कृत वृत्तपत्रांची भाषाशैली परंपरागत अलंकारजड भाषाशैलीहून अगदी वेगळ्या स्वरूपाची झाली. नवलेखकांची वाक्यरचना प्रादेशिक भाषातील गद्यपद्धतीनुसार होऊं लागली. त्यातहि संस्कृत ही अखिल भारतीय भाषा असल्याने व अखिल भारतातील निरनिराळ्या प्रादेशिक भाषांतील वाक्यांची घडण वेगवेगळ्या स्वरूपाची असल्याने, त्या त्या प्रदेशाच्या संस्कृत लेखकाच्या शैलीवर प्रादेशिक भाषेच्या लेखनशैलीची उमटलेली छाप स्पष्ट दिसून येते. लेखनाची भाषा संस्कृत असली तरी देखील लेखनशैलीवरून हा लेखक द्राविड आहे की बंगाली आहे, मराठी आहे की उत्तरभारतीय आहे, हें सहज ओळखता येते. त्याव्यतिरिक्त आङ्ग्ल साहित्याच्या अवगाहनाने संस्कृत लेखकाच्या शैलीवर उमटलेली छाप आणखी वेगळ्याच स्वरूपाची दिसते. इंग्रजी जाणणारे संस्कृत लेखक व इंग्रजी न जाणणारे संस्कृत लेखकहि भाषाशैलीमुळे वेगवेगळ्या प्रभावळींत बसतात.

नवीन संस्कृतीच्या संक्रमणकाळात अनेक नवीन शब्द वृत्तपत्रीय संस्कृत साहित्यात रूढ झाले. उदा.–प्रचारक । सम्पादक । प्रकाशक । आन्दोलनम् । वैज्ञानिक ।

मानवाधिकार । राज्यपाल । राष्ट्रपति । लोकसभा । महापौर । परीक्षागुणा । सत्याग्रह । बहिष्कार । चित्रपट । रङ्गमन्दिरम् । ध्वनिवर्धक । दूरभाष । अग्निरथ (सयानम्) । पुस्तमेघ । धनादेश । विश्वविद्यालय । कलाशाला । द्राक्तरः (डॉक्टर) । मृत्तरी । मार्तेल्यानम् (मोटर) । यासारखे शेकडो नवीन शब्द वृत्तपत्रीय संस्कृत साहित्यात प्रचलित झाले. त्यातील काही शब्दामध्ये जुना अर्थ बीजरूपाने असून नवीन रूढीने निर्माण केलेला अर्थ त्यावर आरोपित करण्यात आलेला आहे उदा०-'चित्रपट' हा शब्द घ्या. भवभूतीच्या उत्तर रामचरितात चित्रपटदर्शनाचा पहिला अंक आहे तेथे चित्रपट हा शब्द वाचावयास मिळतो. पण तो चित्रपट व आजचा चित्रपट यात कितीतरी मोठे अंतर आहे. जुने संस्कृत शब्द ज्या अर्थाने आधुनिक लेखकानी प्रचारात आणले आहेत ते अर्थ प्राचीन कोशामध्ये किंवा प्राचीन वाङ्मयामध्ये कोठेहि आढळत नाहीत. अशाप्रकारे शेकडो नवीन शब्द व नव्या अर्थाचे जुने शब्द वापरण्याचा वृत्तपत्रीय साहित्याने सपाटा चालविल्यामुळे केवळ प्राचीन वाङ्मयाचा व्यासंग करणाऱ्या संस्कृत पण्डिताला आधुनिक संस्कृत लेखकाची भाषा कळणे जड जाते. इंग्रजी राज्याच्या उदया पासून परिस्थितीमध्ये जे स्थित्यंतर घडले त्यामध्ये पूर्वी कधीहि प्रचारात नसलेले आर्थिक, सामाजिक व राजनैतिक व्यवहार पाहावयास मिळतात. पूर्वी कधीहि अस्तित्वात नसलेली यंत्र व उपकरणे सर्रास उपयोगात आली आहेत. त्यामुळे गुण, क्रिया व द्रव्य वाचक जुन्या शब्दाना नवीन अर्थ प्राप्त झाला व या नवीन अर्थाने तेच जुने शब्द वृत्तपत्रकारानी आपल्या लिखाणामध्ये उपयोगात आणले.

नवीन संस्कृतीच्या संपर्कामुळे शब्द व अर्थ यामध्ये झालेले हे स्थित्यंतर केवळ संस्कृतातच आढळते असे नाही. संस्कृतोत्पन्न इतर सर्व प्रादेशिक भाषामध्ये प्राचीन प्रथात नसलेले वर उल्लेखिलेल्या शब्दासारखे असंख्य शब्द सर्रास प्रचलित झाले. प्राचीन शास्त्रामध्ये नवीन नवीन संप्रदाय निर्माण करणाऱ्या जुन्या लेखकानी सुद्धा नवीन पारिभाषिक शब्द निर्माण केले होते व जुन्या पारिभाषिक शब्दाचे नवीन अर्थ रूढ केले होते, हे विद्वानाना सांगावयाची आवश्यकता नाही भाषेमध्ये अशा प्रकारची स्थित्यंतर वेळोवेळी होतातच. संस्कृतातले अनेक शब्द प्रादेशिक भाषामध्ये निरनिराळ्या अर्थाने वेगवेगळ्या प्रदेशात रूढ झाले. उदा०- 'अस्तित्व' या अर्थाचा 'सत्ता' हा संस्कृत शब्द, मराठी भाषे मध्ये आज 'स्वामित्व' या अर्थी रूढ झाला आहे तोच शब्द कानडी भाषेमध्ये 'मरण' या अर्थाने वापरण्यात येतो आदरणीय व्यक्तीचा बहुमान या अर्थी 'सत्कार' हा शब्द मराठीत वापरतात तोच शब्द बंगालीमध्ये 'प्रेतयात्रा' या अर्थाने वापरण्यात येतो 'अनुरोध' शब्दाचा 'अनुसरण' हा अर्थ मराठीत साधारणत करतात. हिन्दीमध्ये 'आग्रह' या अर्थी त्या शब्दाचा प्रयोग होतो.

'संशोधन' हा शब्द मराठींत 'अन्वेषण' या अर्थी वापरतात. हिन्दीमध्ये त्याअर्थी 'गवेषणा' शब्द रूढ झाला असून, संशोधन शब्दाचा अर्थ 'उपसूचना' (amendment) असा होतो. अशाप्रकारें अनेक संस्कृतोपन्न शब्दांचे वेगवेगळ्या प्रादेशिक भाषामध्ये परस्पर विसंगत अर्थ रूढ झाले. त्याच प्रतिबिंब संस्कृत नियतकालिकांतील लेखामध्ये भरपूर प्रमाणात उमटलेलें दिसून येतें. अप्रगल्भ बुद्धीचे होतकरू संस्कृत लेखक प्रादेशिक अर्थानीच संस्कृत शब्दाचा प्रयोग आपल्या लिखाणात करतात. तें चुकीचे शब्दप्रयोग पाहिले म्हणजे लेखक कोणत्या प्रातातला आहे हें तत्काळ लक्षात येतें. अशाप्रकारें संस्कृत नियतकालिकामुळे भाषेमध्ये व शैलीमध्ये जें परिवर्तन घडून आलें त्यामुळे एकूण संस्कृत साहित्यात एक प्रकारची अभूतपूर्व क्रांति घडून आली आहे. या क्रांतीचा अत्यंत चागला भाग म्हणजे जुन्या संस्कृत लेखनातील जटिलता, क्लिष्टता व आत्यंतिक अलंकार निष्ठता जवळजवळ विल्यास गेली. संस्कृत भाषेमध्ये कोणत्याहि प्रकारचे आधुनिक विचार सुबोधपणे अभिव्यक्त करण्याचे सामर्थ्य आहे, ही गोष्टहि नवीन भाषाशैलीच्या द्वारा सिद्ध झाली व त्यामुळेच संस्कृत हीच भारताची खऱ्या अर्थाने राष्ट्रभाषा आहे व तीच राष्ट्रभाषा झाली पाहिजे असा विचार संस्कृतज्ञ लोक मोठ्या आवेशाने प्रतिपादन करू लागले. संस्कृत भाषेच राष्ट्रभाषात्व सिद्ध करणारे शेकडों लेख संस्कृत वृत्तपत्रांतूनच नव्हे तर सर्व भाषांतील वृत्तपत्रांतून लिहिण्यात येऊ लागले. हा तेजस्वी विचार संस्कृतात नियतकालिकांनी प्रसृत केलेली अभिनव, सुबोध, धारावाही लेखनशैली उदयास आली नसती तर कधीहि मांडण्यात आला नसता.

---

## प्रकरण २६ वे

# आधुनिक साहित्यांतील हास्यरस

प्रसिद्ध संस्कृत काव्य-नाट्यातील शृंगार, वीर आणि करुण यातील रसांचें प्राधान्य ज्यांनी अनुभविलें आहे त्यांचा साधारणपणें असा समज होतो की संस्कृतांत हास्यरसप्रधान साहित्य नाही. तथापि हास्यरस निर्माण करणारीं स्फुट सुभाषितें अनेकदा काही चतुर वक्त्याच्या तोंडून ऐकावयास मिळाल्याने तो समज चुकीचा असल्याची क्वचित् जाणीव होते. कोणत्याहि साहित्याचें साकल्याने पर्यालोचन केलें असता असें लक्षांत येतें की निरनिराळ्या काळांत निरनिराळ्या रसाविषयीं रसिक समाजामध्ये विशेष अभिरुचि असते. समाजाची ही रसाभिरुचि आणि समाजाची उन्नतावनतावस्था यामध्ये काही कार्यकारणसंबंध असतो असेंहि काही विचारवंतांचे मत आहे. उदाहरणार्थ, ज्या काळांत शृंगारिक साहित्याचा अतिरेक होतो, त्या काळांत समाजाच्या अवनतीला प्रारंभ झालेला असतो. तो समाज दुर्बल झाल्याने, परकीयांचें आक्रमण झाल्यास लवकरच पराहत होतो. या सिद्धांताचें अर्वाचीन निदर्शन म्हणून महाराष्ट्रांतील शिवकालीन व पेशवेकालीन मराठी साहित्याकडे अंगुलीनिर्देश करण्यांत येतो त्याच त्या प्रकारचें रटाळ साहित्य निर्माण होऊं लागल्यास रसिकवर्ग रुचिपालट अनुभविण्यासाठी उत्सुक होतो. तो रुचिपालट ज्याच्या साहित्यांत अनुभवास येतो, त्याला तो डोक्यावर घेतो. युगप्रवर्तक म्हणून त्याचा गौरव होतो.

रसाभिरुचीच्या संबंधांत मतभेद नित्यच असतात. हे आपले मतभेद प्राचीन साहित्यशास्त्रज्ञांनी—

"शृंगार एव मधुरः परः प्रह्लादनो रसः" —ध्वन्यालोक

"एको रसः करुण एव" —उत्तररामचरितम्

'रसे सारश्चमत्कारः सर्वत्राप्यनुभूयते ।
तच्चमत्कारहेतुत्वे सर्वत्राप्यद्भुतो रसः
तस्माददद्भुतमेवाह कृती नारायणो रसम् ॥ —साहित्यदर्पण

यासारख्या वचनांतून व्यक्त केलें असून क्वचित् आपल्या मताच्या समर्थनार्थ चर्चाहि केलेली आहे. 'युद्धस्य वार्ता रम्या च' हें सुभाषित लिहिणाऱ्याने

वीररसाविषयीची आपली आवड सूचित केली आहे. रूपगोस्वामींनी आपल्या 'उज्ज्वलनीलमणि.' या साहित्यशास्त्रविषयक ग्रन्थात भक्तिरसाचें पृथक् अस्तित्व व त्याचें प्रतिपादन केलेलें आहे. त्याचें मत साऱ्या संतकवींनी आपल्या अपार साहित्यानें परिपुष्ट केलें. समर्थ रामदासासारख्या श्रेष्ठ पुरुषानें 'भक्तिहीन जे जें वचन। तें तें जाणावें श्वानाचें वमन' अशा शब्दात भक्तिकाव्याचें श्रेष्ठत्व व भक्तिहीन काव्याचें निकृष्टत्व ठसठशीत शब्दात सांगितलें आहे. तात्पर्य निराळ्या काळात निरनिराळ्या रसासंबंधीं साहित्यिकांना व सहृदयांना विशेष आकर्षण वाटत होतें असें अनुमान, रसाचें बदलतें प्राधान्य पाहून कोणी काढले तर तें फारसे अप्रस्तुत होणार नाही. पण त्याचा अर्थ असा समजू नये की, शृंगारिक काव्यें समाजात विशेष प्रिय होतीं तेव्हा वीररसपूर्ण किंवा हास्यरसमय काव्याचे रसिक समाजात नव्हतेच! शृंगारिक काव्याच्या काळात करुण, वीर, भक्ति इत्यादि निरनिराळ्या रसानी युक्त अशा काव्यात तल्लीन होणारे व शृंगारिक काव्याना 'रण्डागीतानि' म्हणून हिणविणारे लोक असलेच पाहिजेत. 'शृंगाराच्या माथा पाय ठेवणारा' शांतरस मराठी भाषेत ज्ञानेश्वरानी ओतला तेव्हा शृंगारिक काव्यें आळविणारे रंगेल कवि महाराष्ट्रात नव्हते, असें अभावाचें विना अनुल्लेखाचें प्रमाण देऊनच फार तर कोणी सिद्ध करू शकेल. त्या काळींहि शृंगारिक काव्यें करणारे कवि व त्याचे रसिक समाजात असतीलच पण त्याना त्या काळाचे प्रतिनिधि मानता येणार नाही. पारतन्त्र्याच्या काळात देशभक्ति व्यतिरिक्त विषयावर साहित्यनिर्मिति करणारे भरपूर लेखक होते. त्याना आपण त्या काळातल्या साहित्याचे प्रतिनिधि मानू काय?

संस्कृत साहित्यशास्त्रज्ञात शृंगार, वीर, करुण, अद्भुत, भक्ति या रसाना आपापल्या अभिरुचीनुसार अग्रपूजेचा मान देणारे लोक आहेत. त्यात हास्यरसाला हा मान देणारा कोणी आढळत नाही. तथापि संस्कृत साहित्यात हास्यरसप्रचुर रचना होत होती असें दिसतें. नाट्यवाङ्मयातील विदूषकाच्या द्वारा निर्माण करण्यात येणारा हास्यरस यामध्यें जमेस धरावयाची आवश्यकता नाही.

सुभाषित रत्नभाण्डागारात 'हास्यरसनिर्देश' या शीर्षकाखाली एकूण फक्त ५६ श्लोक संकलित केले असून त्यामध्यें निर्लज्ज, लाडाड, कायस्थ, वेश्या, वेश्यागमनी, दोन बायकांचा नवरा, जावई, धूर्त वाणी, निरक्षर, वेड्यावाकड्या ताना मारणारे गवई, व्यभिचारी बौद्ध भिक्षु, पाठान्तर न करणारे 'पाठक', कुरूप वेश्या इत्यादि लोकांची खिल्ल उडविणाऱ्या श्लोकांचा संग्रह आहे.

'हास्यरसनिर्देश' या प्रकरणातील श्लोकाची अल्पसंख्या व त्याचेसोबत त्याच सुभाषित भाण्डागारातील शृंगारविषयक प्रकरणाचें वैविध्यपूर्ण वर्गीकरण आणि त्यातील प्रत्येक विषयावरील सुभाषितांचें वैपुल्य पाहून संग्रहकर्त्यांना विनोदबुद्धीन

नव्हती असा ग्रह होण्याची शक्यता आहे. पण तसा ग्रह करून घेणं योग्य नाही. सुभाषित रत्नभाण्डागारम् हा कोश असल्याने विषयानुरोधाने त्यात श्लोकांचं वर्गीकरण केले गेले आहे त्यामध्ये विविध विषयावरील सुभाषितात उत्कृष्ट हास्यरसाची छटा आढळून येते. उदाहरणार्थ-शिव, पार्वती इत्यादि देवतांच्या स्तुतीपर अनेक श्लोकात इतक्या उत्तम प्रतीचा विनोद आढळतो की तसा इतर भाषात आढळणार नाही. उदाहरणार्थ —

तात तत्ताततात क्वयय हरकुले लङ्कृते सम्प्रदाने
तच्छ्रुत्वा चन्द्रमौलिर्नतमुखकमलो जातलज्जो बभूव ।
ब्रह्मावादित् तदानीं श्रृणुत हरकुल वेदकण्ठोग्रकण्ठौ
श्रीकण्ठाग्नीलकण्ठ प्रहसितवदन पातुवश्चन्द्रचूड ॥

(शंकरपार्वती-विवाहाच्या प्रसंगीं पूर्वजांचीं नावं सांगा म्हणून नवरदेव शंकराला पुरोहिताने म्हटलें. शंकर हा अनादि. त्याला पूर्वजच नसल्याने तो निरुत्तर झाला असता, ब्रह्मदेवाने वेळ मारून नेण्यासाठी वेदकण्ठ, उग्रकण्ठ श्रीकण्ठ, नीलकण्ठ, हीं शंकरांचींच नावं पूर्वजांचीं नावं म्हणून सांगितलीं ! )

हर्षादम्भोजजन्मप्रभृतिविविधवधूं ससदि प्रीतिमत्या
श्वश्र्वा मौलौ पुरारेर्दुहितृपरिणये साक्षते चुम्ब्यमाने ।
तद्वक्त्र मौलिवक्त्रे मिलितमिति भृश वीक्ष्य चन्द्र सहासो
दृष्ट्या तद्वृत्तमाशु स्मितसुभगमुख पातुवश्चन्द्रचूड ॥

(पार्वतीची माता आपल्या पचमुखी जावयाच्या मस्तकाचं प्रेमाने अवघ्राण-चुम्बन घेत असता, शंकराच्या मस्तकावरील पाचव्या मुखाचं चुम्बन तिला घडलें.)

क्व तिष्ठतस्ते पितरौ ममेवेत्यपर्णयोक्ते परिहासपूर्वम् ।
क्व वा ममेव श्वशुरौ तवेति तामीरयन् सस्मितमीश्वरोऽव्यात् ।

(पार्वतीने शंकराला थट्टेनं म्हटलें, 'तुम्हाला माझ्यासारखे आईवडील कुठे आहेत ?' त्यावर शंकराने उत्तर दिले, 'तुला तरी माझ्यासारखे सासुसासरे कोठे आहेत ?')

युगपत् स्वगण्डचुम्बनलोलौ पितरौ निरीक्ष्य हेरम्ब ।
तन्मुखमेलनकुतुकी स्वाननमपनीय परिहसन् पायात् ॥

(आई वडील एकदम आपलं चुम्बन घेण्याचा प्रयत्न करीत आहेत हें पाहून चाणाक्ष पुत्राने—गणपतीने—आपलें मुख एकदम मागं ओढून गमत पाहिली.)

विष्णोश्चागमन निशम्य सहसा कृत्वा फणीन्द्र गुण
कौपीन परिधाय चर्म करिण शम्भो पुरो धावति ।

दृष्ट्वा विष्णुरथं सकम्पहृदयः सर्पोऽपतद् भूतले,
कृत्तिर्विस्खलिता ह्रिया नतमुखो नग्नो हरः पातु वः ॥

(भुजंगाचा कंबरपट्टा कंबरेभोवतीच्या गजचर्मावर बांधून, गरुडवाहन विष्णूच्या सत्कारार्थ शंकर पुढे गेले. तोंच गरुडाला पाहून भुजंग भयभीत होऊन गळून पडला. त्याबरोबर पाहुण्यासमोर शंकर दिगम्बर झाले.)

प्राचीन संस्कृत साहित्यिकांच्या विनोदबुद्धीची चुणुक वरील सुभाषितांसारख्या विविध विषयांवरील शेकडो सुभाषितांतून लक्षांत येते. त्यांचे योग्य प्रकारे संकलन केलें तर संस्कृत साहित्यात हास्यरस नाही हा अपसमज सहज दूर होईल.

प्राचीन साहित्यात कुट्टिनीमतकर्ता दामोदरभट्ट (११ वें शतक) व देशोपदेश आणि नर्ममाला यांचा लेखक क्षेमेन्द्र या दोन काश्मीरी लेखकांनी आपल्या ग्रन्थांत हास्यरसाचा भरपूर परिपोष केला आहे. हास्यप्रधान ग्रन्थाचे दामोदरभट्ट व क्षेमेन्द्र हेच प्रमुख प्राचीन लेखक आहेत असें म्हटल्यास चूक होणार नाही.

कुट्टिनीमत काव्यांत दामोदरभट्टाने समय नामक आठ प्रकरणातून प्रवरपुरांतील कलावती नामक वेश्येला एका म्हाताऱ्याकडून जो उपदेश केला आहे त्यातून हास्य उत्पन्न होतें. वेश्यागमनी लोकांच्या अंतःकरणांत वेश्येविषयी प्रतिकूल भाव निर्माण व्हावा या हेतूने हा उपदेश उपरोध पद्धतीने केलेला आहे.

क्षेमेन्द्राच्या देशोपदेशांत[1] एकूण आठ उपदेशांत कंजूष, वेश्या, गौडछात्र, म्हातारा जावई, वैद्य, वाणी, कायस्थ, इत्यादिकांचे दोष विनोदी पद्धतीने दाखविले आहेत.

उदा० गौडच्छात्राचे वर्णन पहा—

अलिपिज्ञोऽप्यहंकारः स्तब्धो विप्रतिपत्तये
गौडः करोति प्रारम्भं भाष्ये तर्के प्रभाकरे ।
स्पर्शं परिहरन् याति गौडः कक्षाकृताञ्चलः
कुञ्चितेनैव पार्श्वेण दम्भभारभरादिव ॥

**नर्ममाला** या काव्यांत परिहासनामक एकूण तीन प्रकरणांतून कायस्थ, नियोगी, परिपालक (राज्यपाल), नाकिक (गुप्तचर) लेखक इत्यादि राज्याधिकारी मंडळींचे पैसे खाण्याचे धंदे क्षेमेन्द्राने विनोदी शैलींत रंगविले आहेत. हा हास्यरस समाजाला हितोपदेश करण्यासाठी निर्माण केला असें क्षेमेन्द्राने,

---

१. काश्मीर संस्कृत सिरीजमध्ये १९२४ मध्ये प्रकाशित.

" अपि सुजनविनोदायोम्भिता हास्यसिद्ध्यै ।
कथयति फलभूत सर्वलोकोपदेशम् ॥ (नर्ममाला ३–११४)

या श्लोकांत स्वच्छ सांगितलें आहे.

रघुवंशाच्या सहाव्या सर्गांतील इंदुमती स्वयंवरासाठी जमलेल्या राजाच्या शृंगारचेष्टांतून व कुमारसम्भवाच्या ५ व्या सर्गांतील छद्मी ब्रह्मचारी व तपस्विनी यांच्या संवादांतून कविकुलगुरु कालिदासाच्या नर्मविनोदी बुद्धीची भरपूर कल्पना येते. प्राचीन संस्कृत कवींनी हास्यरसाची उपेक्षा केली ही समजूत चुकीची आहे हे सिद्ध करायला एवढें निवेदन पुरेसें आहे. निरनिराळ्या नाटकात विदूषकांनी निर्माण केलेल्या हास्यरसाचीं उदाहरणें देऊन हें प्रतिपादन आणखी वाढविता येईल, पण त्याची येथे आवश्यकता नाही.

निरनिराळ्या काळांत समाजाच्या रसाभिरुचींत परिवर्तन होत असतें, असें आपलें मत आम्ही वर सांगितलें आहे. तदनुसार आधुनिक काळात समाजाला अधिक आवडणारा रस कोणता ? या प्रश्नाचें उत्तर हास्यरस म्हणून देता येईल. आधुनिक काळात जितकें हास्यगर्भ साहित्य निर्माण झालें त्याच्या शतांश देखील प्राचीन काळात निर्माण झालें नव्हतें असें स्पष्ट दिसतें. पाश्चात्य साहित्याच्या संपर्कानें म्हणा किंवा पोटापाण्याच्या, घरादाराच्या विवंचनेनें ग्रस्त झालेल्या आजच्या वाचकाला क्षणभर हसवील अशा साहित्याची आवश्यकता निर्माण झाल्यामुळें म्हणा, ' हास्य ' हाच आज सर्वत्र रसराज झाला आहे. आधुनिक नियतकालिकांतील निश्चित वाचला जाणारा जर कोणता भाग असेल तर तो ' चुटके ', ' धक्के बुक्के ', ' फटाके ', ' मेवामिठाई ', ' आता थोडें हसू या ' यासारख्या चटकदार शीर्षकाखाली प्रकाशित होणारा मजकूर होय.

१९ व्या शतकातील अन्य प्रादेशिक साहित्याप्रमाणे संस्कृत साहित्यातहि हास्यरसाचा प्रवाह निर्माण झाला नव्हता. पुढे मात्र संस्कृत कवींनी हास्यरसप्रधान काव्यें, नाटकें लिहिण्यात भरपूर उत्साह दाखविला आहे. हास्यप्रधानत्व हें आधुनिक साहित्याचें ऐतिहासिक, सामाजिक, राष्ट्रवादी इ. साहित्य प्रवृत्तींप्रमाणें एक प्रवृत्ति वैशिष्ट्य आहे असें म्हणतां येईल अर्वाचीन कालखण्डातील ' माहिषशतकम् '² हें पहिलें हास्यरसप्रधान काव्य म्हणून उल्लेखिता येईल. १७ व्या शतकात तंजावरच्या तुकोजी भोसल्याच्या आश्रयास वांछेश्वर नांवाचा कवि होता. एकदा राजाकडून त्याचा अपमान झाल्यानें तो राजाश्रय सोडून कोठेतरी गेला व तेथे राजा व रेडा यांचें साधर्म्य सूचित करणारे व्याजस्तुतिगर्भ प्रस्तुत शतक लिहून राजाकडे 'सप्रेम भेट' म्हणून पाठवून दिलें. ( कवी सूड घेतात तो असा ! )

२. क्र. १६३ ।

"सुग्रीवोऽसि गजोऽसि भूप वपुषा नीलः प्रभावो तथा
धूम्रश्चासि महानुभावमहित त्वं दुर्मुख केसरी ।
इत्थं ते सतत महाकपिशताकारस्य साहाय्यत
सीता प्राप्य विलङ्घ्य दु खजलधिं नन्दामि राम स्वयम्" ॥

या श्लोकात रामाच्या वानरसेनेतील मोठमोठ्या वानराची उपमा देऊन राजाची व्याजस्तुति केलेली आहे

विठ्ठलपत ( विठोबा अण्णा दप्तरदार ) याच्या विविध काव्याचा परिचय पूर्वी आलाच आहे त्याच्या 'सुश्लोकलाघवम्' मधील प्राय सर्वच सुभाषितें श्लेषमूलक असल्याने अनेक श्लिष्टोपमामुळे हास्यरस निर्माण होतो. उदाहरणार्थ —

अमृतकलालसात्मा विगतस्नेह स्वकामेष्वपि य ।
गिरिकाननासनोऽय मार्जार सयमीव मे भाति ॥

( *गिरिकाननासन* == [१] *गिरि + कानन + आसन = सयमी* [२] *गिरिक* ( उंदराची पिल ) + आनन + आसन = गिरिकानि आननाश्ने यस्य स मार्जार )

*या सुभाषितातील सयमी व बोका याच श्लेषमूलक साधर्म्य भरपूर हास्यो* त्पादक आहे.

जनार्दनो नरहितो भूत्वाकार विपर्ययात्
अवतीर्ण इव प्राय स जर्देत्यभिधीयते ॥

या सुभाषितातील 'जर्दा' ( तंबाखु ) या मराठी शब्दाची सस्कृत निरुक्ति फारच विनोदी आहे. जनार्दन या शब्दातील दोन न काढले व उरलेला आ र्द मध्ये मिळाला म्हणजे जर्दा शब्द सिद्ध होतो 'नरहित' व 'आकारविपर्यय' यातील श्लेष लक्षात घेता जनार्दन व जर्दा यातील औपम्यहि प्रतीत होतें. )

लब्ध्वा वक्षस्यपि पदमिय तीर्थपादस्य विष्णो
वारवार चरणकमल सेवते स्नेहसान्द्रा ।
धन्या कन्या सकलसरिता पत्युरत्युत्तमाङ्गी
युक्त स्त्रीणा भवति यद्गतो मातृगेह सुखाय ॥ सुश्लो १७४

अर्थाहरणकौशल्य किं स्तुम शास्त्रवादिनाम् ।
अव्ययेभ्योऽपि यैरर्था निष्कास्यन्ते सहस्रश ॥ सुश्लो, ४८३

श्रुत्वा विष्णोर्भक्तिमाहात्म्यचर्चा
कामान्धानां मूर्च्छुदेतीव शूलम् ।

मूर्धान्दोलं ग्रामगीते वदन्ति
'वा वा रांडी ठीक क्या बात हो हो' ॥ मुद्गलो ४९०

लिङ्गरामशंपरा व्यभिचारविचारका हि तर्कज्ञा ।
कल्पन्तीश्वरसिद्धि तद्धि विपुलमत्र चित्रकृद् भवति ॥ ४९० ॥

यासारख्या अनेक श्लोकांतून विठ्ठलपन्तांची मार्मिक विनोदबुद्धि प्रत्ययास येते.

**कपीनाम् उपवास** — या काव्यात श्रीशैल ताताचार्य (श्री. टी. टी. ताताचार्य शिरोमणि–जन्म इ. १८९२ ) यांनी प्रस्तुत काव्यात चंचल मनाच्या लोकांच मतपालन कसें असतें, त्याचें उत्तम दर्शन घडविलें आहे.

कालिदासाच्या मेघदूताचें विडम्बन करणारें 'काकदूतम्' या नावाचे काव्य धारवाडचे सहस्रबुद्धे शास्त्री यांनी लिहिलें आहे.[3]

श्री. एस. आर. राजगोपाळ अयगार यांनीहि 'कालदूतम्' याच नावाचें एक विडम्बन काव्य लिहिलें असून त्यांत तुरुंगातल्या चोराचा दौत्य यावर करतो असें वर्णिलें आहे.

श्री. के. व्ही. कृष्णमूर्ति शास्त्री (पुणें) यांनी तसेंच 'शुनकदूतम्' हें विडम्बनकाव्य लिहिलें असून त्यांत तुरुंगातला एक कैदी एका कुत्र्याबरोबर प्रेयसीकडे संदेश धाडतो असें वर्णन केलें आहे.

**वल्लवदूतम्** — हिंदु विश्वविद्यालयाचे भूतपूर्व प्राध्यापक बटुकनाथ शर्मा यांनी प्रस्तुत विडम्बन काव्य लिहिलं आहे.[4]

**मुद्गरदूतम्** —प. रामावतार शर्मा यांच्या प्रस्तुत विनोदी काव्याचा उल्लेख दूतकाव्यविषयक प्रकरणात आला आहे. हें काव्य वाराणसीतील 'सुप्रभातम्' या नियतकालिकात प्रकाशित झालं होतं

मेघदूताचे विडम्बन करणाऱ्या या विविध विनोदी दूतकाव्याचें स्वरूप ध्यानात येण्यासाठी रामावतारशर्मा यांच्या मुद्गरदूतातील काही श्लोक पाहा—

किं मे पुत्रैर्गुणनिधिरयं तात एवैष पुत्र
शून्यध्यानेरतदहमधुना वर्तये ब्रह्मचर्यम् ।
कश्चिन्मूर्खश्चपल–विधवा–स्नान–पूतोदकेषु
स्नाते पुर्वनिति समवसत् कामगिर्याश्रमेषु ॥

३ इ १९१७ मध्ये धारवाड येथे मुद्रित ४ अहमदनगर येथे इ १९४० मध्ये मुद्रित. ५. इ २५४।

शास्त्रज्ञानामपि ननु तनुर्दूषितावस्कराद्यैः
शुद्धः कः स्याद् गुरुरिति भुवं सम्भ्रमन् मूर्खदेवः ।
वव्रे कञ्चिद् गुरुमय शकृत्पूयरक्ताविशून्यं
चैत्ये कस्मिंश्चन विनिहितं जीर्णपाषाणखण्डम् ॥

श्रुत्वा मृत्युं जरठविदुषः कस्यचित्काशिकायां
शिष्यैः पृष्टः कथय भगवन् कारणं तस्य मृत्योः ।
मोतंर्द्वीपान्तरगतिमयं शंसति स्मैव विप्रः
तस्माद् यातो यमगृहमसावित्युवाच स्वशिष्यान् ॥

काले याते पितरमथ च व्याधितं शुश्रुवान् स
ग्रामं गत्वा झटिति जरठं तं समाच्छिद्य वैद्यात् ।
वैद्यो नारायण इति वदन् स्नापयित्वापगायाम्
एकादश्यामजलरसनं मारयामास तर्षात् ॥

एकं ब्रह्म स्फुटमिह मृषा पुण्यपापादि भेदः ।
स्पृङ्मुद्राद्यैः स्पृशति न यमो धर्मलिङ्गैरुपेतम् ॥
भार्यापुत्राद्विकपरिहृतिः स्वर्गसोपानधारा ।
जल्पन्नित्थं जगति विदधे पातकस्य प्रचारम् ॥

शतककाव्यांतील विनोदी काव्यें पुढीलप्रमाणे आहेत—

**पलाण्डुशतकम्**—जयपूर येथील आयुर्वेदाचे अध्यापक श्रीकृष्णराम शर्मा यानी पलाण्डु = कांदा या लोकप्रिय विषयावर प्रस्तुत विनोदी शतक लिहिले असून त्याव्यतिरिक्त 'सारशतकम्', 'आर्यालंकारशतकम्', 'मुक्तावलीमुक्तकम्' व 'होलिमहोत्सवः' हीं अवान्तर काव्यें लिहिलीं आहेत. पलाण्डु (कांदा) या विषयावर मुट्टु विठ्ठलाचार्य यांनी लिहिलेलें **पलाण्डुप्रार्थना** या नांवाचें आणखी एक विनोदी काव्य सहृदया पत्रिकेंत (वर्ष ८ वें) प्रकाशित झाले होतें.

**होलिकाशतकम्**—होलिमहोत्सवः काव्याचा वर उल्लेख केला आहे. त्याच विषयावर अलमोडा येथील विश्वेश्वर कवीने १८ व्या शतकाच्या आरंभीं प्रस्तुत विनोदी काव्य लिहिलें होतें.[६] त्याव्यतिरिक्त 'वक्षोजशतकम्', 'रोमावलीशतकम्', हीं शृंगारहास्यप्रधान शतकें व आर्याशतकम्, रुक्मिणीपरिणयम् (नाटक), नवमालिका (नाटिका), मन्दारमञ्जरी (गद्यकथा), लक्ष्मीविलासम्, षड्ऋतुवर्णनम्, कवीन्द्रामरणम्, (४ सर्गांचें चित्रकाव्य) नैषध टीका, रसमञ्जरी टीका इत्यादि विविध विषयावर श्री विश्वेश्वरानें लेखन केलें आहे.

---

६. क्र. ३१२

सम्मार्जनीशतकम्—या काव्यांत अनन्ताचार या मैसूरकडे येथील कवीने केरसुणीचें महत्त्व विनोदी पद्धतीने निवेदन केलें आहे. याच विषयावर 'मार्जनी' हें सुटकाव्य व एक विनोदी निबंध (संस्कृतचन्द्रिकेमध्ये, वर्ष ५ वें) प्रकाशित झाले आहेत.

अखिल मानवजातीला युगानुयुगें पीडित करणाऱ्या ढेकूण व डास या क्षुद्रजीवांनी विनोदी काव्यांत स्थान पटकावलें आहे.

"क्षीराम्बुधौ हरिः शेते हरः शेते हिमालये
ब्रह्मा पद्मासने शेते मन्ये मत्कुणशङ्कया ॥"
'प्राणपादयोः पतति खादति पृष्ठमांसं ।'

यासारख्या स्फुट सुभाषितांतून प्राचीन कवींनी या उपद्रवी जीवांचें वर्णन केलें आहे. आधुनिक काळांत पुण्याचे श्री कृष्णमूर्ति शास्त्री यांनी लिहिलेलें एक '*मत्कुणाष्टकम्*' सदरच्या पत्रिकेंत प्रसिद्ध झालें होतें. *संस्कृत साहित्य परिषद्* पत्रिकेत (फेब्रु. १९२८) मुक्तिविहारी दासगुप्त यांनी लिहिलेलें आणखी एक 'मत्कुणाष्टकम्' प्रसिद्ध झालें होतें.

श्री. स्वामीनाथ शर्मा (आत्रेय) यांनी मशकविषयक श्लोक लिहिले आहेत.

कलिविडम्बनम्—हें शतककाव्य नीलकण्ठ दीक्षित यानें लिहिलें असून त्यामध्ये—

"न भेतव्यं न बोद्धव्यं न श्राव्यं वादिनो वचः ।
झटिति प्रतिवक्तव्यं सभासु विजिगीषुभिः ॥"
"प्रामाण्यबुद्धिः स्तोत्रेषु देवताबुद्धिरात्मनि ।
कीटबुद्धिर्मनुष्येषु नूतनायाः श्रियः फलम् ॥"

यांसारख्या सुभाषितांतून उपरोधगर्भ विनोद केला आहे.

कलियुगाचार्यस्तोत्रम्, कलियुगमनावर्णनम्, कलिवृत्तादर्शपुराणम् हीं कलियुगविषयक अवान्तर विनोदी काव्यें कुरुंदवाडचे पाटये शास्त्री यांनी लिहिलीं आहेत. कलिवृत्तादर्शपुराणामध्ये,

"सुधारकेषु ये मुख्याः सभालेक्चरशोडिणः ।
पण्डितास्ते ब्रुवन्त्येवं वयं प्रोफेसरा इति ॥"

यासारख्या आंग्लशब्दांकित संस्कृत श्लोकांतून आधुनिक सुधारकबुवांची टिंगल शास्त्रीबुवांनी केली आहे.

यांही विडम्बनात्मक दूतकाव्यांचा उल्लेख वर केलाच आहे. धारवाडचे सहस्रबुद्धे शास्त्री यांनी 'चहागीता' नांवाचें एक विडम्बन काव्य लिहून नवीन सुधारक मंडळींत बळावलेल्या व्यसनावर उपरोधगर्भ टीका केली आहे. चहागीतेमध्ये—

मूर्खाणां विपर्वार्पणीं भगवतीं वंशाचलाध्यायिनीम्।
अम्ब त्वामनुसन्दधामि खलु 'टी'-गीते पयोद्वेषिणीम्॥

असे चहाध्यान आरंभीं केलें असून अध्यायांच्या शेवटीं—

"इति श्री मच्चहागीतोपनिषत्सु रथ्याकुल्यायां पतनशास्त्रे
चहातद्भक्तसंवादे अनर्थपरम्परा नाम षष्ठोऽध्यायः"

या वाक्यांतून व

'यत्र पेयेश टी-देवो यत्र कप्पधरा नराः।
तत्राल्पायुर्विपद् रोगा ध्रुवान्नीतिर्मतिर्मम॥'

यासारख्या श्लोकांतून भगवद्गीतेचें विडम्बन स्पष्ट दिसतें.

चहागीतेंतील पितापुत्रांचा विनोदी संवाद पाहा—

पिता – धूम्रपानं कुतो वत्स ?
पुत्र – जलं तेन न बाधते।
पिता – कस्मात् कॉप ?
पुत्र – वर्तते तेन मस्तिष्कं शीतलं सदा।
पिता – कुतः क्यापम् ?
पुत्र – रुमालस्य भारेण व्यथते शिरः।
पिता – चहापानेन किम् ?
पुत्र – तेन, तन्द्राल्नुर्नरो भवेत्॥
पिता – टाइट कोटादिभिः किं ?
पुत्र – न स्याच्चरस्तेन तुन्दिलः।
पिता – सेवते मदिरां कस्मात्
पुत्र – सा प्लेगप्रतिबन्धिका॥

चहागीतेच्या शेवटीं 'टिये नमः टिये नमः टियेः नमो बिडीस्वामिने टिये। झुर् झुर् भुस्। सोडावाटराय फट्॥ या पद्धतीनें समाप्ति केली आहे.

चहाच्या बरोबरीने नवीन समाजांत प्रिय झालेलें पण जुन्या पिढीच्या लोकांना चहाप्रमाणेच अप्रिय असलेलें पेय जें कॉफी, त्याविषयीं लिहिलेलीं आत्रेय कविकृत 'कॉफीषोडशिका', एम्. व्ही. सम्पतकुमार आचार्यकृत 'कॉफीपानीयम्'

७. संस्कृत साहित्य परिषत् पत्रिका, १९४१ एप्रिल.

व 'कॉफी-त्याग-द्वादशमञ्जरीका' (श्रीशंकराचार्यकृत द्वादशपञ्जरिका स्तोत्राचे विडम्बन) ही विनोदी काव्यें उल्लेखनीय आहेत. वेंकटेश्वर नावाच्या एका कवीने नुकतेच 'कॉफीशतकम्' हें काव्य लिहिलें असून त्यात

'यानि कानि च पापानि जन्मान्तर-कृतानि च ।
तानि सर्वाणि नश्यन्ति कॉफीपानात् पदे पदे ॥'

यासारख्या विडम्बनात्मक श्लोकांतून कॉफीविषयक विनोद केला आहे.[८]

हा विडम्बनात्मक विनोदी काव्यप्रकार आधुनिक संस्कृत कवींत बराच प्रिय झालेला दिसतो. लखनऊचे शालग्रामशास्त्री (साहित्यदर्पणावरील 'विमला' या हिन्दी टीकेचे लेखक) हे आशुकवि होते. इ. स. १९२३ मध्ये काशींत झालेल्या अखिल भारतीय संस्कृत सम्मेलनात प. मदनमोहन मालवीय यांनी चर्चेसाठी प्रश्न उपस्थित केला की, "अस्ति किं संस्कृतभाषायाम् ईदृशी शाश्वती लोकोत्तरोपकारिता यस्याः अध्ययनाध्यापनार्थं सर्वैरपि आर्यवंशीयैः सार्वजनीन शाश्वतप्रयत्नार्थं प्रयत्नः करणीयः ? यद्यस्ति तर्हि के च ते सर्वोत्कृष्टा उपाया' यैः इदम् *अभीप्सितं प्राप्तुं शक्यते ?" त्याच वेळीं मालवीयजींनी असा दुसरा प्रश्न* उपस्थित केला की संस्कृत शास्त्राचें अध्यापन हिंदी माध्यमातून का करू नये?" या दुसऱ्या प्रश्नाचें उत्तर प. शालग्रामशास्त्रींनी 'पाश्चात्यशिक्षादूषणानि' या नावाचें एक प्रखर टीकात्मक काव्यात देऊन बराच विनोद निर्माण केला. तो असा–

चातुर्यं चाकरीमात्रे कौशलं बूटपालिशे ।
भाले लिखति चैतावत् शिक्षा पाश्चात्यचालिता ॥
बी ए-पर्यन्त-शिक्षायां सहस्राणां तु विंशतिः ।
व्ययीभवति वित्तं तु केवलं दासवृत्तये ॥
यदि स्यान्मूसलस्थूलं भाग्यं प्रीताश्च देवताः ।
तदा 'बाबू' समाप्नोति वेतनं ख-शराङ्कितम् ॥५०॥

विक्रीय तु पितुर्गेहं बन्धकीकृत्य भूषणम् ।
मातुर्वापि स्वश्रुर्वापि बी ए-पर्यन्तमागतः ॥
करालजठरज्वाला कवलीकृतमानसः ।
भारताकृतिराङ्ग्लोऽसौ विश्वं पश्यति शून्यवत् ॥
एम् ए-पर्यन्तमुत्तीर्ण इतिहासे प्रतिष्ठितः ।
छात्रो न वक्तुं शक्नोति भीष्मः कस्य सुतोऽभवत् ॥

---

८. या 'काफीशतकम्'ची माहिती श्रीरंगम्चे विख्यात संस्कृत वक्ते श्री रघूत्तमाचार्य यांनी आम्हास कळविली

आङ्ग्लेयाना तु को राजा कतिवार व्यमूत्रयत ।
इति सर्व विजानाति न जानाति स्वक गृहम् ॥

इ १९३१ मध्ये अ भा. संस्कृत साहित्य सम्मेलनान्तर्गत कविसम्मेलनाचे पं. शालिग्रामशास्त्री हे अध्यक्ष होते. आपले सपूर्ण अध्यक्षीय भाषण त्यानी पद्यातच केले. त्या भाषणातहि पाश्चात्य शिक्षणाची वर दिलेली निंदा त्यानी उद्धृत केली होती.

जयपूरच्या भट्ट मथुरानाथ कवींनी भरपूर गेय काव्ये मागील (२० व्या) प्रकरणात उद्धृत केलेली आहेत. त्यानी गौराङ्गानुकारी मिस्टर चपेगमन याची एका गेय काव्यात थट्टा केली आहे 'चपेगमन' निरपराध पाखराची शिकार करण्या साठी झाडावर बसले असता,

"तावत पेण्टलून-विवरेण फ़ुफलास कोऽपि ।
रिङ्गन् रिङ्गन् निभृतमयासीत् कटिपद्धतौ ॥"

आणि त्यानतर गोंधळलेल्या अवस्थेत 'जेण्टलमन् महाभाग पतित क्षितौ ॥' असा शिकारीचा शेवट झाला

## साहित्यविनोदराज[१]

कल्याणचे श्री दया. वि राजे, वकील यानी लिहिलेल्या सत्तर श्लोकाचा प्रस्तुत काव्यसग्रह संस्कृतातील विनोदी साहित्यात अनेक दृष्टींनी वैशिष्ट्यपूर्ण आहे. काव्याचे विषय सर्वथा आधुनिक स्वरूपाचे आहेत काव्यारंभी कवि म्हणतो —

नवमप्येतत काव्य रुचिर साहित्यकोविदस्यैव ।
सद्यस्तना हि विषया वर्ण्यन्ते तत्र तदनुसारेण ॥

विजेचा पखा व गुप्तचर याचे साम्य —

कोणे लब्ध्वा स्थान चपलोपस्थितिबलेन चलितमुखम् ।
परित श्रुतिमपि कुरुते विद्युद्व्यजन तु तत्र गुप्तचर ॥१५॥

शिवणकाम करणाऱ्या मुलींची वाक्ये —

आदौ कृन्तामि गल हस्तच्छदो भवेत्तत सुकर ।
आलाप। द्विजरादने सीवन्तीना तु बालिकाना ते ॥१६॥

उदर बारय तस्य छिन्दि पद तस्य वर्ध तस्य शिखाम् ।
शिक्षेय बालेभ्योऽक्षरबोधे दीयते तु गुरुणा सा ॥१७॥

---

१ शिवाजी मुद्रणालय, दादर, मुबई, येथ मुद्रित मूल्य १॥ रु ।

जोडे दुरुस्त करणाऱ्या चांभाराला उद्देशून —

अस्याभूद् बहुलम्वा जिह्वा ता छिन्दि, ताडयता पार्ष्णि ।
आदेशोऽयं पादत्राणक्षणे तु चर्मकाराय ॥१८॥

आगगाडीच्या तिसऱ्या वर्गातून प्रवास—

सुखमप्रवासगमनं कथितमिव प्राज्ञ-भर्तृहरिणा यत् ।
मयेऽनुभूय तत् खलु तृतीयवर्गे प्रवासमग्निरथे ॥५७॥

दारुबन्दी—

प्रतिषिद्धं मुम्बय्या मधुपानं भूतये हि दीनानाम् ।
तत्फलमाविर्भूतं तेषां कल्याणयोग इति युक्तम् ॥५८॥

श्री राजे यांचा विनोद वर उल्लेखिलेल्या विडम्बनकाराच्या विनोदासारखा बोचकारे घेणारा नाही. तो निरागस आहे.

दिल्लीचे गुरुदयालुशर्मा (देवीदास मन्दकवि) यांची काव्यशैली बरीच विनोदी आहे. संस्कृतरत्नाकर मासिकातून त्यांचीं काव्यें अनेकदा येत असतात. १-१२-५६ च्या अंकात त्यांचें 'भगवती-स्तवराज' हें काव्य प्रकाशित झालें होतें त्यात त्यांनी,

"अस्य भगवती-स्तोत्रस्य देवीदास (कवीचें टोपण नाव) ऋषि उपजातिश्छन्द्, रतिर्बीजं, नेत्रे शक्ति, कुचौ कीलकम्, महाचण्डी देवता, भक्तजन मारणमोहनोच्चाटने विनियोग " अशा प्रकारें विडम्बनात्मक न्यासाने प्रारंभ करून पुढील प्रकारें आधुनिक चञ्चल तरुणींची टिंगल केली आहे.

राक्षसी—

तीक्ष्णायताग्रैर्नखरैः सुरक्तैः वर्णैर्महाकालतरैश्च केशैः ।
आलोहितौष्ठानुमितास्रपाना साक्षादहो राक्षसकन्यकेयम् ॥
प्रलम्बमान-त्रिगुणोग्रलोलवेणीकशा-ताडितपृष्ठभागा ।
रक्तप्रपूर्णस्तनकुम्भयुग्मा साक्षादहो राक्षसकन्यकेयम् ॥

सिंही—

दृष्ट्वा हरन्ती परमानसानि स्पृष्ट्वा हरन्ती जनजीवितानि ।
नखौष्ठभालाङ्कितरक्तबिन्दुः कृशोदरी केसरिणी किमेषा ॥

करेणु —

श्यामा सुमुक्ता सुदती सलीला निरङ्कुशा दीप्तमदा सरागा ।
अनेकपा मन्थरगामिनीयं साक्षादहो ! पद्मकरा करेणुः ॥

शुकी–

रागं मुखे केवलमुद्वहन्ती वचोरितार्था मधुरं लपन्ती ।
सपक्षपाता भुजपञ्जरस्थाऽप्युद्गातुकामा किमहो शुकीयम् ॥

वामा—

मद्यप्रमत्ता प्रतिमांसरक्ता स्वतंत्रचारा कुलदीक्षितापि ।
मुद्राप्रसन्ना बलिचर्चिताऽपि साक्षादहो वामपरम्परेयम् ॥

* * *

बहुतेक विडम्बनात्मक विनोदी काव्यात समस्यापूर्तीचा किंवा शब्द परिवर्तनाचा प्रचार असतो. असल्या शब्दात कवीने अर्थाचा अनर्थ केल्यामुळे एकदम हास्याचा स्फोट होतो. कालिदासाच्या 'वागर्थाविव सम्पृक्तौ वागर्थप्रतिपत्तये ।' या प्रसिद्ध श्लोकाचे विडम्बन—

वणिगर्थाविवापृक्तौ हास्यस्य प्रतिपत्तये ।
युगस्य पितरौ वन्दे बीबी-बाबू स्वरूपिणौ ॥

सुनीलनर्गिसौ वन्दे पतिपत्नीस्वरूपिणौ ।
याभ्यां विना न पश्यन्ति जनाः फिल्मस्थमीश्वरम् ॥

या प्रकारच्या श्लोकात आले आहे.

संस्कृत रत्नाकराच्या फेब्रुवारी-मार्च १९५७च्या अंकात, 'चेतः समुत्कण्ठते' या समस्येची पूर्ति श्रीरामशंकर भट्टाचार्य याने पुढील दोन श्लोकात केली असून त्यात आधुनिक चलाख विद्यार्थ्यांची थट्टा केली आहे. ते श्लोक असे—

" आलस्येन, मदेन, वाक्यकलहैः संवत्सरं तिष्ठतां
ग्रासाच्छादन-संग्रहप्रणयिनां काशीपुरीवासिनाम् ।
अस्माकं ध्यसनच्छलव्ययमतिनां गीर्वाणभाषार्थिनां
गन्तुं स्वोत्तरपत्रदर्शकगृहं 'चेतः समुत्कण्ठते' ॥

नो विद्यालयदर्शने न हि गुरोरध्यापने मे स्पृहा
ग्रन्थग्रन्थिविभेदनाय मनसो वृत्तिः स्फुरत्येव नो ।
पार्श्वस्थैः पटुभिश्च यद् विलिखितं मित्रैः परीक्षागृहे
तद् द्रष्टुं च निरीक्षकं छलयितुं 'चेतः समुत्कण्ठते' ॥"

या परिहासप्रिय कवींनी मोठमोठे विषयहि हाताळलेले दिसून येतात. 'दयानन्दाष्टकम्' या काव्यात प्रख्यात साहित्यशास्त्रज्ञ छज्जूरामजींनी महर्षि दयानन्दाचा उपहास केला आहे.

सात्त्विकस्वप्न[10]—या शतककाव्यांत पुनसेरी नीलकण्ठ शर्मा यांनी कुत्रा, बैल, कोल्हा, पोपट यांच्या परिषदेचें चित्र रंगवून, त्यातून आधुनिक राजकीय परिषदाचा उपहास केला आहे. काँग्रेसगीता[11] या काव्यात 'काँग्रेसच्या सुरत-अधिवेशनातील धिंगाणा वर्णिला आहे. प्रसिद्ध हिंदी साहित्यिक महावीरप्रसाद द्विवेदी यांनी कान्यकुब्जलीलामृतम्, या ३८ श्लोकांच्या काव्यात कान्यकुब्ज ब्राह्मणांची थट्टा केली आहे.

## नाट्यांतील विनोद

प्रहसन हा प्राचीन नाट्यप्रकार हास्यरसप्रधान असल्याने आधुनिक विनोदी लेखकांनी तो उचलून धरलेला दिसतो. पाश्चात्य साहित्याच्या प्रभावाने सर्व प्रादेशिक भाषांतहि हा प्रकार आधुनिक काळांत विशेष प्रचलित झाल्याचें दिसून येतें. संस्कृतकवि आपल्या समकालीन अवातर साहित्यिकांपेक्षा कधीच मागे राहिले नाहीत.

हास्यरसप्रधान प्रहसनांमध्ये वायु. महालिंगशास्त्रीकृत कौण्डिन्यप्रहसनम्, व शृंगारनारदीयम्, नागपूरचे वे. स्कन्द शंकर खोत यांचे मालाभविष्यम् व लालवैद्यम्, इत्यादींचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. त्याव्यतिरिक्त एस. के रामशास्त्रींचें दोलापञ्चालिकम् व मणिमञ्जूषा; एल्. वी शास्त्रींचें लीलाविलासः, चामुण्डा व निपुणिका, सुरेन्द्रमोहन यांचें काञ्चनमाला हीं प्रहसनें उल्लेखनीय आहेत पौराणिक कथावर लिहिलेल्या नवीन प्रहसनामध्ये विनोदाचे फवारे अधून मधून उडतातच. श्री. जगदीश्वर भट्टाचार्यकृत 'हास्यार्णवप्रहसनम्' मध्ये सूत्रधार अनयसिंधु नामक काल्पनिक राजाच्या राजवटीचें वर्णन करतो तें असें —

"नीतिर्भीतिमती दिगन्तमभजत् क्षिप्र समं साधुभिः  
धूर्तानां पटुतापरं परधनाकृष्ट न केषां मनः ? ।  
कान्ता कस्य बलान्न केन रमिता राज्ये यदीयेऽधुना  
तस्य क्षोणिपतेः समागतिरिह स्यात् न युक्तं प्रिये ॥

कुराज्याचीं सारीं वैशिष्ट्ये भट्टाचार्यांनी या श्लोकात संक्षेपतः सांगून टाकलीं आहेत. या अनयसिंधु राजाचा कुलपुरोहित महामहोपाध्याय विश्वभण्ड उपाध्याय यांचें चारित्र्य प्रहसनातील कुट्टिनी बन्धुरा सांगते —

दिनोपवासी तु निशामिषाशी  
जटाधरः सन् कुलटाभिलाषी ।

---

१०. इ. १९०७ मध्ये त्रिचूर येथे प्रकाशित.

११. इ. १९०८ मध्ये मद्रासमध्ये प्रकाशित.

अयं कपायाम्बर-चारुदण्डः
शठाग्रणीः सर्पति विश्वभण्डः ॥

दुष्ट दांभिकांचे यापेक्षा उत्तम सुबद्ध वर्णन इतरत्र सहसा आढळणार नाही.

वसिष्ठ गोत्रोत्पन्न विश्वेश्वरकृत 'शंकरविवाहम्' नाटकाची नायिका मनोरमा हिची आई डॉक्टर भागीरथी हिने वृद्ध पतीचा त्याग केला असून कृष्णाजीपंत नावाच्या धाकट्या तरुणाशी दुसरा विवाह केला. भागीरथीच्या या कृत्याचे समर्थन करणारा वकील गोडबोले म्हणतो:—

साधु त्वया जराजीर्णः सत्यक्तः स्वेच्छया पतिः ।
अन्यो भवश्च सद्भर्ता पुनरूढो गुणान्वितः ॥
युक्तं कृतं भवत्येदं शुभं भूयात् तवानिशम् ।
पुराणपुरुषं त्यक्त्वा कृपण याति पद्मजा ॥
श्मशानवासिनं त्यक्त्वा गंगा संयाति सागरम् ।
त्यक्तस्त्वयाऽपि वृद्धश्च सम्प्राप्तश्च पुनर्युवा ॥

या समर्थनामुळे प्रसन्न झालेली डॉक्टर भागीरथी म्हणते—

दण्डिनं भारविं माघं बायरनं शेक्सपीयरम् ।
कवीन्द्र कालिदासं च भवानति हि वर्तते ॥
चाह-क्वाथममुं हृद्यमेलाद्रुग्धसितान्वितम् ।
आह्लादकारकं पातुं भवानर्हति मत्करात् ॥
अर्प्यते स्म पुरा स्त्रीभिः स्त्रीभ्यः पुष्पं च कुङ्कुमम् ।
दीयतेऽद्य तु सर्वेभ्य चाहमानन्दकारकम् ॥[12]

वर उल्लेखिलेल्या प्रहसनाव्यतिरिक्त महालिंगशास्त्रीकृत 'मर्कटमर्दलिकाभाणः' सुदर्शन शर्माकृत 'शृंगारशेखरभाणः', के. के. आर्. नायरकृत 'आलस्यकर्मीयम्' (बेकारी), बटुकनाथ शर्मा (हिन्दुविश्वविद्यालयाचे माध्यापक) यानी लिहिलेले 'पाण्डित्यताण्डवम्' (याव्यतिरिक्त बल्ल्यदूतम्[13] हे विडम्बन काव्यहि त्यानी लिहिले आहे.) इत्यादि नाट्यात्मक विनोदी साहित्याचा उल्लेख करावयास हवा.

---

१२. आधुनिक कविता की प्रवृत्तियां (सरदार वल्लभभाई विद्यापीठातर्फे प्रकाशित) यातील श्री भानुशंकरशास्त्री यांच्या लेखांतून (पृ १२६-१२७) उद्धृत.

१३ पृ. २५४।

हास्यरसात्मक आधुनिक साहित्याचा इतका परिचय दिल्यानंतर आम्ही स्वतः लिहिलेल्या 'मन्दस्मितम्'[१४] या शतककाव्यांतील कांही उदाहरणें देऊन हें प्रकरण संपवूं.

आकाशवाणी —

देवानामपि वक्त्राणि त्रीणि चत्वारि पञ्च षट् ।
आकाशवाणी-वक्तृणां सन्ति तानि गृहे गृहे ॥
आकाशवाणीगृहभाषणानि शृणोतु कश्चिन्न च वा शृणोतु ।
वक्तुः समाधानमहो परन्तु व्याप्नोति विश्वं मम भारतीति ॥

ध्वनिवर्धकः (Loud speaker)

समीपमभ्येत्य तवोद्गिरन्ति विपश्चितो वाचमतीव हृद्याम् ।
शृणोषि तां न ध्वनिवर्धक ! त्वं परं परान् श्रावयितुं पटीयान् ॥
रावणस्य किलैकस्य ननाद भुवने ध्वनिः ।
ध्वनिवर्धक ! सर्वेऽपि त्वयेमे रावणीकृताः ॥

दूरभाषः (Telephone)

उपकर्ता न लोकानां दूरभाष ! भवादृशः ।
यदसंश्लेष-सान्निध्यं धत्से विरहिणामपि ॥

उल्का-स्पुटनिक-संवादः —

कस्त्वं बाल ! कुत. क्व यासि कपिना सार्धं नभोमण्डले ?
मूढे ! मां किमु वेत्सि न स्पुटनिकं चन्द्रप्रवासोद्यतम् ।
उल्काऽसौ तदखर्व-गर्व-वचनं श्रुत्वाह मन्दस्वरम्
उच्चैः सञ्चरतां स्खलन्ति गतयो गर्वोद्धतानामधः ॥

ध्वनिमञ्जूषा — (Radio)

पुरा समाधिविघ्नायागच्छन्ति स्म दिवोऽङ्गनाः ।
इदानीं ध्वनिमञ्जूषा. प्रतिवेशिगृहे स्थिता. ॥

नयपैसा —

मूल्यं कपर्दिकाकल्पमाकृतिः क्षुद्रकीटवत् ।
तथापि नयपैसाऽसौ गण्यते रूप्यकैः सह ॥

---

१४. साप्ताहिक 'संस्कृत भवितव्यम्' च्या १९६१ दिवाळी अंकात कांही भाग प्रकाशित.

वनस्पतिघृतम् —

रूपतः स्पर्शतश्चापि वनस्पतिघृतं घृतम् ।
परिणामे घृतं त्वायुरन्यदन्यन्मतं मम ॥

चहा —

प्रदोषे पानमात्रेण निद्रां हरति सर्वथा ।
प्रभाते नाममात्रेण चहा निद्रापहारिणी ॥
कुम्भकर्णप्रबोधाय कृतः किल महान् ध्वनिः ।
चहा सिद्धेति किं नोक्तमहो मूढा हि राक्षसाः ॥
वेदकालेऽमृतं सोमस्ततो दुग्धं ततः सुरा ।
इदानीं शतके विंशे चहा हि परमामृतम् ॥

नेतारः

लोकेऽगण्यभयाक्रान्ते द्वयमत्यन्तभीषणम् ।
अण्वस्त्रमेकमपरं नेतारो राजनैतिकाः ॥
राजनैनिकनेतॄणां निर्वाचनमति-प्रियम् ।
सम्मेलनं च च्छात्राणां नीचानां फाल्गुनोत्सवः ॥

केचिन्नेतृजना भ्रमन्ति सततं वक्तृत्वमात्रोद्यताः
अन्ये केचन वित्तसङ्ग्रहपरा नानानिमित्तैः सदा ।
केऽप्यन्ये परिषत्सु लोकपुरतो दृश्यन्त उच्चासने
केचित् सार्वजनीनभोजनविधेरन्यत्र नालोकिताः ॥

न राजसेवा सुलभा न वणिक्ता न वा कृषिः ।
प्रायेण मन्दबुद्धीनां सुकरा ग्रामनेतृता ॥

आशा न येषां क्वचिनाधिगन्तु
महत् पदं चेद्नृपमन्त्रिणोऽपि ।
आरभ्यतां तैरविषण्णचित्तैः
भूदानयज्ञादिषु भिक्षुकत्वम् ॥

न सा बहुमता माता तथा नैव प्रिया प्रिया ।
निर्वाचनप्रविष्टानां यथा सा मतपत्रिका ॥

मन्त्रिलक्षणम्

हे सामुद्रिक ! भद्र ! मत्सुतकरे पश्य क्षणं लक्षणं
प्रायो गौरिव हिण्डतेऽयमनिशं नैवास्य विद्यारुचिः ।
तद् वृद्धावचनं निशम्य सहसाऽदृष्ट्वैव तल्लक्षणं
स प्राहाम्ब ! शिशुः सुनिश्चितमयं मन्त्री भवेद् भाग्यवान् ॥

मन्त्रिकर्म

उद्घाटनं पत्रकारपरिषत् नाट्यदर्शनम् ।
सन्देशदानमित्येतन्नियतं कर्म मन्त्रिणाम् ॥

कलिसामर्थ्यम्

मुक्तच्छंदांसि काव्यानि हतव्याकरणा गिरः ।
कलेः पश्यत सामर्थ्यं स्वराज्यं च निधार्मिकम् ॥

अन्नसत्याग्रहः

अन्नसत्याग्रह कृत्वा ये केचित् पञ्चतां गताः ।
ते सत्याग्रहतन्नस्य पामरा मर्म नाऽविदन् ॥

नवशिक्षणम् —

सन्तु वर्गा न वा सन्तु श्रोतुं विद्यार्थिनोऽखिला ।
प्राध्यापकैस्तु वक्तव्यमित्युक्तं नवशिक्षणम् ॥
दिने दिने ह्यनध्यायं मासि मासि च मेलनम् ।
विद्यार्थिनः समीहन्ते निरुपास्यिति शिक्षणम् ॥

लोकसंस्था —

डिर्योऽध्यक्षस्ततमुत. कार्यवाह॰
कोषाध्यक्षा तस्य भार्या स्नुषा वा ।
जामात्राद्या बान्धवास्ते सदस्या.
एव प्रायो लोकसंस्था भवन्ति ॥

सामाजिकं कार्यम् —

नाट्यप्रयोगैर्धनमर्जनीयं तत क्वचित् सद्म नवं विधेयम् ।
*याच्यं ततः शासनतोऽनुदानं सामाजिकं कार्यमिद वदन्ति ॥*

वृत्तपत्रम् —

पञ्चम खलु संन्याङ्ग राज्याङ्गमयवाष्टमम् ।
प्रमाण नवम नून वृत्तपत्र नवे युगे ॥
सर्वतः सुगतो बुद्ध सर्वतः किल माधवः ।
साम्प्रत ग्राम्यवक्ता वा सम्पादकमहाशयः ॥
मुखपृष्ठे नटीचित्रमन्तरश्लीलवर्णनम् ।
अहो मासिकसाहित्य कल्किकल्मषवर्धनम् ॥
चौर्य-मृत्यु-बलात्कार-दाहवार्तापरा नराः ।
प्रातः प्रथममिच्छन्ति वृत्तपत्रस्य दर्शनम् ॥

यः पठति वृत्तपत्रं पश्यति नव-चित्रनाट्यमनुदिवसम् ।
सर्वत्र विजयतेऽसौ विविधासु ग्राम्यचर्चासु ॥

नवसुधारणा —

सकुंकुमाङ्काः राधवा विधवाश्च सकुंकुमाः ।
यत्र स्युस्तत्र सम्पूर्णा नूनं नवसुधारणा ॥
रदनच्छदरागेण हिमान्या मुखभस्मना ।
धातुशिल्पगतान् दोषान् छादयन्ति विचक्षणाः ॥
नैव नेतृप्रचारेण संविधानेन नैव च ।
अस्पृश्यता लयं नीता हयुपाहारगृहैरिह ॥
धनं नाट्यप्रयोगेण मानो मन्त्रिपदेन च ।
प्रतिष्ठाङ्ग्लीयवेषेण सुलभा नवभारते ॥

संवादाः

डाक्टर ! कृशता वपुषः कथमपनेया धनव्ययेन विना ? ॥
भव राजकीयबन्दी शीघ्रं कथमपि विधाय विधिभङ्गम् ॥
न हि ते कृषिर्न सेवा वाणिज्य वा कुतो धन लभसे ? ।
मदिरापाननिषेधकमिदमस्माकं चिरं जयतु राज्यम् ॥
किमु बहिरेव भ्राम्यसि विमना इव, किं गृहं न जिगमिषसि ? ।
सत्यं ब्रवीमि गेहे प्राघुणिकाः केचिदप्रियाः प्राप्ताः ॥
अश्लीलमेव सततं वाङ्मयजातं कथं सखे पठसि ? ।
अश्लीलतानिवारकसमितेः खलु कार्यवाहोऽस्मि ॥
चित्रं चित्रं बिभ्रति साम्प्रतमधिकारिणोऽपि सौजन्यम्।
वत्स ! न चित्रं, नगरे प्राप्तः सौजन्यसप्ताहः ॥

प्रकरण २७ वे

# संस्कृत साहित्यांतील राष्ट्रवाद

देशभक्ति किंवा राष्ट्रनिष्ठा या भावनेचा भारतीय समाजात सर्वथा अभाव होता. देशभक्तिपरायण इंग्रजांच्या सपर्काने किंवा इंग्रजी साहित्याच्या संस्कारानेच त्या भावनेचा संचार भारतीय समाजात झाला. अशा प्रकारचा विचार अनेक ठिकाणी प्रतिपादन करण्यात आला आहे. सकृद्दर्शनी तो विचार सर्वसामान्य मनुष्याला ग्राह्य वाटणे स्वाभाविक आहे, याचे कारण आज ज्या स्वरूपात व प्रमाणात राष्ट्रनिष्ठेचा आविष्कार भारतीय साहित्यात होत असल्याचे दिसून येत आहे त्या स्वरूपात व प्रमाणात राष्ट्रनिष्ठा प्राचीन साहित्यात सर्वत्र प्रकट झालेली दिसत नाही तथापि राष्ट्रभक्ति किंवा देशभक्ति एतद्देशीयाच्या अन्तःकरणात कधी अंकुरित झालीच नव्हती असे सरसकट विधान मात्र निरपवादपणे ग्राह्य मानता येत नाही. प्राचीन संस्कृत साहित्यात या राष्ट्रातील पवित्र नद्या, पर्वत, तीर्थक्षेत्रे इत्यादिकांविषयी पराकाष्ठेची भक्ति व्यक्त झालेली दिसून येईल. त्यामध्ये व्यक्त झालेल्या उदात्त भावना जगातील कोणत्याहि राष्ट्राच्या साहित्यात तद्देशीय नदी-पर्वत-इत्यादिकां-विषयी व्यक्त झालेल्या सहसा आढळणार नाही. याच कारण हे राष्ट्र जसे विभूति पूजक आहे तसे जगातील एकहि राष्ट्र नाही. या पूज्य विभूतींमध्ये भगवद्गीतेत विभूतियोगाच्या अध्यायात वर्णिल्याप्रमाणे विविध प्रकारच्या आविष्काराचा अन्तर्भाव होतो. 'माता भूमि पुत्रो अहं पृथिव्या.' यासारख्या वेदवचनातून किंवा 'जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी' यासारख्या इतर सुभाषितांतून भारतीयांची राष्ट्रभक्ति उत्तम प्रकारे व्यक्त झाली आहे.

तथापि या भावनेने आधुनिक काळात विशिष्ट परिस्थितीमुळे जे जाज्वल्य स्वरूप धारण केलेले दिसते तसे ते प्राचीन काळी धारण केल्याचे दिसत नाही. मुसलमानी पारतन्त्र्याच्या काळांत दुर्धर परिस्थिति असूनसुद्धा तत्कालीन साहित्या मध्ये आधुनिक स्वरूपाची जाज्वल्य राष्ट्रभक्ति अभिव्यक्त झालेली आढळून येत नाही. याचे कारण हेंच की त्या काळात जनजागृतीसाठी साहित्याचा उपयोग, (अर्वाचीन मुद्रणकलेच्या काळात जसा व्यापक स्वरूपात झाला तसा) होत नव्हता. त्या काळातले बहुतेक साहित्य 'स्वान्तःसुखाय' लिहिण्यात येत होते. उपदेशाचे कार्य प्राचीन रामायणभारतादि ग्रन्थच प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे करीत होते.

इंग्रजांच्या आक्रमणकाळांत मात्र स्वदेश, स्वधर्म, स्वसंस्कृति याविषयींचा अपरंपार अभिमान सर्व भारतीय भाषांतील साहित्यांतून उफाळून येऊ लागला. इतर सर्व भाषांप्रमाणें संस्कृतांतूनहि तो व्यक्त झालेला आहे. राष्ट्रभक्तीची अभिव्यक्ति करण्याच्या कामीं संस्कृत साहित्यिक इतर कोणत्याहि प्रादेशिक भाषेच्या साहित्यिकांपेक्षा मागे राहिला नाही. सप्तम एडवर्ड, पंचम जॉर्ज, व्हिक्टोरिया यांसारख्या आंग्ल सत्ताधाऱ्यांचीं स्तुतिस्तोत्रें गाणारे कवि पैकळ संस्कृतांत आढळतात असें नसून इतर सर्वच भाषांत आढळतात. इतर भाषांतील परकीय राजस्तुति आळविणाऱ्या कवींनी अनेक देशभक्तिपर स्फुटकाव्यें प्रसंगोपात्त लिहिलीं, तशीं संस्कृत कवींनीहि लिहिलीं आहेत. इंग्रजांनी राजनिष्ठ साहित्याचा मधुर मृदंगध्वनि 'मुखलेप' करून निर्माण करविला होता हें उघड आहे.

आपली राष्ट्रनिष्ठा संस्कृतकवींनी अनेक प्रकारांनी अभिव्यक्त केली आहे. काहींनी भारताचें गतवैभव आठवून आठवून वर्णिलें व त पारतंत्र्यामुळें लयास गेलें या विषयीं शोक व्यक्त केला. काहींनी यूरोपीय संस्कृतीच्या आक्रमणामुळे ओढवलेला शोचनीय संस्कृतिविनाश वर्णिला. स्वदेशाच्या उद्धारासाठी सर्वस्व समर्पण करणाऱ्या प्राचीन व अर्वाचीन महापुरुषांचीं चरित्रें देवदेवतांच्या चरित्राप्रमाणें अनेकांनी मोठ्या भक्तीनें काव्यात्मक स्वरूपांत लिहिलीं. काहींनी पाश्चात्य संस्कृतीच्या संपर्कामुळे नवशिक्षित समाजांत प्रसृत झालेल्या दुराचाराची तळतळून निंदा केली. विशेष म्हणजे परकीय भाषेच्या प्रभावामुळे संस्कृत भाषेचा क्रमशः ऱ्हास झाल्याबद्दल अनेक संस्कृत कवींनी खेद व्यक्त केला व त्या देवभाषेचा पुनश्च उद्धार झाला पाहिजे हा विचार मोठ्या आवेशानें प्रतिपादन केला. संस्कृत नियतकालिकांतून तर या प्रकारच्या विचाराचा पूर आल्यासारखा दिसतो. अशा प्रकारें आधुनिक संस्कृत साहित्यिकांनी परम्परागत साहित्यप्रकारांचें रक्षण करून नवीन विचार देशील अभिनव पद्धतीने संस्कृत साहित्यांत प्रवर्तित केलेले आहेत. अशा प्रकारच्या काही राष्ट्रवादी काव्यदिशांचा परिचय पुढे दिलेला आहे

**भारतीमनोरथम्** — मद्रासचे श्री एम् के. ताताचार्य यांनी ९० श्लोकांचें प्रस्तुत काव्य पहिल्या महायुद्धाच्या सुमारास लिहिलें व त्यामध्ये भारताच्या हिताच्या दृष्टीनें इंग्रज सरकारकडून अपेक्षित असलेल्या आपल्या आकांक्षा त्यांनी वर्णन केल्या आहेत.[1]

**सुगुणितवृत्तम्** — या काव्याचे लेखक श्री चिट्टिगुडूर वरदाचारियर हे मोठे प्रसिद्ध देशभक्त होते प्रस्तुत तीन सर्गांच्या काव्यात त्यांनी भारताचा प्राचीन ऊर्जितकाळ व विद्यमान विपत्काळ वर्णिलेला आहे[2]

१. मॉडर्न संस्कृत रायटिंग्ज् पृ २८।

२. चिट्टिगुडूर नरसिंह कलाशालेतर्फे १९३८ मध्ये प्रकाशित झालेलें ८ वें पुस्तक।

**भारतीशतकम्** — काशीचे कवितार्किक चक्रवर्ती श्री. महादेव पाण्डेय यानी लिहिलेलं हें राष्ट्रभक्तिपर शतककाव्य 'सारस्वती सुषमा' या त्रैमासिकाच्या आठव्या वर्षीच्या अंकात प्रकाशित झालें.

**भारतीगीता** — व्ही आर लक्ष्मी अम्मल या लेखिकेने आपल्या प्रस्तुत काव्यात भारताचें गतवैभव वर्णन करून त्याचा भावी शुभसन्देश निवेदन केला आहे.[३]

**राष्ट्रस्मृति** — अहमदाबादचे देशभक्त प. रामराय यानी प्रस्तुत स्मृति मध्ये प्रतिज्ञापर ल्हान ल्हान संस्कृत वाक्यें संगृहीत केलीं आहेत.[४]

**क्रान्तियुद्धम्** — गोगापुरचे प. वासुदेवशास्त्री बागेवाडीकर यानी १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाविषयींचे अनेक ग्रन्थ वाचून त्याच्या आधारें प्रस्तुत संस्कृत ग्रन्थ लिहिला.[५] स्वातन्त्र्यरणयज्ञात आत्माहुति देणाऱ्या देशभक्तांचें गुणगान करावें व संस्कृत भाषेचीहि सेवा घडावी या उद्देशाने श्री बागेवाडीकरानी हें पुस्तक व लोकमान्य टिळकांचें चरित्र ( टिळक शताब्दीनिमित्त ) लिहिलं.

**संस्कृत-वाग्विजयः** — दिल्लीचे प्रभुदत्तशास्त्री यानी संस्कृत व (जुन्या प्राकृत ऐवजी आधुनिक प्राकृत) हिन्दी या दोन भाषांत हें पाच अंकी नाटक लिहिले असून त्यात संस्कृत भाषेचें प्राचीन वैभव व अर्वाचीन स्वरूप वर्णिलेलं आहे.[६]

**भारती-स्तव** — पाँडेचरीचे ब्रह्मश्री कपालीशास्त्री यानी १५-७-४७ या स्वातन्त्र्यदिनानिमित्त एका दिवसात हें शतककाव्य लिहिलें. योगी अरविन्दांचे राष्ट्रवादी विचार प्रस्तुत काव्यात त्यानी छन्दोबद्ध केले आहेत.[७] त्यातील काही श्लोक पाहा—

> विविधजनता-संघातस्य त्वमम्ब सुहृत्तमा
> विपयबहुले भूगोलेऽस्मिन् शुभाख्य-निदर्शिनी ।
> अभिभुवनमध्यात्मश्रेयो-विधात-पटीयसी
> त्वमसि सदृशास्तेऽमी पुत्रा जयेम वय च ते ॥ १८॥

---

३ मद्रास येथे १९५० मध्ये मुद्रित ।
४. अहमदाबाद येथे १९५१ मध्ये मुद्रित ।
५. सर्वोदय मुद्रणालय पुणे येथे मुद्रित १९५७ ।
६. दिल्ली येथे मुद्रित १९४२ मध्ये.
७ प्राप्तिस्थान – अरविन्दाश्रम, पाँडेचरी, मूल्य १ रु ।

तवाम्ब परिकल्पित भुवन-सर्जन-ज्योतिषा
वपुर्विमलपाटलद्युतिधर महश्चिन्मयम ।
अदृश्यमपि तद्घन जननि दृश्यमन्तर्दृशा
तदेव सकलावनेर्हृदयपदामच्छ विदु ॥ २० ॥

इत. प्रथममुत्थितो मनुजनु पुरा पुण्यवान्
अचर्मनयनो मुनिर्दिवमपश्यदुन्मेषवान् ।
इतो निहतमादिम मनुजनिष्ठमन्ध तमो
जगत्प्रभवगाहनद्युमणिरोचिषा भूभुषा ॥ २३ ॥

इत शरणमुत्तम शिवतमाध्वना भूयसाम
इतः शरणमच्युत जगदधीश्वर-प्रेयसाम् ।
इतो जडतमोद्विषामजडलोचनज्योतिषां
चिदम्बरमुपेयुषामुदयशैलतुङ्गत्वलम् ॥ २४ ॥

अनन्यसामान्यमदभ्रसत्त्व
विचित्रमेतच्चिरजीवित ते ।
युगाद्युग यात्यपि कालचक्रे
चक्रे जरा यत्र पद तवार्ये ॥ ६३ ॥

न केवल ब्रह्मविदामृषीणा लोकान्तराबद्धदृशा सता वा ।
आदित्यलं लोकविदां कलानामभिज्ञलोकस्य च भारति ! त्वम् ॥ ५४ ॥

अक्षय्य-सम्पत्तिरजय्यतेजास्त्वमम्ब भूमेर्हृदयाब्जभूता ।
काञ्चितकला चित्कलिकाप्रसूतिं ता त्वा विदो भारतमा वदन्ति ॥५१॥

स्वामी श्रीभगवदाचार्यांच्या 'भारतपारिजातम्' या गान्धीचरित्रात्मक महाकाव्याच्या प्रथम सर्गात, पाचव्या श्लोकापासून सतराव्या (१७) श्लोकापर्यंत भारत भूस्तोत्र गाइलेलें असून त्यापुढे चरित्रनायकाच्या बाललीलाचे स्थान असलेल्या गुजरात प्रदेशाचें राष्ट्रीय दृष्टया माहात्म्य वर्णिलेलें आहे श्री. अखिलानन्द शर्मा यानी लिहिलेल्या 'दयानन्ददिग्विजय' या महाकाव्याच्या द्वितीय सर्गामध्ये २१ श्लोकात त्याच गुर्जर प्रदेशाचें वर्णन केलेलें आहे. अशा प्रकारें निरनिराळ्या आधुनिक महाकाव्यातून प्रसंगानुरोधानें भारतातल्या निरनिराळ्या प्रदेशाचें राष्ट्रीय भावनेतून केलेलें वर्णन वाचावयास मिळतें

## गांधीनिष्ठ साहित्य

लो. टिळक व म. गांधी यांच्या लोकोत्तर विभूतिमत्त्वाचा प्रभाव भारतातील संपूर्ण साहित्यावर पडला व त्यामुळें त्यांच्या संबंधीं (व त्यांच्याद्वारा इतरहि

श्रेष्ठ पुरुषासमवेत) नेच साहित्य आधुनिक काळात निर्माण झाले. श्री. चितळे यांच गद्यात्मक टिळक चरित्र नुकतेंच प्रकाशित झालें आहे व लोकनायक बापूजी अणे यांनी लिहिलेले पद्यात्मक टिळक चरित्र अद्यापि प्रकाशात यावयाचें आहे. कल्याणचे श्री. विश्वनाथ केशव छत्रे यांनी रेल्वेची कष्टप्रद नोकरी सांभाळून अनेक पद्यात्मक चरित्रें लिहिलीं त्यामध्ये नेताजी सुभाषचंद्र बोस यांचें १६ सर्गांचें पद्यात्मक चरित्र विशेष उल्लेखनीय आहे. (तें अद्यापि अप्रकाशित आहे.)

स्वामी भगवदाचार्यांनी लिहिलेल्या गांधीचरित्रात्मक 'भारतपारिजातम्' या त्रिखण्ड ग्रंथाचा सविस्तर परिचय प्रस्तुत ग्रंथात अन्यत्र आलाच आहे. गांधीनिष्ठ साहित्यामध्ये विशेष उल्लेखनीय आणखी काही ग्रंथ म्हणजे:—

**गान्धिगीता** — पुण्याचे श्री ताडपत्रीकर यांनी म. गांधींच्या सिद्धान्ताचे प्रतिपादन करण्यासाठी प्रस्तुत नवीन गीता लिहिली आहे[8]

**सत्याग्रहगीता[9] व उत्तरसत्याग्रहगीता[10]** — या दोन ग्रंथात पंडिता क्षमादेवी राव यांनी महात्मा गांधींच्या जीवनातील सत्याग्रह संग्राम सविस्तरपणे वर्णिलेले आहेत.

**गान्धिसूत्राणि** — मद्रासचे प्राध्यापक डी. एस. शर्मा यांनी म. गांधींच्या सिद्धान्ताचे प्रतिपादन करण्यासाठी हीं सूत्रें लिहिलीं असून[11] इन्डोनेशियन व डच भाषेमध्ये त्यांची भाषांतरें प्रकाशित झालीं आहेत.[12]

**महात्मविजयम्** – लेखक के. व्ही. एल्. शास्त्री, मद्रास.

**महात्मनिर्याणम्** – ले. व्ही. नारायण नायर, त्रिचूर. - लेखकान स्वत च यावर टीका लिहिली असून त्र्याऐंशी १९५४ मध्ये ते प्रकाशित झाले आहे.

महात्मा गांधींच्या वधामुळें दुःखित झालेल्या अनेक साहित्यिकांनी गांधीजींना श्रद्धाञ्जलि समर्पण करण्यासाठी स्फुट काव्य लिहिलीं. त्यामध्ये मुंबईचे श्री शास्त्री यांचें श्रद्धाञ्जलि हें काव्य व डॉ. वे. राघवन् यांचें महात्मा हें काव्य विशेष उल्लेखनीय आहे. श्री जी. सी. झाला यांनी लिहिलेल्या 'सुषमा' नावाचा स्फुटकाव्य

---

८. पुणे येथे मुद्रित, इ. स. १९४९ मध्ये।

९. Librairie & Amerique et d'orient, Paris येथे १९३२ मध्ये मुद्रित।

१०. मुंबई येथे १९४९ मध्ये मुद्रित।

११. १९३८ व १९४६ मध्ये मद्रास येथे मुद्रित।

१२. मॉर्डर्न मद्रास रायटिंग्ज् पृ. ३०।

संग्रह १९५५ मध्ये प्रकाशित झाला आहे. सर चिन्तामण द्वारकानाथ देशमुख यांच्या अनुवादात्मक 'गाथिसूक्तिमुक्तावली' या पुस्तकाचा निर्देश भाषांतरित साहित्यविषयक प्रकरणात आलेलाच आहे.

**राष्ट्रपतिगौरवम्** – मुंबईचे श्री लक्ष्मीनारायण शानभाग यांनी राष्ट्रसभेच्या (काँग्रेस) १९३८ पर्यंत झालेल्या सर्व अध्यक्षांचा गौरव प्रस्तुत लघुकाव्यात केला आहे. डॉ. राजेन्द्रप्रसाद हे राष्ट्राध्यक्ष झाल्यानंतर त्यांची स्तुति करणारीं अक्षरशः शेकडों काव्यें लिहिलीं गेलीं. त्या सर्वांचा संग्रह पुस्तकरूपानें प्रकाशित करण्याचें कार्य कोणीतरी साक्षेपीपणे करावयास हवें. कोल्हापुरचे श्री. वासुदेव आत्माराम लाटकरशास्त्री यांनी लिहिलेलें राष्ट्रपति डॉ. राजेन्द्रप्रसादचरितम् हे ९० पानांचें पुस्तक पुण्याच्या शारदागौरव ग्रन्थमालेतर्फे नुकनेच प्रकाशित झालें आहे.

**भारतीयदेशभक्तचरितम्** – बंगलोरचे श्री. नागराज यांनी टिळक, विवेकानंद इत्यादि श्रेष्ठ देशभक्तांसंबंधीं सुबोध गद्यामध्ये लिहिलेले चरित्रपर लेख प्रस्तुत पुस्तकांत संकलित केलेले असून शेवटीं त्यांनी स्वतः लिहिलेलें भारतमातेचें स्तोत्र टाकलेलें आहे. स्वातन्त्र्यप्राप्तीच्या समयीं नवीन राष्ट्रध्वजासंबंधीं अनेक संस्कृत कवींनी राष्ट्रभक्तिपर स्तोत्रकाव्यें लिहिलीं व तीं विविध वृत्तपत्रांतून त्याच सुमारास प्रकाशित झालीं. विद्याभास्कर कविताचतुर रामकृष्णभट्ट यांनी लिहिलेलें **राष्ट्रध्वज** हें एक सुंदर काव्य १९५६ डिसेंबरच्या 'संस्कृतरत्नाकरः' या मासिकांत प्रकाशित झालें. तें पुढें उद्धृत केलेलें आहे.—

## राष्ट्रध्वज.

दिगन्तविसृतच्छविर्वितंभति दर्शयन् स्वां तनुं
जनाक्षिसुभगात्रितिविधवर्ण–हृद्यद्युतिम् ।
मघोन इव जीवनं सपदि सूचयन् धार्मुकं
प्रमोदभरकारणं जयति नोऽत्र राष्ट्रध्वजः ॥१॥

विहायसि चलन् भृशं पवनवेगमुक्तो नु यः
स्वराष्ट्रसुयशोमयं क्षितितलागतं स्वर्गिणाम् ।
सुखाय हृदि रञ्जितं नयति शुद्धवृत्तो नृणां
त्रिवर्गकलितं प्रियो जयति सोऽत्र राष्ट्रध्वजः ॥ २ ॥

स्थितो ह्युपरि भारतकुरदनूनभाग्यान्नरः
पटान्तकरपल्लवं शिरसि योजनानां शतं ।
निवाय गुरुवत्सदा नयति शोकपीडामयो
धियं ह्युपति वत्सलो जयति न[illegible]श राष्ट्रध्वजः ॥ ३ ॥

त्रिवर्णरुचिरो मतः प्रियकरश्चतुर्णां च यो
रथाङ्गसहितोऽपि नो मुररिपुर्यशोवाहनः ।
दिगम्बरगतिः सदा न तु मुडोऽपि दण्डी यति.
न चेत्यनुपमस्थितिर्जयति सोऽयं राष्ट्रध्वजः ॥ ४ ॥

वलक्षदलमध्यगो वदति शान्तिशुद्धी यशो
हरित्पुटेपट्टश्च यो विभयमार्यशौर्यं शिवम् ।
सकुङ्कुमरुचिः फलोल्लसितधर्महार्दोद्भवं
सदायति महोदयं विजयते स राष्ट्रध्वजः ॥ ५ ॥

इदं प्रयतते त्रयं रुचिरवर्णकानां मुहुः
समस्तजनजीविते विहितशासनं यस्य यत् ।
समन्वयगुणाश्रितं निखिलधर्मरक्षाक्षमं
भिदा नृपु करिष्यते न हि स नोऽस्ति राष्ट्रध्वजः ॥६॥

यतस्त्रिगुणमष्टक वहति चार्वराणां ततो–
प्यहर्निशमतन्द्रितां दिशति चक्रमभ्युन्नतिम् ।
प्रयत्नविधिमीश्वरे ह्यचलभक्तिमार्गागम–
–प्रदिष्टपथसंश्रयः स्वयमयं स राष्ट्रध्वजः ॥ ७ ॥

महोत्सवरसोत्सुकैः प्रणतिपूर्वमारोपितः
समुन्नतपद धरापतिरिव प्रमोदाकुलः ।
चलाङ्गकिरणो नदन् प्रहृगणं प्रजाश्रेयसा
प्रमाणमवलम्बते स्वयमय स राष्ट्रध्वजः ॥ ८ ॥

* * *

संस्कृत नियतकालिकांतून वेळोवेळी राष्ट्रभक्तिपर अनेक सुकाव्ये प्रकाशित झाली. त्यांतून विषयांचे वैविध्य दिसत असले तरी मूलभूत भावना राष्ट्रनिष्ठेचीच आहे. संस्कृत नियतकालिकांच्या संचालकांनी आपापल्या नियतकालिकातील राष्ट्रीय काव्यांचे संकलन करून स्वतंत्र ग्रंथ प्रकाशित केल्यास संस्कृत साहित्यावर विशेष उपकार होतील. संस्कृतभवितव्यम् साप्ताहिकाच्या पहिल्या वर्षी पुढील राष्ट्रीय काव्ये प्रकाशित झाली आहेत.

| काव्य | कवि |
|---|---|
| ज्वाहरलाल–स्तुतिपद्यम् | ग. रा. छापटे |
| लोकमान्यतिलकः | धर्मदेव विद्यावाचस्पति |

| | |
|---|---|
| कः पातु मे भारतम् | ज्ञानेश्वर साधु |
| गणराज्यदिनप्रार्थना | श्यामशर्मा रावळे |

## द्वितीय वर्ष

| | |
|---|---|
| लोकमान्यस्तवनम् | ना. म. पिम्पळे |
| लोकमान्यस्तवनम् | ग. रा. साबडे |
| ,, | वि. कृ. पेशवे |
| विनोबाभावे–महाभागाना स्वागतपुष्पाञ्जलिः | काशीचे वैदिक पंडित |
| राजेन्द्रप्रसादमुस्वागताभिनन्दनम् | काशी येथील विद्वत्परिषद |
| पोट्टी–रामलुमहोदयस्य पवित्र बलिदानम् | कर्णवीर नागेश्वरराव |
| मेलाराममहोदयेभ्यः श्रद्धाञ्जलि | दुर्गाराम उपाध्ये |
| गणतन्त्रमङ्गलत्रयम् | श्या. गो. रावळे |
| स्वातन्त्र्याभास· | प. करमरकरशास्त्री |
| विजयते स्वातन्त्र्यसूर्योदय | श्री. रमाकांत शुक्ल |

अशा प्रकारें अल्पस्वरूप प्रमाणात प्रत्येक संस्कृत नियतकालिकांतून प्रसंगानुरोधाने राष्ट्रीय वृत्तीची विविध काव्ये प्रकाशित झाली. लोकनायक बापूजी अणे यांनी कित्येक वर्षांपासून वर्षप्रतिपदेनिमित्त नववर्षाचें स्वागत संस्कृत काव्यातून करण्याचें व्रत अव्याहत चालविले आहे. त्यांच्या सर्व वर्षाभिनन्दनपर काव्यांतून राष्ट्रीय आकांक्षा अभिव्यक्त झाल्या आहेत. हे सर्व श्लोक लोकनायकांनी पुस्तकरूपाने ग्रथित करावयास हवेत. राष्ट्रनिष्ठ संस्कृत कवींच्या आकांक्षांचें स्वरूप कशा प्रकारचें आहे याची कल्पना येण्यासाठी आमच्या 'जवाहरतरङ्गिणी' या मुद्रित काव्यातील पुढील श्लोक उद्धृत करतो—

हरिहरजिनबुद्धध्वस्तमोहमदाना
चरणकमलभक्ताः सम्प्रहीणान्यवैराः ।
निजहृदि दृढमेना मातृभूमिं निधाय
त्वदभिलषितमेते बन्धुभाव भजन्तु ॥

भरतभुवि हि पञ्च द्राविडा दाक्षिणात्याः
यदि पुनरपि गौडाः सन्ति पञ्चोत्तराहाः ।
हतपृथगुपभाषा–जाति–वर्णादिवैराः
त्वदभिलषितमेते बन्धुभावं भजन्तु ॥

अणोरणीयानयलारन्तरात्मा
भूयाद् बलिष्ठो महतो महीयान् ।

त्रिवर्णराष्ट्रध्वजधर्मचक्रं
प्रवर्ततां, भारतसिंहमुद्रा ॥
मलिनताऽत्र नभःकुसुमायतां
विषमता मृगसंघतृषायताम् ।
कृपणता शशशृंगकुलायतां
त्वयि जवाहर ! भारतशासके ॥

*स्वातन्त्र्यप्राप्तिसाठी शस्त्रक्रांतीचा मार्ग अवलंबिणाऱ्या सर्व देशभक्तांचें* स्तवन आम्ही एका स्फुटकाव्यात केलें आहे. तें असें —

## राष्ट्रवीर–यशोगानम्

येषां भ्रुवौ दशमुखान्तकचापलेखा
ते लोचने त्रिपुरदाहकबाणवह्निः ।
सोत्तर्जनी क्षितिभृदन्तकुठारधारा
तेऽमी जयन्ति निजराष्ट्रविमुक्तिवीराः ॥ १ ॥

वित्तं स्वराष्ट्रहितचिन्तन–मग्न–चित्तं
सेना स्वदेशपरिमोचन–तीव्रकांक्षा ।
शस्त्रं स्वराज्यरिपुभिद्प्रबुद्धि –
येषां जयन्ति त इमेऽद्भुतमुक्तिवीराः ॥ २ ॥

धैर्यं समस्तकुलपर्वतनिश्चलत्वं
वीर्येऽखिलग्रहगणोल्लसदुग्रतेज. ।
कार्ये त्रिविक्रमविचित्रचरित्रशीलं
येषां जयन्ति त इमेऽद्मुक्तिवीरा. ॥ ३ ॥

दीप्तार्करश्मिरससंघटितेव येषां
वाङ्निःसृता वदनलेखनतो बभासे ।
विद्युन्मयीव नु भुजङ्गमसत्रवह्नि—
ज्वालेव वा शिवललाटविलोचनाभा ॥ ४ ॥

येषामसह्यपरशासनपीड्यमान–
लोकव्यथा–व्यथित–कोमलमानसानाम् ।
सद्योपखण्डित–निजधर–रक्तधारा–
विलग्नं रजोऽप्यनलपूलिरिवोद्बभाते ॥ ५ ॥

धाराभिरात्मरुधिरस्य महाभिषेकः
कृत्तात्मशीर्षकमलैश्चरणोपहारः ।
नीराजनाविधिरहो प्रदहत्स्वदेहै-
र्यैवामियं स्वजननीसमुपासनाऽऽसीत् ॥ ६ ॥

'सत्यज्यतां भरतभू 'रिति घोरगर्जो-
द्भूतैः प्रकम्पन-महालहरी-प्रकम्पैः ।
पारेसमुद्रमतिगूढसुरक्षितं तद्
यैराङ्ग्लभूमिपतिपीठमिवोच्चकम्पे ॥ ७ ॥

आङ्ग्लाधिराज्यविषये ध्वचनानवाप्य
ह्यस्ताचलोच्चशिखरं सविता प्रखिन्नः ।
यैरस्य यैर्रसिलमाङ्ग्लमहाधिपत्यम्
अस्ताचलस्थितिसुखं पुनरेष नीतः ॥ ८ ॥

शूलाग्रकोटि-परिलम्बित-पूतदेह-
प्रेतैः प्रदीप्ततम-जीवशरैर्मदीयैः ।
भिन्नेऽर्कमण्डल इमे ह्यवलोकयन्ति
वैमानिकाः खलु करण्डकमिव स्फुरन्तम् ॥ ९ ॥

कारागृहे निगडकुण्ठितहस्तपादाः
अज्ञातवासमटवीभ्रमणप्रलीनाः ।
द्वीपान्तरे प्रियवियोगविषण्णचित्ता
ते मेऽनिशं हृदि वसन्तु हि देशभक्ताः' ॥ १० ॥

हें काव्य Nagpur Times या नागपूरच्या इंग्रजी दैनिकानें १९५७ च्या क्रांतियुद्धाच्या शताब्दीविशेषांकात इंग्रजी भाषांतरासहित प्रकाशित केलें.

आमच्या 'मन्दोर्मिमाला' या स्फुटकाव्यसङ्ग्रहात 'विभूतिवन्दनास्तोत्रम्' हें राष्ट्रभक्तिपर शतककाव्य अन्तर्भूत झालें आहे. त्यामध्यें शंभर श्लोकांत अष्टोत्तरशत विभूतींचें गुणवर्णन राष्ट्रभक्तीच्या उद्दीपनासाठी केलेलें आहे. आरंभीच्या सात श्लोकांत भारतभूमि, हिमालय, गंगा, यमुना, सिन्धु इत्यादींचें स्तवन, त्यानंतर प्रयाग, रामेश्वर, पुरी, अयोध्या, द्वारावती इत्यादि वैशिष्ट्यपूर्ण नगरींचें स्तवन, त्यानंतर श्रुति, स्मृति, रामायण, भारत, गीता इत्यादि राष्ट्रीय ग्रन्थांचें स्तवन, व पुढील भागांत, व्यासापासून रवीन्द्रनाथापर्यंतचे श्रेष्ठ राष्ट्रीय कवि, चन्द्रगुप्तापासून हरदयालपर्यंतचे क्रांतिवीर, बुद्ध शंकराचार्यांपासून रामकृष्णविवेकानन्दापर्यंतचे तत्वदर्शी, सीताअरुंधतीपासून मीरा, लक्ष्मीबाईपर्यंतच्या पूज्य महिला यांचें प्रत्येकीं एका श्लोकांत स्तवन केलेलें आहे. शेवटीं

"येः शक्तिश्च मतिश्च भक्तिरिह सम्पत्तिश्च मूर्तिर्निजा
निष्काम क्षणशोऽथवाऽपि कणशः प्रत्यर्पिता सर्वशः ।
लोकस्यैव हिताय केवलमहो सौख्याय सर्वस्य च
अज्ञातानपि तान् विचिन्तयति मे नित्यं कृतज्ञं मनः ॥

या श्लोकांत अज्ञात देशभक्तांचे स्मरण केलेलें आहे. प्रस्तुत मन्दोर्मिमाला या काव्यसंग्रहांत,

यदि निगदति सत्यं याति कारानिवासं
यदि नमयति शत्रु देशनिर्वासनं च ।
यदि विशसति दण्डचं विन्दते प्राणदण्डं
न हि न हि खलु दुःखं पारतन्त्र्येण तुल्यम् ॥ (पृ. ५१)

उत्तिष्ठोत्तिष्ठ पश्योन्मदहतमतयो दन्तिनः स्वैरमेते
कान्तारं तावकीनं सफलितमखिलं ध्वंसितुं सम्प्रवृत्ताः ।
निर्दलयैतान् समस्तान् करिवर नखरैर्वज्रतुल्यैरिदानीं
साम्राज्यं स्वं स्वकीयं प्रकटय दशदिङ्मण्डले गर्जनाभिः ॥ (पृ.३८)

इत्यादि अनेक स्फुटश्लोकांत राष्ट्रीय भावना व्यक्त करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

अनेक प्रादेशिक भाषीय वृत्तपत्रांतूनहि संस्कृत वृत्तपत्रांप्रमाणे वेळोवेळीं विविध विषयावरील संस्कृत राष्ट्रीयकाव्यें आजवर प्रकाशित होत आलीं आहेत. त्या सर्वांचें संकलन त्या वृत्तपत्रांनीच करावयास हवें. महाराष्ट्रांत राष्ट्रभक्तीचें उद्दीपन करण्यासाठीच टिळकांचा 'केसरी' प्रकटला. या केसरींतून अनेक प्रासङ्गिक विषयावर संस्कृतकाव्यें सतत प्रकाशित झालीं त्यामध्यें, "राजसार्वभौमः (१२-११-११), स्वराज्याष्टकम् (१०-१०-१६), महात्मनः कारावासः, (१-७-३०) भारतमातृस्तोत्रम् (६-५-३०), रणदुन्दुभिः (२२-४-३०), स्वराज्यमहिम्नःस्तोत्रम् (६-५-३०) यासारखीं मुकुंदराय मिरजकर, ओगले इत्यादि संस्कृत कवींचीं काव्यें विशेष उल्लेखनीय आहेत.*

**भारतभजनम्** – कर्नाटकचे प्रसिद्ध कवि मयूर विश्वनाथशास्त्री यांचीं राष्ट्रभक्तिपर गीतिकाव्यें प्रस्तुत पुस्तकांत संगृहीत केलेलीं आहेत.[1] त्यांचीं ही काव्यें फारच लोकप्रिय झालेलीं आहेत.

**राष्ट्रवाणी** – उत्तर प्रदेशातील आरा या गावचे श्री. रामनाथ पाठक (प्रणयी) यांनी लिहिलेलें हिंदी पद्धतीचीं राष्ट्रभक्तिपर ७५ गेयकाव्यें प्रस्तुत पुस्तकांत

* पहा–"केसरी प्रबोध" पृ. ५९०
१. मद्रास येथें मुद्रित, इ. स. १९४८.

संगृहीत केलीं आहेत. बंकिमचंद्राच्या 'वन्देमातरम्' या राष्ट्रगीतांतून स्फूर्ति घेऊन सर्वच भाषांतून जशीं मातृभूमक्तीपर काव्यें निर्माण झालीं त्याच तोडीचीं गेयकाव्यें संस्कृतांतहि भरपूर प्रमाणांत निर्माण झालीं आहेत. 'वन्देमातरम्' हें गीतच सर्वांचें स्फूर्तिकेन्द्र होतें. श्री. रामनाथ पाठकांचीं कांही गेयकाव्यें पुढे उदाहरणार्थ दिलेलीं आहेत. (राष्ट्रवाणी पृ. ३)

## जयतु भारतवर्षदेशः

यत्र युद्धविरक्तिगीतम् । गीयते प्रतिगृहमतीतम् ।
यत्र कृष्णार्जुनकथा 'गीता' जयति कर्मोपदेशः ॥ जयतु भारतवर्षदेशः ॥

यत्र रे, आतः प्रतापः, विहित-रिपुकुल-तीव्रतापः ।
विजयि-शिवराजप्रबलपदसैन्यदलबल-चलितशेषः ॥ जयतु भारतवर्षदेशः ॥

पद्मिनीव बभूव भूतिः । यत्र राजकुलप्रसूतिः
विजयते स्म विजित्य शत्रून् । यत्र रे विक्रमनरेशः । जयतु०॥

यत्र कविगुरुकालिदासः । यत्र हर्षकलाविलासः
यत्र भवभूतेर्विभूतेर्भाति करुणालयविशेषः ॥ जयतु भारतवर्षदेशः ॥

यत्र तुलसीसूरदासौ । अभवतां वाणीविलासौ
यत्र मीरा, भारतेन्दुः भूषणः कविकुलदिनेशः ॥ जयतु भारतवर्षदेशः ॥

प्राचीन विभूतींच्या नामावलीबरोबरच अर्वाचीन काळांतील मदनमोहन मालवीय, सुभाषचंद्र, म. गांधी, जवाहरलाल इत्यादि अर्वाचीन राष्ट्रभक्तांची नामावली कवीने प्रस्तुत काव्यांत गुंफलेली आहे. **स्वास्त्ये झांशीनरेशे**[१] या गीतांत—

काह्वयत रिपूनुदग्रान् । एकलापि पुनस्समग्रान् ।
बाहुमेच्चलचन्द्रहासं रक्तशतसरितो निमेषे ॥ स्वास्थ्ये झांशीनरेशे ॥

हुङ्कृतो तव सिन्धुघोषः । नयनयोस्ते रुद्ररोषः ।
कालिकेव बभूव मूर्तिस्तेजसा ते रणनिवेशे ॥ स्वास्थ्ये झांशीनरेशे ॥

युद्धमानात्ययमगच्छः । नैव यां जीवन्त्यगच्छः
ईक्षितुं किमेषि 'झांशीन्' तामये स्मृतिमात्रशेषे ॥ स्वास्थ्ये झांशी० ॥

यासारख्या सरळ शब्दांत राणी लक्ष्मीबाईचें पुण्यस्मरण कवीने केलें आहे. **बन्दी प्रविशति कारागारे** (पृ. १०) या गीतांत देशकल्याणासाठी कारालयांत जाणाऱ्या देशभक्ताच्या भावना कवीने वर्णिलेल्या आहे.

---

१. राष्ट्रवाणी, पृ. ५

### धिक् स्वपत्यद्यापि देश

धेनवः प्रतिदिनमगणिताः अननुकूला आर्यवनिताः
हन्त हन्यन्ते कुटिलयवनैर्महात्याचार एव. ॥ धिक् ० ॥

दुग्धसरिता का कथा रे पाल्यते नीरव्यथा रे
चलति नो पवनोऽप्यभीतोऽसभयः कोऽस्त्यत्र शेषः ॥ धिक् ० ॥

यासारख्या गीतातून देशाच्या दुर्दशेने उत्पन्न झालेली व्यथा कवीने प्रकट केली आहे. 'तरुण रे कथमत्र शेषे ?' (पृ. १०), 'तरुण रे रणभेरीं निनादय' (पृ २०), 'सज्ज नवसैनिक चलेयम्' (पृ.२३), 'गाय तरुणि ! नो तादृशगीतम्' 'तरुण ! कल्य भारतमुन्नितम्' (पृ ३१), 'चल नवीनयुग निधातुम्' (पृ. ३६) 'किन शोचसि वीरबालक' (पृ ४०), यासारख्या गीतातून तरुणांना उद्बोधन करीने आपल्या राष्ट्रीय आकांक्षा व्यक्त केल्या आहेत. 'शिशिरमेव जाने न-वसन्तम्।' (पृ. ७९) 'अवतीर्णः पुनरपि हेमन्तः।' (पृ. ८०) 'वर्ष रे घनदर्प जलधर !' (पृ. ७६) । यासारख्या निसर्गवर्णनपर काव्यातून सुद्धा श्री. रामनाथ पाठक याची राष्ट्रीय भावना व्यक्त झालेली आहे.

**स्वातंत्र्यज्योतिः** – बंगलोरचे कवि रामकृष्ण भट्ट यानी स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रसंगी स्वतंत्रभारताची घटना व नेहरू पटेल इत्यादि राष्ट्रनेते यांस उद्देशून प्रस्तुत काव्य केले आहे.[1]

भारतसरकारतर्फे राष्ट्रीय दृष्ट्या महत्त्वाचें असें एक संस्कृत लिखाण प्रसिद्ध झाले आहे. ते म्हणजे **भारतराष्ट्रसंघटना** हा ग्रंथ होय. स्वतंत्र भारताची घटना तयार झाल्यानंतर आंध्रचे विख्यात् पंडित डॉ. सी. कुन्हन्राजा यानी त्या घटनेचा काही भाग पद्यरूपाने भाषांतरित केला. त्यामुळे भारतसरकारलाहि प्रस्तुत घटनेचें इतर भाषाप्रमाणे संस्कृत भाषेमध्येहि भाषांतर करण्याची जाणीव झाली. त्यासाठी सरकारने एक अनुवादक समिति नियुक्त केली. या समितींत पुढील सदस्य होते.— (१) म. म. पांडुरंग वामन काणे (मुंबई)–अध्यक्ष, (२) तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (धर्मकोश व मीमांसाकोश या विख्यात ग्रंथांचे संपादक, वाई)–भाषांतरकार, (३) डॉ. मंगळदेवशास्त्री, (वाराणसी)–भाषान्तरकार, (४) डॉ. सुनीतिकुमार चॅटर्जी, (कलकत्ता)–सदस्य, (५) श्री. के. बालसुब्रह्मण्य अय्यर, ॲडव्होकेट, (मद्रास)–सदस्य, (६) म. म. गिरिधर शर्मा चतुर्वेदी, डायरेक्टर, संस्कृत स्टडीज, हिन्दु विश्वविद्यालय, (वाराणसी)–सदस्य. (७) डॉ. बाबूराम सक्सेना, (अलाहाबाद)–सदस्य, (८) प. राहुल सांकृत्यायन (मसुरी)–सदस्य, (९) डॉ

[1] बंगलोर येथे १९५० मध्ये मुद्रित

रघुवीर (नागपूर)-सदस्य, (१०) श्री. मुनि जिनविजयजी, डायरेक्टर भारतीय विद्याभवन ( मुंबई )-सदस्य, (११) डॉ. कुन्हनराजा ( मद्रास )-सदस्य.

**कावेरीमहिमादर्शः**— वेंकटाचार्य नावाच्या कवीने 'कन्नामबडी' येथील कावेरीच्या धरणास उद्देशून प्रस्तुत काव्य लिहिले असून त्याला 'श्रीकृष्णराज-सेतुबधम्' असे दुसरे नाव दिलेले आहे हुब्लिकेरी येथील योगव्यासनर्धी **व्याघ्रतटाक-भूविवरम्** या नावाचे आणखी एक काव्य या वेंकटाचार्यांनी लिहिले आहे. आपल्या देशाचा भौतिक उत्कर्ष वर्णन करणे हाच या काव्याचा उद्देश आहे. **ग्रंथिज्वर-चरितम्**, 'रामानुजमतामासविलास.', 'यादवगिरिमाहात्म्यसग्रहः', 'पाका न्योक्तिमाला', 'चम्पकान्योक्तिमाला', 'दिव्यसूरिवैभवम्' (गद्यप्रबन्ध), यासारखे अवातर ग्रथहि या वेंकटाचार्यांनी लिहिले आहेत.

राष्ट्राभिमानशून्य लोकाच्या अन्तःकरणात राष्ट्रभक्ति उद्दीपित करण्यासाठी अनेक कवींनी आपल्या राष्ट्राची दुर्दशा व जनतेची सर्वाङ्गीण अवनति वर्णन करणारी काव्ये लिहिली आहेत. दयानन्ददिग्विजयः या महाकाव्याच्या **लोकदशासमीक्षणम्** नामक चतुर्थ सर्गामध्ये कवि श्री अखिलानंद शर्मा यानी ५३ श्लोकामध्ये दयानंदाच्या उदयापूर्वी झालेला भारताचा अध पात वर्णिलेला आहे. आचार्य मेधाव्रत शास्त्री यानीहि आपल्या 'दयानन्ददिग्विजय' महाकाव्याच्या **भारतदुर्दशा** नामक द्वितीय सर्गामध्ये २५ श्लोकात समाजाचा अधःपात वर्णिलेला आहे. आचार्य मेधाव्रत-शास्त्रींच्या काव्यातील याविषयीचे श्लोक निदर्शनार्थ पुढे दिलेले आहेत. त्यावरून राष्ट्रनिष्ठ कवींच्या व्यथेची कल्पना येऊ शकेल.

एकेश्वरोपासनमात्मनीनं विहाय वेदप्रतिकूलरीत्या ।
स्वशेमुषीकल्पितमूर्तिपूजामारेभिरे कर्तुमिहार्यलोकाः ॥१०॥

लोकोपकारक्षमयज्ञकार्ये कुक्षिंभरिब्राह्मणबन्धुसंघाः ।
निर्दोषसत्त्वान् मनुजांश्च हत्वा वह्नावहौषुः श्रुतिमन्त्रपूते ॥११॥

दम्भेन गौरीशिवयोर्मदान्या निपीय हाला महिलासहायाः ।
समाचरन्निन्दितधर्म मात्रा पुत्र्या भगिन्या वि च वामशीलाः ॥१२॥

अनेकदोषाकरमूर्तिपूजा-मिथ्याप्रभावैर्निगृहीतचित्ताः ।
मूढा महीपालगणाः स्वदेशोर्देवालयांस्त्रातुमल न पुर्यान् ॥१३॥

महोपकर्त्रोर्निजवन्द्यपित्रोः प्रज्ञानदानां विदुषां गुरूणाम् ।
नृपातिथीनाञ्च विहाय पूजां जडार्चनायां निरताऽभवज्जातिः ॥१४॥

---

४. पृ. ४१४ ।

पत्नी कथं श्रीपतिदेवभक्ति कुर्यान्न भर्ता यदि तत्सपर्याम् ।
अयोन्यसत्कारविनाशहेतोर्न सन्तति सद्गुणसंस्कृता स्यात् ॥१५॥

धर्मोपदेशेन मतान्तराणां प्रकल्पनां विलिप्सवारिधूर्तैः ।
विधाय वित्ताहरणाय नून कृतानि देवार्चनमन्दिराणि ॥१६॥

मृग यथेहामृग आखुमोतुर्यथा खग श्येन इवैष कह्व ।
मीन यथा दाम्भिकपूजको सौ जग्राह जाले रमणीर्मणि तु ॥१७॥

अनेकपत्नी परिणीय वृद्धो यूना गणो भारतवशजात ।
भोगातिसगात स्वरगादकाण्डे निपात्य भार्या विरहाग्निकुण्डे ॥१८॥

अतृप्तचित्ता विषयोपभोगैं स्वच्छन्दगास्ता विधवा विविक्ते ।
तीर्थस्थले देवगृहे मठे वा शठमठानां व्यभिचेरुरीशै ॥१९॥

श्रद्धालुभिर्मूढजनैं स्वकन्या देवालये देववराय दत्ता ।
श्रीदेवदास्य कृतगीतलास्या बलादभुज्यन्त विटैरजस्रम ॥२०॥

परा मकल्याणधनप्रसूति विहाय दैवीं विमला प्रवृत्तिम ।
जना महाक्लेशदयोनिहेतु तमोमयीं वृत्तिमशिश्रियस्ते ॥२१॥

इत्थं गताऽनर्थकरीकुरीतिनिशाचरीवार्यजनैं चरिष्णु ।
भद्राग्मनुष्यानपि पीडयन्ती स्वराज्यमस्यापयदन्नवन्दे ॥२२॥

अचेतने वारि तरौ कृशानौ समीरणे ग्रावणि तिग्मभानौ ।
प्रेते च मर्त्ये मतिहीनजन्तौ देवत्वबुद्ध्या मनुजा विनष्टा ॥२३॥

युधिष्ठिरानन्तरमायजाते साम्राज्यसूर्योऽम्बरमध्यदेशात् ।
दुर्दैवत क्षीणमहा क्रमेण प्रारब्ध गन्तु हरित प्रतीचीम् ॥२४॥

भूखण्डपिण्डस्य कृते कृतघ्नैर्वैरायमाणैजयचन्द्रतुल्यैं ।
आच्छिद्य राज्य निजबन्धुहस्तात पाणौ प्रदत्त यवनेश्वराणाम ॥२५॥

ऐश्वयसजातविलासिताया पञ्चेन्द्रियाणा विषयातिसगात ।
प्रमादमद्य परिपीय भूपा राज्येन साक यशसाऽपि हीना ॥२६॥

परस्परेर्ष्येन्धनघषणोत्थ-द्वेषाग्निदग्धामलहादभावै ।
महाप्रभौर्विदलामिपरानामङ्गीकृता क्लिक्रता नरेन्द्रै ॥२७॥

मेवाडराष्ट्रावनिराजहस क्षत्रावतंसो रविवंशदीप ।
प्रतापशाली समभूत प्रताप स्वातन्त्र्यमिद्धंं सहितातिताप ॥२८॥

अकब्बराख्यो यवनाधिराजो वशवद य प्रविधातुमैच्छत् ।
छलैर्वने भिल्लसख भ्रमन्त तथापि निघ्नो न हि तस्य जात ॥२९॥

आपन्नर्वशाब्दमय वनान्ते सापत्यभार्य सहमान आर्य ।
अनन्तकष्ट न जहौ स्वधर्मम् प्रवातनिष्कम्प इवाचलेन्द्र ॥३०॥

दु शासनान्मोगलवशजाना दिल्लीश्वराणा छलनापराणाम् ।
यज्ञोपविताहरण द्विजाना कन्यापहार परित प्रवृत्त ॥३१॥

बाल्ये वयस्येव विवाहिता हा द्विजै स्वकन्या अतिकोमलाग्य ।
नाल मुखाम्भोजमपावरीतु भयेन नार्यो रजनीचराणाम् ॥३२॥

महीसुराणामतुल महस्तद् राजन्यतेजोऽपि नितान्तनष्टम् ।
दशा विशा द्रव्यधनानवर्ण्या क्षुद्रस्स शूद्रस्तु भयाद् रिपूणाम् ॥३३॥

रासर्गदोषात् पिशिताशनाना मैरेयपान मतिनाशन तत् ।
दुरोदर स्त्री–मृगयातिसङ्गो मांसाशन चार्यजनेषु वृद्धम् ॥३४॥

आर्यापकर्षविधिचित्रदृश्य प्रहर्षभिद् भारतवर्षमेतद ।
विलोक्य विश्वेश्वरमानसान्तात् कारुण्यगगाऽस्रवदच्छधारा ॥३५॥

*      *      *

श्री. ग गो. जोशी याच्या **काव्यकुसुमगुच्छ** नामक कवितासग्रहात अनेक राष्ट्रीय कवितांचा अतर्भाव झालेला आहे. त्यातील त्रिपुरी कॉंग्रेसच्या अधिवेशनप्रसगीं त्यानी केलेले **राष्ट्रीयसभावन्दनम्** हें काव्य विशेष उल्लेखनीय आहे.

**कॅाँग्रेसगीता**—वर उल्लेखिलेल्या काव्यात कॅाँग्रेसची स्तुति आढळते. त्याचप्रमाणे कॅाँग्रेसची निंदा करणारीं काव्यहि निराळ्या दृष्टिकोनातून राष्ट्रीय जीवनाचा विचार करणाऱ्या कवींनी लिहिलीं. प्रस्तुत 'कॅाँग्रेसगीता' हे उपहासगर्भ काव्य[5] एल् रगीलादास यानी लिहिले आहे.

सपूर्ण भारतवर्षाविषयीं भक्तिभावना व्यक्त करणारी काव्य जशीं अनेक राष्ट्रवादी कवींनी लिहिलीं त्याचप्रमाणे त्याची राष्ट्रभावना विशिष्ट प्रांतापुरती सीमित होती अशानी तिचा आविष्कार आपल्या प्रिय प्रदेशाचीं स्तोत्र गाऊन केला. महाराष्ट्रात जसें 'प्रिय अमुचा एक महाराष्ट्र देश हा' ह प्रादेशिक गीत भाषानिष्ठ राष्ट्रवाद्यामध्ये मान्यता पावलें त्याचप्रमाणे आध्र, बगाल इत्यादि प्रदेशातहि अशींच प्रादेशिक गीतें मान्यता पावलेलीं आढळतात असल्या काव्यामध्ये त्या प्रदेशातील नद्या, पर्वत, तीर्थक्षेत्रें, थोरपुरुष याचा स्तुतिपर उल्लेख केलेला असतो. या सर्व प्रादेशिक राष्ट्रीय काव्याचा सुसबद्ध सग्रह केला तर त्यातून अखिल भारताचें माहात्म्य निवेदन करणारा उत्कृष्ट सुभाषितसग्रह निर्माण होईल. हा उद्योग सुद्धा कोणीतरी नवीन

५ मद्रास येथें १९०८ मध्ये मुद्रित

सुभाषितसंग्रहकाराने अवश्य करावयास हवा. प्रस्तुत प्रथाची मर्यादा लक्षात घेऊन उदाहरणाप्रीत्यर्थ असल्या प्रादेशिक राष्ट्रकाव्याचा संग्रह संक्षेपाने पुढे दिलेला आहे. प्रारंभी श्रीशंकराचार्य कुर्तकोटी यांच्या 'समत्वगीतम्' नामक काव्यातील 'भारत माहात्म्य' दिलेले आहे. व त्यानंतर निरनिराळ्या प्रदेशांची माहात्म्यस्तोत्रे उद्धृत केलेली आहेत.

## समत्वगीतातील भारतमाहात्म्य (अध्याय २)

श्रीमत् पवित्र परिणाहि राष्ट्रं प्राचीनमेतद् भुवि राजते तत् ।
यद् भारताख्या भरतस्य राज्ञः ख्याते पताकामधुनाऽपि धत्ते ॥१॥

अस्य प्रभावं वदतीव कश्चिन्नामान्तरं यत्किमपि प्रयुक्तम् ।
सिन्धुप्रतिष्ठागमकं हि हिन्दुस्थानाभिधानं बहुशोऽद्य रूढम् ॥२॥

स्थानं च तेषां प्रथितं किलेदं ये नूतमार्या जगति प्रसिद्धाः ।
अद्यापि येषां स्वरसप्रवाहो विश्वातिशायी महिमा न हीनः ॥३॥

कालं सुदीर्घं य इह प्रकर्षं सद्धर्ममूलं सरलो ललास ।
तस्यावशेषः सहजे विशेषे क्वाऽप्यस्य सद्यो भवति प्रमाणम् ॥४॥

धर्मं प्रजानां स्थितये सुनद्धा राजर्षयस्ते प्रबभूवुरत्र ।
व्यक्तं हि येषां सुचरित्रतो यत् क्वाऽपि कश्चिन्न तु तत्पदार्हः ॥५॥

रेजुर्महर्षिप्रमुखाः प्रभूताः सर्वज्ञकल्पा इह शास्त्रकाराः ।
ग्रथा मदीया विविधाः सुकीर्तिरतंभायमाना उपकुर्वते नः ॥६॥

सर्वैस्तथाऽर्यैर्निजकर्मदक्षैर्निर्वर्तितं यद्यदतुल्यमत्र ।
तत्तत्त्विदानीं परिरक्षतीव स्वातन्त्र्यहीनानपि पारतन्त्र्यात् ॥७॥

यत्नास्तदीयाः सफलीक्रियन्तां तत्सम्भवश्चेदुपपन्नमेतत् ।
अस्माभिरव्याहततद्रहस्यैर्भाव्यं जगत्सुस्थितिदत्तचित्तैः ॥८॥

स्वार्थच्युतो न क्षमते परार्थे स्वार्थैकदृष्टेः क्व परार्थचिन्ता ।
तद् यौगपद्यात्स्वपरार्थसिद्धिर्यस्मात् स धन्यः कथितः कृतार्थः ॥९॥

यैरार्यवर्यैर्जगतीहितस्य स्वीयैश्चरित्रैः सह दर्शितो ध्वा ।
तेषां वयं सस्मृतिमप्रतोऽर्हा गोदोहोन नन्वनु वत्सपानम् ॥१०॥

या भौतिकीमुन्नतिमेव नैकामाध्यात्मिकीं निवृतिमीक्षतेऽपि ।
सर्वांगपूर्णा सुरसा सुयुक्ता सा संस्कृतिर्नः समुपस्थिताऽस्ति ॥११॥

तस्या हि गत्या स्वयमेव तेजः प्रादुर्भवेत तत्प्रविलीनमन्तः ।
प्रत्यर्थिना यत् कपटप्रबन्धात् गाढान्धकारादिव मोचयेत्तत् ॥१२॥

आसीदय प्रागपि सम्प्रतीव प्रश्नो दुरापोत्तर एव भूय ।
यद् दुर्जनेषु प्रबलेषु लोकश्रेयोऽभिरक्ष्य कथमजसेति ॥१३॥

शाठ्य कदाऽपि 'प्रतिकारहीन क्षात्या न शाम्येत् सहकारता किम् ? ।
शाठ्य च शाठ्य प्रति सम्प्रयुक्त सवर्धयेत् तत एव च सत्यमास्ताम् ॥१४॥

शाठ्य शठानामशठैश्च स्द्भिर्नैव स्वर्किचित्करता प्रलापात् ।
दुष्टा यदि स्यु कुटिलाग्रहास्ते तेजस्युपेयु शलभत्वमाशु ॥१५॥

क्लिश्नन्तु काम कपटाश्रुशसा नश्यत्स्ववश्य बहुशस्ततोऽन्ते ।
निन्दन्तु मन्दा परमार्थधुर्य कश्चिन्न मुचेदृजुता तु जातु ॥१६॥

राष्ट्रे चिरादत्र हि न प्रमाद्य कुत्राऽपि धर्मादिति शिक्षिता स्म ।
ओजायतेऽन्ते समुपासितोऽसौ यस्य स्वरूप परम समत्वम् ॥१७॥

प्रोच्याऽलमेतद् यदिहेव सख्ये सख्येऽपि सम्यक् रामतोपयुक्ता ।
अयं किलाऽत्र प्रकृतो रणोत्थो गीतोपदेश सुनिदर्शन स ॥१८॥

पाश्चात्यराष्ट्रैरधुना तु कश्चिद् य साम्यवादो विविधोऽस्त्युपात्त ।
अध्यात्मनिष्ठारहितोऽस्थिरोऽसौ कि सैक्तोऽपि ध्रुव एव सेतु ॥१९॥

गीतोदित तत्सुदृढ समत्व यस्मिन् यथावत परिवेक्ष्यमाने ।
यद्वेदितव्य विदित भवेत्तत् कृत्य च यत्तन्निखिल कृत स्यात् ॥२०॥

तत्त्वावगत्यामुपदेशमूल यत्पूर्ववृत्त तदपि प्रमाणम् ।
तद् योद्धमर्ह समर प्रवृत्त कैया कुत कुत्र कथ कदेति ॥२१॥

यद् भारताख्य मधुरीकरोति प्राच्येतिहास कलहस्य वृत्तम् ।
तद् यावदित्थ समयानुरूप सक्षिप्य चोदाहरणीयमत्र ॥२२॥

## दुर्गानुग्रह–महाकाव्यातील आध्रवर्णन (सर्ग ९ वा)

श्री भारती प्रियसुतायितमद्रराजधानी–धरामुकुटहीररत्नराज आन्ध्र ।
वाणी रमा धरणि हार्दरसास्पदत्वात् याभाति सर्वविधसम्पदुरुप्रभाभि ॥१॥

महाच्युतेशभुवनत्रयसर्वभूतिभाज सिमूक्षुरज एवमिहार्यदेशे ।
आन्ध्राभिद समसृजत् स ततस्त्रिलिगनाम्नाप्यतीव विदित किल देशरत्नम् ॥२॥

मन्दाकिनीं त्रिपथगामतिशय्य यत्र गगैव सप्तपथगा किल गौतमीति ।
नाम्ना पुनाति जगतामखिलाघहन्त्री भवत्यस्य सविधे कुतुरातिरेकात् ॥

श्रीकृष्णवेण्यभिधयाऽथ च तुगभद्रा नाम्नाऽपि भिन्नतनुयुग्ममुपेत्य गगा ।
यत्प्रेमत. सकलशालिफलप्रदात्री सर्वथियोऽपि परितो दिशति स्रवन्ती ॥४॥

तच्चेटिका इव नदीप्रवराः पिनाकिन्याद्याश्च यत्र सुवहन्त्युदयं नयन्त्यः
सस्यादिभिः सुफलितैर्धनधान्यराशिसम्पत्प्रदैः पशुसमृद्धियुतैश्च नृणाम् ॥५॥

आराम-पञ्चकमुखैर्बहुभिश्च शैलैः श्रीशैलमुख्यविदितैरपि दिव्यपूतैः ।
क्षेत्रैर्ललत्तिरुमल-प्रमुखैस्तथान्तर्वेदीमुखैश्च सुविराजति वैष्णवैश्च ॥६॥

यत्र स्वयम्भु-शिव-विष्णु-गणेश-तत्तद्देव्यादय. श्रितजनेष्ट-फलप्रदाः स्यु ।
दिव्यालयेषु निवसन्ति समन्ततोऽपि भव्यात्मभिः स्वपरिवारगणैः कृपार्द्राः ॥७॥

यत्रोदित-श्रुतिचतुष्टय-तत्त्वबोधि-सिद्धान्तभाष्य-मणिभिः ककुभश्चतस्रः ।
विभ्राजयन् बहुनिबन्धवरैरशेषत-श्चावगूढपटुतत्त्व-विभासि-बन्धैः ॥ ८ ॥

अन्यैश्च सर्वबुधबोध-महाविभूति-सन्धायिभिर्निगमशक्तिविभूतिमाढ्याम् ॥
सन्दर्शयन्निजतपोबलतो रमानुकम्पादिभिर्जगति यः प्रभुतां बभार ॥९॥

सर्वज्ञमाधवमनीषिपतिः स विद्यारण्याख्यया यतिपतिर्गुरुराजपीठम् ।
अभ्युष्य चौपनिषद गुरुतत्त्वबोध-पीयूषमत्र बुधसहृतये विदेश ॥१०॥

श्रीभट्टभास्करमहाविबुधाधिनाथो यत्रावतीर्ण इह वेदचतुष्टयस्य ।
भाष्य प्रतिश्रुतिपदार्थविवेचनादि-भूष्य प्रयोगविधिभि प्रतितन्त्रमाह ॥११॥

नानानिबन्धमणिभिः श्रुतितत्त्वदीपैः श्रीवेदशास्त्रग-रहस्यमशेषमाढ्यम् ।
योऽव्योपयद् बुधवरेभ्य उदारचेता लोकोत्तरोऽद्य च सुजीवति कीर्तितन्वा ॥१२॥

यत्रोदितः किल कुमारिलभट्टनाम्ना स्कन्दः पुराढ्यमुनिजैमिनिसूत्रजालम् ।
श्रीत न्त्रवार्तिक-निबन्धवचो-मणीभिरापूर्य तत्त्वममल समचीचकासत् ॥१३॥

गान्धर्ववेदमखिल परिमथ्य बुद्धिमन्थेन तद्रससुधां निजकीर्तनेषु ।
निक्षिप्य मानवगणाय दिदेश नादब्रह्मानुभूतिसुखमान्ध्रजन्मा ॥१४॥

भाषामयेषु रघुवीरपदाब्जभक्तो भक्तिप्रपत्तिमहिमानमुदञ्चयन् स ।
ब्रह्मात्मभावमपि सर्वजनप्रसिद्ध श्रीत्यागराजविबुधोऽत्रममण्डयद्धि ॥१५॥

यस्मिन्नेवभरतावनि-पण्डिताधिराजत्वभागलिलतन्त्रनिबन्धराजै. ।
प्राचीकशद् विबुधलोकमशेषमाढ्यालङ्कारदर्शन-निबन्धसरस्वतीं च ॥१६॥

सिद्धान्तरत्न-घटितोन्नततत्त्वकोटि-कोटीर-भासुर-किरीटवरेण कामम् ।
प्राभूषयद् विबुधपेयरसोल्लसच्छ्रीगंगाधराध्वरकृति राजत आढ्यकीर्ति ॥१७॥

गोदावरीतटधरा-तिलकायितश्रीगुड्गण्ड सज्जनपदाभिजन' प्रसिद्ध ।
श्रीवेंगिनाडवभिध-सद्बुधवत्तजन्मोपद्रष्ट-गोत्रज-जगत्पतिपूतनामा ॥१८॥

पातञ्जलाक्षपदकाणभुजादि-सर्वतन्त्रस्वतन्त्रपदवीममलप्रबन्धैः ।
रत्नैर्विभूष्य विदितो विबुधेषु सोऽत्र-भट्टाभिधोऽप्यवरणो यत उत्तिनाथ ॥१९॥

यः सर्वतन्त्र-परिनिष्ठित-पाण्डितीद्ध-साहित्यसार-रसनिर्झरिणी-प्रवाहैः ।
व्याख्यानवर्यनिवहैः पटुकाव्यभूमिं सम्प्लाव्य बोधफलराशिमपीफलन्नः ॥२०॥

श्रीमल्लिका-कुसुम-दामित-कीर्तिपुञ्ज-सौरभ्य-हर्षित-समस्तवुधेन्द्रलोकः ।
श्रीमल्लिनाथ-विबुधोऽन्ध्रधरा-रमण्याः कस्तूरिकातिलकवद् विरराज लोके॥२१॥

साङ्गश्रुतिप्रकर-शास्त्रसमूहसार-सत्साहिती-रसझरी-स्रवदाद्यवर्यैः ।
ग्रन्थैरशेषभरतावनि-पण्डितात्मसम्मोदका बहुबुधा इह रेजुरान्ध्रे ॥२२॥

अर्वाक् च पण्डितवरा अपि शेषतुल्य-श्रीविश्वनाथ-हरिशास्त्रिमुखाः सुपूज्याः ।
श्रीगौतमाद्युपम-राममनीषि-मुख्या वेदार्थवित्प्रवर-पायशास्त्रिमुख्याः ॥२३॥

षड्दर्शनीबुधवरा अपि पुल्यकुल्य-श्रीदक्षिणादिपदमूर्तिपदादिभाजः ।
तन्त्रस्वतन्त्रबुधदेशिकतामवाप्ताः प्राचीकशन् प्रतिभयाऽन्ध्रधरामशेषाम् ॥ २४॥

लक्ष्मीनृसिंहविबुधः स तु सुब्बरायशास्त्री नृसिंहविबुधः स तु सङ्गमेशः ।
श्रीराममूर्ति-बुधवेंकटशास्त्रि-सुब्रह्मण्यादि-सूरय इम समभासयंस्ते ॥२५॥

षट्तन्त्रदेशिकवरैः प्रतितन्त्रमाढ्य-तत्तन्त्रकर्तृतुलितैर्विबुधाधिराजैः ।
शर्म्येश्च सर्वसुकला-प्रतिभा-विशिष्ट-साहित्य-हृद्यकवितापतिभिर्लसन्ती ॥२६॥

शब्दागमादि-बहुतन्त्रपटु-प्रबन्धरत्नावलिं स्वबुधवर्यविनिर्मितां या ।
मालामिवोरसि वहन्त्यखिलं च देशमान्ध्री धरा विजयतेऽतिविभामयन्ती ॥२७॥

माधान्तु-दाशरथि-धर्मज-मुख्यलोकमान्य-प्रभुत्वपरिदर्शि-नृपालवर्यैः ।
श्रीकृष्णदेव-धरणीन्द्र-लसत्प्रतापरुद्रप्रभु-प्रभृतिभिः परिपालिता प्राक् ॥२८॥

श्रीराजराज-नरनाथमुखैर्महीन्द्रैः संरक्षिता बहुतरं ददती त्रिवर्गम् ।
विक्टोरियाप्रभृति-हूणनृपाल-सार्वभौम्यैः सुधर्मनयतः परिवर्धिता च ॥२९॥

वेदागमादि-परिनिष्ठित-सन्मनीषाः सर्वत्र सन्ति विबुधा धिषणोपमानाः ।
तत्तद्रहस्यमखिलं विषयान्तरस्था येभ्यो वदन्ति गहन विषयेषु विज्ञाः ॥३०॥

आर्ये सुकर्मनिवहे विविधप्रयोग सत्सम्प्रदाय-समुपेतमितोऽन्य-देश्याः ।
जानन्ति याज्ञिक बुधानपि सन्निकाशान् शुद्धं स्वबुर्लभमिति प्रकटोत्सुकास्ते ॥३१॥

यत्र स्वरो निगमगीमधुरो नितान्त न श्रूयतेऽन्यविषये मुनिलक्षणाढ्यः ।
उच्चारणे क्रम-जटा-घन-मुख्यपाठि-सद्वैदिका बहुसहस्रमिता विभान्ति ॥३२॥

यत्र स्त्रियो निजसतीत्व-विशुद्धिधुर्या धर्मान् वधूजनगतान् परिदर्शयन्ति ।
स्वाचारतोऽन्ययुवतीभ्य उपात्तधर्मा शिष्टेभ्य एव पुरुषाश्च विदन्ति धर्मान् ॥३३॥

श्रौतैश्च यागनिवहैरघुनापि यत्र कर्मण्यशिष्टनिचयाचरितैरमर्त्याः ।
इज्यन्त आज्यमुखदिव्यहवि.सुगन्धैः आमोदितो विजयते सुरैरक्षितोऽन्ध्रः ॥३४॥

गोदावरीमुख–नदीवर–वारिकुल्या–सम्प्लावितार्यफलभूफलितं सुधान्यैः ।
कुक्षामुख्य–परिपोषणमन्यराजधानीषु धारयति यः प्रतिवत्सरं च ॥३५॥
यत्र स्त्रियश्च पुरुषाश्च समस्तसम्पद्भोगैर्निरन्तरमिह स्वनुभूयमानैः ।
स्वर्गादिभोगविरतास्ति स्वनुवर्ण्यमानां यथासिकेष्वतिशयोक्तिमनूद्रयन्ति ॥३६॥
यत्राभितो बहुमतैः परिपाल्यमाना वेदागमाद्यखिलतन्त्र–विविधसस्याः ।
छात्रप्रजाप्रसनाद्यतिसृष्टि–पुष्टियाहिन्य उत्तमगुरुपहिता विभान्ति ॥३७॥
गोदावरीयुगल–मध्यगता विभाति वक्षःस्थलीव रुचिराञ्चधराङ्गनायाः ।
शैलगता निजगतामभिसूचयन्ती श्रीकोनसीमपरणिस्त्रिजगच्छ्रियाढ्या ॥३८॥
यह्नर्विभिर्निगम–तत्त्व–विचार–गोष्ठी–सततामभिस्तपसि सिद्धवरैर्महद्भिः ।
जुष्टामजस्य जगतीं सुलभोगलब्धं राजर्षिभिर्महितयज्ञभिरच्चवार्मैः ॥३९॥
नानाविधाचरितधर्मगणेष्ट–पूर्त–दान–व्रतादिसुकृतातिशयैश्च सद्भिः ।
व्याप्तां बुधेन्द्रनिवहैर्निगमागमादि–निष्कल्मषप्रवचनप्रवणैः सदापि ॥४०॥
दिव्याङ्गनाप्रवर–चन्दन–दिव्यवृक्षारामादिभिः सुरुचिरैरमरावतीं च ।
श्रीविष्णुसत्त्वसमुपासकभक्तवर्यैः शश्वज्जितव्रतमुपोर्जितपुण्यभारैः ॥४१॥
देवालयोन्नत–तडाग–सुलप्रतिष्ठा धर्मोन्नतैरपि विकुण्ठपुरीं दधाना ।
श्रीशारदयुपासक–महाजन–चर्यमाण नित्यार्चनादि विविधार्हण–तुष्टचित्ता ॥४२॥
यत्र स्वयं वसति भक्तजनालयेषु नानाविधाकृतिधरा भुवनेश्वरी सा ।
श्रीशाक्त शैववर–वैष्णव–गाणपादि भक्तप्रजास्पदतया विविधोर्ध्वलोकाम् ॥४३॥

* * *

प्रदेशवर्णनात्मक काव्यांत क्वचित् त्या त्या प्रदेशातील महत्त्वाच्या नगराची वर्णने आधुनिक कवींनी विशेष अभिमानाने केलेली आहेत. उदाहरण म्हणून यात्र दुर्गानुग्रह महाकाव्यांतील आन्ध्रप्रदेश वर्णनापुढचे विजयवाडा वर्णन पाहाः—

## विजयवाडावर्णन ( सर्ग ९ )

तत्रास्ति सर्वमहिता विजयस्य वाटी भूवाऽऽन्ध्रदेशधरणीरमणीमणी सा ।
वाणी रमासहचरी निजकीर्तिरेव याभाति दिव्यनगरी–मणिदर्पणीह ॥४८॥
यत्रेन्द्रकीलगिरिमूर्ध्नि–तपश्चचार दिव्यास्त्र–साधनकृते विजयो जयाय ।
सिद्धशिवात्तपसि पाशुपताद्यभीष्ट–दिव्यास्त्रसहृतिमवाप पुरी तदाख्या ॥४९॥
यत्र स्वयं वसति भक्तजनावनाय दुर्गेन्द्रकीलगिरिमूर्ध्नि हिरण्मयी सा ।
प्रत्यस्तसर्वकलहा सकलार्तिनाश–सन्तोषिता करुणया कलिरोडिनेषु ॥५०॥
श्रीकृष्णवेहजनितो विदिता हि कृष्णवेणीति दक्षिणदिशा वहतीह गङ्गा ।
शातैव–दुष्कलुष–भारनिवारिणी सा दुग्धाभिरामवरणी फलयत्यभीष्टम् ॥

## गोविन्द दीक्षित

तजावरच्या राज्यात रघुनाथ नायकाचे आधिपत्य असताना इ स १५४९ ते १६१४ पर्यंतच्या प्रदीर्घ काळात गोविन्द दीक्षित हा त्या राज्याचा महामन्त्री होता. संस्कृतातल्या सर्वच शास्त्रावर गोविन्द दीक्षिताचें असाधारण प्रभुत्व होतें. या त्याच्या असाधारण पाण्डित्याचे फार मोठें आभरण म्हणजे त्याचें धार्मिकत्व. त्यामुळेच आजहि दक्षिण भारतात गोविन्द दीक्षिताची एखाद्या दैवतासारखी पूजा होते. पट्टेश्वर या गावीं गोविन्द दीक्षिताचा सपत्नीक प्रतिमा असून, लोक त्या प्रतिमाची मोठ्या भक्तीने पूजा करतात. त्याच्या औदार्य, नीतिनैपुण्य इत्यादि गुणासबधीच्या अनेक दन्तकथा दक्षिणेंत सर्वतोमुखी आहेत. गोविन्ददीक्षितकृत **साहित्यसुधा**' नामक ग्रन्थात अच्युतराय व रघुनाथ या तजावर राज्याधिपतींचें चरित्र वर्णिलेले आहे. गोविन्ददीक्षिताचा पुत्र वेंकटमखी याने 'चतुर्दण्डिप्रकाशिका' नावाचा एक धर्मशास्त्रविषयक ग्रन्थ लिहिलेला असून त्यामध्ये स्वत च्या पित्याने **सङ्गीतसुधानिधि**' हा सङ्गीतशास्त्रीय ग्रन्थ व रामायणाच्या सुन्दरकाण्डावर टीका लिहिली असल्याचा उल्लेख केला आहे. वेंकटमखीने **साहित्यसाम्राज्यम्**' या नावाचे एक महाकाव्य व चतुर्दण्डिप्रकाशिका आणि **वार्तिकाभरणम्**' हे दोन शास्त्रीय ग्रन्थ लिहिले आहेत.

गोविन्ददीक्षित मन्त्र्याचा दुसरा पुत्र यज्ञनारायण हाहि महाकवि होता. त्याने लिहिलेले **साहित्यरत्नाकर**' नावाचे १२ सर्गांचे महाकाव्य नुकतेंच उपलब्ध झालेले आहे. **रघुनाथभूपविजयम्** नावाच्या काव्यात यज्ञनारायणाने तजावरच्या नायकवंशाचे श्रेष्ठत्व आणि रघुनाथनायकाचा द्वीपान्तरविजय वर्णिलेला आहे. या व्यतिरिक्त 'रघुनाथविलासम्' या नावाचें ५ अकी नाटक आणि चक्रेश्वराच्या चित्रबन्धरामायणावरील टीका यज्ञनारायणाने लिहिली आहे.

## श्रीनिवास दीक्षित (रत्नखेट, अभिनवभवभूति)

हा महाकवि, अप्पय्य दीक्षित व गोविंद दीक्षित यांचा समकालीन होता. त्याने लिहिलेल्या एका श्लोकामुळे चोलराजाने त्याला 'रत्नखेट' अशी पदवी दिली असें पुढील श्लोकावरुन दिसून येत—

सन्ध्या-सन्धुक्षिताम्भोधर-नलिक्कणादुद्गतान् सोमखण्डान्
ताराकाराशिरोद्धृ शशि-रवि-कपटाद् बिभ्रतो रत्नखेटी ।

---

१ हृ १४८ । २ हृ १४९, १०४६ । ३ हृ १५०, १५२ ।
४ हृ १५० । ५ हृ १५०, १५४

अन्योन्यं युध्यमानावुदय-चरम-भूभृत्-प्रवीराविति द्राक
उक्त्या ख्यातापराख्य. क्षितिपतिवचसा रत्नखेटाध्वरीति ।।

याव्यतिरिक्त "षड्भाषाचतुर", "अद्वैतविद्याचार्य", "अभिनवभवभूति" इत्यादि उपाधी त्याला लाभलेल्या होत्या. त्याने एकूण ६० काव्ये व १८ नाटके एवढी ग्रंथसंपत्ति निर्माण केलेली असून त्यापैकी शितिकण्ठविजयकाव्यम्, भैमी परिणयनाटकम् व भैष्मी (रुक्मिणी) परिणयचम्पू हे काव्यग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत. साहित्यशास्त्रावर, साहित्यसञ्जीवनी, भावोद्भेद, रसार्णव, अलङ्कारकौस्तुभ, काव्यदर्पण, काव्यसारसंग्रह, साहित्यसम्प्रसरणी हे रत्नखेटाचे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत.

जिंजीचा राजा सुरप्पा याच्या पराक्रमासंबंधीची कथा भावनापुरुषोत्तमम्" या नाटकात त्याने रंगविलेली आहे. बालचूडामणिकृत रुक्मिणीकल्याणाच्या टीकेत (इ. स. १८३३) बाल्यक्षेदराने रत्नखेटाच्या पुस्तकाची संपूर्ण नामावली दिलेली आहे. हा राजचूडामणि दीक्षित रत्नखेटाचा मुलगा होता. त्याने रत्नखेट विजयम्' या नावाचे एक काव्य लिहिले आहे. स्वतःच्या आश्रयदाता रघुनाथ नायक यांचे चरितहि राजचूडामणीने रघुनाथभूपविजयम् नावाच्या महाकाव्यात वर्णिलेलें आहे. कविराजाच्या परम्परेस अनुसरून त्याने राघवयादवपाण्डवीयम् या नावाचें त्र्यर्थी काव्य सुद्धा लिहिलेले आहे. रुक्मिणीकल्याणम् या १० सर्गाच्या महाकाव्यात रुक्मिणीकृष्णाचे स्वयंवर राजचूडामणीने वर्णिलेले आहे. हें काव्य अड्यारच्या ग्रंथालयाने श्री. टी. आर. चिंतामणि यांच्या प्रस्तावनेसहित प्रकाशित केलें आहे. शंकराभ्युदयम् या काव्यात जगद्गुरु शंकराचार्यांचे चरित्र वर्णिलेले असून त्याचे ६ सर्ग मुद्रित झाले आहेत.[1] याव्यतिरिक्त, भारत चम्पू, कंसवध, वृत्तरत्नावलि, चित्रमंजरी, कामकथा, मञ्जुभाषिणी (मत्यश्लेषमयी रामकथा) इत्यादि अवान्तर काव्ये राजचूडामणीने लिहिलेलीं आहेत. त्याव्यतिरिक्त शृङ्गारसर्वस्वभाण, आनन्दराघवम्, व कमलिनीकलहंसम् हीं तीन नाटकें राजचूडामणीने लिहिलेलीं आहेत. आनंदराघवम् या ६ अंकाच्या नाटकात विवाहापासून राज्याभिषेकापर्यंतचें रामचरित्र चित्रित केलें आहे. कमलिनीकलहंसम् या चार अंकी नाटकात कमलिनी आणि कलहंस यांचा विवाह दाखविलेला आहे. तंजावर व चिदम्बरम् या शहरीं रघुनाथनायकाच्या सभेमध्ये या नाटकाचे प्रयोग झाले होते. राजचूडामणीने लिहिलेल्या काव्यदर्पण या साहित्य शास्त्रीय ग्रंथावरील टीका रविपण्डिताने लिहिली असून तो ग्रंथ मद्रास येथे मुद्रित झाला आहे. रत्नखेटाचा दौहित्र (कृष्णाध्वरीचा पुत्र) मृत्युञ्जय हाहि कवि होता.

---

१ क्र २३५।

त्याने **प्रद्युम्नोत्तरचरितम्** हें ११ सर्गांचें महाकाव्य लिहिलेलें आहे. या मृत्युञ्जयाचा पुत्र अनन्तनारायण याने **गीतशङ्करम्** नावाचें गीतगोविंदासारखें गेय काव्य लिहिलेले आहे.

*　　　*　　　*

## घनश्यामकवि

शाकरी परमहंसाचा दौहित्र व आर्यक या नावाने प्रसिद्धीस आलेला घनश्यामकवि हा तंजावरच्या तुकोजी राजाचा मंत्री होता ( इ. स. १७२८ ते ३५ ). याने रामनवमीच्या एका रात्रीं संपूर्ण उत्तररामचरितावर टीका लिहिली. सुमारें ३ तासात विद्धशालभंजिकेवर त्याने टीका लिहिली सुंदरी आणि कमला या त्याच्या दोन पत्नींनी सुद्धा विद्धशालभंजिकेवर टीका लिहिलेली आहे. त्याच्या दोन मुलांपैकी गोवर्धन नावाचा पुत्र आंधळा होता. त्यानेहि घटखर्पर काव्यावर टीका लिहिलेली आहे. घनश्यामकवीने **अवोधाकर** नावाचे एक त्र्यर्थी काव्य लिहिलेलें असून त्यामध्ये नल, कृष्ण व हरिश्चन्द्र यांचीं चरित्रे श्लेषाने गुंफिलेलीं आहेत. वयाच्या १२ व्या वर्षींच या घनश्यामाने "भोजचम्पू" काव्याचें युद्धकाण्ड लिहिलं होतें **कलिदूषणम्** हें त्याचं काव्य संस्कृत व प्राकृत या दोन भाषांतून अर्थ व्यक्त करू शकते. **प्रचण्ड-राहूदयम्** हें त्याचे नाटक "प्रबोधचन्द्रोदयम्" या कृष्णयतीच्या नाटकास अनुसरून लिहिले आहे. घनश्यामकवीने एकूण ६४ ग्रंथ संस्कृतात, २० ग्रंथ प्राकृतात व २५ ग्रंथ अन्यान्तर अपभ्रष्ट भाषामध्ये लिहिले आहेत. त्यांपैकी—

**काव्यें**—( १ ) 'भगवत्पादचरितम्', ( २ ) 'वेंकटेशचरितम्', ( ३ ) प्रसङ्गलीलार्णव, ( ४ ) सन्मणिमण्डनम्, ( ५ ) अन्यापदेशशतकम्, ( ६ ) पञ्चस्थलमाहात्म्यानि.

**नाटकें**—( १ ) गणेशचरितम्, ( २ ) मदनसञ्जीवनम्, ( ३ ) कुमारविजयम्, ( ४ ) अनुभूतिचिन्तामणि, ( ५ ) आनन्दसुन्दरी महावीरचरिताचे न आढळणारे दोन अंक लिहिण्याचा प्रयत्न घनश्यामाने केला आहे नवग्रहचरितम् हें एक प्राकृत सट्टक आहे. याव्यतिरिक्त १० प्रकारचीं रूपकं नाट्यशास्त्राच्या लक्षणास अनुसरून घनश्यामाने लिहिलीं आहेत

**टीकाग्रंथ**—शाकुन्तल, विक्रमोर्वशीय, उत्तररामचरित, महावीरचरित, प्रबोधचन्द्रोदय, चण्डकौशिक, वेणीसंहार, हास्यशतशती, भोजचम्पू, नीलकण्ठचम्पू, भारतचम्पू, *कविराक्षस*, *कादम्बरी*, *वासवदत्ता व दशकुमारचरित या* एकूण १५ ग्रंथावर घनश्यामाने टीका लिहिल्या आहेत 'रसार्णव' या नावाचा साहित्य

शास्त्रीय ग्रंथहि त्याने लिहिलेला आहे.[1] घनश्यामाच्या 'प्रचण्डसूर्योदयम्' या या नाटकावर चन्द्रशेखर या त्याच्या मुलाने टीका लिहिलेली आहे.

* * . *

## नारायण भट्टपाद

मलबार प्रांतात मेल्पुत्तूर नावाच्या गावात मातृदत्त नावाचा एक नम्बुद्री ब्राह्मण १६ व्या शतकात होऊन गेला. नारायण भट्टपाद अथवा भट्टत्री हा त्याचा पुत्र अत्यंत बुद्धिमान होता. विवाह होईपर्यंत नारायणाचें मुळीच शिक्षण झाले नव्हते. त्यानंतर मात्र अच्युत पिशारोती नावाच्या नातलगाजवळ त्याने वेदाध्ययन आरंभिले. या अच्युत पिशारोतीला वेदाध्यापनाचा अधिकार नसल्याने वातविकार झाला (अशी समजूत आहे) आपल्या गुरूचा तो वातविकार नारायणाने योगाच्या बळावर स्वतःच्या ठिकाणीं ओढून घेतला व त्याच्या प्रशमनासाठी गुरुवायुर येथील श्रीकृष्णाच्या स्तुतिपर **नारायणीयम्** नावाचें सहस्रश्लोकाचें हृदयंगम भक्तिस्तोत्र नारायणभट्टपादाने लिहून काढलें. त्या स्तोत्राच्या प्रभावाने नारायणाला दीर्घायुरारोग्य प्राप्त झालें अशी कथा सर्वत्र प्रसृत आहे. केरळ प्रदेशातील असंख्य भाविकजन या स्तोत्रातील काही श्लोक प्रत्यहीं नियमानें आजहि म्हणत असतात. या सहस्रश्लोकात्मक स्तोत्राचे पुढे सारखे १०० विभाग करण्यात आले. श्रीमद् भागवतातील संपूर्ण सार या स्तोत्रात साठविलेले आहे.

**जिष्णो त्वं कृष्णसूतः खलु समरमुखे बन्धुघाते दयालुम्**
**खिन्नं तं वीक्ष्य वीरं किमिदमयि सखे नित्य एकोऽयमात्मा ।**
**को वध्यः कोऽत्र हन्ता तदिह वधभयं प्रोज्झ्य मय्यर्पितात्मा**
**धर्म्यं युद्धं चरेति प्रकृतिमनयथा दर्शयन् विश्वरूपम् ॥**

या श्लोकात नारायणभट्टपादानी भगवद्गीतेचें सार सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे. प्रस्तुत श्लोकावरून त्यांच्या शैलीची काहीशी कल्पना येईल.

नारायण भट्टपादाचे चम्पू ग्रंथ—(१) राजसूय, (२) दूतवाक्य, (३) पांचालीपरिणय, (४) द्रौपदीपरिणय, (५) सुभद्राहरण, (६) किरात, (७) भारत युद्ध, (८) स्वर्गारोहण, (९) मत्स्यारोहण, (१०) नृगमोक्ष, (११) गजेन्द्रमोक्ष, (१२) स्यमंतक, (१३) कुचेलवृत्त, (१४) अहल्यामोक्ष, (१५) निरनुनासिक, (१६) दक्षयाग, (१७) पार्वतीस्वयंवर, (१८) अष्टमीचम्पू, (१९) गोष्ठीनगरवर्णनम्, (२०) कैलासशैलवर्णनम्, (२१) शूर्पणखाप्रलाप, (२२) नला

---

१ जर्नल आफ ओरिएंटल रिसर्च III २३१-रामस्वामीशास्त्री यांचा लेख पहा

यनीचरित व (२३) रामकथा असे हे चम्पूग्रंथ नारायणभट्टपादांनी शाक्यार समाज तील लोकांच्या उपयोगासाठी लिहिले त्यातील राजसूयचम्पूमध्ये कवीचे वेद व मीमांसा शास्त्रावरील असाधारण ज्ञान व्यक्त झालेले आहे भट्ट नारायणाची कीर्ति ऐकून सिद्धान्तकौमुदीचे विख्यात लेखक भट्टोजी दीक्षित हे त्यांच्या दर्शनार्थ काशीहून निघाले बराच प्रवास केल्यानंतर भट्ट नारायणाच्या मृत्यूची (वयाच्या १०९व्या वर्षी) वार्ता त्यांना कळली। त्यानंतर पुढील प्रवास रद्द करून ते काशीला गेले, अशी एक दंतकथा प्रचलित आहे. **कोटिविजयम्** व **स्वाहासुधाकरम्** ही नारायणभट्टपादांची दोन काव्ये मुंबईच्या काव्यमालेत प्रसिद्ध झाली आहेत. त्यांचा पुत्र कृष्णकवि याने **ताराशशाङ्कम्** नावाचे काव्य लिहिले असून तेंहि मुद्रित झालें आहे.

* * *

## समीक्षाचक्रवर्ती प मधुसूदनजी ओझा

### A Hindoo Savant in London

"In the back ground of the group of personages who have come to London for the coronation, the presence has remained unnoticed of a Hindoo savant, a great celebrity in India a human store of Vedic wisdom and philosophy This is a Pandit Madhusudan Ojha a profound Sanskrit sclolor The pundits conversation in fluent Sanskrit greatly interested the Cambridge orientalists in the Eastern Visitor "

*The Westminster Gazette* 26–7–1902

इ. स १९०२ मध्ये लंडन येथे सातव्या एडवर्डचा राज्याभिषेक झाला त्या प्रसंगीं उपस्थित असलेल्या एका संस्कृत पंडिताविषयीं लंडनच्या वेस्ट मिनिस्टर गॅझेटच्या एका अंकात वरील शब्दात बातमी आली होती त्याच बातमीत त्या महान् पंडिताचे मधुसूदन ओझा हे नाव आलेलें आहे. प्रस्तुत ग्रंथात दीर्घतान संस्कृत ग्रंथ लिहिणारे अप्पय्य दीक्षित, शास्त्रकार नागेशभट्ट, मन्त्री नारायणशास्त्री (९३ नाटकांचे लेखक), राधामंगल नारायणशास्त्री (१०८ ग्रंथांचे लेखक), वेल्लमकोण्डरामराय इत्यादि लेखकांचा उल्लेख आला आहे. त्याच प्रभावळींत प मधुसूदन ओझांजींचें नाव उल्लेखण्याजोगें आहे. त्यांच्या विद्वत्तेविषयी गौरवो द्गार काढताना हिंदु विश्वविद्यालयाच्या संस्कृत संशोधन विभागाचे माजी डायरेक्टर

व जयपूरच्या महाराजा संस्कृत कॉलेजचे माजी प्राचार्य प. गिरिधरशर्मा चतुर्वेदी हे ओझाजींच्या कादम्बिनी ग्रंथाच्या प्रास्ताविक लेखात लिहितात – "जगन्नियन्ता जगदीश्वरने ऐसे एक प्रतिभाशाली व्यक्ति को धराक्षेत्र में उतार दिया जिसने उसी जगन्नियन्ता की प्रेरणासे अपनी सब आयु वैदिक विज्ञान और वैदिक इतिहास के अन्वेषण में लगातार उक्त महत्त्वपूर्ण विज्ञान और इतिहास का क्रमबद्ध सब तयार कर ही डाला, जिसके अतुल परिश्रम और अलौकिक प्रतिभा के प्रकाशसे अनेक शताब्दियों से अमूल्य विज्ञान-रत्नों को अपने उदर में छिपा रखनेवाली गुहा का द्वार आज देखने में आगया और उसमें प्रवेश करनेवालों को सौकर्य मिलगया।" (कादम्बिनी पृ. २)

प. मधुसूदनजींचा जन्म बिहार प्रांतात गाढा या गावी (जिल्हा मुजफ्फरपुर) इ. १८६५ च्या कृष्णाष्टमीस झाला. त्यांचे वडील प. वैद्यनाथ ओझा हे उत्तम श्रेणीचे विद्वान होते. वडिलांचे ज्येष्ठ बंधु प. राजीवलोचन हे जयपुर महाराजांचे आश्रित पंडित होते. त्यांना संतान नसल्याने त्यांनी मधुसूदनालाच दत्तक घेतले. मतनंतर पाच सहा वर्षे चुलत्याजवळ शास्त्राध्ययन झाले. सिद्धान्तकौमुदीपर्यंत एवढ्या अल्पवयात प्रगति झाली. एवढ्यात राजीवलोचनजींचा व त्यानंतर दीड वर्षाच्या आत त्यांचे आश्रयदाते महाराज रामसिंहजींचा देहान्त झाला. जयपूर सोडून मधुसूदनजी आपल्या कुलक्रमागत बिहारमध्ये जन्मस्थानी परत आले. पण तेथे अभ्यासाची सुचरणा होऊ लागल्याने वडिलांच्या अनुज्ञेने काशीस दरभंगा पाठशाळेत प. शिवकुमार मिश्रजीजवळ अध्ययनासाठी राहिले. भगवान् शंकराची उपासना व शास्त्राध्ययन यामध्ये आठ वर्षांचा काळ काशीत त्यांनी घालविला. बुद्धि अत्यंत कुशाग्र व मूलग्राही असल्याने एवढ्या काळात परिश्रम करून मधुसूदनजींनी साहित्य, व्याकरण, न्याय, मीमांसा, वेदान्त इत्यादि जटिल शास्त्रांच्या मौलिक ग्रंथावर पूर्ण अधिकार संपादन केला.

वयाच्या १७ व्या वर्षी अलवरचे राजगुरु श्रीचंचल ओझा यांच्या कन्येशी मधुसूदनजींचा विवाह झाला. काशीचा अध्ययनक्रम आटोपून ते पुढी कोटा, झल्रा पाटन, रतलाम इत्यादि संस्थानच्या अधिपतींच्या जवळ राहिले. असाधारण पाण्डित्यामुळे सर्वत्र यांचा मोठा सत्कार झाला. जयपूर संस्थानतर्फे त्यांना फार आग्रह झाल्याने इ. १८६८ मध्ये वयाच्या २३ व्या वर्षी महाराजा संस्कृत कॉलेजचे वेदान्ताचे प्राध्यापक म्हणून आले. या नवीन प्राध्यापकाच्या अद्भुत पाण्डित्याच्या कीर्तीने जयपूरचे गुणग्राहक नरेश माधवसिंहजींचे लक्ष त्यांच्याकडे आकर्षित झाले. मधुसूदनजींशी धार्मीय विषयांवर सुसंवाद करता यावा व त्यांच्या राजनीतिज्ञतेचा राज्याला लाभ व्हावा यासाठी महाराजांनी त्यांना आपल्या खाजगी सभाल्याचे व्यवस्थापक व धर्मसभेचे अध्यक्ष म्हणून नियुक्त केले. मधुसूदनजींच्या

पाण्डित्याचा प्रभाव महाराजावर इतका पडला की त्यांच्या अनुमतिवाचून राजभव नातलें कोणतेंहि धर्मकार्य होत नव्हतें.

राजादेतेकच जयपूरचे प्रजाजनहि पंडितजींना मान देत असत. राजा अशा प्रकारें पूर्णपणे प्रसन्न असल्यामुळे मधुसूदनजींना कशाचीहि ददात नव्हती. त्यांचें कौटुम्बिक जीवन वैभवसंपन्न होतें पण त्यात त्यांचे लक्ष नव्हतं त्यांचा संपूर्ण काळ वेदरहस्य शोधण्यासाठी ग्रंथाचें आलोडन करण्यात व शास्त्राध्यापन करण्यात व्यतीत होत असे. शरीरस्वास्थ्य, विश्रांति व मनोरंजन यांचा विचार करण्यास देखील त्यांना वेदाध्ययनापुढे अवसर नव्हता. इ. १८८४ मध्ये त्यांच्या पत्नीचा देहान्त झाला. पत्नीच्या निधनानंतर सांसारिक व्यापांतून मुक्त झाल्यामुळे आयुष्याचा प्रत्येक क्षण वैदिक विज्ञानाच्या संशोधनात त्यांनी व्यतीत केला

इ. स. १९०२ मध्ये एडवर्डच्या राज्याभिषेकासाठी जयपूरनरेशाबरोबर इंग्लंडात जाण्याचा योग मधुसूदनजींच्या जीवनात आला तेथे चार महिने त्यांचें वास्तव्य होतें त्या काळात केम्ब्रिजचे संस्कृत प्राध्यापक मॅकडोनेल, बेंडाल इत्यादि विद्वानांच्या भेटी झाल्या. इंग्लिश पण्डितांनी त्यांचा मोठा सत्कार केला. ठिकठिकाणीं वेदविषया-वर त्यांचीं व्याख्यानें झालीं 'वेदधर्मव्याख्यान' या पुस्तकात (मूल्य ३१ रु.) तीं सर्व प्रकाशित झालीं आहेत. केम्ब्रिज येथे विश्वविद्यालयात वैदिक धर्म व विज्ञान यासंबंधी पंडितजींचें संस्कृत व्याख्यान झालं. त्याचे वृत्त The Sun या वृत्त पत्रात पुढील शब्दात आलें होते ' Last Sunday the Pandit was invited to Cambridge by professor C. Bendall, who with his wife gave him a warm reception What interested the Cambridge orientalist most was the conversation of the Pandit in fluent Sanskrit which is a rare treat now even in India while he was deeply impressed by the deep learning of his eastern visitor. —*The Sun* 23 7 02

इंग्लंडच्या प्रवासाव्यतिरिक्त भारतात इ. १९०६ मध्ये काशीला कॉंग्रेस अधिवेशनानिमित्त, त्यापूर्वी इ. १८८४ मध्ये प्रयागला कुम्भमेळ्यानिमित्त, इतर काही निमित्ताने काशी, लाहोर, कलकत्ता यासारख्या मोठ्या शहरीं त्यांचा प्रवास झाला. त्या प्रसंगीं त्यांचीं जीं भाषणं विद्वत्समाजापुढे झालीं त्यांचा फार मोठा प्रभाव पडला होता. त्यांचें वक्तृत्व अमोघ व अत्यंत विद्वत्ताप्रचुर असे

हा अल्पप्रवास, थोडेंफार राजकार्य व अध्ययन वगळलें तर आयुष्याचा संपूर्ण काळ त्यांनी लेखनात व्यतीत केला. सतत ५० वर्षे त्यांनी ऋणु लेखनतर

केले. या काळात १३९ संस्कृत ग्रन्थ त्यांनी लिहिले. त्यातील दोनचार ग्रन्थ वगळल्यास इतर सारे ग्रन्थ २०० ते ५०० पृष्ठांचे आहेत. पंडितजी उत्कृष्ट चित्रकार होते त्यांचे हस्ताक्षरहि त्यांच्या चित्राप्रमाणें सुंदर होतें त्यांच्या संस्कृत माध्यमाविषयीं त्यांचे पुत्र प्रद्युम्न ओझा लिहितात, "यह प्राय. सर्व विदित है की पूज्य पिताजी यह वैज्ञानिक तत्त्व यद्यपि, हिंदी भाषा में भी भली प्रकार प्रतिपादन कर सकते थे तथापि उनकी संस्कृत में ही हार्दिक अभिरुचि थी। इस लिये उन्होंने जो कुछ भी विवेचनाएँ की वह संस्कृत भाषा में ही है। जैसा कि उन्होंने यह वैदिक विज्ञान का रिसर्च किया है, वह यदि हिंदी में होता तो आज इसकी ख्याती संसार में द्रुत गतिसे होकर यह विशेष उपयोगिता में आता, परन्तु उनकी संस्कृत में प्रगाढ रुचि होने के कारण ही ऐसा नहीं हो सका। इतना होने पर भी यद्यपि विषय तो अवश्य बहुत गहन और मार्मिक है तथापि संस्कृत भाषा उन्होंने बहुत ही सरल रक्खी है।"

इ. स. १९१५ मध्ये अखिल भारतीय संस्कृत साहित्य सम्मेलन या संस्थेतर्फे पंडितजींच्या ७० व्या वाढदिवसानिमित्त शुद्धाद्वैत सम्प्रदायाचे आचार्य गोस्वामी गोकुलनाथजी महाराज (मुंबई) यांच्या अध्यक्षतेखाली रजतजयन्ती महोत्सव झाला या उत्सवासाठी जामनगरचे राजपंडित म. म. मथुरादासजी दीक्षित, भिवानीचे विद्यामार्तण्ड प. सीतारामशास्त्री याव्यतिरिक्त राजस्थानातल्या निरनिराळ्या राज्यातले मोठमोठे पंडित व अनेक संस्कृत विद्यालयांचे आचार्य उपस्थित होते. संस्कृतरत्नाकर मासिकानें त्यानिमित्त एक उत्कृष्ट वेदविशेषांक प्रकाशित केला होता. त्यात संस्कृत व हिंदी या दोन्ही भाषांतून पंडितजींचें चरित्र प्रकाशित झालें होतें.

या महोत्सवानंतर तीन वर्षांनी दोन तीन दिवसांच्या आजाराने भाद्रपदी पौर्णिमेला या असाधारण संस्कृत विद्योपासकाचें देहावसान झालें स्थानीय सिव्हिल सर्जनने त्यांच्या प्रकृतीचें निदान करून सांगितलें की अपरिमित बौद्धिक परिश्रमामुळे हा मृत्यु ओढवला. आयुष्याच्या शेवटच्या घटकेपर्यंत त्यांचे अध्ययन, लेखन व अध्यापन चालू होतें, असे पंडितजींजवळ ज्यांनी सतत ४० वर्षें नतमस्तक होऊन अध्ययन केलें असे त्यांचे विख्यातकीर्ति शिष्य म. म. गिरिधरशर्मा चतुर्वेदी यांच्या, "मृत्युसे तीन दिन पूर्व भी मेरा पाठ हुवा था" या उद्गारावरून स्पष्ट दिसते. या अद्वितीय विद्वानाच्या निधनानें सारें जयपूर राज्य नव्हे तर सारें संस्कृतजगत् शोकमग्न झालें. वैदिक विज्ञानाचा सूर्यास्त झाला. महामना प. मदन मोहन मालवीय, प्रयागचे तत्कालीन कुलगुरु डॉ. गंगानाथ झा इत्यादि थोर विद्वानांनी शोकपूर्ण सान्त्वनपत्र त्यांचा पुत्र प. प्रद्युम्न ओझा याच्याकडे पाठविलीं आपल्या परमपूज्य पित्याचे औध्वदेहिक कर्म यथासांग व यथाशास्त्र पार पाडल्या

नतर प. प्रद्युम्नजींनी आपली सारी शक्ति त्यांच्या संस्कृत ग्रन्थांचे प्रकाशन करण्याच्या कामीं लावली. कारण शेवटच्या घटकेला स्वरचित ग्रन्थांच्या प्रकाशनाची एकमात्र इच्छा त्यांनी आपल्या एकुलत्या एक पुतण्याजवळ प्रकट केली होती. वडिलार्जित सम्पत्तीचा अल्पमात्र अंशदेखील त्यांनी आपल्या वैयक्तिक सुखासाठी खर्च होऊ दिला नाही. श्री. प्रद्युम्नजींनी 'वैदिकविज्ञान प्रकाशन कार्यालय' स्थापन करून आज वर्यंत (इ १९२८ पर्यंत) पन्नास मोठमोठे ग्रन्थ प्रकाशात आणले. त्याची सविस्तर माहिती दिल्यावाचून पंडितजींच्या गहन व सर्वकष पांडित्याची कल्पना येणार नाही. प. मधुसूदनजींनी जे अफाट लेखन केले त्यामागे काही योजना होती तदनुसार आजवर प्रकाशित झालेल्या पन्नास ग्रन्थांच पुढील प्रमाणे खंड व उपविभाग पडतात

| खण्ड | उपविभाग |
|---|---|
| १. ब्रह्मविज्ञान | (१) दिव्यविभूति, (२) उक्थवैराग्यिक, (३) आर्यहृदयसर्वस्व, (४) निगमबोध, (५) विज्ञानप्रवेशिका, (६) विज्ञानमधुसूदन, (७) सायन्स्प्रदीप. |
| २. यज्ञविज्ञान | (१) निविल्लाप, (२) यज्ञमधुसूदन, (३) यज्ञविज्ञानपद्धति, (४) प्रयोगपारिजात. |
| ३. पुराणसमीक्षा | (१) विश्वविकास, (२) देवयुगाभास, (३) प्रसङ्गचर्चितक. |
| ४. वेदाङ्गसमीक्षा | १) वाक्पदिका, २) ज्योतिश्चक्रधर, ३) आत्मसंस्कारकल्प, ४) परिशिष्टानुग्रह। |

या उपविभागात पुढीलप्रमाणे ग्रन्थ लिहिलेले आहेत.

ब्रह्मविज्ञानखण्डान्तर्गत **दिव्यविभूति** विभागात (१) जगद्गुरुवैभवम् (मू. १॥ रु.)* (२) स्वर्गसन्देश (मूल्य १ रु.) (३) इन्द्रविजय (५ रु.)

**उक्थवैराजिक** विभागात (१) सदसद्वाद (१२ आ.) (२) व्योमवाद (३) अपरवाद (४) आवरणवाद (५) अम्भोवाद (२-३-४ व ५ मिळून मूल्य २ रु) (६) अहोरात्रवाद (१२आ.), संशयतदुच्छेदवाद (२॥ रु) (७) दशवादरहस्यम् (१ रु)

**आर्यहृदयसर्वस्व** विभागात — (१) गीताविज्ञानभाष्यस्य प्रथम रहस्य काण्डम् (३ रु) (२) गीताविज्ञानभाष्यस्य द्वितीय मूलकाण्डम्– (३

* हे सारे ग्रन्थ कर्तव्यबुद्धीने प्रकाशित झाले असल्याने त्यांचे मूल्य पृष्ठसंख्येच्या मानाने फारच थोडे ठेवले आहे अल्प मूल्यावरून पृष्ठसंख्या अल्प आहे असे समजू नये.

रु.) (३) गीताविज्ञान–भाष्यस्य तृतीयम् आचार्यकाण्डम्–(५॥ रु.) (४) गीताविज्ञानभाष्यस्य चतुर्थं हृदयकाण्डम् (५ रु.) (५) शारीरक विज्ञानभाष्यस्य–प्रथमभाग (३ रु.) (६) शारीरकविज्ञानभाष्यस्य द्वितीयभाग. (१ रु.) (७) शारीरकविमर्शः।

**गीताविज्ञानप्रवेशिका** विभागात–(१) विज्ञानविद्युत् (१॥ रु.) (२) ब्रह्मविज्ञानप्रवेशिका (१॥ रु) (२) ब्रह्मविज्ञानम् (१० रु.)

**गीताविज्ञानसायन्सप्रदीप** विभागात – (१) पञ्चभूतसमीक्षा (.॥. रु) [इ. १९१४ च्या डिसेंबर महिन्यात हिंदुविश्वविद्यालयात एक पञ्चमहाभूत परिषद झाली. या परिषदेत मधुसूदनजींनी जीं संस्कृत व हिंदी व्याख्यानें दिलीं त्यांचा संग्रह या पुस्तकात आहे.] (२) वस्तुसमीक्षा (.॥.)

२. यज्ञविज्ञानखण्डान्तर्गत **निवित्कलाप** विभागातः–देवतानिवित् (२॥ रु.)

गीताभाष्ययज्ञ**मधुसूदन** विभागात (१) स्मार्तकुण्डसमीक्षाध्याय (२॥ रु) (२) यज्ञोपकरणाध्याय, (३) यज्ञविटपाध्याय, (४) कर्मातुक्रमणिकाध्याय (२–३– ४ मिळून २॥ रु.) (५) आधिदैविकाध्याय (२॥ रु.)

गीताभाष्य **यज्ञविज्ञानपद्धति** विभागात – (१) यज्ञसरस्वती (६ रु.) (२) छन्दोभ्यस्ता (२॥ रु)

गीताभाष्यविज्ञान **प्रयोगपारिजात** विभागात (१) निरूढपशुबन्ध।

३. पुराणसमीक्षाखण्डान्तर्गत **विद्वविकास**विभागात—(१) पुराणोत्पत्ति प्रसङ्ग. (१॥ रु.) । (२) (३) वैदिकउपाख्यान (१। रु.)

गीताभाष्यविज्ञान**देवयुगाभास**विभागात—(१) देवासुरख्याति (१॥ रु.) माधवख्याति (१॥ रु. (३) अत्रिख्याति (२ रु.)

**प्रसंगचार्चिलक्रम्** विभागात—पुराणनिर्माणाधिकरणम् १ रु.

* * *

४. वेदसमीक्षाखण्डान्तर्गत **धाक्पदिका**विभागात— (१) वैदिककोश (१॥ रु.) (२) पदनिरुक्तम् (१। रु.)

वेदाङ्गसमीक्षा खण्डान्तर्गत **ज्योतिश्चक्रधर**विभागात— (१) कादम्बिनी (पर्जन्यविषयक ग्रन्थ) (४ रु.)

वेदाङ्गसमीक्षाखण्डान्तर्गत—आत्मसंस्कारकल्पविभागात—(१) पितृसमीक्षा (१। रु.) (२) अशौचपञ्चिका (३॥ रु.) (३) धर्मपरीक्षापञ्चिका (.।.)

वेदसमीक्षान्तर्गत परिशिष्टानुग्रहविभागात — (१) कौषीतकोपनिषद् (२) ऐतरेयोपनिषद् (१ रु.) (३) प्रत्यन्तप्रस्थानमीमांसा (।॥।) (४) वेदधर्मव्याख्यान (३। रु.), (५) वेदार्थभ्रमनिवारण (२ रु.)

या चार खण्डात जसे निरनिराळे विभाग व तदन्तर्गत मुद्रित ग्रंथ वर दाखविले आहेत तसे अमुद्रित ग्रन्थहि आहेत. त्या सर्वांची सुसंगत विवरणात्मक सूची श्री. मधुसूदनजींनी प्रकाशित केली आहे. सम्पूर्ण अमुद्रित ग्रन्थांचे मुद्रण स्वतः करून होईल असे त्यांना वाटत नाही. या अमुद्रित ग्रन्थांच्या नामावलींत 'जानकीहरणम्' या नावाचे एक सम्पूर्ण महाकाव्य (हस्तलिखित पृष्ठे ८८) आहे. ते जयपूरच्या महाराजा कॉलेजचे भूतपूर्व प्राचार्य कालीपदबाबू यांनी आपल्या नावे छापून प्रकाशित केले होते. पण मधुसूदनजींची मूळ हस्तलिखित प्रत उपलब्ध असल्याने ती अनधिकार चेष्टा उघडकीस आली. अर्वाचीन संस्कृत साहित्यातील अप्रकाशित उत्तमोत्तम ग्रन्थांची संख्या किती मोठी आहे याची कल्पना एकट्या मधुसूदनजींच्या अप्रकाशित ग्रन्थांची विपुल संख्या पाहून लक्षात येईल.

मधुसूदनजींनी ज्या काळात हा प्रचण्ड ग्रन्थसंभार निर्माण केला तो पारतंत्र्याचा काळ होता. त्यामुळे राजकारणाकडे, विशेषतः देशाच्या स्वातंत्र्याकडे, देशातील सर्व थोर पुरुषांचे लक्ष केन्द्रित झाले होते. पाश्चात्य संस्कृतीचे आक्रमण जोरदार होते. संस्कृत भाषेकडे दुर्लक्ष होऊ लागले होते. त्यामुळे त्यांच्या वेदसंशोधनपर लिखाणाकडे जेवढ्या मोठ्या प्रमाणात विद्वानांचे लक्ष जावे तितके गेले नाही. महर्षि दयानन्दांप्रमाणे त्यांनी संघटना निर्माण केली असती तर कदाचित् त्यांच्या लेखनाला धार चढली असती. राजाश्रय नसता तर त्यांच्या लिखाणाला कदाचित् आज जी प्रतिष्ठा किंवा प्रसिद्धी प्राप्त झाली आहे तेवढीहि प्राप्त झाली नसती अशी कल्पना मनाला स्पर्श करून जाते.

श्री. मधुसूदनजींनी आपले सर्व आयुष्य वेदसमीक्षात्मक लिखाणात निष्काम कर्मयोग्याच्या वृत्तीने व्यतीत केले. त्यामागची त्यांची भूमिका थोडक्यात सांगता येईल ती अशी की, वेदांसंबंधी भारतीय हिंदु समाजात अतिप्राचीन काळापासून इतर कोणत्याहि धर्मग्रन्थापेक्षा शतपट अधिक श्रद्धा आहे. पण ती सारी श्रद्धा परलोकाच्या आशेने आहे. वेदाध्ययन किंवा वेदश्रवण घडले तर स्वर्गप्राप्ति होईल या धारणेव्यतिरिक्त इतर धारणा मोठमोठ्या सुशिक्षितांच्या ठिकाणी सुद्धा नाही. 'भूतं भवद् भविष्यच्च सर्वं वेदात् प्रसिध्यति" हा मनूक्त वेदमहिमा त्यांना वाच्यार्थाने खरा न वाटता केवळ अर्थवाद वाटतो. आधुनिक विज्ञानाच्या दृष्टीने वेदांचे संशोधन करण्यास काही वैदिकांचा विरोध सुद्धा आहे. पाश्चात्य विद्वानांना वेदांचे महत्त्व वाटते, ते भारताच्या प्राचीन संस्कृतीचे व इतिहासाचे मौलिक ज्ञान प्राप्त करण्याचे उत्तम साधन म्हणूनच. वेदामध्ये आधुनिक विज्ञानाचे रहस्य सुद्धा

आढळते, यावर त्याचा लेशमात्र विश्वास नाही. पाश्चात्यांच्या या अश्रद्धेला धक्का मारण्यासाठी काही भारतीय विद्वानांनी वेदांतील विज्ञान शोधण्याचा प्रयत्न केला पण तो त्यांचा प्रयत्न सुसूत्र नव्हता. वेदांचा सर्वग्राही अभ्यास करताना या विद्वानांनी केवळ मन्त्रभागावर परिश्रम केले. ब्राह्मण व पुराण ग्रन्थांची त्यांनी सर्वतोपरी उपेक्षाच केली. श्री मधुसूदनजींना वेदांचें निरंतर अवगाहन करून हे ध्यानात आलें की जोपर्यंत ब्राह्मणग्रन्थ, वेदाङ्गविषयक ग्रन्थ, पुराणग्रन्थ व इतिहास या सर्वांचें सहाय घेऊन वेदांचा अभ्यास होणार नाही तोपर्यंत वेदांतील विज्ञानविषयक व इतरहि गूढ रहस्यें प्रकट होण्याची शक्यता नाही. केवळ मन्त्र भागाचा अभ्यास म्हणजे यथासांग वेदाभ्यास नव्हे !

डार्विनच्या विकासवादाच्या पगडा विद्वानांच्या मनावर बसल्यापासून एवढें गृहीत धरण्यांत येई की वेदकाळातील ज्ञान-विज्ञान अविकसित अवस्थेत होतें. पुढे त्याचा क्रमाक्रमाने विकास झाला. वेदकाळीं 'विज्ञान' जन्मासच आलें नसावें व आलेंच असल्यास तें नगण्य स्वरूपाचें असावें. श्री. मधुसूदनजींना यावज्जीव वेदाध्ययन (ब्राह्मणादि ग्रन्थांच्या आधारें) करून साक्षात्कार झाला तो असा की वैदिक काळ हा विज्ञानाचा वास्तविक माध्याह्न काळ-तारुण्यकाळ-होता. पण वैदिक विज्ञानाचें आकलन करून देणाऱ्या अनेक विद्या (ज्यांचा उल्लेख गोपथ ब्राह्मण व छांदोग्य उपनिषद् यामध्ये आढळतो) व त्यांविषयींचे अनेक ग्रन्थ घोर परचक्राच्या आपत्तींत नष्ट झाल्याने आज त्या काळच्या विज्ञानविकासाची यथार्थ कल्पना येत नाही. श्री. मधुसूदनजींनी आपल्या प्रखर प्रतिभेच्या बळावर असंख्य ग्रन्थांमध्ये ठिकठिकाणीं विखुरलेल्या सिद्धांतांचे दुवे साधून आपलें मन प्रस्थापित करण्याचा अभूतपूर्व प्रयत्न केला आहे. त्यांच्या अप्रकाशित ग्रन्थांना प्रकाशात आणताना भारतातील सर्वमान्य वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध विद्वान् पं. गिरिधरशर्मा चतुर्वेदी यांनी सविस्तर प्रस्तावना लिहून व स्वामी सुरजनदास (एम्. ए., साहित्य, व्याकरण-वेदान्त-सांख्य-योगाचार्य) यांनी काही ग्रन्थांचीं हिंदी भाषांतरें करून मधुसूदनजींचा सिद्धान्त विशद करण्याचा अत्यंत स्पृहणीय प्रयत्न केला आहे. प्रस्तुत ग्रंथात त्यांनी मौलिक संस्कृत लेखन केलें असल्याचाच उल्लेख प्राधान्याने आलेला आहे. पं. गिरिधरशर्माजीं प्रमाणें ज्यांनी संस्कृतची सेवा केली, असे सहस्रावधि विद्वान् या अर्वाचीन काळ उदयास झाले, त्यांचा निर्देश या ग्रंथात होऊ न शकण्याचें कारण विषयाची संकुचित मर्यादा ! वैदिक वाङ्मयाच्या समीक्षेचें श्री. मधुसूदनजींचें हें अवाढव्य कार्य पाहून अजिंठा वेरूळचीं लेणीं किंवा हिमालयाचीं मोठमोठीं शिखरें पाहून व्हावें तसें थक्क झालेलें मन आतल्या आत म्हणू लागतें की, श्रीमधुसूदनजींच्या रूपाने कोणीतरी वैदिक ऋषीच अर्वाचीन काळात पुनर्जन्म पावला असावा.

* * *

## काव्यकण्ठ वासिष्ठ गणपति मुनि

नगालात नवद्वीप यथ संस्कृत साहित्यिकांची परिषद भरली होती. एक प्रौढ वयाचे पंडित उच्चासनावर बसले होते. थोड्याच वेळात एक वीस बावीस वर्षांचा तरुण पंडित सभामंडपात आला. 'हे कोण' म्हणून त्याने त्या प्रौढ पंडिता कडे निर्देश करून शेजारच्या एका गृहस्थाला प्रश्न विचारला. तो प्रश्न पंडित महा शयाच्या लक्षात येताच त्यांनी स्वत पद्यात आपला परिचय करून दिला.

" सत्वरकवितासविता गौडोऽहं कश्चिदम्बिकादत्त "

तो अहंकारपूर्ण आत्मपरिचय ऐकताच त्या तरुणाचा स्वाभिमान जागृत झाला. त्यानेहि त्या प्रौढाला पद्यातच आत्मपरिचय करून दिला.

" गणपतिरिति कविकुलपतिरतिदक्षो दाक्षिणात्योऽहम् ॥

तत्काळ दोघांची काव्यस्पर्धा सुरु झाली. समस्यापूर्ति, श्लोक, व्याख्या, रसचर्चा, कूटप्रश्न यांची उभयपक्षी सरबत्ती सुरू झाली. शेवटी या साहित्यसंघर्षात तरुण पंडिताचा विजय झाल्याचे परिषदेने घोषित केले. श्री अम्बिकादत्तांनी स्वत त्या तरुणाचा मोठा गौरव केला. हा तरुण पंडित म्हणजेच **वासिष्ठ गणपति मुनि** होय!

तामिळनाडातल्या कुंभकोण जिल्ह्यातील कल्वैरायमान या अग्रहारातल्य एका कौण्डिण्य गोत्री अय्यल्सोमयाजी या नावाच्या कुटुंबात **जानकीपरिणयम्** या संस्कृत नाटकाचा लेखक रामभद्र दीक्षित हा पंडित होऊन गेला. याच अय्यल्सोमयाजी कुटुंबातील नरसिंहशास्त्री व त्यांची धर्मपत्नी नरसाम्बा यांचा पुत्र गणपति!

वयाच्या सहाव्या वर्षापर्यंत गणपतीला वाचा फुटली नाही! सर्व प्रकारच्या बालरोगांनी त्याचे शरीर ग्रस्त होते. सहावे वर्ष सपताच गणपति रोगमुक्त झाला. त्याच्या देहावर एक अभिनव कान्ति तळपू लागली. अभ्यासाला आरंभ झाला. बाल-रामायण व शिवसहस्रनाम सातव्या वर्षापर्यंत तोंडपाठ झाले. गणपतीचे चुलते प्रकाश शास्त्री त्याला गणित व काव्य शिकवू लागले. अभ्यासात झपाट्यान प्रगति असली तरी खेळांची ओढ भारी! त्यामुळे कधी कधी गणपतीला चोप बसत असे

वयाच्या दहाव्या वर्षी गणपतीने पहिला संस्कृत श्लोक रचला पुढे हाच श्लोक त्यांनी **पाण्डवधार्तराष्ट्रसंभवम्** या स्वकृत खण्डकाव्याचे मंगलाचरण म्हणून उद्धृत केला दहाव्या वर्षी लघुपाराशरी व श्रीपतिपाठ संपला. सिद्धान्त गणितात नवीन रीति शोधून काढण्यास गणपतीची बुद्धि झटू लागली. याच वयात पत्रिका पाहून भविष्य सांगताना गणपतीची सहसा चूक होत नसे. वयाच्या १४ व्या वर्षापर्यंत पंचमहाकाव्ये, सर्व उपसाहित्य व साहित्यशास्त्र यांचा अभ्यास पूर्ण झाला. मेघदूत वाचून दूतकाव्य रचण्याची स्फूर्ति गणपतीला झाली. त्याने **भृङ्गदूतम्**

नावाचे खण्डकाव्य लिहिलें, परंतु स्वतःच त्या या काव्यासंबंधीं "कालिदासाच्या मेघदूता पुढे आपलें 'भृङ्गदूतकाव्यम्' म्हणजे गजराजापुढे अजापुत्र!" अशी कल्पना येताच गणपतीनें ते फाडून टाकलें. श्रीकृष्णचरित्राची शक्ति प्राप्त व्हावी म्हणून गणपतीनें सहस्त्रावधि श्लोक लिहिले. पण ते संस्कृत साहित्याच्या भव्योदात्त परंपरेंत शोभण्या-सारखे नाहीत या जाणीवेनें फाडून टाकले! वयाच्या १४ व्या वर्षापर्यंतची ही संस्कृतसेवा अशा रीतीनें गणपतीनें अग्न्यर्पण केली! याच काळात सरळ व मुलिष्ट संस्कृत भाषेत भाषण करण्याचा अभ्यास गणपतीनें केला. १४ ते १८ व्या काळात सिद्धान्त कौमुदीचा अभ्यास करण्यासाठी स्वतःच्या गावापासून दहा कोसांवर असलेल्या लोवेश अग्रहारांतील 'नीलिलि संस्थान पाठशाळेंत' गणपतीच्या खेपा चालव्या लागत.

प्राचीन ऋषिमुनींप्रमाणें आपण जप-तप करावें असी प्रेरणा गणपतीच्या अन्तःकरणांत वयाच्या दहाव्या वर्षापासून अंकुरित होऊं लागली. वडील नरसिंहशास्त्री हे परंपरागत श्रीविद्येचे महान् उपासक. त्यांनी १३ व्या वर्षी मुलाला महा-गणपति मंत्राची व श्रीविद्येची दीक्षा दिली. यात्यतिरिक्त पचाक्षरी, मेधादक्षिणामूर्ति, नारायणाष्टाक्षरी, सौराष्ट्राक्षरी, बाला, वाराही, चंडी-श्यामरी, मातंगी, भुवनेश्वरी, षोडशी इत्यादि मंत्रोपासनांची वडिलांनी मुलाला दीक्षा दिली. त्यांचा परिणाम म्हणजे कोणत्या तरी तीर्थक्षेत्रात जाऊन तपश्चर्या करावी ही अन्तःप्रेरणा गणपतीच्या ठिकाणीं प्रबळ होऊ लागली.

छात्रावस्थेतच गणपतीचा विवाह झाला होता. वयाच्या १८ व्या वर्षी, पत्नी माहेरीं असताना गणपतीनें आपले वडील भाऊ भीमशास्त्री व मित्र वेंकटेशय्या यांच्यासह, वडिलांना कळू न देता तपश्चर्येसाठी पलायन केलें.

काही काळानें गणपति घरीं आला. माहेरीं गेलेली पत्नी पतिसेवेसाठी आली गणपतीची तपोबुद्धि काही काळपर्यंत क्षीण झाली. शास्त्राध्ययनात व आरतीच्या लेखांत काळ जात होता मध्येच तपश्चर्येची आकांक्षा गणपतीच्या मनात उसळी मारी. या अवस्थेचें वर्णन करताना गणपति मुनि आत्मचरित्रात म्हणतात, 'धर्म संकटान्याम् अन्वभूवम्

"एकतः सुन्दरी कान्ता प्राणेभ्योऽपि गरीयसी।
अन्यतस्तापसी काङ्क्षा दिवसमादपि भूयसी॥"

एक वर्षांचा काळ या मानसिक संघर्षात निघून गेला. त्यानंतर गणपति नाशिकास आला तेथल्या अग्निहोत्र्यांनी त्याला पौरोहित्यात अडवून धरलें. पण काही दिवसांनंतर गण पतीच्या काव्यप्रतिभेच्या प्रचितीनें आल्यानंतर त्यांची सुटका झाली. नाशिक क्षेत्राचें नीट निरीक्षण करून ते तपश्चर्येला योग्य स्थान नाही असें मनांत ठरवून गणपतीनें त्र्यंबकेश्वराला प्रयाण केलें.

एका प्रयोगात दहा मिनिटात पचवीस या वेगाने या शीघ्रकवीने संस्कृत श्लोकरचना करून दाखविली. या वेगाने लिहिण लेखकाना अशक्य झाल्याने प्रयोग थांबवावा लागला. ( भगवान् व्यासानी महाभारत किंवा ज्ञानेश्वरानी ज्ञानेश्वरी याच पद्धतीने सांगितली, या कथेवर विश्वास न ठेवणाऱ्यानी वीसाव्या शतकातील गणपति मुनींचा हा प्रयोग लक्षात घेऊन विश्वास ठेवण्यास शिकावे ! ) या प्रयोगप्रसंगी श्रीनिवास शास्त्री, नीलमेघशास्त्री, हालास्यनाथशास्त्री, डॉ. एम्. डी कृष्णस्वामी यासारखे मद्रासचे मान्यवर नागरिक उपस्थित होते.

अरुणाचलाच्या वास्तव्यानतर वेल्लूर येथे तीन वर्षांचा काल एका महा विद्यालयात आन्ध्र भाषाध्यापक म्हणून घालवावा लागला. या नोकरीचा त्याच्या तापसी अन्तःकरणाला पथरवाड्यांतच वीट आला. पण धाकट्या भावाच्या आग्रहा स्तव नोकरी चालू ठेवावी लागली. या काळात अनेक सज्जनानी प्राध्यापक गणपति शास्त्रीपासून मन्त्रदीक्षा घेतली. हे सर्व सुप्रतिष्ठित शिष्य त्याना 'नायन' (आन्ध्र भाषेतील पितृवाचक सबोधन ) म्हणत.

तापसी वृत्तींत बाधा आणणाऱ्या प्राध्यापकपदाचा गणपति मुनाना वीट आला एके दिवशी शिष्याचा व पत्नीचा निरोप घेऊन ते तपस्नयेला निघाले. जवळच्या एका निर्जन स्थळी पचाक्षरी शिवमन्त्राचा कोटी जप केला मध्यतरी एक चमत्कार अनुभवास आल्याने अन्तःकरणांतली शिवभक्ति वृद्धिगत झाली.

दोन वर्षांपूर्वी अरुणाचलावर गणपति मुनींचा एका ब्राह्मण स्वामींशी परिचय होण्याचा प्रसग आला होता. या साधनेच्या काळात त्या ब्राह्मण स्वामीचे तीन स्मरण गणपति मुनींना झाले. त्या ब्राह्मण स्वामींचा उपदेश घेण्यासाठी गणपति मुनि गेले. स्वामींनी द्राविड भाषेत उपदेश केला तो गणपति मुनींनी

"अहमिति स्मृति क्व नु विभासते ।
इदमनुस्मरस्तत्र लीयते ।"

या श्लोकात गुम्फून टेवला.

त्या ब्राह्मण स्वामींचे नाव गणपति मुनींना ठाऊक नव्हते म्हणून त्यानी स्वामींच्या एका शिष्याला ते विचारले. शिष्याने नाव सांगितले 'वेंकटराम'। गणपति मुनींनी त्याचे सक्षिप्त रूप 'रमण' असे केले व तेच नांव पुढे ज्यास्त सर्वत्र प्रसिद्धीस आले

रमण महर्षींच्या सान्निध्यांत साधना करीत असतांना विख्यात कल्पनातीत उमासहस्रम् हे स्तोत्र लिहिण्याचा सकल्प गणपति मुनींनी केला त्यांपैकी आठशें श्लोक झाले. उरलेले दोनशे श्लोक सरस्वतीस अवसरच मिळेना दिवसेंदिवस एक

रात्रीं दोनशें श्लोक रचून ते सहस्रक पूर्ण करण्याच्या उद्देशाने गणपति मुनींनी आसन मांडलें. रमण महर्षि त्यावेळीं आपल्या या शिष्याच्या पाठीशींच नेत्र मिटून बसले होते. स्तोत्र पूर्ण होतांच डोळे उघडून ते म्हणाले, "मी सांगितलें तसेंच लिहिलेंस ना?" सर्वांनाच त्या प्रश्नाचें मोठें नवल वाटलें. मात्र शिष्याने होकारार्थी उत्तर दिलें!

यापुढील काळांत गणपति मुनींचा कपालीशास्त्रींशीं परिचय झाला. त्यांच्या जवळ लाभलेल्या विष्णुपुराण व सामवेद–सायणभाष्य या ग्रन्थांचा सखोल अभ्यास त्यांनी केला. त्यामुळे पुढें वैदिक वाङ्मयाच्या अभ्यासांत चित्त लागलें. सायण भाष्याधारें ऋग्वेद वाचून वैदिक मन्त्रांचा महिमा, वैदिक देवतांचीं स्वरूपें व त्यांच्या साक्षात्काराचीं साधनें यासंबंधीं गणपति मुनींनी काही सूत्रें लिहिलीं. मद्रासला उपनिषदांतील उपासनापद्धतीवर त्यांनी कांही व्याख्यान दिलीं. एका शूद्रवर्णी श्रोत्याने यासंबंधांत विशेष तत्परता दाखविल्यामुळे त्याला ती उपासनापद्धति नीट शिकविली. हा उपासक पुढें आपल्या समाजांत फार नांवालौकिकास आला.

मद्रासहून गोकर्ण क्षेत्रांत वास्तव्य करण्यासाठी गणपति मुनि सहकुटुम्ब सहपरिवार निघाले. वाटेंत उडुपी मुक्कामीं तासीं शंभर या प्रमाणात श्लोकरचना करण्याचा प्रयोग विद्वत्सभेत झाला. उडुपींत एका ब्राह्मणपुत्राच्या उपनयनासंबंधीं विवाद चालू होता. मुलाचा पिता मेल्यावर आईनें स्त्रियांनी वाढविलें. त्यामुळे हा व्रतबंध होऊं शकत नाही असें गावांतल्या वैदिकमन्यांचें मत होतें. गणपति मुनींनी वादांत या हठवाद्यांचा पराभव करून मुलाचा व्रतबंध करविला. गोकर्ण क्षेत्रांत अनेक विद्यार्थी गणपति मुनींच्याभोवती गोळा झाले. त्यांतील ज्योतिषशास्त्र शिकूं इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं अनेक ग्रन्थांचें रहस्य व्यक्त करणारा होरानिर्णय-संग्रहः नांवाचा एक संक्षिप्त ग्रन्थ मुनींनी लिहिला. गणपतिशास्त्री होसमने यांचा नातू स्वेच्छेने मुनींजवळ सेवेसाठी राहिला. मुनींनी त्याचें 'दैवरात' असें नांव ठेवलें. या दैवरातांच्या साहित्य, पुराण, व्याकरण, वेदान्त इत्यादि शास्त्रांतील अगाध पांडित्याची प्रशंसा पं. मदनमोहन मालवीय, म. म. प्रमथनाथ तर्कभूषण, शिवस्वामी यांच्यासारख्यांनी काशींमध्ये केली होती. त्याचें विशुद्ध चारित्र्य व गाढ श्रद्धा पाहून मुनींनी त्याला हठयोग व औपनिषदिक उपासना शिकविली.

गोकर्णांतल्या महाबळेश्वर मंदिरांत एका कर्नाटकी पंडिताचें प्रवचन झालें. या प्रवचनाचा उपसंहार गणपति मुनींनी केला. त्यांच्या त्या वक्तृत्वाचा व विद्वत्ताप्रचुर पांडित्याचा श्रोतृसमाजावर इतका प्रभाव पडला की अनेक शास्त्री विद्वान त्यांच्याकडे शिष्य म्हणून शिकण्यास येऊं लागले. त्यांत ऋग्वेदभाष्य व शांकरभाष्य शिकणाऱ्यांची संख्या अधिक होती. उप्पुन्द उपाध्यायांनी आरंभिलेल्या ज्योतिष्टोमांत गणपति मुनींची

वेदार्थाविषयीं संस्कृत प्रवचनें झालीं या प्रवचनांसंबंधीं ब्रह्मश्री कपालीशास्त्री (ऋग्वेदाच्या सिद्धाञ्जन भाष्याचे विख्यात लेखक व योगी अरविंदांचे अन्तेवासी) लिहितात की, "वेदाचा सारभूत अर्थ कळल्यामुळे मोठमोठ्या वैदिक विद्वानांना नवीन जन्म झाल्या सारखे वाटू लागले."

गोकर्णक्षेत्रात कदम्बवंशीय मयूरवर्म महाराजांनी वैदिक-धर्म-प्रवर्तनार्थ अनेक वैदिक पण्डितांचे वास्तव्य करविले होतें गणपति मुनींच्या जीवनाचा बराच उत्तरकाळ या पवित्र क्षेत्रात गेला. धर्मशास्त्रविषयक **गोत्रप्रवरनिर्णय, विवाहधर्मसूत्राणि, पञ्चजनचर्चा, जैमिनीयसूत्रवार्तिकम्** यासारखे मौलिक ग्रन्थ याच काळात गणपति मुनींनी लिहिले.

मथुरेत दरभङ्गा महाराजांच्या अध्यक्षतेखाली सनातनधर्म सभेचं अधिवेशन भरले होतें. कन्याविवाहाचा उचित काळ कोणता यासंबंधीं शास्त्रार्थ चालू होता. रजोदर्शनापूर्वीच विवाह झाला पाहिजे असा पक्ष सभेत स्थापन झाला होता. गणपति मुनींचे आगमन अधिवेशनात झाल्याचे कळताच अध्यक्ष महाराजांनी त्यांना स्वमत प्रतिपादन करण्याची विनंती केली. अर्ध्या तासाच्या संस्कृत भाषणात गणपति मुनींनी रजोदर्शनानन्तर तिसरे वर्ष संपण्यापूर्वी विवाह व्हावा हे आपलं मत प्रतिपादन केलं. सभेत उच्चासनावर सहस्रापेक्षा अधिक शास्त्रीपण्डित होते. विद्वान श्रोत्यांची एकूण संख्या दहा सहस्रापेक्षा अधिक असावी. गणपति मुनींच्या प्रतिपादनावर कोणीहि उत्तरपक्ष करण्याचे साहस केले नाही. दुसऱ्या दिवसापासून ऐकणाऱ्यांची संख्या वाढतच वाढत गेली या सनातन धर्म सभेनन्तर साहित्यपरिषदेचं स्थान च अध्यक्ष पद म. म. हरप्रसादशास्त्रींनी गणपति मुनींना दिले!

अरुणाचलावर रमण महर्षींच्या सान्निध्यात राहात असताना गणपति मुनींनी **दशमहाविद्यासूत्राणि** या पुस्तकाचं लेखन करून त्यावर प्रवचन दिलीं. या प्रवचन काळात शिष्यांनी विचारलेल्या प्रश्नांना रमण महर्षींनी जी उत्तरं दिलीं तीं तत्काळ श्लोकात गुंफून 'रमण गीता' नावाचा ग्रंथ गणपति मुनींनी रचला. या रमण गीतेतच तीन चार वर्षांपूर्वी अरुणाचलस्वामींशी झाला ना जो संवाद झाला त्याला निर्वाणात असा जीं उत्तरं रमण महर्षींनी दिलीं तीं पहिल्या अध्यायात गोविलीं आहेत. सद्गुरूचा अध्याय नसतानाहि रमण महर्षींच्या तोंडून एकाएकी निघालेले 'हृदयकुहर' इत्यादि श्लोक द्वितीयाध्यायात गायला असून, इतर सर्व अध्यायात विविध प्रकारचीं प्रश्नोत्तर गुंफिलीं आहेत. रमणगीतेत अठरा अध्याय व तीनशे श्लोक असून त्यांत निज स्त्रीच्या अध्यात्मप्रश्न लेखांचे पूर्ण समाधान होईल असे विचार घाटविले आहेत.

## इन्द्राणी सप्तशती

मध्यन्तरी काही प्रवास आटोपून गणपति मुनि पुत्राचा विवाह आटोपण्यासाठी आपल्या कुमुदोपल या गावीं येऊन राहिले. या वास्तव्यात ते घोर विषमज्वराने अत्यंत अशक्त झाले. तीन चार वर्षे या अशक्तपणात गेलीं. एके रात्रीं उठून ते म्हणाले, "आज ग्रहणातून माझी मुक्तता झाली. आता मला गुरूजवळ गेलेंच पाहिजे". या वास्तव्यकाळात रमण महर्षींच्या अनुग्रहाने गणपति मुनींची दुर्धर योगसाधना पूर्ण झाली. या काळातले काही अनुभव त्यानी 'उमासहस्रम्' स्तोत्राचें पुनर्लेखन करताना काही श्लोकात गुंफले आहेत. उमासहस्राचें संशोधन आटोपून इंद्राणी सप्तशतीची रचना आरंभिली. ग्रीष्म ऋतूत ही रचना चालू असताना प्रत्यहीं सायंकाळीं विजाचा लखलखाट आकाशात होत असे. या विद्युत्स्फुरणासंबंधीं कपालीशास्त्री लिहितात, "जडतत्त्वविचारसंस्कृतमतीनां निसर्गरसिकानाम् अत्र विद्युद्दर्शने न किमपि अद्भुत स्फुरेद् इति सत्यम्। तपोनिष्ठस्य असाधारणप्रभावस्य अस्य तु इदं दिव्यं चक्षुः उन्मेषयत् साक्षाद् देवदर्शनमेव अभूत इति तस्य अन्तिकस्थानां तदन्तेवासिनाम् अवदातम्।"

ही सप्तशती समाप्त झाल्यावर कुण्डलीपुर नामक रेणुकाक्षेत्रात देवीसमक्ष कवीने वाचली. 'स्तोत्रवाचन चालू असताना आम्हा श्रोत्याना जे दिव्य अनुभव आले ते आम्हीं यावज्जीव विसरू शकणार नाही' असें कपालीशास्त्री म्हणतात.

गणपति मुनींच्या असाधारण काव्यशक्तीसंबंधीं अनेक सत्यकथा ब्रह्मश्री कपालीशास्त्री या त्यांच्या महान् शिष्याने **वासिष्ठवैभवम्** नावाच्या संस्कृत ग्रंथाच्या २३ व्या प्रकरणात संकलित केल्या आहेत. त्या सर्वच सत्यकथा इतक्या अद्भुत आहेत की वाचणाऱ्याला आपण कालिदास, भवभूति इत्यादि प्राचीन महाकवींसंबंधीच्या दंतकथा वाचीत आहों की काय असें वाटू लागते. पण त्या सर्व घटना त्यांच्या सहवासात घडल्या अशी अनेक थोर मंडळी आजहि त्यांच्या सत्यत्वाची ग्वाही देण्यास हयात असल्याने, या कथा जर खऱ्या, तर मग कालिदास, भवभूति प्रभृती या कथा तरी अग्राह्य म्हणून का खोट्या मानाव्या असा प्रश्न उपस्थित होतो.

## देशभक्तिपूर्ण अंतःकरण

गणपति मुनींच्या लोकविलक्षण खाजगी जीवनात तत्कालीन राजनैतिक आंदोलन कोठे प्रत्यक्ष दिसत नाही. उपरकरणी त्यांच्या हालचालीवर पाळत ठेवण्याची आवश्यकता भासली, यावरून त्यांच्या राष्ट्रीय चळवळीसंबंधीं फार तर अनुमान करता येईल. पण एकदा त्यांची हृदयस्थ देशभक्ति श्लोकमय वाणीने फोडून गेली. समुद्रतीरावर विरावयास आलेली त्यांची सर्व शिष्यमंडळी आसपासचा समुद्रकाठ

करीत असता गणपति मुनि मौन धारण करून निश्चल बसून होते. तें पाहून वपाली-शास्त्रींनी त्याना विचारलें, "किमपि ध्यायति इव भवान् ?"

तत्काळ गणपति मुनींच्या तोंडून उद्गार निघाला,

"दशा देशस्यैता प्रतिपदमय ध्यायति जन."

हा छंदोमय उद्गार त्यानी लगेच श्लोकरूपाने पूर्ण केला. तो श्लोक असा,

"कुलीन क्षुद्राय प्रवर इति दत्ते निजसुताम्
धनार्थान् विद्वांश्च प्रभव इति गायन्ति शतश ।
बल बाह्वोर्लुप्त हृतमपि च वाग्वीर्यमरिभिः
दशां देशस्यैता प्रतिपदमय ध्यायति जन· ॥"

यावर आणखी एक श्लोक म्हणून मुनींनी आपल्या अन्त·करणातली तळमळ व्यक्त केली.

## अस्पृश्यतेचे खंडन

गणपति मुनींनी आंध्र प्रांताचें राजकीय नेतृत्व करावें म्हणून तत्कालीन काँग्रेस कार्यकर्त्यांनी फार खटपट केली. पण 'ईश्वराच्या आदेशावाचून आम्हाला या क्षेत्रात अधिकार नाही' असें त्याचें ठराविक उत्तर असे. शेवटीं मित्रमंडळींच्या विनंतीला मान देण्यासाठी तीन चार वर्षे त्यानी राजकीय चळवळींत भाग घेतला. बेळगावला १९२४ साली म. गांधींच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या अधिवेशनाला गणपति मुनि गेले होते. त्या वेळीं "अस्पृश्यता निवृत्ति न अशास्त्रीया" अस्पृश्यतानिवारण अशास्त्रीय नाही म्हणजे शास्त्रीय आहे; या विषयावर गणपति मुनींचें संस्कृत व्याख्यान झालें. काँग्रेस अधिवेशनात झालेलें हेंच पाहिलें ( व बहुधा शेवटचें ) संस्कृत व्याख्यान होय. या संस्कृत व्याख्यानाची मदनमोहन प. मालवीयजींनी अंत·करणपूर्वक प्रशंसा केली. प्रत्येकाच्या अंत करणावर या प्रभावशाली संस्कृत व्याख्यानाचा सखोल ठसा उमटला. याशिवाय आणखी कांही त्याच्या राजकीय आठवणी आहेत. त्या सर्व येथे देणें आवश्यक नाही.

योगी अरविंदाविषयीं गणपति मुनींच्या अंत करणात नितांत श्रद्धा होती. त्या श्रद्धेने त्याना अरविंदाश्रमांत ओढून नेलें. दोघा योगी पुरुषांचा पधरा दिवस सहवास होता. या पधरवाड्यात कोदण्डराम नावाच्या साधकांने भिन्न भिन्न योगा-संबधी मुनींना कांही प्रश्न विचारले असता, एका तासात १०८ सूत्रांचें अष्टप्रश्नमय पुस्तक लिहून त्यांनी कोदण्डरामाला दिलें व त्यावर स्वत· विवरण लिहिलें. या 'तत्वानुसन्धानम्' नामक सूत्रग्रन्थाची कांहीशी कल्पना पुढील सूत्रावरून येईल.

**सप्तम खण्डः**—(१) अथ योगाः। (२) फलोपकाररहित सत्कर्म कर्मयोग.। (३) मनसा मन्त्रस्य ध्यान मन्त्रयोगः। (४) वायोर्निग्रहः हठयोगः। (५) चित्त वृत्तिनिरोधो राजयोग। (६) आत्मविचारण ज्ञानयोगः। (७) अहं वृत्तिमूलान्वे षणमेव आत्मविचारण न शास्त्रचर्चा। (८) आत्मसमर्पण प्रपत्तियोग. (९) राजयोग प्रपत्तियोगपुरस्सर नित्य प्रवहन्त्याः शक्तेः महता मौनेन आत्मन्यवकाश दत्वा पञ्चाना कोशानाम् अनवरत चिदाग्निना सत्करणम् अमृतयोग.। (१०) अस्याङ्ग कल्पमेवा इत्येके।

**अष्टम खण्डः**—(१) अथामृतयोगे महामौनसाधिका विद्याः। (२) केवलं सम्प्रसादेन तिष्ठेत् सा भूमविद्या। (३) प्रणव ध्यायेत् कण्ठकुहरे स्थिरमनाः सोद्गीथविद्या। (४) गत्यागतिप्रत्यवेक्षणद्वारा प्राणवायुं ध्यायेत् सा सवर्गविद्या। (५) तीव्रनिर्विषयालोचनजम् उष्माण ध्यायेत् सा ज्योतिर्विद्या (६) रस ध्यायेत् जिह्वाया स्थिरमनाः सा वारुणीविद्या। (७) उपजिह्वायाम् इन्द्रयोनिविद्या। दृष्टिं द्रष्टार वा ध्यायेत् सा उपकोसलविद्या।

अशा प्रकारे या अभिनव सूत्रात्मक ग्रथात गणपतिमुनींनी सर्व औपनिषदिक विद्यांचें सक्षेपत स्वरूप विशद करून सांगितलें।

## ग्रंथरचना

गणपति मुनींचे सपूर्ण अतरंग व बुद्धिवैभव ज्यात व्यक्त झाले असे अनेक संस्कृत ग्रथ आज उपलब्ध आहेत त्यातील काही थोडे मुद्रित व इतर सर्व अमुद्रित आहेत

(१) उमासहस्रम् [मुद्रित] (२) इन्द्राणी सप्तशती। (३) प्रचण्ड चण्डीत्रिशती। (४) उमाशतकम्। (५) शिवशतकम्। (६) इन्द्रसहस्रम्। (७) गीतमाला [मुद्रित] (८) रमणैकविंशति. [मुद्रित]। (९) हेरम्बो पस्थानम्। हे नऊ स्तोत्र ग्रथ आहेत. (१०) **विश्वमीमांसा**—या ग्रथात ईश्वरतत्त्व, शक्तितत्त्व, जीवतत्त्व, अवतारतत्त्व, औपनिषदिक उपासना, देवयान-पितृयानमार्ग विचार, मोक्षविचार, इत्यादि अलौकिक विषय अन्तर्भूत झाले आहेत. (११) **रमण गीता** [मुद्रित] (१२) तत्त्वघण्टाशतकम् (उडुपीजवळच्या बालमाण्डेश्वर क्षेत्रात पण्डितसभेमध्ये एका तासात लिहिलेला ग्रंथ.) (१३) महाविद्यासूत्रम् (तन्त्रमार्गातील दश महाविद्यांचें विवेचन यात आहे.) (१४) **राजयोगसारसूत्रम्** (१५) **शब्द-प्रमाणचर्चा** (वेदांच्या अपौरुषेयत्वाचें खण्डन यात केलें आहे.) (१६) **पञ्चजन-चर्चा**—अन्त्यजांची शास्त्रदृष्ट्या निराधारता यात सिद्ध केली आहे. (१७) **विवाह-धर्मसूत्रम्**। (१८) **ईशोपनिषद्भाष्यम्**, (१९) **उपदेशसारभाष्यम्**।

(रमणाश्रमातर्फे प्रकाशित) याव्यतिरिक्त (२०) **चिकित्सानुशासनम्।** (२१) **आयुर्वेदसङ्ग्रह** व (२२) **प्राणतोषणम्।** हे वैदिक शास्त्रविषयक ग्रंथ आणि (२३) **षोडशश्लोकी** (२४) **होरानिर्णयसंग्रह** व (२५) **निभावकलचन्द्रिका** हे तीन ज्योतिःशास्त्रविषयक ग्रन्थ असून (२६) **इन्द्रगीतम्** हे एक तेलुगु काव्य आहे. (२७) **पूर्णा** या नावाची संस्कृत कथा अपूर्ण राहिली. (२८) **महाभारतविमर्श.** हा ग्रन्थ बराच मोठा असून यात पाण्डवांचे ऋग्वेदसमकालीनत्व सिद्ध केले आहे.

## महाप्रयाण

गणपति मुनींनी आपल्या जीवनाच्या उत्तरार्धांचा बराच काळ कर्नाटकातील 'शिरसी' या गावी घालविला. अधूनमधून शिष्यमंडळींच्या आग्रहाप्रीत्यर्थ ते निरनिराळ्या गावी प्रवास करीत. पण स्वतःच्या गावात मात्र ते सहसा गेले नाहीत. आपल्या प्रिय मंडळींचा कुशल समाचार संस्कृत पत्रद्वारे ते विचारीत व स्वतःचा त्यांना कळवीत. परमश्रद्धेय रमण महर्षींना त्यांनी लिहिलेली संस्कृत पत्रे सर्व दृष्टींनी आदर्श आहेत. गणपति मुनींची सारी गुरुश्रद्धा या पत्रांतून ओसंडत आहे.

वेंकटरामसूर्ति नावाच्या मुनिशिष्याने आपल्या गुरूचा ध्येयवाद व साधनामार्ग प्रसृत करण्यासाठी 'निम्पुरा' नावाच्या आन्ध्रातील एका गावात वैदिक संघाची स्थापना करून एक आश्रम उभारला. दि. २६-४-३६ या दिवशी गणपति मुनींनी त्यात प्रथम प्रवेश केला. मित्रमंडळींनी त्यानिमित्त मोठा यज्ञ आरंभिला. यज्ञमण्डपात *गणपति मुनींचे 'वैदिक धर्म' या विषयावर प्रवचन झाले.* सोमयाजी *सूर्यनारायण* नामक एका शिष्याशी संभाषण करीत असता मुनि म्हणाले, 'येथे केवळ तीन महिने वास्तव्य राहील' या संभाषणात आपल्या ग्रंथाच्या प्रकाशनासंबंधी त्यांनी चिंता व्यक्त केली.

पुढे काही दिवसांनी गणपति मुनि म्हणाले, "आता वीस दिवसांनी मला सिद्धि मिळणार!" त्यावर कोणी काही विचारले नाही. एवढ्यात कानाला एक फोड आला. मुनींनी त्यावर काही उपचार करू दिला नाही. जप, ध्यान, ग्रंथलेखन यथापूर्व चालूच होते. फोड आपल्या जागी जिरला, पण ताप सुरू झाला. मुलगा गावाहून शुश्रूषेसाठी आला, पण त्याच्याशी काही भाषण केले नाही. एका कागदावर, "*जप, ध्यान व देवताराधन सोडू नकोस*" *या अर्थाचे एक वाक्य तेलगु भाषेत* मुलासाठी संदेश म्हणून त्यांनी लिहिले. गणपति मुनींनी यावज्जीव तेच केले होते, मुलाला लिहिलेला तोच त्यांचा संदेश सर्वांसाठी आहे, असे का मानू नये? शेवटी 'निम्पुरा' आश्रमात प्रवेश केल्याच्या दिवसापासून बरोबर तीन महिन्यांनी दि. २५-७-३६ शनिवारी सूर्यास्तापूर्वी दोन तास असताना गणपति मुनींनी ग्रंथाच्या अष्टाक्षराचा

वर्षी इहलोकाचा त्याग केला. ( या दिवशीं श्रावण शुक्ल सप्तमी म्हणजे श्री तुलसीदासजींची पुण्यतिथि होती ! )

आपल्या गुरुच्या विभूतिमत्त्वासंबंधीं लिहिताना ब्रह्मश्री कपालीशास्त्री लिहितात, "वेदपुरुषो मूर्तिमानिव आयात छान्दसेन ज्योतिषा ध्वान्तम् अवैदिकम् अपहन्तुम्, आगमरहस्यकोशो मानुषाकार इव सञ्जातो महाशक्तिविद्या-साधनानि प्रदर्शयितुम्, पुन समागत ऋषि कोऽपि औपनिषदविद्या आवेदयितुम्, अन्यादृश कविसार्वभौम , मन्त्रमूर्ति , तपोराशि , काचन दैवी विभूति. " इत्यादि इत्यादि.

*  *  *

## ब्रह्मश्री कपाली शास्त्री

आधुनिक काळात सद्गुरुनिष्ठेने जनतेचा संपर्क टाळून वेदोपनिषदान्तर्गत गूढ आध्यात्मिक ज्ञानाचें संशोधन आपल्या प्रतिभेच्या बळावर करणारे जे महापुरुष झाले त्यामध्ये महर्षि रमण, वासिष्ठ गणपति मुनि व योगी अरविंद याचे पट्टशिष्य श्री कपाली शास्त्री यांचे चरित्र अत्यंत स्फूर्तिदायक आहे. श्री. कपाली शास्त्री हे भारद्वाज गोत्री असून त्यांच्या वडिलांचे वडील श्रीविश्वेश्वर हे मोठे नामवंत पण्डित होते. त्यांनी तिरुवोत्रिपूर या गावीं विद्येची उपासना करीत आपलें पावित्र्यपूर्ण जीवन घालविलें. कपाली शास्त्रींने बाल्यपणीं पित्याजवळ परम्परेनुसार वेदाध्ययन केलें. वयाच्या वीसाव्या वर्षापर्यंत कपालीने आयुर्वेद व ज्योतिःशास्त्र यामध्ये मोठे प्रावीण्य सम्पादन केले वयाच्या बाराव्या वर्षींच त्याने वाल्मीकि रामायणाचीं अनेक पारायणे केलीं होतीं. उपनयनानंतर तिरुवोत्रिपूरची ग्रामदेवता जी त्रिपुरसुन्दरी तिच्या मंदिरात प्रतिदिन उभ्याने सहस्र गायत्रीमन्त्राचा जप करण्याचा कपालीचा नियम होता. अशा प्रकारच्या व्रतस्थ व संस्कारपूर्ण जीवनामुळे तारुण्याच्या आरंभींच कपाली शास्त्रींना समाजात मोठी मान्यता प्राप्त झाली होती. वेदाध्ययनाचे संस्कार चालू असताना बाल्यपणीं वेद हे योगनिद्रास्थित भगवान् नारायणाचे निःश्वास आहेत, अशी परमश्रद्धा कपालीच्या अन्तःकरणात उदित झाली. श्रुति ही प्रत्यक्ष परमात्म्याची वाङ्मयी मूर्ति आहे ही श्रद्धा त्यांच्या हृदयात स्थिरावली. सायणाचार्यकृत वेद भाष्याचा अनेकवार अभ्यास करीत असताना सायणाचार्यांनी न सांगितलेलें असें काही तरी गूढ ज्ञान वेदात अवश्य साठविलेलें आहे, अशी कल्पना कपालीशास्त्रींच्या अन्तःकरणास वारंवार स्पर्श करू लागली. तो गूढ अर्थ आकलन करण्याचा कपाली शास्त्रींचा प्रयत्न चालू असताना दैवयोगाने इ. स. १९०७ मध्ये काव्यकण्ठ गणपति मुनींशी त्यांची गाठ पडली गणपति मुनींच्या सहवासात असताना मन्त्र, तन्त्र, योग, वेदान्त यासारख्या गूढ विद्यांचें रहस्य कपाल शास्त्रींना नीट उमगलें गणपति मुनींच्या कृपेने वैदिक देवतांच जें रहस्यमय स्वरूप व वेदमन्त्राचा जो गूढार्थ कपालीशास्त्रींना

फळला त्याचा परिपोष श्री अरविंदाच्या आर्य मासिकात त्या काळात प्रकाशित होणाऱ्या लेखांनी झाला. वासिष्ट गणपति मुनींच्या अनुग्रहाचा कृतज्ञतापूर्ण उल्लेख कपालीशास्त्रींनी आपल्या गुरुच्या 'उमासहस्रम्' या भक्तिकाव्यावर लिहिलेल्या टीकेमध्ये केलेला आहे. आपल्या गुरुचे भाषासौष्ठव व विचार आविष्कृत करण्याचें सामर्थ्य कपालीशास्त्रींनी तीव्र अभ्यासाने आत्मसात् केले होते. किंबहुना गुरुच्या लेखनशैलीवर मात करणारी लेखनशैली त्यांनी संपादन केली होती.

अरुणाचलमचे महर्षि रमण यांच्या सिद्धान्तानुरोधाने गणपति मुनींनी **सद्दर्शनम्** व **रमणगीता** हे दोन संस्कृत ग्रंथ लिहिले होते. त्या दोन्ही ग्रंथांवर भाष्यें कपाली शास्त्रींनी लिहिली. सद्दर्शनाचें भाष्य वाचताना भगवान् शंकराचार्यांच्या प्रसन्नगम्भीर लेखनशैलीचें पदोपदी स्मरण होतें. रमणगीतेवरील भाष्यात कपाली शास्त्रींनी ज्ञान, कर्म व भक्ति मार्गासंबंधीच्या अनेक प्रश्नांचा ऊहापोह केलेला आहे. गणपति मुनींनी या प्रतिभासम्पन्न शिष्याची रमण महर्षींशी गाठ घालून दिली. रमण महर्षींच्या सहवासात काही काळ घालविल्यानंतर अन्तःप्रेरणेनुसार कपालीशास्त्री पाँडेचरीस श्रीमद् अरविंदाच्या सहवासात आले. तेथे श्रीअरविंदाच्या आदेशानुसार सर्वतोपरी जनसंपर्क टाळून एकान्तात ते तत्त्वचिन्तनात मग्न झाले. योगाभ्यासामुळे त्यांच्या देहावर अलौकिक तेज झळाळू लागलें. नेत्रात विद्युद्दीप्ति तळपू लागली. त्या काळात ते वेदपठन करू लागले की श्रद्धाहीनांचीं अन्तःकरण मुद्धा त्यांच्या घन गंभीर स्वराने आकर्षित होत असत. स्वानुभवावर आधारलेले शाश्वत सत्य सिद्धान्त या काळात ते बोलत असत. 'ऋषीणा पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति' या भव भूतीच्या वचनाचा प्रत्यंतर त्यांच्या भाषणातून येऊ लागला. श्रीअरविंदाच्या पूर्णयोग सिद्धान्ताप्रमाणे अनुसरून वेद व उपनिषदांचे निरन्तर अध्ययन कपाली शास्त्रींनी पाँन्डेचरीस राहून केले. 'लाईट्स ऑन दी उपनिषद्ज्' या इंग्रजी ग्रंथात उपनिषदें ही साधना-पर आहेत, हा सिद्धान्त कपालीशास्त्रींनी प्रतिपादन केला आहे. 'लाईट्स ऑन दी तंत्राज्' या नावाच्या दुसऱ्या एका इंग्रजी ग्रंथात तन्त्रमार्गाचें वेदमूलत्व व आध्यात्मिक महत्त्व त्यांनी सिद्ध केलें आहे.

## ऋग्भाष्यभूमिका

यद्यपि यापूर्वी श्री सायणाचार्यांनी ऋग्वेदावरील आरम्भ भाष्याचा मध्य लिहिले, त्यापूर्वीही वेदांवर कांही उल्लेखनीय भाष्यें निर्माण झाली होती. त्यापैकी स्कन्दस्वामी ७ वे शतक, नारायणाचार्य ७ वे शतक, उद्गीथाचार्य ७ वे शतक, हस्तामलकाचार्य ८ वे शतक, वेंकटमाधव ११ वे शतक, लक्ष्मणाचार्य १२ वे शतक, धानुष्कयज्वा, आनंदतीर्थ १३ वे शतक, आत्मानन्दतीर्थ १३ वे शतक, मुद्गलाचार्य १५ वे शतक, चतुर्वेदस्वामी म्हणजमार, गुहदेव, दुर्गाचार्य १७ वे शतक, हस्तयुग,

अनन्ताचार्य, इत्यादि अनेक वेदांचे भाष्यकार होऊन गेले. आधुनिक काळांतील वेदभाष्यकारांत स्वामी दयानन्द हे फार मान्यता पावलेले महापुरुष झाले. त्यांनी संपूर्ण यजुर्वेदावर व ऋग्वेदाच्या सप्तम मण्डलाच्या द्वितीय सूक्तातील द्वितीय मन्त्रापर्यंत भाष्य लिहून त्यामध्ये विमानें, तारायन्त्र, यांसारखे आधुनिक विज्ञानाचे विषय सुद्धा वेदांत असल्याचें सिद्ध करण्याचा हिरीरीने प्रयत्न केलेला. ब्रह्मश्री कपालीशास्त्रींनी श्री अरविंदांच्या पूर्णयोग सिद्धान्तानुसार वयाच्या ६० व्या वर्षी ऋग्वेदावर सिद्धान्जन भाष्य लिहिले. ऋग्भाष्यभूमिकेच्या आरंभीं ७२ श्लोकमध्ये त्यांनी आपला सिद्धान्त मांडलेला असून, त्याचा विस्तार भाष्यभूमिकाविषयक प्रबंधात त्यांनी केलेला आहे.

भारतीस्तवः, कविताञ्जलिः, मातृतत्त्वप्रकाशः, आह्निकस्तवः या अरविंदांच्या काव्यांचे अनुवाद असलेल्या संस्कृत काव्यात कपालीशास्त्रींचे असाधारण भाषाप्रभुत्व व्यक्त होते. या भाषान्तराचे सौन्दर्य मूळ ग्रंथांवर मात करणारें आहे, असें अनेकांचे मत आहे. त्यांच्या संपूर्ण साहित्याचा सविस्तर परिचय पूर्वार्धातील 'धार्मिक आश्रमांची संस्कृतसेवा' या प्रकरणात दिलेला आहे. कपालीशास्त्रींच्या वासिष्ठवैभवम्, उमासहस्रप्रभा, रमणगीतगीताप्रकाशः, सर्वदर्शनभाष्यम्, अरुणाचलपञ्चरत्नदर्पणः या ग्रंथामुळे अर्वाचीन टीकावाङ्मयांत महत्त्वाची भर पडली आहे. त्यांच्या 'भारतीस्तवः' या शतकातील,

निद्राणा किमु भारती क्षितिरियं किं मूर्च्छिता मोहतः
किं नैराश्यवशंवदैररिजनैराक्रान्ततरवा पुनः ।
भिन्ना सङ्ग्रसहस्रिभिः किमु जनैश्छिन्नान्तरङ्गैर्विभिः
क्षोणीमण्डलसारदिव्यमहिम-ज्वालेव शान्ता नु किम् ॥

यातः कुत्र पराक्रमस्तव पुरा रक्षांसि येनाऽधुनोः
किं यातं बलमम्ब येन भगवद्धर्मा पुरा दर्शिताः ।
इत्थं व्याकुलचेतनैः सुकृतिभिः पुत्रैश्चिराय स्थिते
मातर्भारति हन्त ते समुदयः सोऽयं समासाद्यते ॥

सुचिरभरिताद् बन्धान्मोक्षोऽधुना भरतावने
सकलजगतः कल्याणाय प्रभातनु कल्पताम् ।
भवतु च सदा लोके यात्रा तवात्मभुवा तव
जननि विलसेदच्छ रूप वरं तव वास्तवम् ॥

यासारख्या श्लोकांतून कपालीशास्त्रींची उज्ज्वल देशभक्ति व्यक्त होते. असा हा देशभक्त, योगी व वेदरहस्यज्ञ महापुरुष इ. स. १९५३ मध्ये दिवंगत झाला. आश्चर्य असें की महाराष्ट्रातल्या एकाहि वृत्तपत्रात त्यासंबंधी चार ओळींची बातमी सुद्धा झळकली नाही. प्रादेशिक वृत्तपत्रे संस्कृतविद्या व अन्य प्रांतातील संस्कृतज्ञ

विद्वर्ग यांच्यासंबंधी किती अंधारांत असतो याचे हे प्रत्यंतर आहे. कपाली-शास्त्रींच्या महानिर्याणानिमित्त लिहिलेल्या २३ ऑगस्ट १९५३ अकांत मद्रासच्या Sunday Times म्हणतो—

"The passing of Shri Kapali Shastri marks the disappearance of the last of the heirarchy, of versatile scholars, who with the active guidance of a guru, to whom they surrendered themselves totally and without reserve scaled sunlit summits of spirituality bringing down from those higher heights ethereal light and knowledge with which they impregnated their word, spoken or written and thus invested it with immortality."

* * *

## पंडिता क्षमादेवी राव व इतर कवयित्री

ज्या राष्ट्रांत अर्धांची कार्यशक्ति निरनिराळ्या क्षेत्रात योग्य प्रकारें अभिव्यक्त होत नाही ते राष्ट्र एका दृष्टीने असंस्कृत समजावयास हवें. स्त्रियांचे सुसंस्कृतत्व हे राष्ट्राच्या सुसंस्कृतत्वाचें उत्कृष्ट निदर्शन आहे. "न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति" या तथ्यभूत मनुवचनाचा विपरीत अर्थ घेऊन प्राचीन भारतामध्ये स्त्रीजीवन सर्वथा अज्ञानमय होते, असें प्रतिपादन करण्याचा प्रयत्न बहुतेक नवमतवादी विद्वान करीत असतात. त्यांच्या असल्या दुराग्रही प्रतिपादनातून त्यांचेंच अज्ञान अभाविकपणे व्यक्त होत असतें. याचे कारण ऋग्वेदापासून सुशिक्षित व प्रतिभासंपन्न महिलांची परंपरा आजवर भारतामध्ये निरन्तर चालत आलेली आहे. ऋग्वेदांत घोषा, गोधा, विश्ववारा, अपाला, अदिति, इन्द्राणि, इन्द्रमाता, सरमा, रोमशा, उर्वशी, लोपामुद्रा, वाक्, श्रद्धा, दक्षिणा, रात्री, सूर्या, सार्पिनी, इत्यादि २६ ब्रह्मवादिनींचा नामोल्लेख आढळतो. भारतीय महिलांच्या सुशिक्षितत्वाची परम्परा किती सनातन आहे याची कल्पना देण्यास येवढी नावें पर्याप्त आहेत. बौद्ध साहित्याच्या 'थेरीगाथा' नावाच्या काव्यसंग्रहात मुक्ता, नंदा, श्यामा, चन्द्रा, उत्पलवर्णा, वासिष्ठी, आम्रपाली, सुमेधा, महाप्रजापती, गौतमी, इत्यादि ३७ कवयित्रींची नावे व काव्ये आढळतात. त्यानंतरच्या काळात विज्जिका, विकटा, शीलाभट्टारिका, मारुला, अवन्तिसुन्दरी, गंगादेवी, तिरुमलाम्बा इत्यादि श्रेष्ठ कवयित्रींची नावें आढळतात. भारताच्या सांस्कृतिक जीवनात विविध क्षेत्रामध्ये ज्यांनी आपलें असाधारण चैतन्य अनादिकालापासून व्यक्त केलें अशा सहस्रावधि महिलांचा परिचय 'कल्याण' या हिन्दी मासिकाच्या 'नारी' विशेषांकात उत्सुकांस पहावयास मिळेल.

संस्कृत साहित्याच्या क्षेत्रात ज्यांनी आपले प्रतिभासामर्थ्य आधुनिक काळात उत्कृष्टपणे व्यक्त केले, त्यामध्ये पण्डिता क्षमादेवी राव हिचे स्थान फार महत्त्वाचे आहे. क्षमादेवींचा परिचय देण्यापूर्वी आधुनिक कालखण्डातील अनेक संस्कृत कवयित्रींचे साहजिकच स्मरण होते. त्यापैकी काहींचा संक्षिप्त परिचय पुढीलप्रमाणे आहे.

**प्रियंवदा** — ही कवयित्री १७ व्या शतकात होऊन गेली.[1] हिच्या पित्याचे नाव शिवराम व पतीचे नाव रघुनाथ असे होते. बंगालच्या फरीदपूर नावाच्या नगरात ती राहात होती असे आढळते. **श्यामरहस्यम्** नावाचे कृष्णभक्तिपर काव्य तिने लिहिलेले आहे.

**वैजयन्ती**—१७ व्या शतकात बंगालमधील धानुक नावाच्या गावामध्ये राहणाऱ्या मथुराभट्ट नावाच्या विद्वानाची ही कन्या अनेक शास्त्रांमध्ये व विशेषत मीमांसाशास्त्रामध्ये निष्णात होती. दुर्गादास तर्कवागीश याचा पुत्र कृष्णनाथ याच्याशी तिचा विवाह झाला होता.[2] या विद्वान दापत्याने **आनन्दलतिकाचम्पू** नावाचे काव्य लिहिले होते, असे त्या चम्पूतील " आनन्दलतिकानम्पूर्मयाकारि प्रिया सह " या वाक्यावरून आढळते. वैजयन्तीचे श्लोक काव्यात ठिकठिकाणी विखुरलेले असल्यामुळे ते स्वतंत्रपणे ओळखता येत नाहीत. तथापि—

**अहिरय कलधौतगिरिभ्रमात् स्तनभरात् किल नाभिहृदोस्थित ।**
**इति निवेदयतु नयने हि यत श्रवणसीमनि किं समुपस्थिते ॥**

यासारखे काही श्लोक वैजयन्तीचे म्हणून ओळखण्यात येतात.

**त्रिवेणी**—१९ व्या शतकातील ( १८१७ ते १८८३ ) उदेन्द्रपुरचे विद्वान श्री अनन्ताचार्य याची ही कन्या होती. अनन्ताचार्यांनी ज्या दिवशी "यादवराघव पाण्डवीय" हे आपले त्र्यर्थी काव्य पूर्ण केले, त्याच दिवशी हिचा जन्म झाला, म्हणून तिचे नाव त्रिवेणी असे ठेवण्यात आले. पेरुदूरच्या प्रतिवादिभयंकर वेंकटाचार्यांशी हिचा विवाह झाला होता. संस्कृत कवयित्रींमध्ये विविध प्रकारची काव्यरचना करणारी कवयित्री हीच आढळते, त्यामध्ये ' रङ्गाभ्युदयम् ' व " सम्पत् कुमारविजयम् ' ही दोन लाक्षणिक नाटक, ' लक्ष्मीसहस्रम् ' व ' रङ्गनाथसहस्रम् ' ही दोन महास्तोत्रे ' शुकसंदेशम् ' व ' भृङ्गसन्देशम् ' ही दोन दूतकाव्य, 'रङ्गराट् समुदयम् ' व ' तत्त्वमुद्राभद्रोदयम् ' ही दोन प्रबोधचन्द्रोदयासारखी तत्त्वज्ञान-प्रधान नाटकं, एवढी विविध स्वरूपाची ग्रंथसंपत्ति या विदुषीने निर्माण केली आहे.[3] वैधव्य प्राप्त झाल्यानंतर तिने सरकारी अधिकाऱ्याच्या सहाय्याने आपल्या उपास्य दैवताचे एक मंदिर उभारले होते.

---

१. पृ ३७३ । २ पृ. ३७७ । ३ पृ. ३७९ ।

**लक्ष्मी**—१९ व्या शतकांत मलबार प्रदेशांतील एकावर्ल कोविलग्राम या गांवीं लक्ष्मी या नांवाची एक कवयित्री होऊन गेली. तिनें ' सन्तानगोपालम् ' या नांवाचें ३ सर्गांचें काव्य लिहिलेलें आहे.[4] एका ब्राह्मणाचे मृतपुत्र श्रीकृष्णानें जिवंत केले, *अशी कथा या काव्यात गुंफिलेली आहे.* शेवटच्या तिसऱ्या सर्गांत यमकमय पद्यरचना आढळते.

**सुन्दरवल्ली**—म्हैसूरच्या नरसिंह अय्यंगारांची कन्या व कस्तूरी रंगाचार्यांची शिष्या असलेल्या सुन्दरवल्ली या कवयित्रीनें (१९ वे शतक) ' रामायणचम्पूः ' नांवाचें एक ६ सर्गांचें काव्य लिहिलें आहे.[5]

**ज्ञानसुन्दरी** — १९ व्या शतकांत कुम्भकोण येथें राहणाऱ्या ज्ञानसुन्दरी या विख्यात नर्तकीनें ' हालास्यचम्पूः ' या नांवाचें ६ स्तबकांचें काव्य लिहिलें आहे. ही कवयित्री काव्यकलेप्रमाणें नृत्य, गीत, वक्तृत्व इत्यादि विविध कलांत अत्यंत निपुण होती. म्हैसूर सरकारनें ' कविरत्नम् ' ही उपाधि देऊन तिचा मोठा सन्मान केला होता. ' हालास्यचम्पू ' व्यतिरिक्त हिचीं अवान्तर काव्यें आढळत नाहीत. प्रस्तुत ' हालास्यचम्पू ' मध्यें मीनाक्षी व सुन्दरेश यांचा विवाहप्रसंग वर्णिलेला आहे. *हा ग्रन्थ कुंभकोणं येथील मुद्रणालयांत मुद्रित झाला आहे.*[6]

**कामाक्षी**—तंजावर जिल्ह्यांतील गणपति अग्रहारामध्यें राहणाऱ्या पञ्चापगेशाचार्यांची कन्या कामाक्षी हिनें कालिदासाच्या शैलीचें अनुकरण करून ' रामचरितम् ' नांवाचें लघुकाव्य लिहिलें. या काव्यांत कालिदासाच्या काव्यांतील शब्दांचें, वाक्यांचें माधुर्य आहे. मुथुकृष्ण नांवाच्या विद्वानाशीं तिचा विवाह झाला होता. कडलोर या मद्रास प्रांतातील गावांतल्या एका विद्यालयांत ती संस्कृत अध्यापिका होती.[7]

**सिस्टर बालम्बाल** — या मद्रासी विदुषीनें सरळ व सुबोध संस्कृतांत ' आर्यारामायणम् ' नांवाचें काव्य बालवाचकांसाठीं लिहिलें आहे.[7]

**अलमेलम्मा** या विदुषीनें इ. १९२२ मध्यें बुद्धचरितम् हा चरित्र ग्रन्थ लिहिला.

अशाप्रकारें अद्यावत् अगण्य असलेल्या संस्कृत कवयित्रींच्या परंपरेंत क्षमादेवींचें व्यक्तित्व व कर्तृत्व विशेष स्पृहणीय आहे. क्षमादेवींचा जन्म ४ जुलै *१८९० या दिवशीं पुणें येथें झाला. तिचे वडील श्री. शंकर पाण्डुरंग पंडित हे*

---

४. पृ. ३०० । त्रिचूर येथें मुद्रित
५. पृ. ३८१ । बंगलोर येथें मुद्रित.
६. पृ. ३८२ । ७. पृ. ३८३.

श्रेष्ठकोटीचे संस्कृत पंडित होते क्षमादेवींच्या बाल्यपणींच ते दिवंगत झाले. पुढे चुलत्यांच्या सहाय्याने क्षमादेवींने उच्च शिक्षण प्राप्त केले मुंबईचे डॉक्टर राजेन्द्र राव यांच्याशी तिचा विवाह झाला. ल्हानपणापासूनच अनेक भाषावरील प्रभुत्व व खेळातील नैपुण्य यामुळे क्षमादेवी सर्वत्र प्रसिद्ध झाली होती. विवाहानंतर पतीच्या ऐश्वर्यात मग्न न होता तिने पतिसेवेबरोबर विश्वेचीहि सेवा निरन्तर चालू ठेवली. इंग्रजी, फ्रेंच इत्यादि यूरोपीय भाषावर व यूरोपीय संगीतशास्त्रावरहि क्षमादेवींचे असाधारण प्रभुत्व होते. एका जर्मन महिलेजवळ तिने यूरोपीय संगीताचा अभ्यास केला होता. १९२० पासून १९३० पर्यंत तिने इंग्रजी भाषेमध्येच कथा व नाटके लिहिली. दी ॲम्युलेट, दी गेस्टस् आर् वेटिंग, नन्दाज् सन्, इत्यादि तिच्या इंग्रजी नाटकांचे प्रयोग मुंबईमध्ये वेळोवेळी झाले. रत्नाकर मासिकात वेळोवेळी प्रसिद्ध झालेल्या क्षमादेवींच्या सात्त्विक लघुकथांनी मराठी साहित्य क्षेत्रातहि क्षमादेवींना चांगली प्रतिष्ठा प्राप्त झाली होती. इ. स. १९३० मध्ये स्वातंत्र्याच्या सत्याग्रह-आंदोलनात देशबांधवांना छळ झालेला पाहून क्षमादेवींचे अन्तःकरण व्यथित झाले. या काळात तिने '**सत्याग्रह-गीता**' नावाचा १८ अध्यायांचा ग्रंथ लिहिला. या अभिनव गीतेत राष्ट्रीय आन्दोलनाच्या *आरंभापासून १९३१ च्या गांधी इर्विन तडजोडीपर्यंतच्या सर्व* महत्त्वाच्या घटना वर्णिलेल्या आहेत. सत्याग्रहाच्या आन्दोलनात भाग घेण्यासाठी प्रत्यक्ष महात्मा गांधींची अनुमति मागण्यासाठी क्षमादेवी गेली होती. पण ती अनुमति मिळू शकली नाही. त्यामुळे देशसेवेचे एक साधन म्हणून क्षमादेवीने संस्कृतची उपासना आरंभिली. आपल्या घरी मोठमोठ्या शास्त्रीपंडितांना बोलावून ती त्यांचा सत्कार करीत असे. तिचा त्यांच्याशी पत्रव्यवहारहि संस्कृतातच होऊ लागला. त्रिवेंद्रमच्या प्राच्यविद्या परिषदेहून आल्यानंतर त्या परिषदेचे **विचित्रपरिषद्यात्रा** नांवाच्या पुस्तकात व्यंग्यपूर्ण वर्णन तिने केले. शंकरजीवनाख्यानीयम् या पुस्तकात आपले वडील शंकर पांडुरंग पंडित यांचे चरित्र मोठ्या कारुण्याने तिने वर्णिलेले आहे. श्री पंडित हे केवळ आडनावाचे पंडित नव्हते. 'वेदार्थयत्न' नावाच्या मासिकाने त्यांच्या यथार्थ पांडित्याचा परिचय महाराष्ट्राला झाला होता. पोरबंदराचे प्रशासक म्हणून सौराष्ट्रहि त्यांना ओळखत होता.

साधुसंतावर क्षमादेवींची मोठी भक्ति होती. 'श्रीरामदासचरितम्', 'श्री तुकारामचरितम्', 'मीरालहरी', 'श्रीज्ञानेश्वरचरितम्', इत्यादि ग्रंथात त्यांच्या रम्य कथांतून भारतातल्या श्रेष्ठ साधूंची काव्यात्मक चरित्रे तिने गायिली आहेत. गद्यपद्यरचनेत क्षमादेवीने फार मोलाची भर घातली आहे 'कथामुक्तावली' हा तिचा १५ लघुकथांचा संग्रह १९५४ मध्ये प्रसिद्ध झाला. त्यातील 'प्रेमस्फोटक.' या कथेत एका प्राचीन मुनीचे प्रेम चित्रित केलेले आहे. 'ग्रामज्योतिः' 'ग्रामस्य परितोषणम्'

समगर्जन् ग्रामीणाः पुनः पुन.।" पिकले तेथे खपत नाही, हा सिद्धान्त प्रस्तुत कथेत प्रतिपादन करून जातीयतेच्या भावनेवर विदारक प्रकाश क्षमादेवींने पाडलेला आहे.

प्रस्तुत कथासग्रहातील कथाची पार्श्वभूमी मुंबई, काश्मीर, महाबळेश्वर, अरू, याच्या निसर्गरमणीय वर्णनानी आकर्षक केलेली आहे. त्यातील काश्मीरचे वर्णन खरोखरच अप्रतिम आहे या संस्कृत कथात हिन्दु, मुसल्मान, खिश्चन या समजातीन व शेतकरी, व्यापारी, साधु, कैदी, कोळी, शिंपी अशा विविध वर्गातील पात्राचे रंगीत चित्रण प्रथमच पाहावयास मिळते. विवाहित, विरहिता, परित्यक्ता, विधवा, पतिव्रता, अभिसारिका या निरनिराळ्या अवस्थातील स्त्रीहृदयाची गुतागुत क्षमादेवींने फार सहृदयतेने उकलून दाखविलेली आहे सवाद रोचक, सुटसुटीत व आकर्षक असून बोलणार्‍यांच्या मनाचे प्रतिबिंब स्पष्ट उमटवितात. स्वदेशाचा व स्वसस्कृतीचा अभिमान हे क्षमादेवीच्या एकुण साहित्याचे वैशिष्ट्य आहे. क्षमादेवीच्या साहित्यात सस्कृत भाषेची जीवनशक्ति व भारतीय महिलेचें प्रतिभासामर्थ्य उत्कटत्वाने प्रत्ययास येते

* * *

## म म. कृष्णशास्त्री घुले

नागपुरातील गोंडाचें राज्य जिंकून पहिले रघूजी भोसले यानी मराठी राज्य स्थापन केल्यानतर नागपुरात सस्कृत विद्येचा अभ्यास सुरू झाला. ऐतिहासिक दृष्ट्या नागपूरच्या सस्कृत पाडित्याचा इतिहास दीडशें वर्षापेक्षा अधिक प्राचीन नाही. पण एवढ्या अल्पकाळात झालेल्या या नगरातील पडितानी अखिल भारतातील विद्वानाची दृष्टि आपल्याकडे आकर्षित केली होती. प्रत्यक्ष काशीच्या विद्वानानाहि नागपूरची प्रतिष्ठा ज्याच्या पाडित्यामुळे मान्य करावी लागली, अशा विद्वान पंडित घराण्यामध्ये घुले घराणे हें सर्वांत श्रेष्ठ होतें. हें घराणें मूळचें दक्षिणेतलें. गगारामभट्ट घुले या नावाचे एक विद्वान पेशव्याकडे पुराणिक असल्याचा उल्लेख आहे. गगाराम भट्टाचे नातू अनत भट्ट यानी महाभारतावर 'दुर्बोधपदचन्द्रिका' नावाची टीका लिहिली होती. तिचा प्रारंभीचा मगल श्लोक असा —

भारतस्य प्रबन्धस्य दुर्बोधपदचन्द्रिका ।
घुल्लोपनामकानन्तेनभट्टेनेया प्रतन्यते ॥

अनत भट्टाचे नातू राजारामभट्ट घुले यानी 'दुर्गासप्तशती'वर 'सप्तशतीसर्वस्वोद्धारः' नावाची टीका लिहिली होती. त्याचे नातू रामकृष्णभट्ट यांनी 'नामस्मरणमीमांसा', 'मल्लारिटीका' 'अष्टकटीका', 'भागवतविरोधपरिहारः' इत्यादि अनेक ग्रथ लिहिले होते. बुंदेलखडाचा तत्कालीन राजा खुमानसिंह याने सवत् १८४३ मध्ये घुले घराण्याला चार गांवाची जहागिरी दिली होती. रामकृष्णभट्टाचे चिरंजीव वैयाकरण-

केसरी सदाशिवभट्ट याचा न्याय, व्याकरण व मीमांसा या दुर्बोध शास्त्रांवर असामान्य अधिकार होता. श्रीमंत अमृतराव पेशवे यांचे सभापंडित गंगाधरशास्त्री गाडगीळ यांच्या काशीच्या पंडितसभेत त्यांनी पराभव केला होता. त्याबद्दल त्यांना 'वैयाकरणकेसरी' ही मानाची पदवी लाभली होती. शब्देन्दुशेखरावर 'शेखरनिवृतिः' या नावाची एक अप्रतिम टीका सदाशिवभट्टांनी लिहिली होती. ही टीका 'सदाशिवभट्टी' किंवा 'भट्टी' या नावाने प्रसिद्ध असून तिचे आकलन करण्याचे सामर्थ्य असणारे पंडित आज दुर्मिळ झालेले आहेत.

इ. स. १८१७ मध्ये वीरराघवाचार्य व कृष्णशास्त्री रामानुज या दोन पंडितांच्या वादाचा निर्णय करण्यासाठी नागपूरचे राजे दुसरे रघूजी भोसले यांनी सदाशिवभट्टांना काशीहून नागपुरास आणले व त्यांच्या पांडित्याने प्रभावित होऊन वार्षिक अडीच सहस्र रुपयांची नेमणूक त्यांच्या नांवे करून त्यांना नागपुरलाच ठेवून घेतलें. सदाशिवभट्टांचे चिरंजीव चिन्तामणशास्त्री व हरिरामशास्त्री हे मोठे वैयाकरण होते. हरिरामशास्त्रींचे पुत्र सीतारामशास्त्री उर्फ भाऊशास्त्री हे धर्मशास्त्र व व्याकरणशास्त्र यामध्ये पारंगत होते. इ. स. १९१८ साली इंग्रज सरकारने त्यांना 'महामहोपाध्याय' ही सन्मानाची पदवी दिली होती. पं. कृष्णशास्त्री घुले हे या भाऊशास्त्रींचे चिरंजीव होते. दि. ३१ मे १८७३ या दिवशीं कृष्णशास्त्रींचा जन्म झाला. नागपुरात नील सिटी हायस्कूल व पुढे मॉरिस कॉलेजमध्ये त्यांचें आधुनिक शिक्षण झालें होतें. पण जुन्या परंपरेनुसार त्यांचें शिक्षण भाऊशास्त्री घुले (त्यांचे वडील), म. म. मट्टूजीशास्त्री घाटे व कै. श्रीनिवास शास्त्री हरिदास यांच्या जवळ झालें. संस्कृतबरोबरच हिन्दी, इंग्रजी, बंगाली, गुजराथी, फ्रेंच, व उर्दू या भाषांचाहि त्यांनी उत्तम अभ्यास केला होता. विद्यार्थी दशेंतच कृष्णशास्त्रींनी **पतितोद्धारमीमांसा** नावाचा संस्कृत निबंध लिहून त्यामध्ये हिंदुधर्मातून परधर्मात गेलेल्या पतितांना परत स्वधर्मात घेता यतें असा सिद्धान्त यांनी प्रतिपादन केला होता. त्या काळात असल्या विचाराचा निबंध स्वतःच्या नावाने प्रसिद्ध करणे श्रीकृष्णशास्त्रींना कठीण वाटलें. त्यांनी स्वतःचे नाव न टाकताच तो प्रकाशित केला. या निबंधाची एक प्रत त्यांचे गुरु म. म. मट्टूजीशास्त्री घाटे त्यांच्याकडे अभिप्रायार्थ आली होती. मट्टूजीशास्त्रींनी त्यांतील सिद्धांत खोडून काढण्याच्या दृष्टीने निबंधाचें वाचन केलें; पण त्यांना त्यामध्ये एकहि चूक आढळली नाही. त्यांनी तो निबंध खोडण्यासाठी कृष्णशास्त्रींजवळच दिला. स्वतःच्याच निबंधांतील चूक हुडकून काढण्याची पाळी गुरूंच्या आज्ञेनुसार कृष्णशास्त्रींवर आली. २-३ दिवस निबंध स्वतःकडे ठेवून घेऊन, मला यात काही त्रुटी आढळत नाही, असें म्हणून त्यांनी तो निबंध मट्टूजीशास्त्रींना परत केला !

प्रस्तुत निबंधाप्रमाणेच **होत्रध्वान्तदिवाकर** व **सापिंड्यभास्कर** हे दोन शास्त्रीय निबंध कृष्णशास्त्रींनी लिहिले होते. होत्रध्वान्तदिवाकरामध्ये आपस्तम्भ शाखेच्या अग्निहोत्र्याला ऋग्वेदाचे हौत्र करण्याचा अधिकार आहे, असा सिद्धान्त शास्त्रीबोवानी प्रतिपादन केला होता. 'सापिंड्यभास्कर' या प्रबंधात 'सापिंड्य' या शब्दाचा अर्थ निश्चित करून मातुलकन्यापरिणयाच्या संबंधात सापिंड्य शब्दाच्या रूढ अर्थामुळे येणारी शास्त्रीय अडचण त्यानी निवारलेली आहे.

**हरहरीयम्** व **वाचकस्तव** हीं दोन संस्कृत काव्यें शास्त्रीबोवानी लिहिलेलीं आहेत. त्यापैकी 'वाचकस्तव' हें काव्य त्यानी विद्यार्थीदशेत लिहिलें असून दुसरें 'हरहरीयम्' हें प्रौढावस्थेत लिहिलेलें आहे. या काव्याची टीका त्यानी स्वतःच लिहिलेली आहे. त्यातील श्लोकावरून शास्त्रीबोवाच्या पांडित्य व प्रतिभा या गुणाची कल्पना येईल.

हर कण्ठेकाल गिलित गरल वीक्ष्य विहसन
हरिं सावज्ञं तत्स्वयमपि मनः पातुमकरोत् ।
परं यावन्नासावधयदसुरीस्तन्यगरलम्
प्रकृत्या शुभ्रांगोऽप्यभवदखिलं श्यामलतनुः ॥

माया तु प्रकृतिं जगाद नियमः श्रीशंकरं मायिनम्
तेन द्वैतमतिं कदाचिदुदिता माऽज्ञानिना भूदिति ।
भार्यां स्वां प्रकृतिं पुमांसमपि च स्वात्मानमेकीकृतम्
धृत्वैकेन च वर्ष्मणा प्रभवति ह्यद्वैतमर्थ्यं किमु ॥

वैदिक संशोधनाची स्फूर्ति शास्त्रीबोवाना लोकमान्य टिळकापासून झाली होती. इ. स. १९०४ मध्ये **ऋग्वेदाचें मराठी भाषांतर** या नावानें स्वतंत्र वेदविषयक मासिक त्यानी सुरु केलें. त्यामध्ये ऋग्वेदाच्या भाषांतराबरोबर त्यानी ज्या माहितीपूर्ण टीपा लिहिल्या आहेत, त्यावरून शास्त्रीबोवाचा वेदावरील अधिकार लक्षात येतो. त्याच्या वेदविषयक मराठी लिखाणाचा एक संग्रह त्याचे प्रख्यात शिष्य साहित्याचार्य बाळशास्त्री हरदास यानी इ. स. १९४९ मध्ये प्रकाशित केलेला आहे.

पूर्वी नागपुराहून निघत असलेल्या 'नीरजोल्लास' नावाच्या एका मासिकात कृष्णशास्त्रींचे एक पूर्वज अनंतभट्ट यांच्याविषयी एक आख्यायिका प्रसिद्ध झाली होती. ती अशी—अनंतभट्टाना प्रत्यक्ष भगवान् वेदव्यासाचें दर्शन होऊन त्याच्या कडून असा वर मिळाला होता की, 'तुमच्या कुळांत सर्व विद्वानच निपजतील. पुढे या घराण्यातील एक विद्वान आत्मारामभट्ट हे काशीला पुराण सांगत असता त्यांच्या पुराणाला प्रत्यक्ष द्रोणपुत्र चिरंजीवी अश्वत्थामा येत असे. पुराण सांगतांना

पाडवाच्या मुलाना रात्रीं झोपेत ठार मारल्याबद्दल आत्मारामभट्टानी अश्वत्थाम्याची कडक शब्दात निर्भर्त्सना केली. त्यामुळे श्रोतृसमुदायात वृद्ध ब्राह्मणाच्या वेषाने बसलेल्या अश्वत्थाम्याच्या अगाचा तिळपापड उडून त्याने आत्माराम घुल्याना असा शाप दिला की, ' तुझ्या कुळात यापुढे फक्त ७ पिढ्यापर्यंतच विद्वत्ता राहील ' ही दतकथा खरी की खोटी हें सागण अशक्य आहे. पण ती एका अर्थाने खरी ठरली आहे कृष्णशास्त्री घुले हे आत्मारामभट्टापासूनचे सातव्या पिढींतील विद्वान होते शास्त्रीबोवाना अपत्य नसल्याने त्याच्याबरोबर घुले घराण्यातील पाडित्य ल्याला गेलें

नागपूरच्या परपरेंत विशेष उल्लेखनीय अशी दुसरी व्यक्ति म्हणजे गगाधर शास्त्री मगरूळकर हे होत याचा जन्म इ. स. १७९० च्या सुमारास झाला त्याचे वडील विठ्लशास्त्री हे दुसऱ्या रघूजीच्या कारकीर्दीत पुराणिक होते त्यानी ' भामा विलास ', ' गुरुतत्त्वविचार ', ' रामप्रमोद ', ' अपराधमार्जनम् ', ' राधाविनोद ', ' गणेशलीला ', ' विलासगुच्छ ', ' रतिकुतूहलम् ', ' प्रसन्नमाधवम् ', ' चित्रमञ्जूषा ', ' गगापदी ' व ' सगीतराघवम् ' हे काव्यग्रथ लिहिले आहेत त्यापैकी सगीतराघवम् हें गीतगोविंदाच्या परपरेंतील काव्य आहे ' जैमिनीअश्वमेध ' नावाचे एक मराठी काव्यहि त्यानी लिहिलेलें आहे शकराचार्यांच्या आनदलहरीवर त्यानी गद्य व पद्य टीका लिहिल्या आहेत गगाधरशास्त्रींचें सर्व साहित्य नागपूर विश्वविद्यालयाच्या हस्तलिखितसग्रहात सुरक्षित आहे

घुले व मगरूळकर या दोन घराण्याव्यतिरिक्त नागपुरात आणखीहि काही पडित घराणीं नादत होतीं. त्यामध्ये खरे घराण्यातील प गजाननशास्त्री, धारे घराण्यातील भट्टजीशास्त्री व बाळशास्त्री, रोडे घराण्यातील प्रभाकरशास्त्री, जपे घराण्यातील श्रीनिवासशास्त्री ( हे श्रीनिवासशास्त्री हरदास म्हणून ओळखले जात ) तेलग घराण्यातील कृष्णशास्त्री, इत्यादि सस्कृत पडित प्रसिद्ध होऊन गेले या विद्वानानी सस्कृतात विशेष उल्लेखनीय लिखाण केलें नाही, पण याच्यामुळे नागपुरातील सस्कृत विद्येची परपरा मात्र अव्याहत टेवत राहिली

* * *

## श्री वासुदेवानन्द सरस्वती

आधुनिक काळातील योगी सत पुरुषामध्ये श्री वासुदेवानद सरस्वती याची प्रामुख्याने गणना होते त्याचे शिष्य–प्रशिष्य महाराष्ट्रात व इतरत्रहि गावोगावीं पसरलेले आहेत. त्याचे वडील श्री गणेशभट्टजी टेंबे व माता सौ रमाबाई याच वास्तव्य सावतवाडी सस्थानातील माणगाव येथे होत शके १७७६ श्रावण वद्य पचमीला या धार्मिक मातापित्याच्या पोटीं वासुदेवाचा जन्म झाला. वासुदेवाचें सस्कृत शिक्षण

घरींच (त्यांचे आजोबा हरिभट्ट यांच्याजवळ) झालें. उपनयनानंतर कुलपरंपरेनुसार वेदाध्ययन व इतर उपासना यांचा संस्कार वासुदेवावर झाला. हरिभट्टाच्या निधनानंतर त्यांचे पुढील वेदाध्ययन वेदमूर्ति तात्याभटजी उकिडवे व भास्करभटजी आळेकर यांच्याजवळ झालें. लहानपणापासूनच वासुदेवाचें जीवन मोठें व्रतस्थ होतें. विविध प्रकारच्या पुरश्चरणामुळे त्याला जणू मंत्रसिद्धि प्राप्त झाली होती व त्यामुळे समाजामध्ये त्याच्यासंबंधी मोठें कुतूहल निर्माण झालें होतें. वयाच्या २१ व्या वासुदेवरावांचें लग्न झाले त्यांच्या पत्नीचें नाव अन्नपूर्णा असें होतें विवाहानंतर २ वर्षांनी वडिलांच्या निधनामुळे कुटुंबाचा सर्व भार वीतरागवृत्तीच्या वासुदेवरावांवर पडला तथापि वासुदेवरावांच्या साधना यथापूर्व चालूच होत्या शके १८१३ च्या वैशाखात सौ. अन्नपूर्णाबाईचें देहावसान झाले पत्नीच्या निधनानंतर १४ व्या दिवशींच श्री वासुदेवरावांनी सन्यास घेतला त्याच रात्रीं श्री गोविंदस्वामींनी त्यांना प्रणवोपदेश दिला पुढे निरनिराळ्या ठिकाणीं प्रवास करीत ते उज्जयिनीस आले तेथे नारायणस्वामींकडून त्यांनी दण्डग्रहण केलें. दण्डग्रहणप्रसंगीं नारायणस्वामींनी आपल्या या शिष्याचें नाव 'वासुदेवानंद सरस्वती' असें ठेवलें त्यानंतर (इ स १८९१ च्या सुमारास) त्यांनी धार्मिक पदयात्रेस प्रारंभ केला ही पदयात्रा इ. स. १९१४ पर्यंत अव्याहत चालू होती. सिंध, पंजाब काश्मीर व बंगाल हे चार प्रांत वगळून महाराजांनी सारा भारत आपल्या सचारानी पुनीत केला सहस्रावधि आर्तांना दु खमुक्त करून, साधकांना परमार्थाचा मार्ग त्यांनी या काळात दाखवून दिला. साधारणत ३–४ दिवसांपेक्षा अधिक दिवस एका ठिकाणीं ते वास्तव्य करीत नसत. चातुर्मास्यांत मात्र त्यांचें वास्तव्य स्थिर असें. प्रवासाच्या काळात भोजनापूर्वी ते ४० ते ५० मैलांची मजल मारीत असत. पुण्याचे श्री. द. धु. कवीश्वर यांनी महाराजांचे सविस्तर लिहिलें असून त्यात त्यांच्या जीवनातील बारीकसारिक घटनांचा उल्लेख केलेला आहे. त्यांचें संपूर्ण जीवन हें योगशास्त्रात वर्णिलेल्या चमत्कारांनी परिपूर्ण आहे जिज्ञासूंनी त्यासाठी मूळ चरित्रग्रंथच पहावा. महाराजांनी आपल्या तापसी व प्रवासी जीवनात संस्कृत भाषेची फार मोठी सेवा केलेली आहे. महाराजांचे शिष्य श्री वामनराव गुळवणी महाराज [पुणे] यांनी 'श्री वासुदेवानंद सरस्वती ग्रन्थमाले' तर्फे त्यांचे सर्व ग्रंथ एकूण १२ खण्डात प्रकाशित केलेले आहेत. त्यातील काही ग्रंथांचा संक्षिप्त परिचय पुढे दिलेला आहे.

**शिक्षात्रयम्**—यामध्ये कुमारशिक्षा, युवशिक्षा व वृद्धशिक्षा असे तीन भाग असून त्यातील मूळ संस्कृत श्लोकावर स्वत महाराजांनीच विद्वत्तापूर्ण संस्कृत टीका लिहिलेली आहे. श्री राजेश्वरशास्त्री द्रविड यांनी या ग्रंथास प्रस्तावना लिहिलेली आहे. अर्वाचीन काळातला एक उत्कृष्ट धार्मिक ग्रंथ म्हणून या ग्रंथाचा निर्देश करता येईल

**गुरुचरित्रम्**—( द्विसाहस्री )-मराठी भाषेत श्री सरस्वती गंगाधरानी लिहिलेल्या ओवीबद्ध 'गुरुचरित्र' या मन्त्र सिद्ध ग्रथाचें संस्कृत रूपांतर म्हणजेच हा ग्रंथ होय या ग्रथारंभी श्रीगुरुस्तुति म्हणून ११२ श्लोकाचे एक प्रकरण आहे. या गुरुस्तुतिमध्ये मानसपूजा, अपराधक्षमापनस्तोत्र व अष्टोत्तरशत नामावली हे विषय आले आहेत प्रस्तुत ग्रथात एकदर २३ अध्याय असून शेवटी योगरहस्य व बोधरहस्य ही दोन प्रकरण आहेत. मराठी गुरुचरित्रातील सर्व कथाभाग यात आलेला आहे. याव्यतिरिक्त यदु, प्रल्हाद व कार्तवीर्य याना श्रीदत्तप्रभूनी केलेला उपदेशहि चतुर्थ अध्यायात वर्णिलेला आहे पहिल्या १३ अध्यायात ज्ञानयोग, १४ ते १८ या ५ अध्यायात कर्मयोग व शेवटी ५ अध्यायात भक्तियोग प्रतिपादन केलेला आहे. हा ग्रथ त्यानी शके १८०६ मध्ये गृहस्थाश्रमी असताना माणगाव येथे लिहिला. त्यानतर शके १८२१ मध्ये म्हणजे १५ वर्षानतर त्याची संस्कृत टीका त्यानी प्रभासपट्टण व द्वारका येथे लिहिली या द्विसाहस्री गुरुचरित्राचा गद्य संस्कृतात साराशहि 'चूर्णिका' म्हणून महाराजानीच लिहिलेला आहे. या ग्रथासबधी काही अद्भुत कथा श्री वामन दत्तात्रेय गुळवणी यानी आपल्या निवेदना मध्ये सागितलेल्या आहेत काशीचे विख्यात प. हरिरामशास्त्री शुक्ल (वाचस्पति मिश्राच्या साख्यतत्त्वकौमुदीवरील सुषमा या उत्कृष्ट टीकेचे लेखक) यानी या गुरुचरित्राला संस्कृत प्रस्तावना लिहिलेली आहे.

**श्रीगुरुसंहिता**—हा ग्रथ म्हणजे मराठी गुरुचरित्राचा संस्कृत अनुवाद होय हा अनुवाद करण्याचें प्रयोजन स्वत महाराजानीच सागितलें आहे त असें—

चरित यन्महाराष्ट्रभाषया रचित हितम् ।
सरस्वत्याख्यविप्रेण वच्मि तद्देवभाषया ॥
महाराष्ट्रीय भाषा तु न सर्वविषयोचिता ।
अत सुगमया देववाण्येद तन्यते मितम् ॥

गगातीरावर ब्रह्मावर्त येथे चातुर्मास्यानिमित्त मुक्काम असताना शके १८२४ मध्ये महाराजानी हा ५१ अध्यायाचा महान् ग्रथ लिहिला या ग्रथाची भाषा अत्यत सुबोध असून सामान्य वाचकानाहि ती कल्याणकारी आहे. या ग्रथावर साराश रूपाने गद्य चूर्णिका महाराजानी कावेरी तीरावरील तजावरच्या अध्यामात शके १८२९ मध्ये लिहिली तीहि एक सहस्र पृष्ठाच्या प्रस्तुतग्रथात सकलित केलेली आहे

या महत्त्वाच्या ग्रथाव्यतिरिक्त 'श्रीगुरुचरित्रत्रिशतीकाव्यम्', 'श्रीदत्त चम्पू', 'श्रीदत्तपुराणम् ( संस्कृत टीकेसह )', हे ग्रथ व 'वेदनिवेदनस्तोत्रम्', 'श्रीकृष्णालहरी' यासारखी काही स्तोत्रें त्यानी टीकेसह लिहिलीं आहेत [1] श्रीगुरु

---

१ श्रीवासुदेवानद सरस्वतीचे सव मुद्रित ग्रथ श्री वामन दत्तात्रय गुळवणी २० नारायण पेठ पुणें २ यथे मिळतात

संहिता या ग्रंथावर धारवाडच्या शंकराचार्य पाठशाळेचे विद्वान आचार्य श्रीभालचंद्र शास्त्री उपिनबेट्टगिरी यानी संस्कृतात प्रस्तावना लिहिलेली आहे.

शके १८३५ च्या चातुर्मास्यात नर्मदा तीरावर श्रीगरुडेश्वर या तीर्थक्षेत्रात महाराजांचें वास्तव्य होतें. तेथेच शके १८३६ च्या आषाढ शुद्ध प्रतिपदेला महाराज समाधिस्थ झाले. त्यांच्या अनुयायानी गरुडेश्वर येथे महाराजांचे उत्कृष्ट समाधि मंदिर बांधलें आहे

* * *

## श्रीवेल्लमकोण्ड रामराय

प्राचीन काळातील श्रीशंकराचार्य, मधुसूदन सरस्वती, ज्ञानेश्वर इत्यादि सत्पुरुषानी अल्पायुष्यातच लोकोत्तर स्वरूपाचे ग्रंथलेखनकार्य केले, यावर स्वतःला नवमतवादी म्हणविणारे आधुनिक विद्वान बहुधा विश्वास ठेवीत नाहीत. त्यांच्या अश्रद्धेचें खंडन करणारें आधुनिक उदाहरण म्हणजे श्रीवेल्लमकोण्ड रामराय यांचे चरित्र होय. शके १७९७ ( इ. स. १८७५ मध्ये ) मार्गशीर्षांत आंध्र प्रांतातील नरसारावुपेट जवळच्या पमिडिपाडु नावाच्या अग्रहारात या रामरायाचा जन्म झाला. त्यांच्या आईचें नाव हनुमाम्बा व वडिलांचे नाव मोहनराय असे होतें. वयाच्या ५ वर्षी रामरायाचा अक्षरपरिचय झाला. त्याच सुमारास वडिलांचें देहावसान झाल्यामुळे केशव नावाच्या आपल्या चुलत्याकडे रामराय राहावयास गेला. चुलत्याने त्याला इंग्रजी शिकण्यासाठी गर्तपुरी येथील एका शाळेंत त्याचे नाव टाकलें वयाच्या १४ व्या वर्षी ३ऱ्या वर्गात शिकत असताना दुर्धर रोगामुळे त्याला शाळा सोडावी लागली त्यानंतरहि शरीर अत्यंत दुर्बळ झाल्यामुळे रामरायाला परगावास जाऊन शिक्षण करता आले नाही. घरी राहूनच त्याला संस्कृतचा अभ्यास करावा लागला. वयाच्या १५ व्या वर्षी सीताराम नावाच्या संस्कृत पंडिताजवळ त्याने रघुवंशापासून संस्कृताध्ययनास आरंभ केला. रामराय हा ल्हानपणापासूनच श्रीहय ग्रीवाचा उपासक होता. या काळात त्याला कांहीतरी स्वप्नसाक्षात्कार होऊन त्यात दम्भाल्पाण्डु नावाच्या गुरुजवळ जाण्याचा आदेश मिळाला स्वप्नाची प्रचीति पाहण्यासाठी रामराय त्या गावास गेला. तेथे रत्नगुरुचा संबंध घडला. गुरूने शिकविलेल्या पद्धतीनुसार त्याने उपासना करण्यास प्रारंभ केला. तिच्या प्रभावाने रामरायाच्या ठिकाणी विलक्षण काव्यशक्ति उद्दीपित झाली. वयाच्या १६ व्या वर्षीच त्याने **रुक्मिणीपरिणयचम्पू** ( टीकेसह ) **कृष्णलीलातरङ्गिणी** यासारखीं उत्तम काव्य लिहिलीं. काव्याच्या प्रभावामुळे एका कुग्रामात राहणाऱ्या या बालकवीची कीर्ति संपूर्ण आंध्रप्रांतात पसरली रामरायाच्या बुद्धिमत्तेवर प्रसन्न होऊन 'बुद्धिमते कन्या प्रयच्छेत्' या शास्त्रवचनानुसार वेल्लूरच्या सिंगराइ घरातील

वेंकटरमण नावाच्या एका धनिकाने आपली आदिलक्ष्मी नावाची कन्या त्याला समर्पण केली. रामरायाचा गृहस्थाश्रम म्हणजे एक मोठी तपश्चर्याच होती. प्रतिदिन सहस्र गायत्रीजप व इतर उपासना करून सायंकाळपर्यंत अध्यापनकार्यात रामरायाचा काळ व्यतीत होत असे. सायंसंध्या आटोपल्यावर पुनः ग्रंथशोधन, ग्रंथलेखन, तत्त्वचिंतन या स्वरूपात ज्ञानोपासना सुरू होई. अध्यापनाइतकेंच अध्ययनाचें त्याचें कार्यहि अखण्डित चालू होतें. रामशास्त्री नावाच्या गुरुजवळ ३ महिन्यांत संपूर्ण व्याकरणशास्त्र व तेवढ्याच काळात सुब्रह्मण्य सुधीन्द्र नावाच्या गुरूजवळ संपूर्ण न्यायशास्त्र रामरायाने आत्मसात् केलें. सिद्धान्तकौमुदीवर 'शरद्रात्रि' या नावाची एक टीका या अध्ययनकाळात रामरायानी लिहिली. ती पाहून त्याच्या गुरूंनासुद्धा विलक्षण आश्चर्य वाटलें. 'तुझी टीका हीच माझी गुरुदक्षिणा आहे' असा अभिप्राय रामशास्त्रींनी व्यक्त केला. त्यानंतर सुब्रह्मण्य गुरूंनी दक्षिणा म्हणून 'नवकालिदास' नावाच्या कवीने लिहिलेल्या चम्पूभागवतावर टीका लिहिण्याचा आदेश रामरायाला दिला. रामरायाने आपल्या गुरूची इच्छा तत्काळ पूर्ण केली.

रामरायाने आपल्या ३८ वर्षांच्या अल्पायुष्यात एकूण १४३ संस्कृत ग्रंथ लिहिले त्यांपैकी २५ ग्रंथांचीं नावें पुढें दिलेलीं आहेत.—(१) श्रीमद्भगवद्गीताभाष्यार्थप्रकाशिका (२) रुक्मिणीपरिणयचम्पू (टीकेसह) (३) कृष्णलीलातरङ्गिणी काव्य (टीकेसह) (४) समुद्रमन्थनचम्पू (५) कन्दर्पदर्पविलासभाण । (६) शारीरकचतुस्सूत्रीविचार । (७) शङ्करशङ्करभाष्यविमर्श (८) वेदान्तकौस्तुभम् । (९) अद्वैतविजय । (१०) गुरुलिङ्गव्याख्या । (११) त्रिवर्णादिविष्णुसहस्रनामावली । (१२) हकारादिहयग्रीवसहस्रनामावली । (१३) हयग्रीवाष्टोत्तरम् । (१४) हयवदनशतकम् । (१५) दशावताराष्टोत्तराणि । (१६) धर्मप्रकाश । (१७) धनवर्णनम् । (१८) कर्ममीमांसा । (१९) त्रिमतसम्मतम् । (२०) चित्रार्थचित्रोतनम् । (२१) रामायणान्तरार्थ । (२२) भारतान्तरार्थ । (२३) मोक्षप्रसाद । (२४) ब्राह्मणशब्दविचार (२५) अद्वैतविजय । या सीमित प्रबंधामध्ये वेल्लमकोण्डरामरायाच्या संपूर्ण ग्रंथांची नामावली देणें सुद्धा अशक्य आहे. त्याच्या ग्रंथांचें स्वरूप थोडक्यात सांगावयाचें झाल्यास असें सांगता येईल की जगद्गुरु शंकराचार्यांनंतर ज्या ज्या विद्वानांनी शांकरसिद्धांताचें खंडन करण्यासाठी जे जे युक्तिवाद पुढें मांडले त्या सर्वांचे खंडन वेल्लमकोण्डरामरायाने शंकराचार्यांच्याच प्रसन्नगंभीर शैलीमध्ये केलेलें आहे. शांकरसिद्धांताच्या पुनःप्रतिष्ठापनचें असें महान् कार्य रामरायाव्यतिरिक्त इतर कोणीहि केलें नाही, असें म्हटलें तर तें चुकीचें होणार नाही

एकदा कोणीतरी रामरायाला म्हटलें की "आपले हे ग्रंथ मुद्रणसंस्कारावाचून जगात प्रकाशात येणार नाहीत म्हणून आपण हे ग्रंथ प्रकाशित करण्याची काही तरी

स्पष्ट करा. "तेव्हा रामराय हसत म्हणाले, " कालिदासादि प्राचीन कवींनी आपले ग्रंथ मुद्रित व्हावेत या आशेने लिहिले काय?

" ग्रन्था जीवयुता प्रकाशपदवीं गच्छेयुरार्यादृताः ।
निर्जीवा यदि ते प्रकाशरहिता नश्येयुरेषा स्थितिः ॥ "

मी यावज्जीव वेदान्तपर ग्रंथ लिहित राहणार. माझ्यानंतर एखादा धार्मिक धनवान त्याचे मुद्रण करील."

अशाप्रकारें ब्रह्मचिंतनात आयुष्य जात असता रामरायाला मधुमेह झाला व त्या रोगाने जर्जर होऊन वयाच्या ३८ व्या वर्षी रामराय स्वर्गवासी झाले. गुंटूर जिल्ह्यातील नरसारावुपेट या गांवचे श्रीकविता वेंकटसुब्रह्मण्यशास्त्री हे श्री आञ्जनेय प्रभृति धार्मिक धनिकांच्या सहाय्याने रामरायाच्या ग्रंथांचें प्रकाशन करीत आहेत. 'दुर्गानुग्रहम्' काव्याचे लेखक पुल्य उमामहेश्वरशास्त्री यांनी १०० श्लोकात रामरायाचें चरित्र लिहिलें आहे. त्यांच्या आधारेंच आम्ही हा परिचय लिहिला आहे.[१]

* * *

## प्रज्ञाचक्षु श्रीगुलाबराव महाराज

भारतात आजवर अनेक साधुसंत होऊन गेले व त्यांच्या अद्‌भुत चरित्रामुळे ते प्रसिद्धीस पावले, पण त्यांच्या जीवनातील अद्‌भुततेवर आजचा तथाकथित सुशिक्षित समाज प्रत्यक्ष प्रमाणाच्या अभावीं विश्वास ठेवीत नाही. श्रीगुलाबराव महाराजांचें चरित्रहि अन्या साधूंच्या चरित्राप्रमाणे अद्‌भुत आहे. पण त्यातील अद्‌भुततेचा अनुभव घेतलेले अनेक लोक आजहि हयात असल्याने त्या संबंधात साशंकता जागाच नाही. जन्मान्ध असताहि केवळ ३४ वर्षांच्या आयुष्यात त्यांनी जें लोकोत्तर साहित्य निर्माण करून ठेवले ते सुद्धा एक मोठें आश्चर्यच आहे.

विदर्भातील अमरावती जिल्ह्यात माधान या गावीं गोंदुजी मोहोड या नावाचा एक शिवभक्त शेतकरी राहात होता. त्याच्या पत्नीचें नाव अलोकाबाई हिच्या पोटीं इ. स. १८८२ मध्यें गुलाबरावाचा जन्म झाला. लहानपणींच कोणत्यातरी दुखण्याने त्यांना आंधळेपण आले पण तेंव्हापासूनच त्यांच्या कडून अनेक चमत्कार घडू लागले, ते सर्व त्यांच्या चरित्रात दिलेले आहेत. गावातल्या देवळांत कीर्तनप्रवचनांतून रामायणभारतादि ग्रंथांचें ज्ञान या अंध बालकाला मिळत होतें.

१. वेल्लमकोण्ड रामरायाचे प्रकाशित ग्रंथ मिळण्याचे स्थान–श्रीकविता-वेंकटसुब्रह्मण्यशास्त्री, श्रीरामकविता ग्रंथमाला संपादक, नरसारावुपेट, जिल्हा गुंटूर, आंध्रराज्य

पुराणश्रवण हेंच त्यांचें अध्ययन. वयाच्या १५ व्या वर्षापासून त्यांच्या मुखांतून संत तुकारामासारखी अभंगवाणी स्रवूं लागली ज्ञानेश्वरी, अमृतानुभव यासारख्या गहन ग्रंथावर प्रवचन करण्याचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं याच वयात प्रकट झालें वयाच्या १० वर्षींच सीतारामजी मोयर यांची नात मणिकर्णिका हिच्याशीं गुलाबरावांचा विवाह झाला होता. सीतारामजी मोयर यांच्या घरीं हा आंधळा मुलगा एकदा सहज गेला असता ते म्हणाले, ' हा ओला नारळ वरची साल न काढता एका बुक्कींत तूं फोडून देशील तर मी तुला माझी नात देईन गुलाबरावांनी तो नारळ त्याप्रमाणे फोडून दाखविला व म्हणून हा विवाह झाला.

जन्मजात भावुकतेमुळे गुलाबरावांचा सर्व काळ ईश्वरोपासनेंत जात होता. त्यांच्या संपर्कांत जो जो सुशिक्षित मनुष्य येई त्याच्याशीं संवाद करून ते त्यांचें ज्ञान आत्मसात् करीत फारच थोड्या काळात त्यांच्या ठिकाणीं एक प्रकारची सर्वज्ञता उत्पन्न झाली. त्यांचें सर्वंकष पांडित्य पाहून लोक त्यांना विचारीत ' महाराज ही सर्वज्ञता आपल्याला कोठून लाभली ? ' त्यावर ते उत्तर देत, ' हा ताताचा अनुग्रह ' ! तात म्हणजे श्री ज्ञानेश्वर महाराज. गुलाबराव महाराजांनी प्रत्येक ग्रंथाच्या आरंभीं—

उमा माता पिता शम्भुर्गुरुर्ज्ञानेश्वरो महान् ।
पतिः कृष्णो राधिकाद्या भगिन्यो गोपिका मम ॥

या श्लोकात आत्मपरिचय दिलेला आहे. स्वतःचा ते उल्लेख ते 'ज्ञानेश्वर-कन्यका' या शब्दाने करीत असत. तरुणपणीं माधान सोडून ते अमरावतीस राहावयास आले. त्या काळात श्री ल. रा. पांगारकर, कृष्णानंदसरस्वती, आदित्य रामभद्राचार्य, दादासाहेब खापर्डे, प्रियनाथ मुखोपाध्याय, बालसरस्वती रानडे, भवानीशंकर नियोगी, लोकनायक बापूजी अणे, यासारख्या विख्यात पंडितांनी महाराजांशीं वादविवाद करून त्यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेचा अनुभव घेतला होता इ. स. १९१५ मध्ये ( शके १८३७ भाद्रपद शुद्ध द्वादशी ) वयाच्या ३४ व्या वर्षी महाराजांनी देहत्याग केला. एवढ्या अल्पायुष्यात त्यांनी संस्कृत, मराठी व हिन्दी मध्ये जें विपुल व विविध साहित्य निर्माण करून ठेवलें आहे तें आजच्या युगातील एक मोठे आश्चर्य आहे. महाराजांचे उत्तराधिकारी वेदान्तकेसरी श्री बाबाजी महाराज पंडित व त्यांचे सहायक श्री ज्ञानेश्वर उद्धव मादरे यांच मधुराद्वैत मंडळ (अमरावती) या संस्थेतर्फे ते सर्व साहित्य प्रकाशित केलेलें आहे.

संस्कृत भाषेवर महाराजांनीं अलौकिक प्रभुत्व कसें संपादन केलें हे एक कोडें आहे त्यांची भाषा वाचताना पदोपदीं श्रीशंकराचार्यांच्या प्रसन्नगंभीर शैलीचा प्रत्यय येतो. 'नारदीयभक्तिसूत्रभाष्यम्', 'बालवासिष्ठम्', 'शास्त्रसमन्वय', 'उच्छिष्टपुष्टिलेश', 'श्रीधरोच्छिष्टपुष्टि', 'तत्त्वबोध', 'आगमदीपिका', 'षड्दर्शनलेशसंग्रह.', 'युक्तितत्त्वानुशासनम्', 'ऋग्वेदटिप्पणी', 'सच्चिनिर्णय'

'भक्तितत्त्वविवेक', 'अन्तर्विज्ञानसंहिता', 'दुर्गातत्त्वम् (सूत्रबद्ध)', 'ईश्वरदर्शनम्' (सूत्रबद्ध), 'प्रियप्रेमोन्माद', 'स्वमतनिर्णय', 'शिशुबोधव्याकरणम्' (सूत्रमय), 'काव्यसूत्रसंहिता', 'भिषगिन्द्रशचीप्रभा', 'मानसायुर्वेद', 'पुराणमीमांसा' (सूत्रबद्ध), एवढे गद्य, पद्य, सूत्रबद्ध व कारिकाबद्ध संस्कृत ग्रंथ महाराजांनी लिहिलेले आहेत. ते सर्व 'सूक्तिरत्नावली' नावाच्या खंडात प्रकाशित झालेले आहेत. अशा प्रकारच्या एकूण १८ ग्रंथात महाराजांचे संपूर्ण साहित्य प्रकाशित झालें आहे. त्यातील 'सम्प्रदायसुरतरू', 'अलौकिक व्याख्यानमाला', 'हरिपाठरहस्य', 'भागवतरहस्य', 'समयोपदेश' यासारखे मराठी ग्रंथ आध्यात्मिक विषयाच्या अभ्यासकाला अत्यंत मार्गदर्शक होतील

आपल्या एवढ्या अवाढव्य वाङ्‌मयामध्ये प्रतिपादन केलेले सिद्धान्त त्यांनी 'स्वमतनिर्णय' नावाच्या एका पुस्तकात श्लोकबद्ध करून ठेवलेले आहेत. त्यातील काही श्लोक पुढीलप्रमाणे आहेत.

शाङ्करज्ञानसंयुक्तं भगवद्भक्त्यलंकृतम् ।
यद् वाक्यं तत् प्रमाणं स्यादिति स्वमतनिर्णयः ॥
धर्मो ज्ञानं हरेर्भक्तिः पालनीयं त्रयं सदा ।
नीतिः कालानुरोधेनास्त्विति स्वमतनिर्णयः ॥
सत्त्ववृद्धिर्भवेद्येनान्यगुणद्वयघातिनी
स हि धर्मो न चान्यः स्यादिति स्वमतनिर्णयः ॥
स्वधर्मे परधर्मे वा यत्सत्त्वफलसाधकम् ।
तत्तवस्तु परं धर्म्यमिति स्वमतनिर्णयः ॥
पशौ दण्डः शिशौ मौनं शठे शाठ्यं मुनौ रतिः ।
सभ्येषु सभ्यता नीतिरिति स्वमतनिर्णयः ॥
श्रोतव्यं श्रुतिशास्त्राभ्यां मन्तव्यं चोपपत्तिभिः ।
ध्यानादनुभवाज्ज्ञानमिति स्वमतनिर्णयः ॥
धार्मिकास्वपि नारीषु जननी-कन्यकादिषु ।
विश्वासो नैव कर्तव्य इति स्वमतनिर्णयः ॥
विष्णुं सव्ये हृदि ध्यायेद् वामे हृदि महेश्वरम् ।
सहस्रारे गुरुं ध्यायेदिति स्वमतनिर्णयः ॥

* * *

## ५. हृषीकेश भट्टाचार्य

कलकत्त्याजवळील भट्टपल्ली नावाच्या गावी एका विद्वान कुळात श्रीहृषीकेश भट्टाचार्यांचा जन्म झाला. त्याच गावातील संस्कृत पाठशाळेत त्यांचे प्राचीन शास्त्रांचे अध्ययन पूर्ण झालें. त्यानंतर नवीन आङ्ग्ल विद्येचें अध्ययन करण्याची प्रेरणा

त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झाली. पण त्या काळात या म्लेच्छ भाषेचें अध्ययन हें पाप समजण्यात येत होतें. स्वत ची इच्छा गावात राहून पूर्ण होणार नाही, हें येताच लक्षात येताच हृषीकेश भट्टाचार्यांनी पजाबचा रस्ता धरला. लाहोरच्या सस्कृत विश्वविद्यालयामध्ये सस्कृत व इग्रजी या दोन्ही विषयाचा अभ्यास त्यानी नेटाने सुरू केला. इ. स. १८७३ मध्ये शास्त्री परीक्षत पहिला क्रमाक प्राप्त झाल्यामुळे हृषीकेश भट्टाचार्यांचे नाव सर्वत्र दुमदुमलें. त्यानतर लाहोरच्या सरकारी ओरिएटल् कॉलेजमध्ये त्याना सस्कृत प्राध्यापकाचे पद प्राप्त झाले. याच विद्यालयामध्ये त्यानी आयुष्याचीं १० वर्षे अध्यापनकार्यात घालविलीं

पजाब विश्वविद्यालयात त्या काळात डॉ जी डब्ल्यू. लिट्नर हे रजिस्ट्रार होते. या लिटनर महाशयाचें ग्रीक, लॅटिन, फ्रेंच या पाश्चात्य व फारसी, उर्दू, हिंदी इत्यादि पौरस्त्य भाषावरहि मोठें प्रभुत्व होतें. सस्कृतचाहि त्यानी मोठ्या हौसेने अभ्यास केला होता पजाब विश्वविद्यालयाची स्थापना याच्याच प्रेरणेने झाली होती त्यानी हृषीकेश भट्टाचार्यांचें सस्कृत भाषेवरील प्रभुत्व ओळखून त्याना ' विद्योदय ' नावाचें सस्कृत मासिक सुरू करण्यास प्रेरणा दिली लिट्नर साहेबाच्या प्रेरणेने भट्टाचार्यांनी ' विद्योदया 'च्या सपादकत्वाचा भार स्वत वर घेतला. व त्यानतर आमरण ४४ वर्षेपर्यंत आपल्या पाडित्यपूर्ण हृद्य लेखानी त्या नियतकालिकाची लोकप्रियता त्यानी सतत वाढविली भट्टाचार्यांच्या भाषाप्रभुत्वासबधीं जयपूरचे म म गिरिधर शर्मा चतुर्वेदी लिहितात, " सस्कृतभारत्या यौवन प्रत्यापयत्यपि पुरातने समये यत्सत्य विरल एव आसन् ईदृशा प्रबन्धार । दूरे तु अद्य ईदृशाना कथा ।

**मुद्रयति वदनविवर मृतभाषावादिना मुहेराणा ।**
**स्मरयति च भट्टबाण भट्टाचार्यस्य सा वाणी ॥**

यथा चास्य भाषासौष्ठव तथा विषयप्रतिपादनप्रकारेरपि कमपि प्रगल्भतातिशयमाव हति । क्वचिदिदानींतम–धर्मदुर्दशावर्णने करुणस्रोतोनिर्झर, क्वचिद् विद्वद्म्य कर्तव्योपदेशे प्रशान्तमहासागरगाभीर्य, क्वचित् कौतुकेनैव दर्शनदृष्टार्थविवेचनेऽद्भुत चमत्कार, क्वचित् स्वार्थसक्तमानवजातिनिर्घृणताख्याने भीभत्सकल्लोल, क्वचित् तिरश्चा वनस्पतिप्रभृतिना च सभावर्णनमुखेन इदानींतनसभाभिनयपरिहास, क्वचित् सिंहाद्यप्रस्तुतप्रशसया दृप्तजनरौद्रख्याति, क्वचित् तिर्यक्षु–तत्कल्पेषु च समुचित भयानकनिवेशनम् ।" अशा प्रकारें जन्मभर हृषीकेश भट्टाचार्यांनी 'विद्योदयाचें' सपादनकार्य मोठ्या दक्षतेने चालविलें होतें. मातापित्याच्या वृद्धापकाळीं त्यानी कलकत्त्यात आपलें वास्तव्य केलें. त्यावेळीं कलकत्त्याच्या सस्कृत महाविद्यालयातील ग्रथालयातल्या सस्कृत हस्तलिखित ग्रथाची प्रचड सूची त्यानी सपादित केली

१४ व्या शतकातील पद्मनाभ या मैथिल पडिताने लिहिलेल्या व्याकरणावर हृषीकेश भट्टाचार्यांनी टिप्पणीसहित भाष्य लिहून त्या व्याकरणाला मोठी प्रतिष्ठा

प्राप्त करुन दिली. या सुपद्म व्याकरणामध्ये पद्मनाभाने शास्त्रीय व लौकिक व्याकरण पद्धतींचा समन्वय केलेला आहे. इ. स. १९१३ मध्ये हा महान् संस्कृत पंडित दिवगत झाला. 'विनोदयात्रा' संपादनकार्यातिरिक्त त्यानी इतर नऊच पुस्तकें लिहिलीं आहेत. तीं अशीं (१) सुपद्मव्याकरणव्याख्यानम्। (२) कवितावली। (३) राजपुनागमनम्। (४) प्राकृतव्याकरणम्। (इंग्रजी भाषांतरासहित) (५) संस्कृतश्रुतबोध। (६) प्रबोधचन्द्रोदयनाटकव्याख्या. हीं सर्व पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत त्याच्या 'विनोदयातील' निबंधाचा एक संग्रह त्याच्या एका शिष्याने प्रकाशित केला आहे. याव्यतिरिक्त त्याचीं ४ हिंदी पुस्तकें लाहोरच्या मिहिरचंद्राने प्रकाशित केलीं असून १० बंगाली पुस्तकेंहि प्रकाशित झालीं आहेत.

* * *

## विद्यावाचस्पति श्री आप्पाशास्त्री राशिवडेकर

महाराष्ट्रात संस्कृत वृत्तपत्राचा आरंभ श्री. आप्पाशास्त्री राशिवडेकर याच्या कर्तृत्वाने झाला. कोल्हापूर जिल्ह्यातील राशिवडे या गावचे रहिवासी सदाशिवशास्त्री गुळवणी याचे आप्पाशास्त्री हे चिरंजीव होत. शके १७९७ मध्ये त्याचा जन्म झाला. लहानपणींच पितृनिधनाचें संकट ओढवल्यामुळे त्याना राशिवडें गावाहून कोल्हापुरास रहावयास यावें लागलें कोल्हापूर संस्थानच्या अष्टप्रधानमंडळातील पंडितराज श्री कान्ताचार्य प्रधान याच्या जवळ आप्पाशास्त्रींचे संस्कृताध्ययन झालें. अध्ययनानंतर कोल्हापुरात त्याचें वास्तव्य होतें शके १८१५ मध्ये बंगालात श्री जयचंद्र शर्मा सिद्धान्तभूषण या पंडिताने 'संस्कृतचंद्रिका' नावाची मासिकपत्रिका सुरू केली तिच्या संपादकाचा व आप्पाशास्त्रींचा बराच परिचय होता. याच सुमाराला बंगीय संस्कृत पंडितसंमेलनातर्फे आप्पाशास्त्रींना निमंत्रण आलें. त्या पंडितपरिषदेंत आप्पा शास्त्रींचें पांडित्य पाहून विद्वज्जनानी त्याना 'विद्यावाचस्पति' ही पदवी अर्पण केली. संस्कृतचंद्रिकेच्या संपादकानी त्याच्या भाषाप्रभुत्वावर प्रसन्न होऊन त्यानी आपल्या मासिकपत्रिकेचें संपादकत्व समर्पण केलें. अशाप्रकारें शके १८२० पासून म्हणजे वयाच्या २३ व्या वर्षापासून आप्पाशास्त्री हे 'संस्कृतचंद्रिकेचे' संपादक झाले. कोल्हापुरात कांही काळ संस्कृतचंद्रिकेचें कार्यालय एका मंयाच्या वाड्यांत होतें. मध्यंतरी शाहूराजाच्या विरुद्ध कांही लिखाण संस्कृतचंद्रिकेंत प्रकाशित झाल्यामुळे राजशिक्षेनुसार कार्यालय कोल्हापुरातून हालवावें लागलें पुढे कांही दिवसांनी 'संस्कृत चंद्रिका' प्रकाशित होऊं लागली. यानंतर आप्पाशास्त्रींनी 'सूनृतवादिनी' नावाचें एक साप्ताहिक संस्कृतपत्रिका सुरू केली. केसरीच्या आकाराचीं ४ पानें दर आठ वड्याला एकदां प्रकाशित करणें म्हणजे सामान्य कर्म नव्हे. पण आप्पाशास्त्रींनी तें करून दाखविलें. या 'सूनृतवादिनींत' मुख्यतः सामाजिक व राजकीय विषयांवर संस्कृत लिखाण प्रसिद्ध होई. दोन वृत्तपत्राच्या संपादकत्वाशिवाय इतरहि अनेक सार्व

जनिक साहित्यिक कार्यांमध्ये आप्पाशास्त्री नित्य व्यग्र असत. पुराणग्रंथाचे अनुवाद, काव्य-नाटकांवर टीकालेखन यासारखे त्यांचे लिखाण सतत चालू असे. त्यांच्या नियतकालिकांतून सद्बोधनपर, सामाजिक वादाचे खंडनमंडन करणारे, आधुनिक विज्ञानपर व लोकमान्यांसारख्या पुढाऱ्यांच्या लेखांचे अनुवाद असलेले लेख त्यांनी सतत लिहिले. वाराणसेय भारतधर्ममंडळाने त्यांना 'विद्यालंकार' व 'महोपदेशक' या दोन पदव्या अर्पण केल्या होत्या. श्री अंबिकादत्त व्यासांचा 'शिवराजविजयम्' हा उत्कृष्ट गद्यग्रंथ आप्पाशास्त्रींच्या संस्कृतचंद्रिकेतूनच प्रथम क्रमशः प्रकाशित झाला. अशाप्रकारें निरंतर संस्कृत भाषेच्या उपासनेंत आयुष्याचें सार्थक करणाऱ्या आप्पाशास्त्रींचें कौटुंबिक जीवन मात्र विशेष सुखाचें नव्हतें. वारंवार स्त्रीनिधनाचें संकट कोसळल्यामुळे, केवळ ३८ वर्षांच्या अल्पायुष्यात ४ वेळा विवाह करण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला. शके १८३५ मध्ये आप्पाशास्त्रींचें देहावसान झालें. त्यांच्या संस्कृतसेवाकार्याचा गौरव करताना 'केरलीय-संस्कृत-विज्ञान-चिन्तामणि.' या नियतकालिकाचे संपादक श्री पुनश्शेरिनम्पी नीलकण्ठ म्हणतात, 'प्रियपाठकमहाभागाः ! न बहुविधग्रंथप्रणेतारः कालिदासादि-कविवराः न वा भयकराः कर्कशतरविवादपरायणाः संस्कृतपरायणाः संस्कृतपण्डिताः, नापि गद्यविलेखनचणो बाणभट्टः संस्कृतभाषाप्रणयिनाम् अस्माकम् उपकुर्वन्ति, यथाऽयमेकः श्रीमान् उपकरोति विद्यावाचस्पतिः आप्पाशास्त्री नवनवसंस्कृतग्रंथलेखनविनियुज्यमानस्वीयसमयः स्वतन्त्रसंस्कृतगद्यविलेखने, वैयाकरणमणि, आलङ्कारिकालङ्कारभूतो नैय्यायिकमूर्धन्यो धर्मशास्त्रराद्धान्तान्तरार्थवेदी रसिकमणिः संस्कृतचन्द्रिकासहकारिसम्पादकः।"

* * *

## महामहोपाध्याय श्री. नारायणशास्त्री खिस्ते

इ. स. १८९२ मध्ये काशी येथे यांचा जन्म झाला. यांच्या वडिलांचे नांव भैरवपंत असे होतें. काशींत म. म. बाळशास्त्री काळे व गंगाधरशास्त्री यांच्याजवळ त्यांनी संस्कृत शास्त्रांचे अध्ययन केलें. इ. स. १९१० मध्ये त्यांनी **दक्षाध्वरध्वंसम्** नांवाचें एक खण्डकाव्य लिहिलें व 'साहित्यशरीर' नांवाच्या हिंदी मासिकांत प्रकाशित झालें होतें. (१) विद्वच्चरितपञ्चकम् (चम्पूकाव्य), (२) अभिज्ञान शाकुन्तलाची 'लक्ष्मी' टीका, (३) स्वप्नवासवदत्ताची 'श्री' टीका, (४) दरिद्राणां हृदयम् व (५) दिव्यदृष्टिः या दोन संस्कृत नाटकांच्या व्यतिरिक्त संस्कृत लिखाण म. म. नारायणशास्त्री खिस्ते यांनी केलें आहे. गव्हर्नमेंट संस्कृत सिरीज या ग्रंथमालेमध्ये सरासरी २० ग्रंथ श्रीनारायणशास्त्री खिस्ते यांनी प्रकाशित केले आहेत. काशीच्या 'सरस्वतीभवन' ग्रंथालयामध्ये यांनी अधिकारग्रहण केलें तेव्हां तेथे १३००० ग्रंथ होते. पण त्यानंतर यांनी काशींतील अनेक पंडितांच्या घरीं व ग्वाल्हेर,

जयपूर, बडोदा, रीवा यासारख्या संस्थानात हिंडून विविध विषयावरील ग्रंथाचा त्यांनी संग्रह केला. त्यामुळे सरस्वतीभवनातील ग्रंथाची एकूण संख्या ६०००० च्या वर गेली.

नारायणशास्त्रींच्या शिष्यवर्गात डॉ डब्ल्यू. नार्मन ब्राऊन, डॉ. फ्रँक्लीन एजरटन्, डॉ. पोल्मेन हे अमेरिकन पंडित व इतर काही जर्मन व ब्रिटिश पंडित होते. काशीच्या राजकीय संस्कृत महाविद्यालयाशीं त्यांचा घनिष्ट संबंध होता.

*　　　*　　　*

## पंडित तेजोभानु

इ स १८८० मध्ये रावळपिंडी येथे याचा जन्म झाला. याच्या वडिलाचं नाव प० विष्णुदत्त असे होते. (१) विप्रप्रचदर्शी (२) श्रीचन्द्रचरितम् (काव्य) (३) स्तुति मुक्तावली (४) नीतिशतकम् (५) शृंगारशतकम् (६) वैराग्यशतकम् एवढीं पुस्तके प तेजोभानु यानी लिहिलीं आहेत, नीति शृंगार व वैराग्य या विषयावरील शतकामुळे त्याना ' अभिनवभर्तृहरि. ' अशी पदवी प्राप्त झाली' पंजाब प्रातात संस्कृत प्रचाराचे फार मोठें कार्य यानी केल्यामुळे याना मोठी ख्याति प्राप्त झालेली आहे.

## श्री. व्ही. रामानुजाचार्य

मद्रास प्रांतात छत्र नावाच्या गावीं याचा जन्म झाला. ' सर्वशास्त्रपारङ्गत ' ' संस्कृत महाकवीश्वर ', ' सरसकविराज ', 'कविरत्नम्', 'साहित्यभास्कर' इत्यादि अनेक पदव्या याना लाभल्या. रूपकाच्या लक्षणानुसार १० प्रकारचीं रूपके याने लिहिलीं आहेत त्याची नावं पुढीलप्रमाणे आहेत.

(१) कलिकाकोलाहलम् (नाटक)
(२) आत्मावलीपरिणय. (प्रकरण)
(३) श्रीनिवासविलास (भाण)
(४) महादेशिकचरितम् (व्यायोग)
(५) लक्ष्मीकल्याणम् (समवकार)
(६) दक्षमखरक्षणम् (डिम)
(७) नहुषाभिलाष (ईहामृग)
(८) अन्यायराज्यप्रध्वंसनम् (अंक)
(९) मुनिनयविनय. (वीथि)
(१०) वाणीपाणिग्रहणम् (लाक्षणिक नाटक)

याशिवाय " रामागस्त्यचरितम् " नावाचें नाटक व " अभिनवलक्ष्मी सहस्रनाम नावाचं स्तोत्रदि यानी लिहिलेले आहे. यांच हें अप्रकाशित नाट्यसाहित्य अयोध्येच्या ' संस्कृतम् ' साप्ताहिकाचे वृद्ध संपादक प० कालीप्रसाद त्रिपाठी यांच्या संग्रहीं असल्याचें आम्ही पाहिलें आहे

---

प्रकरण २९ वे

# अर्वाचीन शास्त्रीय लेखक

प्रस्तुत प्रबन्धामध्ये प्राधान्याने ललित साहित्याचा परिचय देण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे. या ललित लेखकांपैकी अनेकांनी व्याकरण, न्याय, मीमांसा, धर्मशास्त्र इत्यादि आपापल्या आवडीच्या शास्त्रावर टीकात्मक व प्रकरणात्मक ग्रन्थ लिहिले. त्यांचा तुरळक उल्लेख सम्पूर्ण प्रबन्धातून ठिकठिकाणी आढळलेच. पण अर्वाचीन संस्कृत वाङ्मयाचा परिचय देताना, ज्यांनी ललित लिखाण न करता केवळ शास्त्रीय विषयावरच लिखाण केलें, अशा लेखकांपैकी काही लेखक इतक्या श्रेष्ठ योग्यतेचे आहेत की त्यांचा नामनिर्देश न करता प्रस्तुत विषयावरील ग्रन्थ संपविणें हा *अपराध ठरेल. अशा अग्रगण्य व सर्वमान्य अशा काही विद्वानांचा व* त्यांच्या लिखाणाचा परिचय संक्षेपत: पुढे दिला आहे

## वैयाकरण लेखक

**भट्टोजी दीक्षित** — (१७ व शतक पूर्वार्ध) हे महाराष्ट्रीय ब्राह्मण होते. नृसिंहपुत्र शेषकृष्ण (प्रक्रियाकौमुदीवर व्याख्या लिहिणारे) अप्पय्य दीक्षित यांच्या जवळ भट्टोजींनी व्याकरणाचें अध्ययन केले. सिद्धान्तकौमुदी या अद्वितीय *ग्रन्थामुळे भट्टोजी दीक्षित हे व्याकरणपरम्परेत एक युगप्रवर्तक लेखक ठरले आहेत.*

"**कौमुदी यदि कण्ठस्था वृथा भाष्यपरिश्रम ।**
**कौमुदी यद्यकण्ठस्था वृथा भाष्यपरिश्रम ॥**"

या सुभाषितावरून त्यांच्या कौमुदीचें असाधारण महत्त्व सांगितलं जातं. हा ग्रन्थ त्यांनी रामचन्द्र शेष यांच्या प्रक्रिया कौमुदीचें अनुकरण करून लिहिला. सिद्धान्त कौमुदी व्यतिरिक्त **लिंगानुशासनवृत्ति**, **वैयाकरणसिद्धान्तकारिका** व **शब्दकौस्तुभ** नामक पाणिनिसूत्रावर पातंजल महाभाष्याच्या धर्तीवर विवरणस्वरूप पाचा ग्रंथ भट्टोजींनी लिहिला. त्यामध्ये महाभाष्यानंतर लिहिलेल्या ग्रंथातील विवेचनाचा आवश्यक तेथे आधार घेतला आहे. हा ग्रंथ समग्र उपलब्ध नाही. या शब्दकौस्तुभावर पुढील सात टीका लिहिण्यात आल्या, त्यावरून त्या कृतिग्रंथाची योग्यता लक्षात येईल. :—

(१) नागेश — विषमपदी
(२) वैद्यनाथ पायगुण्डे (नागेशाचे शिष्य) — प्रभा
(३) विद्यानाथ शुक्ल — उद्योत
(४) राघवेन्द्राचार्य — प्रभा
(५) कृष्णमित्र — भावप्रदीप
(६) भास्कर दीक्षित — शब्दकौस्तुभदूषणम्
(७) जगन्नाथ — शब्दकौस्तुभखण्डनम् ।

भट्टोजींनी स्वतःच्या सिद्धान्तकौमुदीवर "प्रौढमनोरमा" नामक मार्मिक व सविस्तर टीका लिहिली. या टीकेत प्रक्रियाकौमुदीकार रामचंद्र शेष व प्रक्रियाकौमुदी-व्याख्या लिहिणारे आपले गुरु शेषकृष्ण यांच्यावर त्यांनी टीका केली म्हणून तिच्यावर पण्डितराज जगन्नाथाने 'प्रौढमनोरमाकुचमर्दिनी' नामक टीका लिहून खण्डन करण्याचा प्रयत्न केला आहे. (प्रौढमनोरमेचा सविस्तर मराठी अनुवाद नागपूरचे विख्यात वैयाकरण रावबहादुर नारायण दाजीबा वाडेगावकर यांनी केला आहे.) सिद्धान्तकौमुदीवरील 'बालमनोरमा' ही टीका वासुदेव दीक्षित या तंजावरनिवासी वैयाकरणाने १७ व्या शतकाच्या शेवटी लिहिली आहे. भट्टोजी दीक्षितापासून व्याकरणाच्या जगात नवे युग निर्माण झाले. त्यांचा शिष्य वरदराज याने लघुसिद्धान्तकौमुदी व रामशर्माने मध्यम कौमुदी ही भट्टोजींच्या कौमुदीची छात्रोपयोगी संक्षिप्त रूपान्तरे तयार केली. व्याकरण-शास्त्राचा विद्यार्थी प्रथम लघुसिद्धान्तकौमुदीचाच आधार घेतो. भट्टोजींचा पुतण्या (रंगोजीभट्टाचा पुत्र) कौण्डभट्ट याने त्यांच्या वैयाकरणसिद्धान्तकारिकांवर वैयाकरणभूषणम् व वैयाकरण-भूषणसारः या नावाचे टीका ग्रन्थ लिहिले. वैयाकरणभूषणाची क्लिष्टता दूर करण्यासाठी पुण्याचे शंकरशास्त्री मारुलकर यांनी त्यावर शांकरी (अप्रकाशित) नावाची मार्मिक टीका लिहिली आहे. गुरु-मताचे खण्डन केल्यामुळे जो गुरुद्रोह भट्टोजींकडून घडला त्यामुळे ते मरणोत्तर ब्रह्मसमंध झाले व त्या अवस्थेत ज्ञानेन्द्रसरस्वती या संन्याशाला व्याकरण शिकवून त्याचेकडून 'तत्त्वबोधिनी' ही सिद्धान्तकौमुदीवरील टीका लिहून घेतली अशी दंतकथा प्रचलित आहे.

**नागेशभट्ट**—(इ.स. १७१८) भट्टोजींच्या परम्परेतील हे महाराष्ट्रीय विद्वान् नागोजीभट्ट या नावाने विशेष प्रसिद्ध होते. त्यांच्या पित्याचे नाव शिवभट्ट व मातेचे नाव सतीदेवी असे होते. भट्टोजी दीक्षिताचे पुत्र हरिदत्त हे नागोजींचे व्याकरणगुरु व अन्नंभट्टाच्या महाभाष्यप्रदीपोद्योतनावर 'छाया'[१] नामक टीका लिहिणारे पण्डित वैद्यनाथ पायगुण्डे हे त्यांचे शिष्य होते. 'शृंगवेरपुराधीशाद्रामतो लब्धजीविकः'

---

१ निर्णयसागर प्रेसमध्ये मुद्रित.

असा आपल्या आश्रयदात्याचा नामनिर्देश नागेशभट्टाने आपल्या ग्रन्थांत केला आहे. *व्याकरणशास्त्रावरील लघुशब्देन्दुशेखरः, बृहत्-शब्देन्दुशेखरः* (सिद्धान्त-कौमुदीवरील टीका) परिभाषेन्दुशेखरः[२] (याचाहि सविस्तर मराठी अनुवाद रा. ब. ना. दा. वाडेगांवकर यांनी केला असून तो, उद्यम मुद्रणालय नागपूर तर्फे, प्रकाशित झाला आहे.), लघुमञ्जूषा, स्फोटवादः, महाभाष्यप्रदीपोद्योतः (कैयटाच्या महाभाष्य प्रदीपावरील उपटीका व 'महाभाष्य-प्रत्याख्यानसंग्रहः' हे नागेशभट्टांचे ग्रन्थ संस्कृत शास्त्रीय वाङ्मयाचे दैदीप्यमान अलंकार आहेत. व्याकरणाव्यतिरिक्त धर्मशास्त्र, ज्योतिष व षड्दर्शनें या विषयांवरहि नागेशभट्टांनी व्याख्याग्रन्थ लिहिले आहेत. जगन्नाथाच्या रसगङ्गाधराचें खण्डन करून मम्मटमताची प्रतिष्ठापना करण्याचें कार्य नागेशभट्टांनी केलें. नागेशभट्टाच्या शिष्यांपैकी ज्ञानेन्द्र किंवा जिनेन्द्रसरस्वती याने '*तत्त्वबोधिनी*' व वासुदेव दीक्षित यांनी '*बालमनोरमा*' *या टीका सिद्धान्त* कौमुदीवर लिहिल्या.

भट्टोजी दीक्षितांचा नातु हरि दीक्षित यांनी आजोबांच्या प्रौढमनोरमेवर लघुशब्दरत्न व बृहत्शब्दरत्न या नांवाच्या दोन टीका लिहिल्या आहेत. नागेशाचे लघुशब्देन्दुशेखरः व परिभाषेन्दुशेखरः हे ग्रंथ इतके विद्वन्मान्य आहेत की सिद्धान्त-कौमुदी व मनोरमा-शब्दरत्नांचें वारकान्त अध्ययन झाल्यावर दोन्ही शेखरग्रथांचें अध्ययन करण्याची प्रथा पडली. त्यानंतर नागेशाची मंजूषा व महाभाष्यांतील नवाह्निकी आणि अंगाधिकार यांचे अध्ययन झाले की व्याकरणाचे अध्ययन पूर्ण झालें असें मानण्यांत येऊं लागलें

नागेशाच्या ग्रंथांवरील टीका व टीकाकार *

| लेखक | टीकाग्रंथ |
| --- | --- |
| वैद्यनाथ पायगुंडे | लघुशब्देन्दुशेखरावर चिदस्थिमाला व परिभाषेन्दुशेखरावर 'गदा'। याव्यतिरिक्त-पातंजल-भाष्य उद्योतावर 'छाया'. |
| भैरवमिश्र | श. शे. वर 'चन्द्रकला'; प. शे. वर 'भैरवी' |
| उदयशंकर पाठक | लघु श. शे. वर 'ज्योत्स्ना'; प. शे. वर 'पार्वती' |
| हरिनाथ | प. शे. वर 'अकाण्डताण्डवम्', |

२. पाणिनिसूत्रांच्या आकलनासाठी लोकसिद्ध व शास्त्रसिद्ध अशा १३० चे वर न्यायांचे विवेचन नागेशाने या ग्रन्थात केले आहे त्यांपैकी ४० न्याय (किंवा परिभाषा) वार्तिककारांनी दिले आहेत.

* व्याकरण महाभाष्य, भाग ७ वा, (प्रस्तावना खंड,) पृ. ४०८।

| लेखक | टीकाग्रंथ |
|---|---|
| मन्तुदेव— | 'टोपोद्धरण' (प. शे.) |
| भीमभट्ट— | 'भैमी' (प. शे.) |
| शंकरभट्ट— | 'शांकरी' (प. शे.) |
| लक्ष्मीनृसिंह— | त्रिशिखा (प. शे.) |
| सदाशिवभट्ट मुळे (नागपूर)— | सदाशिवभट्टी (ल. श. शे.) |
| श्रीधर— | 'श्रीधरी' ,, |
| राघवेन्द्राचार्य गजेन्द्रगडकर— | 'विषमा' ,, |
| विष्णुशास्त्री भट्ट— | 'विष्णुभट्ट' (प. शे.) |
| इन्दिरापति— | 'परीक्षा' (ल. श. शे.) |
| शिवनारायणशास्त्री— | 'विजया' |
| गुरुप्रसादशास्त्री— | 'वरवर्णिनी' |

**अन्नंभट्ट** -हा आन्ध्र पण्डित, अद्वैतवादी विद्वान् राघव सोमयाजी याचा वंशज होता. त्याच्या पित्याचें नांव तिरुमलाचार्य असें होतें. याचें सर्व अध्ययन काशीत झालें. **महाभाष्यप्रदीपोद्योतनम्, राणकोज्जीवनी** टीका, ब्रह्मसूत्र-व्याख्या, **अष्टाध्यायी-मिताक्षरावृत्तिः** व **तर्कसंग्रहः** हे अन्नंभट्टाचे शास्त्रीय ग्रन्थ सुप्रसिद्ध आहेत.

* * *

## साहित्यशास्त्र

साहित्यशास्त्रांत ज्याची मीमांसा करण्यांत आली आहे, त्या काव्याचा प्रथमाविष्कार वेदांतील,

अभ्रातेव पुंस एति प्रतीची गर्तारुगिव सनये धनानाम् ।
जायेव पत्य उशती सुवासा उषा हस्रेव निरिणीते अप्सः ॥
(ऋ १-१२४-७)

द्वा सुपर्णा सयुजा सखाया समानं वृक्षं परिषस्वजाते ।
तयोरन्यः पिप्पलं स्वाद्वत्ति अनश्नन्नन्यो अभिचाकशीति ॥
(ऋ ७-३३-८)

चत्वारि शृङ्गास्त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।
त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्यानाविवेश ॥
(ऋ ४-५८-३)

लेखक वेमभूपाल.[४] रीतिवृत्तिलक्षण आणि शृंगाररसमण्डन याचा लेखक विठ्ठलेश्वर (१६ वे श.)[५], काव्यडाकिनीकार गंगानन्द (१६ वे श.), कुवलयानन्दकार अप्पय्य दीक्षित आणि रसगंगाधरकार जगन्नाथपण्डित यानी व त्यांच्या विख्यात ग्रन्थावर उत्तमोत्तम टीकाग्रन्थ लिहिणाऱ्या शतावधि टीकाकारानी निरनिराळ्या प्रकारानी वृद्धिंगत केले. उदाहरणार्थ अलंकाराची संख्या भरताच्या नाट्यशास्त्रात चार होती. अग्निपुराणात ती सोळा आढळते. त्यानंतर भामहाच्या ग्रन्थात ती संख्या अडतीस पर्यंत पोचली. याचा अर्थ भरत ते भामह या कालखंडातील साहित्यशास्त्रज्ञानी (यांची नावे आढळतात पण ग्रन्थ आज उपलब्ध नाहीत) ती संख्या क्रमशः वाढविली. वामनाच्या काव्यालंकारसूत्रामध्ये (८ वे श.) बावन अलंकाराचा निर्देश आहे. त्यानंतरच्या कालखंडात रुद्रट, भोज, मम्मट, रुय्यक (१२ वे श.) यानी क्रमश ती संख्या १०३ पर्यंत पोचविली. पुढे ही संख्या १९१ पर्यंत पोचल्याचे दिसून येते.[६]

याचप्रकारे साहित्यशास्त्राचा विकास किंवा शास्त्रान्तर्गत अनेकविध विषयाचा ऊहापोह करण्याचे कार्य अर्वाचीन कालखंडात निरन्तर चालू राहिले. सामान्यत. समजूत अशी आहे की अप्पय दीक्षित आणि जगन्नाथ पंडित यांच्यानंतर साहित्य शास्त्रविषयक उल्लेखनीय लेखक झाले नाहीत. पण ही समजूत इतर शास्त्रविषयक समजुतीप्रमाणेच चुकीची आहे हे शास्त्रविषयक लेखकाची व त्यांच्या ग्रथाची पुढील नामावली पाहता चुकीचे आहे असे लक्षात येईल.[७]

**कृष्णसुधी**—हा लेखक पंडितराज जगन्नाथाचा वंशज होता. त्याचे वास्तव्य काञ्चीजवळील उत्तरमेरू येथे होते. काव्यकलानिधि[८] या आपल्या ग्रन्थात उदाहरणार्थ लिहिलेल्या श्लोकात त्याने आपला आश्रयदाता कोल्लमचा राजा रामवर्मा याचे गुणगान केले आहे.

---

४ वामनभट्ट याने याच वेमभूपालाचे चरित्र 'वीरनारायणचरितम्' या नावाने लिहिले आहे पूर्वार्ध पृ २०७ वर त्याचा उल्लेख पाहा

५ प्रसिद्ध भाष्यकार वल्लभाचार्य याचा पुत्र

६ संस्कृत साहित्य का इतिहास ले कन्हैयालाल पोद्दार, भाग २. पृ १२४ ते १३९.

७ यापूर्वीच्या प्रकरणातून, विविध विषयावर ज्यांनी लेखन केले अशा लेखकाच्या साहित्य शास्त्रविषयक अनेक ग्रथाचा आनुषंगिकपणे नामनिर्देश आलेला आहे.

८. यापुढील लेखकाच्या माहितीच्या संदर्भासाठी एम्. कृष्णमाचारियर याच्या ग्रथांतील पृष्ठें ७८१ ते ८०३ होता.

**शातलूरी कृष्णसूरी** — याने आपल्या 'अलंकारमीमांसा' या ग्रन्थात रसगंगाधरातील मताचा समाचार घेण्याचा प्रयत्न केला आहे. 'साहित्यकल्पलतिका' या नावाचा आणखी एक ग्रन्थ याने लिहिला आहे.[१]

**सामराज दीक्षित** (१७ वें श.)—नरहरि बिन्दुपुरन्दर याचा हा पुत्र होता. शृंगारामृतलहरी या साहित्यशास्त्रीय ग्रन्थाव्यतिरिक्त 'श्रीदामचरितम्' (नाटक) त्रिपुरसुंदरीमानसपूजा, अक्षरगुम्फ आणि आर्यात्रिशती हे ग्रन्थ याने लिहिले आहेत. याचा पुत्र कामराज याने 'काव्येन्दुप्रकाश', नातु व्रजराज याने रसमञ्जरीवरील टीका, व पणतु जीवराज याने रसतरङ्गिणीवरील 'सेतु' टीका, अशा प्रकारे साहित्य शास्त्रीय ग्रन्थनिर्मिति केली असून शतक चम्पू इत्यादि प्रकारचे ग्रन्थलेखन केलें आहे.

**चतुर्भुज**—शाइस्ताखान उर्फ आमरखान या आपल्या रसिक आश्रय दात्याला प्रसन्न करण्यासाठी याने 'रसकल्पद्रुम' हा ६५ प्रस्तावात्मक साहित्य शास्त्रीय ग्रन्थ लिहिला त्यात उदाहरणार्थ टाकलेले १ सहस्र श्लोक असून त्यापैकी शाइस्ताखानाने रचलेले ५-६ उत्तम श्लोक आहेत.

**बलदेव विद्याभूषण**—(१८ वें शतक) 'साहित्यकौमुदी' हा भरत सूत्रावरील टीकात्मक ग्रन्थ याने लिहिला. मम्मटाच्या काव्यप्रकाशातील कारिकांचा संग्रह मुळांत स्वत भरतानेच 'काव्यलक्षणम्' नावाच्या ग्रन्थात केला होता त्या काव्यलक्षणावर मम्मटादिक अनेक प्राचीन लेखकांनी लिहिलेल्या टीकांचा परामर्श घेऊन मी ही 'साहित्यकौमुदी' लिहित आहें असा निर्देश विद्याभूषणाने केला असल्याने व काव्यप्रकाशाच्या दशमोल्लासाच्या शेवटी 'सम्पूर्णमिदं काव्यलक्षणम्' असाच निर्देश केलेला असल्याने मम्मट हा काव्यप्रकाशाचा कारिकाकार नसावा हा पक्ष सबळ ठरून काव्यप्रकाश हा ग्रन्थ 'काव्यलक्षणम्' या भरतकृत कारिकांची वृत्ति असावी असे अनुमान निघते. विद्याभूषणाने रसगङ्गाधरकाराप्रमाणे उदाहरणार्थ स्वरचित श्लोक घातले असून त्या सर्वांचा विषय कृष्णस्तुति हा आहे. विद्याभूषण हा कृष्णावतार गौराङ्गमहाप्रभूचा भक्त होता

**विश्वेश्वर पाण्डे**—१८ व्या शतकात अल्मोडा येथे याचे वास्तव्य होते ३४ वर्षांच्या आयुष्यात याने असामान्य लेखनकार्य केलें. वयाच्या १० व्या वर्षीच

---

१ व्याख्यातमिदं सम्पूर्णमिदं काव्यलक्षणम्–
'मम्मटाद्युक्तिमाश्रित्य मितां साहित्यकौमुदीम् ।
वृत्तिं भरतसूत्राणां श्रीविद्याभूषणोऽम्दधात् ॥'

त्याने लेखनास आरंभ केला 'रुक्मिणीपरिणयम्' व 'शृंगारमञ्जरी' (प्राकृत) या नाट्यकाव्यातिरिक्त इतर सारे ग्रन्थ त्याने साहित्यशास्त्रविषयकच लिहिले आहेत त्यांची नावे अशी—अलंकारकौस्तुभ, अलंकारकर्णाभरणम्, काव्यलीला, काव्यरत्नम्[10], अलंकारकुलप्रदीप, अलंकारमुक्तावली व रसचन्द्रिका[11] याव्यतिरिक्त भानुदत्ताच्या रसमञ्जरीवर टीकाहि विश्वेश्वराने लिहिली आहे

**वासुदेव पात्र**—ओरिसातील किमुडीचा संस्थानिक गजपति नारायणदेव याचा हा निकटवर्ती होता त्याने आपल्या 'कविचिन्तामणि' नामक २४ किरणांच्या ग्रन्थात कविशिक्षेत आणि समस्यापूर्ति यासंबंधी प्राधान्याने चर्चा केली असून शेवटच्या तीन किरणात संगीतविषयक चर्चा केली आहे.

**अच्युतराय मोडक**—(१८–१९ शतक) साहित्यसार[12] नामक १२ प्रकरणांचा ग्रन्थ याने लिहिला असून त्यातील प्रकरणांना ऐरावतरत्न, धन्वंतरिरत्न अशी नावें सहेतुकपणे दिली आहेत. जगन्नाथपंडितकृत 'भामिनीविलास' या काव्यावर व विद्यारण्य-भारतीतीर्थकृत 'पञ्चदशी' या प्रख्यात वेदान्तग्रन्थावर अच्युतराय मोडकाने टीका लिहिल्या आहेत. 'भागीरथीचम्पू' या प्रस्तुत लेखकाच्या ग्रन्थाचा निर्देश पूर्वीच आला आहे.

**राजशेखर**—(१९ वे शतक) आन्ध्र प्रदेशात गोदावरी जिल्ह्यातील सोमनाथपुरी येथे याचे वास्तव्य होते 'साहित्यकल्पद्रुम' (८१ स्तबक) व 'अलंकार मकरन्द' ह्या व्यतिरिक्त 'शिवशतकम्' व 'श्रीशचम्पू' अर्थात् 'भागवतचम्पू' हे ग्रंथ लिहिले आहेत.

**मुडुम्बी नरसिंहाचार्य**--विजयानगरमच्या विजयराम गणपति आणि आनन्दगणपति यांच्या आश्रयात राहून याने संस्कृत साहित्यसेवा केली याच्या 'व्हिक्टोरियाप्रशस्ति' या काव्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. त्याव्यतिरिक्त दैवापोलम्भ, नरसिंहाट्टहास, जयसिंहाश्वमेधीयम्, युद्धप्रोत्साहनम्, ही काव्यें व ५० लहानमोठी स्तोत्रकाव्ये[13] एवढी साहित्यनिर्मिति याने केली आहे. साहित्यशास्त्रीय विषयावर काव्योपोद्घात, काव्यप्रयोगविधि, काव्यसूत्रवृत्ति व अलंकारमाला हे उल्लेखनीय ग्रंथ याने लिहिले आहेत.

---

१० हे चार ग्रंथ मुबईत मुद्रित

११. हे तीन ग्रंथ वाराणसीत मुद्रित

१२ सरसामोद या टीकेसह मुबईत प्रकाशित.

१३ इ ९१९.

अलंकारशास्त्र किंवा साहित्यशास्त्र हा प्रायः सर्वच लक्षितलेखकांचा आवडीचा आणि व्यासंगाचा विषय असल्याने या शास्त्राविषयीं भरपूर लिखाण सतत होत राहिलें आहे. त्यामध्ये वामनाचार्य झळकीकरकृत बालबोधिनी (काव्यप्रकाश टीका) मुजफ्फरपूरचे बदरीनाथशर्मा याची दीधिति (ध्वन्यालोकाची टीका) यासारखे अनेक उत्तमोत्तम टीकाग्रन्थ आहेत. त्याव्यतिरिक्त चन्द्रकान्त तर्कालंकार (१९ वें शतक) कृत 'अलंकारसूत्राणि'[14] अमृतानन्दयोगीकृत 'अलंकारसंग्रह'[15] नृसिंहपुत्र रामकृत 'अलंकारमुक्तावली'[16], देवेश्वरकृत 'कविकल्पलता'[17], कान्तिचन्द्र मुखोपाध्यायकृत 'कविकौतूहलम्'[18], समसन्दभट्टकृत 'काव्यरसायनम्'[19], नागेशभट्टकृत 'व्यञ्जनानिर्णयः'[20], दाजी शिवाजी प्रधानकृत 'रसमाधवः', चार्ला भाष्यकारशास्त्री कृत 'मेकाधीशमन्दार्थकल्पतरु'[21] यासारखे संस्कृतसाहित्यशास्त्रीय ग्रन्थांच्या उज्ज्वल परंपरेस साजेसे अनेक ग्रन्थ लिहिणारे लेखक झाले आहेत. तेराव्या शतकात विद्यानाथ नावाच्या लेखकाने 'प्रतापरुद्रभूषणम्' हा ग्रन्थ लिहून यशोभूषणात्मक ग्रन्थाची एक नवीन परम्परा संस्कृत साहित्यात निर्माण केली. विद्यानाथाने प्रतापरुद्रदेव या आपल्या आश्रयदात्याला अनुलक्षून साहित्यशास्त्रीय सिद्धान्ताची उदाहरणे म्हणून काव्यरचना केली. साहित्यशास्त्रावर ग्रन्थ लिहिणाऱ्या अलंकारसार-कार सुधीन्द्रयोगी, शहाजीराजीयमूकार काशी लक्ष्मण, कृष्णराज-यशोडिंडिम-कार अनन्ताचार्य, नञ्जराजयशोभूषणकार नृसिंहकवि, रामवर्मयशोभूषणकार सदाशिव मखी, काव्यकलानिधिकार कृष्णसुधी, रामचन्द्र-यशोभूषणकार कच्छेश्वर दीक्षित, व लोकमान्यालंकार कार करमळकरशास्त्री इत्यादि लेखकांनी विद्यानाथाने प्रवर्तित केलेली परम्परा अखण्डित राखली आहे.

* * *

## ज्योतिःशास्त्र

भारतीय ज्योतिःशास्त्राच्या अर्वाचीन इतिहासात जयपूरचा नृपति सवाई जयसिंह याचें स्मरण केल्यावाचून पुढे पाऊल्च टाकता येणार नाही. जयसिंहाचा जन्म इ. स. १६८६ मध्ये झाला व वयाच्या १३ वर्षी (इ स १६९९) तो गादीवर आला. ज्योतिःशास्त्रविषयक भारतीय व परदेशीय ग्रन्थांचें तौलनिक अध्ययन करून अनेक विद्वानांना तद्विषयक ग्रन्थनिष्पत्ति करण्यास त्याने प्रोत्साहन

१४ कलकत्ता येथे मुद्रित। १५ इंग्रजी भाषान्तरासहित कलकत्ता येथे मुद्रित। १६ विजागापट्टम येथे मुद्रित। १७ कलकत्ता येथे मुद्रित। १८ कलकत्ता येथे मुद्रित। १९. कलकत्ता येथे मुद्रित। २० मुंबईत मुद्रित। २१ या लेखकाच्या 'कंकणबन्धरामायणम्' या एकश्लोकी अद्भुत ग्रन्थाचा उल्लेख विलष्टकाव्यें या प्रकरणात केला आहे.

दिले. जयपूर, दिल्ली, उज्जयिनी, वाराणसी व मथुरा या प्रसिद्ध शहरीं जयसिंहाने उभारलेल्या वेधशाळा त्याच्या कर्तृत्वाची साक्ष देत आहेत.

१८ व्या शतकात, वैष्णवकरणकार शंकर, 'ग्रहगणितचिन्तामणिकार' मणिराम, ब्रह्मसिद्धान्तकार मुल, यन्त्रराजघटना व ज्योतिषसिद्धान्तसारः याचा लेखक मथुरानाथ, सूर्यसिद्धान्तसारिणी व गोलानन्द याचा लेखक चिन्तामणि दीक्षित (सातारानिवासी), षिटक्कृति, पञ्चाङ्गार्क व पद्धतिचन्द्रिका या तीन ग्रन्थांचा लेखक राघवपण्डित खाण्डेकर (खानदेशवासी) व तिथिपारिजातकार शिव, हे मोठे मोठे ज्योतिःशास्त्राचे ग्रन्थकार होऊन गेले. यांव्यतिरिक्त पुणे येथील दिनकर हा ज्योतिःशास्त्रावरील फार मोठा लेखक १८ व्या शतकात होऊन गेला. हा मोठा गणितज्ञ होता. याच्या वडिलांचे नाव अनन्त असें होते. ग्रहविज्ञानसारिणी, मासप्रवेशसारिणी, लग्नसारिणी, क्रान्तिसारिणी, दृक्कर्मसारिणी, चन्द्रोदयाङ्कजालम्, ग्रहणाङ्कजालम्, पातसारिणीटीका व यन्त्रचिन्तामणिटीका इत्यादि विविध व विपुल ग्रन्थ दिनकराने लिहिले आहेत. (गणकतरङ्गिणी, पृ ११६)

यज्ञेश्वर सदाशिव रोडे उर्फ बाबा रोडे यानी ज्योतिःशास्त्रज्ञ समाजात मोठी प्रतिष्ठा प्राप्त केली होती. शके १७६४ च्या सुमारास यानी यन्त्रराजवासना टीका, गोलानन्द-अनुक्रमणिका, मणिकान्ति-टीका इत्यादि ग्रन्थ लिहिले.

महाराष्ट्रीय ज्योतिःशास्त्रज्ञामध्ये बापूदेवशास्त्री याचं कार्य फार मोठे आहे. याचा जन्म शके १७४३ मध्ये झाला. हे मूळचे अहमदनगर जिल्ह्यातले रहिवासी पण विद्याध्ययनासाठी काशींत अधिक काळ राहिले. भारतीय व यूरोपीय ज्योतिःशास्त्राचा तुलनात्मक अभ्यास करून विविध भाषांमध्ये ग्रन्थलेखन करणारा बापूदेव शास्त्री यांच्या तोडीचा दुसरा ज्योतिःशास्त्रज्ञ अर्वाचीन काळात आढळत नाही. रेखागणित (प्रथमाध्याय), त्रिकोणमितिः, सायनवादः, प्राचीन-ज्योतिषाचार्याशय-वर्णनम्, अष्टादशविचित्रप्रश्नसंग्रह, तत्त्वविवेकपरीक्षा, मानमंदिरस्थयन्त्रवर्णनम् व अङ्कगणितम् हे बापूदेवशास्त्रींचे संस्कृत ग्रन्थ प्रकाशित झाले असून काही अप्रकाशित ग्रन्थ प्रकाशनाची वाट पाहात आहेत. लीलावतीचें एक संस्करणहि त्यानी प्रकाशित केले होतें. हिन्दी भाषेत बापूदेवशास्त्रींचे अङ्कगणित, बीजगणित, फलितविचार व सायनवादानुवाद हे ग्रन्थ प्रकाशित झाले आहेत. सिद्धान्तशिरोमणीच्या गोलाध्यायाचें इंग्रजी भाषान्तर विल्किन्सन साहेबाच्या सहाय्याने त्यानी प्रकाशित केले. सूर्यसिद्धान्त ग्रन्थाचेंहि इंग्रजी भाषान्तर यानी केले. नीलाम्बर शर्मा या मैथिल पण्डिताने यूरोपीय पद्धतीनुसार 'गोलप्रकाश' हा ग्रन्थ संस्कृतात लिहिला. तो प्रकाशित करण्याचे कार्य बापूदेवशास्त्रींनी केले. बापूदेवशास्त्रींना त्यांच्या पाण्डित्याबद्दल सी. आय. ई. व महामहोपाध्याय या उपाधि सरकारकडून मिळाल्या होत्या. शके १८१२ मध्ये यांचे देहावसान झालें.

'व्यंकटेश बापूजी केतकर याचा जन्म इ. स १८५४ मध्ये झाला यानी ज्योतिर्गणितम् हा सस्कृत ग्रंथ शके १८१२ च्या सुमारास लिहिला. त्याव्यतिरिक्त त्यानी सौरार्यब्रह्मपक्षीय–तिथिगणितम्, केतकीवासनाभाष्यम्, केतकीग्रहगणितम्, वैजयन्ती, भूमण्डलीयसूर्यग्रहगणितम् हे ग्रन्थ लिहिले आहेत. मराठीत गोल्द्वयप्रश्न भूमण्डलीयगणित यासारखे ग्रन्थ श्री केतकरानी लिहिले आहेत.

भारतीय ज्योति शास्त्रज्ञाची ज्ञानसाधना आजहि यथापूर्व अव्याहत चालू आहे. श्री शकर बाळकृष्ण दीक्षित यानी 'भारतीय ज्योति शास्त्राचा बोधक इतिहास' या विख्यात ग्रन्थात ज्योति शास्त्रविषयक ल्हानमोठ्या अनेक ग्रन्थाची माहिती पद्धतशीरपणे सकलित केलेली आहे. श्री श. बा दीक्षिताच्या या अद्वितीय ग्रथाचे हिन्दी भाषान्तर श्री शिवनाथपत झारखडी या काशीनिवासी महाराष्ट्रीय पण्डिताने केले. उत्तरप्रदेश सरकारने या ग्रन्थाचे महत्त्व ओळखून त्याचे प्रकाशन करविले. या व्यतिरिक्त म. म. प सुधाकर द्विवेदी व डॉ. गोरखप्रसाद या विद्वानानी श्री श बा. दीक्षिताच्या पावलावर पाऊल टाकून हिन्दींत ज्योति शास्त्राचे इतिहासग्रथ लिहिले त्यामध्ये बऱ्याच ज्योति शास्त्रीय ग्रन्थासबधी माहिती उपलब्ध होते

* * *

## संगीतशास्त्र

भारतीय सगीत शास्त्राचे मूळ सामवेद व त्यानतर भरतनाट्यशास्त्र या सारख्या अति प्राचीन ग्रन्थात आढळते त्यानतरच्या काळात नारदशिक्षा, सगीत मकरद, पार्श्वदेवकृत सगीतसमयसार (१२ वे शतक) शार्ङ्गदेवकृत सगीतरत्नाकर (१७ वे शतक) यासारखे अत्यत महत्त्वाचे ग्रन्थ सगीतशास्त्रीय परम्परेत निर्माण झाले १७ व्या शतकात पडित सोमनाथ याने रागविबोध, दामोदरपण्डिताने सगीतदर्पण व अहोबिलपण्डिताने सगीतपारिजात हे उत्तम ग्रन्थ निर्माण केले. दामोदरपण्डिताचा 'सगीतदर्पण' हा ग्रन्थ फारच लोकप्रिय झाला होता. १८ व्या शतकात त्याचे फारसी भाषेत व त्यानतरच्या काळात हिंदी, बगाली, गुजराथी इत्यादि विविध भाषामध्ये भाषान्तरे झाली.

अहोबिल पण्डिताने इ. स १७५० ते १७७७ च्या काळात आपला 'सगीत पारिजात' हा ग्रन्थ लिहिला. इ. स. १७७४ मध्ये दीनानाथ नावाच्या लेखकाने फारसी भाषेत त्याचे भाषान्तर केले. १७ व्या शतकाच्या प्रारंभी राजा रामजस याच्यासाठी रामामात्याने 'स्वरमेलकलानिधि' हा ग्रन्थ लिहिला.

राजा राधाकान्तदेव याने शब्दकल्पद्रुमः व प. कृष्णानन्द व्यास याने राग-कल्पद्रुम[1] हे सगीतशास्त्रपर ग्रन्थ १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात लिहिले. प. कृष्णानद

१ कलकत्ता येथे प्रकाशित।

याला मेवाडच्या महाराजानी 'रागसागर' ही पदवी दिली होती. याच ग्रन्थाच्या तोडीचा ' गीतसूत्रसार. ' उत्तम ग्रन्थ कृष्ण बॅनर्जी यानी १८५० मध्ये लिहिला.

संगीतशास्त्राच्या परम्परेतील महान् पण्डित व कार्यकर्ते श्री विष्णु नारायण भातखण्डे याचे नाव त्यांच्या असाधारण शास्त्रसेवेमुळे अजरामर झाले आहे. त्याचा जन्म १० ऑगष्ट १८६० या दिवशी मुंबई येथे झाला. मराठी, हिन्दी, उर्दू, इंग्रजी, गुजराथी, या भाषावर त्यांचे विलक्षण प्रभुत्व होते त्या भाषातून त्यानी संगीतविषयक लेखन केले असून **लक्ष्यसंगीतम्** हा त्याचा संस्कृत ग्रन्थ उल्लेखनीय आहे. त्याव्यतिरिक्त **अभिनवरागमञ्जरी** व **अभिनवतालमञ्जरी** ही दोन संगीतज्ञाना उपयोगी पडणारी संस्कृत पुस्तके प. भातखंडे यानी 'विष्णुशर्मा' या टोपण नावाखाली लिहिली आहेत. हा विष्णुशर्मा कोण ते कित्येक वर्षापर्यंत संगीतज्ञाना कळल न हते. संगीतशास्त्रज्ञामध्ये प. भातखण्डे याना सर्वोच्च मान होता १९ ऑगष्ट १९३६ या दिवशी ते स्वर्गवासी झाले.

* * *

## आयुर्वेद

पाश्चात्य आरोग्यचिकित्सा शास्त्राचा प्रचार शासनकर्त्यांच्या सर्वांगीण साहाय्यामुळे सर्वत्र फार मोठया प्रमाणात झाल्यामुळे, सहस्रावधि वर्षापासून मानवजातीला जीवदान देण्याच्या भारतीय आयुर्विज्ञानाचा संपूर्ण लोप होण्याची चिह्नें सर्वत्र दिसू लागली. या आसन्नमरण भारतीय विज्ञानाला जीवदान कसे देता येईल, याची चिंता आयुर्वेदाच्या व भारतीय संस्कृतीच्या अभिमानी मंडळींना भासू लागली. अशा परिस्थितीत ज्या आयुर्वेदज्ञ संस्कृत विद्वानानी नवीन ग्रन्थ संस्कृतात निर्माण करून आयुर्वेदाची श्रेष्ठता व उपयुक्तता सिद्ध करण्याचा प्रयत्न केला, त्यामध्ये **प्रत्यक्षशारीरम्**[1] [ शरीरव्यवच्छेदशास्त्र (Anatomy) विषयक ] व **सिद्धान्तनिदानम्**[2] [ रोगनिदानशास्त्र (Pathology) विषयक ] या दोन ग्रन्थांचे लेखक कविराज गणनाथ सेन याचे नाव अविस्मरणीय आहे.

नागपूरचे विख्यात राजकारणी मुत्सद्दी डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे यानी आयुष्याचा फार मोठा भाग राजकारणात घालविला. तथापि ते नेत्ररोगाचे विशेषज्ञ व संस्कृत भाषेचे मोठे अभिमानी व अभिज्ञ होते त्यानी लिहिलेला 'नेत्ररोगचिकित्सा' हा त्या विषयावरील एकमात्र संस्कृत ग्रन्थ आहे. संस्कृत भाषेच्या व विद्येच्या पुनरुत्था नासाठी राजकारणाचे व्याप सांभाळून डॉ मुंजे यानी केलेले विविध प्रयत्न फार मह

१. इ. १९१९ मध्ये कलकत्ता येथे मुद्रित।
२. इ १९२२ मध्ये मुद्रित।

त्याचे होते. पुण्याचे श्री. चिं ग. काशीकर यांनी आयुर्वेदीयपदार्थविज्ञानम्³ या ग्रन्थात "आयुर्वेदाच्या पार्श्वभूमीची कल्पना विशद केली आहे. यात्यतिरिक्त मलबारचे पी. एस्. वेरियर, व व्ही. एन्. नायर, यांनी अनुग्रहमीमांसा⁴ या ग्रन्थात अनुरोगासंबधी चिकित्सा केली आहे. मुंबईचे म्हसकर व वाटवे यांनी स्वास्थ्यवृत्तम्⁵ या ग्रन्थात स्वास्थ्य व दीर्घायुष्य यासंबधी प्रतिपादन केले आहे.

अमरावतीचे श्री पुरुषोत्तम सखाराम हिर्लेकर यांचे नाव सपूर्ण महाराष्ट्रात व विशेषतः विदर्भात उत्कृष्ट वैद्य म्हणून प्रसिद्ध होते. भारतीय आयुर्वेदीय शिक्षणसमितीचे कार्यकारी अध्यक्ष म्हणून त्यांनी फार मोठे कार्य केले. इ. १९४२ मध्ये शारीरं तत्त्वदर्शनम् (नाम वातादिदोषविज्ञानम्)⁶ या नावाचा ग्रन्थ लिहून आयुर्वेदाचा आधार जो त्रिदोषसिद्धान्त त्याची शास्त्रीयता प्रतिपादन करण्याचा उत्तम प्रयत्न त्यांनी केला. हा ग्रन्थ पूर्वार्ध व उत्तरार्ध असा विभागला असून प्रत्येक भागात दर्शन नामक १२ प्रकरणे आहेत. सपूर्ण ग्रन्थ अनुष्टुप छंदोबद्ध असून त्यावर स्वतः हिर्लेकर शास्त्र्यांनी 'समीक्षा' नावाची व्याख्या लिहिली आहे. अमरावतीचे वैद्य हरिहर वामन देशपांडे यांनी केलेला हिंदी अनुवादहि सोबत छापलेला आहे.

या ग्रन्थाचे मूळ श्लोक श्री हिर्लेकरांनी इ. स १९३० पूर्वी लिहिले होते. त्यासाठी १९३० च्या नि. भा. वैद्य सम्मेलनाच्या म्हैसूर अधिवेशनात त्यांना प्रथम सुवर्णपदक व प्रशंसापत्र प्राप्त झाले होते त्यानंतर त्यांनी उत्तरार्ध व सपूर्ण ग्रन्थावरील 'समीक्षा' व्याख्या लिहिली. या ग्रन्थाचे महत्त्व सांगताना नागपूरचे विख्यात नेत्र-चिकित्साविशारद डॉ क. नि. भिवापूरकर व अमरावतीचे डॉ. रावसाहेब श्री. वि. भागवत लिहितात '...वातादि तीन दोष, रसरक्तादि सात धातु और मलमूत्रादि मल इनकी आजतक हम (डाक्टर) लोग जो रूढ व स्थूल कल्पना कर लेते थे, वह कितनी अयथार्थ थी और उनका वास्तविक स्वरूप क्या है आदि बातों का प्रस्तुत ग्रन्थ द्वारा जितना सम्यक् परिचय हो सकता है उतना आयुर्वेदीय प्रणाली के याथार्थ्यका परिचायक अन्य ग्रंथ हमारे निदर्शन में अभी तक नहीं आया है।' (पृ. ३)

* * *

## तत्त्वज्ञान आणि न्यायशास्त्र

ललित वाङ्मयाचा परामर्श घेतांना, सर्वपुरम् अण्णय्याचार्यकृत 'तत्त्वगुणादर्शचम्पूः', गोकुलनाथ मैथिल (१८ वे शतक) याचे 'अमृतोदयम्' नाटक,

३. १९५८ मध्ये मुद्रित। ४. १९३८ मध्ये कालिकत येथे मुद्रित।
५. १९५४ मध्ये मुबईत मुद्रित:
६. सरस्वती मुद्रणालय, अमरावती येथे मुद्रित।

नरसिंहकविकृत 'अनुमितिपरिणयम्' नाटक व घट्टशेषार्यकृत 'सपिण्डीकरणनिरासम्' नाटक, यासारख्या शास्त्र–दर्शनात्मक ललित ग्रन्थाचा उल्लेख आलेला आहे. पण या प्रकारचे ललित साहित्य म्हणजे तत्त्वज्ञानपर मौलिक साहित्य नव्हे. तत्त्वज्ञानपर ग्रन्थात अर्वाचीन कालखंडात दक्षिण भारतातील शैव–वैष्णव वादाने बरीच भर पड लेली दिसते कर्नाटकातील हुक्केरीचा बसव नायक (१८ वे शतक) याने शिवतत्त्व रत्नाकर[1] हा ग्रन्थ लिहिला. म्हैसूरच्या द्वितीय कृष्णराजाचा सर्वाधिकारी नजराज (सगीतगगाधरम् (मुद्रित) या गेयकाव्याचा लेखक) याने शैव तत्त्वज्ञानविषयक एकूण १८ ग्रन्थ लिहिले.[2] मजारगुडीनिवासी त्यागराजमखी (राजू शास्त्रिगळ) याने शिवाद्वैताच्या समर्थनार्थ 'न्यायेन्दुशेखर' हा ग्रन्थ लिहिला, त्याचे खण्डन करण्यासाठी रामनद संस्थानच्या सेतुपतीचा आश्रित वेंकटेश याने 'निंदाव्हलोकी' अर्थात् 'विष्णुतत्त्वनिर्णय' हा वैष्णवमतानुसारी सटीक ग्रन्थ लिहिला. त्यावर एदय्यात्तुमङ्गलम् चा रहिवासी अप्पय्य दीक्षित (१८ वे शतक) याने 'विमत भजनम्' हा खण्डनात्मक ग्रन्थ लिहून त्यागराजमखीच्या शिवाद्वैत मताचे समर्थन करण्याचा प्रयत्न केला. याच पद्धतीने रामशास्त्रीच्या 'नवकोटी' या शैवसिद्धान्ती ग्रन्थाचे खण्डन करण्यासाठी अण्णगराचार्य शेष यानी 'दशकोटी' हा ग्रन्थ लिहिला. रामानुज व माध्व या द्वैत मताचे खडन करून अद्वैतमत प्रतिपादन करण्यासाठी महादेव नावाच्या लेखकाने 'प्रपञ्चामृतसार'[3] हा ग्रन्थ लिहिला. कडाड अप्प कोण्डाचार्य याने अद्वैतविरोधी व वैष्णव विशिष्टाद्वैतवादी साठ ग्रन्थ लिहिले, असा उल्लेख डॉ राघवन् यानी आपल्या एका लेखात[4] केला आहे. चम्पकेश्वर याने शाकर व माध्व मतविरोधी 'वादार्थमाला' या नावाची ग्रन्थमाला लिहून काढली वेदान्त देशिकाच्या 'शतदूषणी' चे खण्डन करण्यासाठी अन्दान श्रीनिवास याने 'सहस्रकिरणी' हा ग्रन्थ लिहिला

श्रीरगपट्टमच्या कौशिक रामानुजाचार्यांनी 'अथर्वशिखाविलास.' या ग्रन्थात वैष्णव मताचे प्रतिपादन केले वेदगर्भ पद्मनाभाचार्य (१८ वे शतक) यानी 'माध्व सिद्धान्तसार' हा स्वमतप्रतिपादक ग्रन्थ लिहिला. असा प्रकार 'परवादविवर्जित'

---

१ पालघाट येथे मुद्रित ।

२ मद्रास युनि जर्नल पृ १८३ प्रस्तुत प्रकरणात उल्लेखिलेल्या तत्त्वज्ञान व धर्मशास्त्रविषयक अनेक ग्रन्थाचा निर्देश–मद्रास युनि जर्नल (१९५७) मधील डॉ राघवन्च्या लेखात आढळेल

३ अड्यार येथे मुद्रित तजावरचा द्वितीय व्यकोजी याला या ग्रन्थाचा लेखक चुकीने मानण्यात येते या ग्रन्थाचे मराठी भाषान्तर उपलब्ध आहे

४ मद्रास युनि जर्नल पृ १८० ।

ग्रन्थ लिहिणारे लेखक म्हणजे, १०८ उपनिषदांवर व गीतेवर टीका[५] लिहिणारा *शाम्वीवरमूचा उपनिषद्ब्राह्मण हा सन्यासी*. *साख्य, योग व वेदान्त यांचा समन्वय* सिद्ध करण्यासाठी 'अनुभवामृतम्' हा (ज्ञानेश्वराच्या ग्रन्थाचें नाव स्मृतींत जागृत करणारा) ग्रन्थ लिहिणारा अप्पय्याचार्य (मृत्यु १९०१); भाष्यभानुप्रभा, श्रुतिमतोद्योतः व अद्वैतसिद्धान्तवैजयन्ती[६]चा लेखक त्र्यंबकशास्त्री; स्वाराज्यसिद्धि.[७], वेदान्तसिद्धान्तसूक्तिमञ्जरी[८] व सिद्धान्तचन्द्रिकोदय यांचा लेखक गगाधरेन्द्र सरस्वती; 'शाकरपदभूषणम्' व 'पदभूषणम्' (ही गीताटीका) लिहिणारा भोरनिवासी रघुनाथशास्त्री, पर्वते;[९] 'चित्तप्रदीप'[१०]चा लेखक वासुदेव (काश्मीरी पण्डित); विद्वन्मोदतरङ्गिणी[११] हा सवादनिष्ठ ग्रन्थ लिहिणारा चिरजीवी भट्टाचार्य (१८ वे शतक), चैतन्यमतानुसार ब्रह्मसूत्रावर 'गोविन्दभाष्यम्'[११] लिहिणारा बलदेव विद्याभूषण† *स्वामीभगवदाचार्य (गाधीचरित्रविषयक भारतपारिजातकम् या काव्याचे लेखक)* यांच्या ब्रह्मसूत्रवैदिकभाष्यम् व रामरक्षास्तोत्रभाष्यम् चा उल्लेख पूर्वार्धात आलाच आहे. नदियाचा रामानन्द (१८ वें शतक) याने अद्वैत, धर्मशास्त्र, शास्त्रमत, सङ्गीत, वास्तु इत्यादि विषयावर भरपूर लेखन केलें असा उल्लेख हरप्रसादशास्त्रींच्या प्रतिवृत्तात आहे.

याव्यतिरिक्त दिनेशचन्द्र सेन यानी Vishnava Literature in Mediaoval Bengal या ग्रन्थात ज्याचा निर्देश केला आहे असे, 'भक्तिरत्नाकर.' व 'नरोत्तमविलास.'चा लेखक नरहरिचक्रवर्ती, विश्वनाथचक्रवर्ती (१८ वें शतक, 'सारार्थबोधिनी' या भागवत टीकेचा लेखक) 'तत्त्वसारः'चा लेखक भट्टपल्ली रासालदास, न्यायरत्न राधामोहनशर्मा (१९ वें शतक) पचानन तर्करत्न इत्यादि बगालचे भक्तिमार्गी लेखक[१२] यात अन्तर्भूत होतात. तत्त्वज्ञान

---

५ मुद्रित। ६. वाणीविलासप्रेस येथे मुद्रित। ७ मद्रास येथे मुद्रित।

८ कलकत्ता संस्कृत सिरीजमध्ये मुद्रित १९३५।

* उपनिषद्-ब्राह्मणासबधी डॉ राघवन् यानी प्राच्यविद्यापरिषद् अन्नमलै अधिवेशनात निबध वाचला त्यात त्याच्या संगीतविषयक कार्याचा उल्लेख केला

९ श्री पो के. गोडे यांनी Poets of the Peshva Period या आपल्या लेखात (भा. इ स मं. पत्रिका १८-२) पर्वते प्रभृति महाराष्ट्रातील संस्कृत लेखकांचा परिचय दिला आहे

१० कलकत्ता येथे मुद्रित। ११. अलाहाबाद येथे भाषान्तरासह मुद्रित।

† 'साहित्यकौमुदी' या बलदेवाच्या ग्रन्थाचा परिचय पृ. ४३७ वर पाहा

१२. सी चक्रवर्तीकृत 'Bengal's contribution to Sanskrit literature' हा ग्रन्थ बगाली संस्कृत लेखकांच्या परिचयासाठी पाहा

विषयक निरन्ध ग्रन्थामध्ये अनेक दृष्टींनी प्रशंसनीय ग्रन्थ म्हणजे श्रीपादशास्त्री हसूरकर याचा मोक्षमन्दिरस्य द्वादशदर्शन-सोपानावलि.* हा होय. सर्वदर्शन संग्रहानन्तर भारतीय तत्त्वज्ञानाचा सर्वंकष परिचय देणारा प्रस्तुत ग्रन्थाव्यतिरिक्त दुसरा उत्तम संस्कृत ग्रन्थ नाही, असे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. चार्वाक; वैभाषिक, सौत्रान्तिक, योगाचार, माध्यमिक ( हीं चार बौद्धदर्शनें ) व जैन, हीं नास्तिक दर्शने आणि न्याय वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा ( ही आस्तिकदर्शने ) याचा प्रकरणशः २६७ पृष्ठामध्ये परिचय दिला असून त्यात उत्तरमीमांसेतील मध्व, रामानुज, वल्लभ व शकर या चार महनीय आचार्यांच्या दर्शनावर स्वतंत्र विवेचन आहे. उपसंहारात ( पृ २६८ ते २८७ ) या सर्व दर्शनाचा समन्वय आणि तत्त्वज्ञानाचा उपयोग सांगितला आहे. संपूर्ण ग्रन्थाची प्रतिपादनपद्धति व लेखनशैली अगदी नवीन स्वरूपाची असल्याने तत्त्वज्ञानासारख्या गहन विषयावरील हा ग्रंथ अत्यंत सुबोध झाला आहे.† तत्त्वज्ञानात्मक ग्रन्थ लेखनाची संस्कृतपण्डिताची परम्परा अशा प्रकारे अद्यायावत् अखण्डित राहिलेली दिसते.

## न्यायशास्त्र व खण्डन-मण्डनाची परम्परा

न्यायशास्त्रविषयक साहित्यात खण्डन मण्डनाची परम्परा गौतमाच्या न्याय सूत्रग्रन्थापासून दिसते. या प्रमाणभूत आद्य ग्रन्थातच बौद्धसिद्धान्ताचे खण्डन करणारीं काही सूत्र आढळतात.[13] या न्यायसूत्रावर वात्स्यायन[14] या प्रख्यात

* इ स १९२८ मध्ये इन्दोर सहकारी मुद्रणालय येथे मुद्रित । मू ३ रु.

† श्रीपादशास्त्री हसूरकराच्या इतर ग्रंथाचा परिचय पूर्वार्धात ( पृ. ४० व ५१-५२ ) आला आहे

१३ गौतमाच्या न्यायसूत्राचे बुद्धकालापेक्षा प्राचीनत्व मानणारे विद्वान असे मानतात की न्यायसूत्राची रचना एकदम झाली नसून क्रमश- त्यात भर पडत गेली " सबसे पूर्व गोतम के अध्यात्मप्रधान न्यायसूत्र की रचना हुई। उसके बाद अक्षपाद ने आन्वीक्षिकी न्यायविद्या का पृथक् करने के लिए उसके प्रमेयप्रधान स्वरूप के स्थल पर प्रमाणप्रधान स्वरूप देकर अक्षपाद ने उसका नवीन संस्करण किया। और बौद्ध युग में उनमें कुछ प्रक्षेप और परिवर्धन होकर ही न्यायशास्त्र को वर्तमान स्वरूप प्राप्त हो सका है।"

( आचार्य विश्वेश्वरशिरोमणि-तर्करहस्यदीपिका, पृ २९ )

१४. " वात्स्यायनो मल्लनागः कौटिल्यश्चणकात्मजः ।
द्रमिलः पक्षिलस्वामी विष्णुगुप्तोऽङ्गुलश्च सः ॥

हेमचन्द्राच्या अभिधानचिन्तामणि ग्रंथातील या उल्लेखावरून वात्स्यायन व चाणक्य हो एकच व्यक्ति मानतात.

श्री. सतीशचन्द्र विद्याभूषण यानी History of Indian Logic या आपल्या ग्रन्थांत हरिराम तर्कसिद्धान्त, कृष्णानन्द वाचस्पति, जगन्नाथ तर्कपञ्चानन, राधामोहन गोस्वामी, कृष्णकान्त (चिन्तामणि–उपमानखण्ड–व्याख्याकार), हरिराम, गगाराम जडी (जगदीशाच्या तर्कामृतावर टीका लिहिणारा), कृष्णभट्ट आर्डे (गादाधरीवर टीका लिहिणारा); रामनारायण, रामनाथ, इत्यादि १७–१८ व्या शतकातील व शंकर, शिवनाथ, कृष्णनाथ, श्रीराम, माधव, हरमोहन, प्रसन्नतर्करत्न इत्यादि १९ व्या शतकातील वंगवासी नैयायिक लेखकांचा परिचय दिला आहे.

प्राचीन लेखकाच्या टीका–उपटीकात्मक पद्धतीनुसारहि लेखन अर्वाचीन कालखंडात भरपूर प्रमाणात झाले आहे. अक्षपाद गौतम (किंवा गोतम) याच्या 'न्यायसूत्र' या मूळ ग्रन्थावर अर्वाचीन कालखण्डातील १७ व्या शतकात काही उल्लेखनीय टीकाग्रन्थ लिहिण्यात आले ते असेः—

| लेखक | | टीकाग्रन्थ |
|---|---|---|
| रामभद्र | ... | न्यायरहस्यम्। |
| विश्वनाथ | .. | न्यायसूत्रवृत्तिः। |
| गोविन्द शर्मा | ... | न्यायसंक्षेपः। |
| जयराम | ... | न्यायसिद्धान्तमाला। |

तेराव्या शतकात न्यायशास्त्रामध्ये गंगेशोपाध्यायाच्या 'तत्त्वचिन्तामणिः' या ग्रन्थापासून नव्यन्यायाची परम्परा सुरू झाली. (याच शतकात व्याकरण व वेदान्त शास्त्रातहि नव्यसम्प्रदायाचा आरंभ झाला. प्राचीन पद्धतीमध्ये ग्रन्थाचे स्वरूप लक्षणानुसारी असे, नव्य पद्धतीमध्ये तें लक्ष्यानुसारी झालें.) नव्यन्यायाच्या परम्परेत अर्वाचीन कालखण्डात अनेक लेखक झाले. आचार्य विश्वेश्वर सिद्धान्तशिरोमणि यानी आपल्या 'तर्करहस्यदीपिका' व्याख्येच्या प्रस्तावनेत[१५] सर्वच नव्य नैयायिकांची नामसूची दिली आहे. त्या सूचींतील अर्वाचीन कालखण्डातील लेखकांचीं नावे पाहा :—[१६]

---

१५. पृ. ४८ ते ५५।

१६. नव्यन्याय लेखकांची मैथिल परम्परा १३ व्या शतकात सुरू होऊन १६ व्या शतकात खण्डित झाली. १६ व्या शतकापासून वासुदेव सार्वभौम याने नव्य न्यायाची नवद्वीप शाखा सुरू केली. प्रस्तुत सूचीत अर्वाचीन नवद्वीप शाखेतील लेखकांचा उल्लेख आहे.

| लेखक | शतक | ग्रन्थ |
| --- | --- | --- |
| रघुनाथशिरोमणि ( वासुदेव सार्वभौमाचा शिष्य ) | १६-१७ | तत्त्वचिन्तामणिदीधितिः। बौद्धधिक्कारः। शिरोमणिः। पदार्थतत्त्वनिरूपणम्। किरणावलीप्रकाशदीधितिः। न्यायलीलावतीप्रकाशदीधितिः। अवच्छेदकत्वनिरुक्तिः। खण्डनखण्डखाद्य-दीधिति.। आख्यातवादः। नञ्वादः। (एकूण ९ ग्रंथ) |
| हरिदास-न्यायालङ्कार-भट्टाचार्य ( वासुदेव सार्वभौमाचा शिष्य ) | १६-१७ | न्यायकुसुमाञ्जलिकारिकाव्याख्या। तत्त्वचिन्तामणिप्रकाशः। भाष्यालोकटिप्पणी। |
| जानकीनाथ शर्मा | ,, | *न्यायसिद्धान्तमञ्जरी।* |
| कणाद तर्कवागीश | १७ | मणिव्याख्या। भाषारत्नम्। अपशब्दखण्डनम्। |
| रामकृष्ण भट्टाचार्य चक्रवर्ती ( रघुनाथशिरोमणीचा पुत्र ) | १७ | गुणशिरोमणी-प्रकाशः। न्यायदीपिका। |
| मथुरानाथ तर्कवागीश (रघुनाथाचा पुत्र) | १७ | याने एकूण १० ग्रन्थ लिहिले. त्यांपैकी 'आयुर्वेदभावना' हा ग्रन्थ वगळल्यास इतर न्यायविषयक आहेत. ते असे — तत्त्वचिन्तामणिरहस्यम्। (तत्त्वचिन्तामणि-) -आलोकरहस्यम्[१७]। दीधितिरहस्यम्[१८]। सिद्धान्तरहस्यम्। किरणावलीप्रकाशरहस्यम्[१९]। *न्यायलीलावतीप्रकाशरहस्यम्*[२०]। न्यायलीलावतीरहस्यम्। बौद्धधिक्काररहस्यम्। व आदिक्रियाविवेकः। |
| कृष्णदास सार्वभौम भट्टाचार्य | १७ | तत्त्वचिन्तामणिदीधितिप्रसारिणी, अनुमानालोकप्रसारिणी। |

१७. पक्षधर मिश्र जयदेव (१३ वे शतक) याच्या तत्त्वचिन्तामणि-आलोक या ग्रन्थाची टीका।

१८. पिता रघुनाथ शिरोमणि याच्या ग्रंथाची टीका।

१९. वर्धमानोपाध्यायाच्या (१३ वे शतक) किरणावली-प्रकाशाची टीका।

२०. वर्धमानोपाध्यायाच्या न्यायलीलावतीची टीका।

| लेखक | शतक | ग्रन्थ |
|---|---|---|
| गुणानन्द विद्यावागीश | १७ | अनुमानदीधितिविवेकः। आत्मतत्त्वविवेक-दीधिति–टीका। गुणविवृत्तिविवेकः। न्यायकुसुमाञ्जलिविवेकः। न्यायलीलावती-प्रकाश-दीधितिविवेकः। व शब्दलोकविवेकः। (एकूण ६ ग्रन्थ) |
| रामभद्र सार्वभौम | १७ | दीधितिटीका। न्यायरहस्यम्। गुणरहस्यम्। न्यायकुसुमाञ्जलिकारिकाव्याख्या। पदार्थ-विवेकप्रकाशः। षट्चक्रकर्मदीपिका। (एकूण सहा ग्रन्थ) |
| जगदीश तर्कालंकार | १७ | तत्त्वचिन्तामणिदीधितिप्रकाशिका–(जागदीशी)। तत्त्वचिन्तामणिमयूखः। न्यायादर्शः (न्यायसारावली)। शब्दशक्तिप्रकाशिका। तर्कामृतम्। पदार्थतत्त्वनिर्णयः। न्यायलीलावतीदीधितिव्याख्या। (एकूण ७ ग्रन्थ) |
| रुद्र न्यायवाचस्पति | १७ | त. चि. दीधितिपरीक्षा। किरणावलीप्रकाश-विवृत्तिपरीक्षा। पदार्थखण्डनव्याख्या।[21] |
| भवानन्द सिद्धान्तवागीश | १७ | त. चि. दी. प्रकाशिका। प्रत्यगालोकसार-मञ्जरी। तत्त्वचिन्तामणि-टीका।[22] |
| हरिराम तर्कवागीश | १७ | त. चि. टीकाविचारः। आचार्यमतरहस्य-विचारः। रत्नकोषविचार.। स्वप्रकाश-रहस्यविचारः। (एकूण चार ग्रन्थ) |
| रामभद्र सिद्धान्तवागीश | १७ | सुबोधिनी (शब्दशक्तिप्रकाशटीका) |
| गोविन्द न्यायवागीश | १७ | न्यायसंक्षेपः। पदार्थखण्डनव्याख्या। समासवादः। |

२१. भावविलासः (राजस्तुतिविषयक) व भ्रमरदूतम् (पूर्वार्ध पृ. १४० पाहा) ही दोन काव्ये लिहिली आहेत.

२२. कारकविवेचनम् हा व्याकरणविषयक ग्रन्थ.

| लेखक | शतक | ग्रन्थ |
| --- | --- | --- |
| रघुदेव न्यायालंकार | –१७ – | त चि. गूढार्थदीपिका। नवीननिर्माणम्, दीधिति टीका। न्यायकुसु० कारिका-व्याख्या द्रव्यसार-सङ्ग्रहः। पदार्थखण्डनव्याख्या। |
| गदाधर भट्टाचार्य | –१७ – | त चि. दीधितिप्रकाशिका। त. चि. व्याख्या। त. चि. आलोकटीका। मुक्तावलीटीका। रत्नकोषवादरहस्यम्। अनुमानचिन्तामणि दीधिति टीका। आख्यातवादः। कारकवादः। नञ्वादः। प्रामाण्यवाददीधिति टीका। शब्दप्रामाण्य वादरहस्यम्। बुद्धिवादः। मुक्तिवादः। विधिवादः। विषयतावादः। व्युत्पत्तिवादः। शक्तिवादः। स्मृतिसंस्कारवादः। (एकूण १८ ग्रंथ) |
| विश्वनाथ सिद्धान्तपञ्चानन | –१७ – | अलङ्कारपरिष्कारः। नञ्वादटीका। न्यायसूत्रवृत्ति। पदार्थतत्त्वालोकः। न्यायतन्त्रबोधिनी। भाषापरिच्छेदः। याव्यतिरिक्त सुवर्थतत्त्वालोकः व पिङ्गलप्रकाशः हे अन्यशास्त्रीय ग्रंथ। |
| नृसिंहपञ्चानन | –१७– | न्यायसिद्धान्तमञ्जरीभूषा। |
| श्रीकृष्ण न्यायालंकार | –१७ – | भावदीपिका (न्यायसिद्धान्तमञ्जरी टीका) |
| राजचूडामणि मखी | –१७ – | तत्त्वचिन्तामणिदर्पणः। |
| धर्मराजाध्वरीण | –१७ – | त. चि. प्रकाशटीका। |
| गोपीनाथ मौनी | –१७ – | शब्दालोकरहस्यम्। उज्ज्वला (तर्कभाषा-टीका)। पदार्थविवेकटीका। |
| रामदेव चिरञ्जीव | –१७–१८ – | विद्वन्मोदतरङ्गिणी। काव्यविलासः। (वृत्तरत्नावली)। व (माधवचम्पूः) |
| रामरुद्र तर्कवागीश | –१७–१८ – | त. चि. दीधितिटीका। व्याप्तिवाद-व्याख्या। दिनकरीय-प्रकाशतरङ्गिणी तत्त्वसङ्ग्रहदीपिकाटिप्पणी। सिद्धान्तमुक्तावलीटीका। (कारकनिर्णय-टीका) |

| लेखक | शतक | ग्रन्थ |
|---|---|---|
| जयराम तर्कालंकार | १७-१८ | शक्तिवादटीका। |
| जयराम न्यायपञ्चानन | १७-१८ | त. चि. दी. गूढार्थविद्योतनम्। त. चि. आलोकविवेकः। न्यायसिद्धान्तमाला। गुणदीधितिविवृत्तिः। न्यायकुसुमाञ्जलिकारिका-व्याख्या। पदार्थमणिमाला। [२३] (एकूण आठ ग्रन्थ) |
| गौरीकान्त सार्वभौम | १८ | भावार्थदीपिका (तर्कभाषाटीका)। सद्युक्तिमुक्तावलिः। आनन्दलहरीतरी। विदग्धमुखमण्डनवीटिका। (एकूण चार ग्रन्थ) |
| रुद्रराम | १८ | वादपरिच्छेदः। व्याख्याव्यूहः। चित्तरूपम्। अधिकरणचन्द्रिका। वैशेषिकशास्त्रीयपदार्थनिरूपणम्। |
| कृष्णकान्त विद्यावागीश | १८ | न्यायरत्नावली। उपमानचिन्तामणिटीका। शब्दशक्तिप्रकाशिका॥ अवान्तर ग्रन्थ—गोपाललीलामृतम्। चैतन्यचन्द्रामृतम्।, कामिनीकामकौतुकम्। |
| कृष्णभट्ट आर्डे | १८ | गादाधरीकर्णिका। |
| महादेव उत्तमकर | १८ | व्याप्तिरहस्यटीका। |
| रघुनाथशास्त्री | १९ | गदाधरीपञ्चवादटीका। |

अन्नम्भट्टाचा तर्कसंग्रह व केशवमिश्रान्ची तर्कभाषा (१३ वा श) हे दोन ग्रन्थ न्यायविषयक ग्रन्थात अत्यंत लोक लोकप्रिय आहेत. त्यापैकी तर्कसंग्रहावर महादेव पुणतामकर, रुद्रराम, व नीलकण्ठ यानी प्रत्येकी स्वतन्त्रपणे टीका लिहिल्याबद्दल्चा उल्लेख सतीशचन्द्र विद्याभूषणांनी आपल्या इतिहासात केला आहे.

'तर्कभाषा' ग्रंथावर सामान्यतः उत्तम अशा १४ टीका लिहिण्यात आल्या. त्यापैकी नागेशभट्टकृत 'युक्तिमुक्तावली', विश्वकर्मकृत 'न्यायप्रदीपः' यासारख्या अर्वाचीन कालखण्डातील टीका उल्लेखनीय आहेत.

---

२३. वृंदावनविनोदम् हें काव्य व काव्यप्रकाशतिलकः हा साहित्यशास्त्रीय ग्रन्थहि जयरामाने लिहिला आहे.

श्रवण बेळगोळचा जैनपण्डित अभिनव चारुकीर्ति पण्डिताचार्य याने 'प्रमेय रत्नालङ्कार' व इतर न्यायविषयक ग्रन्थ लिहिले आहेत

*    *    *

## धर्मशास्त्र

सतराव्या शतकापासून धर्मशास्त्रविषयक लेखनाला निरनिराळ्या कारणास्तव विशेष चालना मिळालेली दिसते. त्यामध्ये काही शासनकर्त्यांची या विषयासंबंधीची आस्था हें एक महत्त्वाचें कारण आहे सिद्धान्तकौमुदीवर 'बाल–मनोरमा' ही उत्कृष्ट टीका लिहिणाऱ्या वासुदेव दीक्षिताने अध्वरमीमांसाकुतूहलवृत्ति हा ग्रंथ लिहून शिवाय यज्ञेश्वर दीक्षिताच्या सहकार्याने 'बोधायनश्रौतसूत्रव्याख्या' हा धर्मशास्त्रविषयक ग्रन्थ लिहिला. तंजावरच्या सर्फोजी भोसल्याच्या कारकीर्दीत (इ. स १८००–३२) साम्राज्यलक्ष्मी–पीठिका[13] हा मन्त्रसंग्रहात्मक ग्रंथ तयार करण्यात आला तंजावरच्या श्रीधरवेंकटेश अय्यावळाचा शिष्य याणी अण्णाव्या या भरवात तेलगू कवीने 'व्यासतात्पर्यनिर्णय' व 'यज्ञशास्त्रार्थनिर्णय' हे ग्रन्थ लिहिले. श्री पी के गोडे यानी Studies in Indian Literary History या ग्रंथात, 'धर्मतत्त्वप्रकाश' चा लेखक शिवदीक्षित (महाभारतावरील नीलकण्ठी–टीकाकाराचा वंशज — १८ वें शतक) 'प्रतिष्ठेन्दु' चा लेखक त्र्यम्बकभट्ट, पञ्चवटीनिवासी अच्युतराव मोडक (याने एकूण ३० ग्रन्थ लिहिले), भट्टचिन्तामणिकार वाञ्छेश्वर, 'धर्मनौका' ग्रन्थाचा लेखक अद्वैतेन्द्रयति (अहमदनगराजवळ वास्तव्य) इत्यादि महाराष्ट्रांतील धर्मशास्त्रविषयक लेखकाचा निर्देश केला आहे. जयपूरच्या रामसिंगाच्या आदेशानुसार 'धर्मसंग्रह' हा ग्रन्थ लिहिणाऱ्या हरिश्चंद्र (१९ वें शतक) या लेखकाचाहि निर्देश श्री गोडे यानी केला आहे. राजस्थानमध्ये धर्मशास्त्रावर लिहिणाऱ्या लेखकांमध्ये 'जयसिंहकल्पद्रुम' चा कर्ता रत्नाकर पण्डित (१८ वें शतक), आचारामृतचन्द्रिकाकार सदाशिव दशपुत्र, 'निर्णयकौस्तुभ' व 'प्रतापार्क' चा लेखक विश्वेश्वर (रत्नाकर पण्डिताचा वंशज) व 'वैष्णिक-वैष्णवसदाचार' चा लेखक हरिकृष्ण (व्रजनाथ नावाच्या पण्डिताने या ग्रन्थात पुढे सुधारणा केली) हे लेखक उल्लेखनीय आहेत.

काश्मीरमध्ये १९ व्या शतकात शिवशंकर पण्डिताने 'रणवीररत्नाकर हा ग्रन्थ धर्मशास्त्राविषयीं लिहिला. काश्मीरातील संस्कृत परम्परेमध्ये प्रश्नार्थरत्नावली या ज्योतिषशास्त्रविषयक ग्रन्थाचा लेखक लाल पण्डित, 'विषहरमन्त्रम्' या आयुर्वेदविषयक ग्रन्थाचा लेखक गणेश पण्डित (जम्मूनिवासी) आणि स्वस्तिप्रश्ना

१३ सरस्वती महाल लायब्ररीतर्फे मुद्रित ।

(तत्त्वज्ञानविषयक) व रणवीरज्ञानकोषः चा लेखक विश्वेश्वर पण्डित यांचीं नांवें विशेष उल्लेखनीय आहेत. हे ग्रन्थ काश्मीरांतील हिंदु राजवटींत निर्माण झाले असले तरी एकूण सामाजिक परिस्थिति संस्कृत ग्रन्थ लेखनाला प्रतिकूल असल्याने, तसल्या परिस्थितींत निर्माण झालेल्या ग्रन्थांना कांही निराळें महत्त्व आहे.

इंग्रज प्रशासकांच्या प्रेरणेने निर्माण झालेला धर्मशास्त्रविषयक अर्वाचीन ग्रन्थ या दृष्टीने 'विवादार्णवसेतुः' या ग्रन्थाचा उल्लेख करण्यासारखा आहे. हा ग्रन्थ निर्माण करण्यासाठी वॉरन् हेस्टिंग्जने एक पण्डितसमिति नियुक्त केली होती. त्या समितीत बाणेश्वर नांवाचा मोठा धर्मशास्त्री होता. बंगालांतील तत्कालीन अनेक राजांची (त्यांत मुर्शिदाबादचा अलीवर्दीखान हाहि एक होता) या बाणेश्वरावर मोठी कृपा होती. हा मूळचा हुगळी जिल्ह्यांतील गुप्तपल्लीचा रहिवासी होता, पण निरनिराळ्या राजेमहाराजांच्या संबंधात ठिकठिकाणीं त्याचे वास्तव्य घडलें. बरद्वानचा राजा चित्रसेन याच्या प्रेरणेने चित्राभिषेकः, चित्रचम्पूः व रहस्यामृतम् हे ग्रन्थ बाणेश्वराने लिहिले. वाराणसी या पवित्र नगरीच्या स्तवनार्थ वाराणसीशतकम् हें काव्यहि त्याने लिहिलें आहे.

वॉरन् हेस्टिंग्जच्या समितीतील दुसरा उल्लेखनीय धर्मशास्त्रज्ञ म्हणजे नव्य-धर्म-प्रदीपिकाकार कृपाराम तर्कवागीश हा मैथिल पण्डित होय. मैथिल धर्मशास्त्रज्ञांमध्ये चित्रदास, चित्रपतिदास, अपूर्छ झा. रूपनाथ (रामविजय काव्याचा लेखक) हीं नावें उल्लेखनीय आहेत.

सर विल्यम् जोन्सच्या प्रेरणेने सर्वोरुशर्मा त्रिवेदी याने 'विवादसारार्णवः' हा ग्रन्थ लिहिला. त्याच प्रकारचा दुसरा ग्रन्थ म्हणजे जगन्नाथ तर्कपञ्चाननकृत 'विवादभङ्गार्णवः' हा होय. ओर्छाचा राजा वीरसिंहदेव (इ. १६०५-१६२७) याच्या प्रेरणेने मित्रमिश्र या गौड पंडिताने 'वीरमित्रोदयः' हा धर्मशास्त्र-विषयक महत्त्वाचा ग्रंथ लिहिला. मित्रमिश्राच्या आनन्दकन्दचम्पूचा उल्लेख पूर्वी आलाच आहे.

'धर्मसिन्धुः' ग्रन्थाचा महाराष्ट्रीय लेखक कृष्णनाथ याचा निर्देश म. म. पां. वा. काणे यांच्या History of Dharmashastra या प्रख्यात ग्रन्थांत (खण्ड १ पृ. ४६३) आढळतो. याव्यतिरिक्त धर्मशास्त्रावरील महाराष्ट्रीय लेखक धर्मतत्त्वप्रकाशकार शिवदीक्षित, प्रतिष्ठेन्दुकार त्र्यम्बकभट्ट, व अच्युतराव मोडक यांचा उल्लेख वर आलाच आहे. धुळ्याचे विख्यात विद्वान म. म. श्रीधरशास्त्री पाठक यांची धर्मशास्त्रावरील व्याख्यानें पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली असून नागपूर विश्वविद्या-

१४. मुंबईत मुद्रित ।

त्याच्या मीमांसा व धर्मशास्त्रविषयक 'शास्त्री' परीक्षेच्या अभ्यासक्रमात त्या पुस्तकाला स्थान देण्यात आले आहे.

वाराणसीच्या समरसिंहाचा आश्रित अन्नमट्ट मीमांसक याने सदाचाररहस्यम् हा ग्रन्थ लिहिला. नागोजीभट्ट या वाराणसीवासी महाराष्ट्रीय लेखकाने अनेक विषया वर मौलिक लेखन केलें त्यात धर्मशास्त्रावरील ग्रन्थ आहेतच. रामेश्वर (१८ वें श.) या वाराणसीस्थ मीमांसकाने विधिविवेक हा ग्रन्थ लिहिला.

बंगालच्या रघुदेव नैयायिकाने 'दिनसङ्ग्रह' हा दिवसाचें शुभाशुभ स्वरूप सांगणारा धर्मशास्त्रविषयक ग्रन्थ लिहिला आहे.

धर्मशास्त्रविषयक लेखनामध्ये विशेष उल्लेखनीय व्यक्ति म्हणजे 'स्मृतिरत्न प्रकाशिका' कर्त्री कामाक्षी (१९ वें शतक) ही आन्ध्रप्रांतीय लेखिका होय. ललित लेखन करणाऱ्या अनेक लेखिकांचा परिचय 'क्षमादेवीराव यांच्या चरित्राच्या अनुषगाने (पृ. ४११ १३) आम्ही दिला आहे. धर्मशास्त्रासारख्या विषयावर किंबहुना एकूण शास्त्रीय विषयावर लिखाण करणारी महिला विरळाच. प्रस्तुत ग्रन्थाव्यतिरिक्त 'नीलकण्ठीय-विषयमाला' व 'अद्वैतदीपिका' हे शास्त्रीय ग्रन्थ कामाक्षीने लिहिले असून ते सर्व कुम्भकोणममध्ये मुद्रित झाले आहेत. कामाक्षीने हें लेखनकार्य वैधव्य-दशेत केलें.*

## शिवराजाभिषेकप्रयोगः

धर्मशास्त्रविषयक अर्वाचीन कालखंडातील एक महत्त्वाचा ग्रंथ म्हणजे गागाभट्ट काशीकरकृत 'शिवराजाभिषेकप्रयोग' हा होय. धर्मशास्त्रान्तर्गत संस्कृत ग्रंथामध्ये राजाभिषेकविषयक निदान १०-१५ प्रमुख ग्रंथ आढळतात. त्यातील काही, एका राजानन्तर दुसरा राजा गादीवर येताना तयार करण्यात आले आहेत. पुण्यश्लोक शिवाजीमहाराजाच्या सिंहासनारोहणाला अनेक दृष्टींनी असाधारण महत्त्व असल्याने तत्कालीन महान् मीमांसक व धर्मशास्त्रज्ञ ('कलियुगीचा ब्रह्मदेव' असे ज्याचें बखरकारांनी वर्णन केलेलें आहे) गागाभट्ट काशीकर यानी त्या राष्ट्रीय महोत्सवा साठी राज्याभिषेकप्रयोगाचा स्वतंत्र ग्रन्थ तयार केला.

राजाभिषेकस्य महाप्रयोगं विश्वेश्वरो दिनकरिस्तनोति ।

---

* धर्मशास्त्राच्या क्षेत्रात आधुनिककालात निर्माण झालेल्या समस्यांना अनुलक्षून लिहिण्यात आलेल्या 'अधिनौयानमीमांसा', 'बालविवाहहानि' प्रकाश इत्यादि निबन्धग्रन्थांचा परिचय पूर्वार्धे पृ २१३-२१४ वर पाहा

(विश्वेश्वर हें गागाभट्टाचें नाव) या आरंभीच्या श्लोकार्धात व "इति श्रीमन्मीमांसक-भट्टनारायणसुत-श्रीमद्रामकृष्णतनुज-भट्टदिनकरसूनु-गागाभट्टनामक-विश्वेश्वरकृतौ राज्याभिषेकप्रयोग " या शेवटच्या वाक्यात गागाभट्टानी स्वतःच्या ग्रन्थकर्तृत्वाचा स्वच्छ निर्देश केलेला आहे. हा ग्रन्थ पुण्याचे इतिहाससंशोधक श्री वा. सी बेन्द्रे यानी मोठ्या प्रयासाने तीन वर्षापूर्वी संपादित केला* व त्याला ४२ पृष्ठांची अभ्यासपूर्ण प्रस्तावना जोडून शिवचरित्रविषयक एका अत्यंत महत्त्वपूर्ण घटनेसंबंधीचें भ्रमजाल दूर करण्याचे साधन उपलब्ध करून दिलें. या अल्प ग्रन्थात राज्याभिषेका प्रीत्यर्थ करावयाचे निरनिराळे विधि दिनक्रमानुसार सात दिवसात जसे करावयाचे होते तसे, शिवाजी महाराजांच्या मुख्य पुरोहिताच्या मार्गदर्शनार्थ लिहून काढलेले आहेत. गागाभट्टाचे गुरुबंधु श्रीमद् अनन्तदेवभट्ट ( पैठणवासी ) यानी **राजधर्म कौस्तुभ** ' या नावाचा या विषयावरील एक ग्रंथ लिहिला आहे. तो अधिक सविस्तर असून त्यात पौराणिक मन्त्राचें स्वतंत्र प्रकरण आहे. गागाभट्टानी पौराणिक मन्त्राना आपल्या ग्रंथात स्थान दिलेले नाही ' शिवराजाभिषेकप्रयोग ' हा ग्रंथ सर्वस्वी वैदिक मन्त्रमय आहे. प्रस्तुत ग्रंथाचें मूळ हस्तलिखित बीकानेर राज्याच्या राजहस्तलिखित संग्रहात होतें.

शिवराज्याभिषेकाची घटना राष्ट्रीय दृष्ट्या अत्यंत महत्त्वाची असल्याने व प्रस्तुत ग्रन्थात तिचें अधिकृत स्वरूप आढळत असल्याने तिचें संक्षिप्त निवेदन या ठिकाणीं करणें अप्रस्तुत होणार नाही.

राज्याभिषेक विधीच्या आरंभापूर्वी महाराजाचा व्रतबंध झाला. त्यानंतर ' ब्रह्महत्यादिसकलपापक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ' "अग्निदैवत्य हिरण्य, पितृदैवत्य रजत स्वशरीरसमधिकतया तोलित कुर्वन् ऋत्विग्भ्योऽहं संप्रददे", असें म्हणून महाराजानी तुलादान विधि केला. हा विधि श्रीगागाभट्टांनी स्वतंत्रपणे रचला. त्या नतर महाराजाचे पूर्वपरिणीत भार्यांशी वैदिक पद्धतीने समन्त्रक विवाह झाले ( राजाभिषेकाच्या महान् समारंभाची नांदी किंवा प्रस्तावना म्हणून हे विधि झाले. ) त्यानंतर जेष्ठ शु ६, शनिवार, शके १५९६ (३० मे १६७४) या मङ्गलदिवशीं,

> "मम प्रजापालनाधिकारसिद्धिद्वारा परमेश्वरप्रीत्यर्थं साम्राज्यादिफलप्राप्त्यर्थं गणेशपूजन तदङ्गत्वे ब्राह्मणे पुण्याहवाचन पूजन नान्दीश्राद्ध पुरोहित वरणादि च करिष्ये"

असा संकल्प सोडून महाराज अभिषेकासाठी सिद्ध झाले.

दुसऱ्या दिवशीं ऐन्द्रशान्ति, ऐशानयाग,

---

* प्राप्तिस्थान—पी पी एच बुक स्टॉल, मुंबई, मूल्य ३ रु

तिसऱ्या दिवशीं ग्रहयज्ञ, नक्षत्रहोम,

चवथ्या दिवशीं मगळवार व नवमी हा निषिद्ध दिवस आल्याने समारंभ बंद राहिला.

पाचव्या दिवशीं उत्तरपूजनानन्तर आचार्यांना प्रतिमादान केलें

सहाव्या दिवशीं कृष्णवस्त्र परिधान करून पक्व-अपक्व मास, मत्स्य व सुरा यानी युक्त असा निर्ऋतियाग, व

सातव्या दिवशीं ऐन्द्रशान्तिसमाप्ति, सहस्रब्राह्मण भोजन झाल्यावर मंडप पूजन, विविधकुम्भस्थापना, महावेदीवर अग्नि व ग्रह याची प्रतिष्ठापना, होम (या होमाच्यामध्यें सर्व वेदाच्या सर्वशाखीय ब्रह्मवृन्दानी वेदमन्त्राचा उद्घोष केला द्वारपालानी द्वारजप केला) पूर्णाहुतीनतर महाराज अभिषेक शालेंत गेले. तेथे सुगधि तैलें, चूर्णे विविध मृत्तिका, पञ्चामृत इत्यादींनी युक्त अशीं समत्रक स्नानें त्याना घातलीं. त्यानतर शुभ्रवस्त्रें व चन्दन धारण करून वेदमन्त्राच्या पावनमङ्गल घोषात मण्डपप्रवेश करून वदीवर प्रतिष्ठित केलेल्या आसदीवर दोन गुडघे टेकून महाराजानी विधिपूर्वक आरोहण केले नतर अभिषेक झाला पुढे अग्निप्रार्थनेनतर अभिषेकशालेतील सुवर्ण सिंहासनावर आरोहण झाल्यावर प्रति 'इन्द्र' झालेल्या शिवप्रभूला ब्राह्मणामात्यानी हात धरून--

"महते क्षत्राय, महते आधिपत्याय, महते जानराज्याय, एष वो मरता राजा सोमोऽस्माक ब्राह्मणाना राजा" अशी उद्घोष करीत निरनिराळ्या पवित्र उदकानी अभिषेक करण्यासाठी अभिषेकशालेत नेले तेथें मन्त्रपाठादिकाच्या उद्घोषात अभिषेकविधि समाप्त झाला

सात दिवसपर्यंत शास्त्रशुद्ध पद्धतीने चाललेल्या या महामङ्गल समारंभातील केवळ प्रमुख विधींचा निर्देश ग्रन्थाच्या अतरंगाच ओझरतें दर्शन घडावें म्हणून येथे केला आहे यात्यतिरिक्त इतर बरेच विधि यथावसार झाले त्याच्या इत्यभूत माहितीसाठी मूल ग्रन्थ पाहणेंच उचित होईल.

गागाभट्ट काशीकराच्या शिवार्कोदय, दिनकरोद्योत, निरूढप्रतिबन्धप्रयोग, पिण्डपितृप्रयोग कायस्थधर्मप्रदीप, सुशानदुर्गोदय, या धर्मशास्त्रविषयक व मीमासा कुसुमाञ्जलि, भाट्टचिन्तामणि, इत्यादि मीमासाशास्त्रविषयक ग्रन्थाचा निर्देश पूर्वार्धात 'शिवाजी महाराजाची सस्कृतनिष्ठा' या प्रकरणात (पृ १०१) आला आहे.

महाराष्ट्रातल्या स्येनवी जातीच्या धर्मकर्माधिकारासबधीं अधिकृत निर्णय देण्याचें कार्य शिवाजी महाराजानी गागाभट्टावर सोपविले होतें (गागाभट्ट व शिवाजी

महाराज यांचा दृढ परिचय राज्याभिषेकापूर्वी निदान दहा वर्षांपासून होता) तदनुसार इ. स. १६६४ मध्ये त्यांनी 'श्येनवीजातिनिर्णयः' नांवाचा धर्मशास्त्रीय ग्रन्थ लिहिला. त्यामध्ये शिवाजी महाराजाची स्तुति पुढील सुभाषितांत केलेली आहे:—

यस्मिन्नसाधारणधैर्यशौर्य –
गाम्भीर्य–सौन्दर्य–गुणैकधुर्ये ।
गिरीन्द्र–भीमानुज–सिन्धुराज –
स्मराश्च साधारणतां भजन्ते ॥

दानाय द्रविणार्जनं जनपरित्राणाय वीरव्रत
सत्याय प्रियभाषणं हरिपदध्यानाय चेतःस्थितिः ।
यत्सख्येन च चक्रवर्तिपदवीं याता नृपा भूरिशो
दिल्लीन्द्रः क्षयमाप यस्य कलहाल्लकेशतुल्योपमः ॥

विश्राणनेषु व्यसनं यदीयं
विद्याप्रसङ्गेषु विनोदसौख्यम् ।
यस्यावदात च यशोवितान
दिङ्मण्डलीमण्डपमातनोति ॥

---

प्रकरण ३० वे

# कांही महत्त्वाचे ग्रन्थ

मागील प्रकरणांतून शेकडों ग्रंथाचा व ग्रंथकाराचा निर्देश विविध विषयांच्या अनुरोधाने आम्ही केला त्यातील सर्वच ग्रंथ सारख्याच महत्त्वाचे आहेत असें नाही. विशेष महत्त्वाचे ग्रंथ "चन्दन न वने वने" या न्यायाने वाटेल त्या ठिकाणीं वाटेल त्यावेळीं निर्माण होत नसतात. व्यास-कालिदासासारखे युगप्रवर्तक लेखक आदर्श ग्रंथ निर्माण निर्माण करतात व त्याचें अनुकरण करीत इतर साहित्यिक विविध स्वरूपाची साहित्य निर्मिति करीत असतात. पूर्वीच्या प्रकरणातून उल्लेखिलेल्या अनेक ग्रंथावर एक एक स्वतंत्र प्रकरण लिहिता येणं सहज शक्य आहे. तसेंच प्रत्येक लेखकाच्या चरित्रासंबंधीसुद्धा रोचक व बोधक माहिती लिहिता येणे शक्य आहे. काही लेखकाचें वाङ्मयकार्य इतके भव्य व इतक्या विविध स्वरूपाचें आहे की त्याच्या संबंधीं स्वतंत्र प्रबंध सुद्धा लिहिता येतील. प्रस्तुत प्रकरणात त्या दिशेने मार्गदर्शक व्हावें या उद्देशाने आम्ही स्वेच्छेनुसार केवळ तीन ग्रंथाचा सविस्तर परिचय पुढे देत आहोंत. त्यावरून स्थालीपुलाकन्यायाने या विषयाची गभीरता व व्यापकता लक्षात येऊ शकेल. अर्वाचीन संस्कृत साहित्यिकांच्या अभ्यासकानी आपल्या आवडीचे ग्रंथ व ग्रंथकार यासंबंधीं शक्य तितकी अधिक माहिती स्फुटलेखाच्या रूपाने जनतेपुढे आणणे आज आवश्यक झालेले आहे.

## शिवभारतम्

संस्कृत साहित्यामध्ये महाराष्ट्राच्या इतिहासाशी संबधित असलेल्या ग्रंथामध्ये जयराम कृत 'पर्णालपर्वतग्रहणाख्यानम्' रघुनाथपंडित कृत 'राज्यव्यवहारकोश', छत्रपति संभाजीविरचित 'बुधभूषणम्' या सारखे काही ग्रंथ अत्यंत महत्त्वाचे आहेत पण त्या सर्वांमध्ये कवींद्र परमानंदाच्या 'शिवभारताचें' महत्त्व आगळेंच आहे. याचे कारण शिवाजी महाराजांच्या विभूतिमत्त्वाविषयींची भारतीयांची आत्यंतिक श्रद्धा हें होय. शिवाजी महाराजाचें चरित्र हें रामचंद्राच्या चरित्राप्रमाणें पापनाशक आहे, अशी श्रद्धा शिवाजी महाराजांच्या काळातच समाजामध्ये निर्माण झालेली दिसते. शिवभारतकार कवीन्द्र परमानंद शिवचरित्राविषयीं लिहितात—

कलिकल्मषहारीणि हारीणि जनचेतसाम् ।
यशांसि शिवराजस्य श्रोतव्यानि मनीषिभिः ॥

अशा प्रकारचें शिवाजी महाराजांचें चरित्र जाणूं इच्छिणाऱ्या लोकांसाठी इतर तत्कालीन चरित्रविषयक उल्लेख उपलब्ध आहेत. त्यांपैकी परकीयांनी लिहून ठेवलेले उल्लेख दुष्टहेतुमूलक असल्याने अत्यंत अविश्वसनीय आहेत. शिवभारताचा लेखक कवीन्द्र परमानंद हा तत्कालीन विद्वत्समाजामध्ये अत्यंत सन्मान्य व विशेष म्हणजे शिवाजी महाराजांचा एक श्रेष्ठ सहकारी असल्याने त्याच्या ग्रंथाचें महत्त्व शिवचरित्रविषयक सर्व ग्रंथांमध्ये असाधारण आहे. ऐतिहासिक पत्रांमध्ये ज्या शिवकालीन सन्माननीय पंडितांची नामावली आढळते, त्यांत कवीन्द्र परमानंदांचाहि उल्लेख केलेला आहे. ती नामावली अशी—

गागाभट्टस्त्वनूचानो निगमागमवित्तमः ।
सभायां सुशुभे राज्ञः सुधर्मायां यथा गुरुः ॥
दीक्षितः शितिकण्ठश्च रघुनाथो बुधाधिपः ।
कवीन्द्र परमानन्दो महादेवश्च पण्डितः ॥
प्रभाकर उपाध्यायस्तथा श्रीरङ्गशास्त्रिणः ।
नृसिंहशास्त्रिणश्चाथ भट्टविश्वंभरोऽपि च ॥
अयाचितमहादेवः पण्डिताग्र्यो विनायकः ।
सोमनाथो जगन्नाथो भट्टविष्णुस्तथैव च ॥
भृगोपालाभिधोऽनंतोपाध्यायः पण्डिताग्रणीः ॥
शेषोपाख्यमहादेवः काशीस्थाः पण्डिता अमी ॥

हे परमानन्द कवि एकदा तीर्थयात्रेनिमित्त काशीला गेले असतांना तेथील विद्वान् पंडित त्यांच्याभोवती शिवाजी महाराजांचें चरित्र ऐकण्याच्या इच्छेने गोळा झाले व म्हणाले,—

" य. शास्ति वसुधामेतां राजा राजगिरीश्वरः ।
तुलजायाः प्रसादेन लब्धराज्यो महातपाः ॥
विष्णोरंशो विशेषेण लोकपालांशसम्भवः ।
मनस्वी सुप्रसन्नात्मा प्रतापी विजितेन्द्रियः ॥
भीमावपि महाभीमः सीमा सर्व–धनुर्भृताम् ।
धीमानुदारचरितः श्रीमानद्भुतविक्रमः ॥
कृती कृतज्ञः सुकृती कृतात्मा कृतलक्षणः ।
वक्ता वाक्यस्य सत्यस्य श्रोता चातिविलक्षणः ॥

देवद्विजगवां गोप्ता दुर्दान्तयवनान्तक ।
प्रपन्नानां परित्राता प्रजाना प्रियकारक ॥
तस्यास्य चरित ब्रह्मन्ननेकाध्यायगभितम् ।
भगवत्या प्रसादेन भवता यत् प्रकाशितम ॥
उदारशब्दसन्दर्भं भूरिभावार्थमद्भुतम् ।
माधुर्यादि–गुणोपेतमलङ्कारैरलङ्कृतम ॥
निचित धर्मशास्त्रार्थैरशास्त्रसमन्वितम् ।
विश्रुत सर्वलोकेषु पुराणमिव नूतनम् ॥
समस्तदोषरहित सहित लक्षणैर्निजै ।
तदशेषमशेषज्ञ शस न सशितव्रत ॥

काशीतल्या विद्वन्मण्डलाची ही प्रार्थना शिरोधार्य मानून कवीन्द्रपरमानन्दाने त्याना '*दुर्दान्तयवनान्तक*' शिवरायाच "*कलिकल्मषहारि*" चरित्र सागितलें. हें शिवभारत आपण का लिहिलें यासबधी कवीन्द्र म्हणतात —

योऽय विजयते वीर पर्वतानामधीश्वर ।
दाक्षिणात्यो महाराज शाहराजात्मज शिव ॥
साक्षान्नारायणस्याश त्रिदशद्वेषिदारण ।
स एकदात्मनिष्ठ मा प्रसाद्येदमभाषत ॥
'यानि यानि चरित्राणि विहितानि मया भुवि ।
विधीयन्ते च सुमते तानि सर्वाणि वर्णय ॥'

शिवानी महाराजाचा हा आदेश शिरोधार्य मानून कवीन्द्र परमानद शिवभारत लिहा वयास उद्युक्त झाले व त्यानी ३२ अध्यायाचा हा ग्रथ लिहिला.

ऐतिहासिक दृष्ट्या प्रतिष्ठित समकालीनाचे ग्रथ प्रमाणभूत मानण्यात येतात व म्हणूनच शिवाजी महाराजाच्या जीवनासबधीं शिवभारताला प्रमाणदृष्ट्या महत्त्वाचे स्थान दिलें पाहिजे

एवढा हा महत्त्वपूर्ण ग्रथ ३०–४० वर्षांपूर्वी सर्वथा अज्ञात होता. सस्कृत भाषेमध्ये शिवचरित्रविषयक असा महत्त्वपूर्ण ग्रथ आहे ही गोष्ट त्या काळीं इति हासपडिताना ठाऊक देखील नव्हती. पुण्याच्या भारतेतिहास सशोधन मडळाचे कार्य वाह श्री सदाशिव महादेव दिवेकर यानी मोठ्या परिश्रमाने हा ग्रथ शोधून काढला. ग्रथ कसा आढळला यासबधी श्री दिवेकरानी केलेलें आत्मनिवदन मोठें उद्बोधक आहे. त्याचा सारांश असा की बालपणीं शाळेमध्ये शिवाजी हा निरक्षर, चोर, लुटारू होता असें शिकविण्यात येत होतें. इग्रज व मुसलमान लेखकानी शिवचरित्राविषयीं असेंच

निर्गल लिखाण करून ठेवलेले आहे. ते वाचून शिवाजी सारख्या पुण्यपुरुषाचे चरित्र प्राचीन ग्रंथ व पत्रसंग्रह वाचून नीट जाणावे अशी इच्छा त्याच्या अन्तःकरणात बळावली. अनेक प्राकृत व संस्कृत ग्रंथाचें वाचन करीत असताना तंजावरच्या सरस्वती महाल लायब्ररीमध्ये त्यानी प्राचीन ग्रंथ हुडकण्यास आरंभ केला. कर्नाटकात शिवाजी महाराजानी अनेकदा आक्रमणें केलेली होती. समर्थ रामदासानीहि कर्नाटका मध्ये अनेक मठ स्थापन केलेले होते. म्हणून कर्नाटकातील ग्रंथालयामध्ये शिवचरित्र विषयक प्राचीन अधिकृत ग्रंथ असलाच पाहिजे अशा श्रद्धेने श्री दिवेकरानी संशोधन सुरू केलें. शेवटी तंजावरच्या ग्रंथालयात भूर्जपत्रावर तामिळ भाषेमध्ये लिहिलेला "शिवभारत" नावाचा एक तामिळ ग्रंथ त्याना आढळला. या तामिळ ग्रंथाचें अनुवादकाकडून भाषांतर करवून त्यानी वाचन आरंभिलें. या वाचनातून एक गोष्ट त्याच्या लक्षात आली ती ही की हा ग्रंथ मुळात संस्कृतातला असून त्याचा लेखक परमानन्द नावाचा महाराष्ट्रीय पण्डित होता. हा मूळ संस्कृत ग्रंथ कसा वाचावयास मिळेल याची त्याना तळमळ लागली. जर्मनीतल्या ओरिएण्टल सोसायटी, (लिपझिक) या संस्थेशी त्यानी पत्रव्यवहार सुरू केला त्या संस्थेंत संस्कृत हस्तलिखिताचा फार मोठा संग्रह असून त्याची एक प्रचंड सूचीहि या संस्थेने प्रकाशित केलेली आहे. पुण्याच्या आनंदाश्रमात श्री दिवेकराना ही ग्रंथसूची पाहावयास मिळाली तीमध्ये कवीन्द्र परमानन्द कृत शिवभारताचा उल्लेख त्याना मिळाला. इ. स. १८७९ मध्ये बर्नेल नावाच्या इंग्रज सूचीकाराने केलेल्या ग्रंथसूचीमध्ये सुद्धा या शिवभारताचा उल्लेख व क्रमांक आढळला. एवढ्या माहितीच्या आधारें हा संस्कृत ग्रंथ तंजावरच्या ग्रंथालयामध्येच आहे हें निश्चित ठरलें. यानंतर नऊ महिन्यानी मूळ ग्रंथाची हस्तलिखित नवीन आवृत्ति श्री दिवेकराना वाचावयास मिळाली त्यावरून तामिळ भाषेतले शिवभारत या मूळ ग्रंथाचें भाषांतर होते ही गोष्ट सिद्ध झाली. श्री दिवेकरानी सांगितलेला शिवभारताचा हा वृत्तान्त फारच उद्बोधक आहे. अशा प्रकारचे सहस्रावधि उत्कृष्ट संस्कृत ग्रंथ आमच्या देशात किंवा परदेशात अद्यापि उपेक्षित पडलेले आहेत.

'शिवभारतम्' या नावावरूनच हा ग्रंथ महाभारताच्या तोडीचा आहे हें कवींद्र परमानन्दाने सूचित केलेले आहे. महाभारतात ज्याप्रमाणे भीम, अर्जुन इत्यादि महावीराच्या विक्रमकथा वर्णिलेल्या आहेत त्याप्रमाणे या शिवभारतात सुद्धा भीम पराक्रमी शिवाजी महाराजाच्या विक्रमकथा वर्णिलेल्या आहेत, हे कवीन्द्राने 'शिवभारतम्' या नावावरूनच ध्वनित केलेले आहे त्याचप्रमाणे हा ग्रंथ पुराणग्रंथासारखा आहे हें सूचित करण्यासाठी प्रत्येक अध्यायाच्या शेवटी, 'इति अनुपुराणे सूर्यवंशे कवीन्द्रपरमानन्दप्रकाशितायां शतसाहस्र्यां' हे वाक्य कवीन्द्राने लिहिलेलें आहे. पहिल्याच अध्यायात 'पुराणमिव नूतनं' अशा आपल्या ग्रंथाचा उल्लेख केलेला

आहे. पण पुराणाची संख्या १८ ही निश्चित असल्याने हें नवीन १९ वें पुराण नाही हे सूचित करण्यासाठी कवीन्द्राने आपल्या ग्रंथाला अनुपुराण असे नाव दिलेलें आहे. प्रथवर्णनाच्या ओघात,

'माधुर्यादिगुणोपेतमलंकारैरलंकृतम्' या वाक्याने आपल्या ग्रथाची काव्यात्मकताहि कवीने स्पष्ट सांगून टाकली आहे. शिवाजी महाराजाच्या स्वभावरमणीय चरित्राचे रमणीयत्व अधिक वाढविण्यासाठी कवीन्द्राने हा चरित्रग्रंथ रघुवंशाप्रमाणे काव्यमय केलेला आहे. या काव्यात्मक चरित्रग्रंथामध्ये अनुष्टुप, प्रहर्षिणी, मालिनी, शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, वसततिलका, पुष्पिताग्रा, हरिणी, स्रग्धरा, रथोद्धता, उपजाति, उपेन्द्रवज्रा, वियोगिनी इत्यादि विविध वृत्तें वैचित्र्यासाठी कवीने उपयोजिलीं आहेत. 'सर्गान्ते भिन्नवृत्त स्यात्' हा महाकाव्याचा संकेत सर्वत्र कटाक्षाने पाळलेला आहे. यमक अनुप्रासासारखे शब्दालंकार ठिकठिकाणीं आढळतात. उदा०—

"प्रतापतापितारातिधराधिपतिमण्डलः।" १–४७
"विकराल महाकाल करवालं करे वहन्।" २२–२९
"क्रूर करिकराकारकर. प्रतिभयस्वरः।" २२–१४
"चण्डेन भुजदण्डेन दण्डितारातिमण्डलः।" २९–६०
"सुख सुप्तो निजगृहे ततो निजगृहेरिभिः।" १६– ७

यासारख्या उदाहरणातून कवीन्द्राचे शब्दालंकारनैपुण्य उत्तम प्रकारें व्यक्त होतें. शिवाजीसारख्या वीरपुरुषाचें चरित्र हा या काव्याचा विषय असल्याने स्वाभाविकपणेच संपूर्ण काव्य वीररसप्रधान आहे. वीररसाचें उद्दीपन ओजोगुणावाचून होत नाही. त्या दृष्टीने प्रस्तुत काव्यातील ओजोगुणाचीं उदाहरणें,—

पाशैं प्रासैश्चन्द्रहासैं पट्टिशैश्चपरश्वधैं ।
मुद्‌गरैः परिघैस्तद्वत् त्रिशूलैस्तोमरैरपि ॥
गदाभिः शक्तिभिश्चापैर्नियड्‌गैरिषुपूरितै‌ः ।
खेटकं चापि चक्रैश्च छुरिकाभिः कटारकैः ॥

यासारख्या २२ व्या अध्यायातील १०–१५ श्लोकामध्ये पाहावयास मिळतात.

*अर्थालंकाराचीं उदाहरणें —*

उपमा – निर्मदा इव मातङ्गाः निर्विषा इव पन्नगा ।
निरुष्णोष्मा इव नरा निःशृङ्गा इव भूधरा. ॥

उत्प्रेक्षा– तदा हेतिद्वैय तद्वैपरिभ्रायताऽमुना ।
परितो विततकार. प्राकारः किमकारि न ॥

दृष्टान्त – नावज्ञेया खलु ज्ञेन वराका अपि विद्विषः ।
प्रशाम्यते पतङ्गेन प्रज्वलन्नपि दीपकः ॥

अर्थान्तरन्यास – नूनं पिपीलकोऽप्येकः प्रविश्य करिणः करम् ।
भवत्यन्तकरस्तस्मादल्पं मन्येत नो परम् ॥

तदनु शिवनृपस्त प्राप्तभङ्गं पुरस्तात् ।
प्रसभमपसरन्त रुस्तुमं त्रस्तमुच्चैः ॥
निकटगमपि नैव न्यग्रहीन् निग्रहार्हम् ।
न हि विदधति भीरौ शूरतां सूर्यवंश्याः ॥

यासारख्या अलंकाराप्रमाणेच --

सहायपरिहीनेन नरेणेह न केनचित् ।
परिभावयितुं शक्या परोपानामनीकिनी ॥
अर्थं समर्थसामर्थ्यात् व्रजेत् सामर्थ्यमात्मनः ।
असमर्थाश्रितस्त्वर्थो नार्थोऽनर्थो हि केवलम् ॥
न हि साहसमात्रेण सिद्धिमायान्त्युपक्रमाः ।
अलं फलाय महते सनयाः किल विक्रमाः

या सारखी उत्तम सुभाषितेहि प्रस्तुत महाकाव्यात विखुरलेली आहेत.

श्री सदाशिव महादेव दिवेकर यानी शके १८४९ मध्ये हे काव्य प्रथम प्रकाशित केले. त्याला विख्यात इतिहासज्ञ श्री. दत्तात्रेय विष्णु आपटे यानी २०० पानाची विद्वत्तापूर्ण मराठी प्रस्तावना लिहिली. पुण्याचे संस्कृत पंडित श्री राजाराम मनोहर देसाई यानी संपूर्ण महाकाव्याचे मराठी भाषांतर केले. शिवभारतांत रघुवंश, किरातार्जुनीय यासारख्या महाकाव्यात आढळतात त्याप्रमाणे निरनिराळ्या प्रकारची हृदयंगम वर्णने आढळतात. आपल्या महाकाव्यातील वर्णनीय विषयाचे स्वरूप कवीन्द्राने पुढील शब्दात सांगितलेले आहे.--

यत्रास्ते महिमा शम्भोर्महादेवस्य वर्णितः ।
दुर्वृत्तासुरमर्दिन्यास्तुलजायास्तथैव च ॥
धर्मस्यार्थस्य कामस्य मोक्षस्य च यथायथम् ।
तीर्थानामपि माहात्म्यं यत्र सम्यङ्निरूपितम् ॥
यत्र युद्धान्यनेकानि शिवस्य यवनैः सह ।
तेषामेव विनाशार्थमवतीर्णस्य भूतले ॥
देवानां ब्राह्मणानां च गवां च महिमाधिकम् ।
पवित्राणि विचित्राणि चरित्राणि च भूभुजाम् ॥

गजानां तुरगाणां च दुर्गाणां लक्षणानि च ।
निरूपितान्यशेषेण राजनीतिश्च शाश्वती ।।

सहाव्या अध्यायामध्ये परमानंद कवीने केलेलं शिवजन्माचें वर्णन खरोखरच रसिकाला अत्यंत आनंद देणारें आहे. त्याचप्रमाणें

अध्याध्यासनमग्रीणां ग्रीवान्तां द्विपिना तथा ।
स्वर्णसिंहासने स्थैर्य सितच्छत्रतलेऽपि च ।।
श्वेतनोन्नमनं चोच्चैः चारुचामरवीजनम् ।
श्रुतिर्दुंदुभिशब्दानां कृतिः समरकर्मणाम् ।।
धारणं काण्डकोदण्डशक्तिनिस्त्रिंशवर्मणाम् ।
प्रसाधनं पर्वतानां साधनं विजयश्रियाम् ।।
महादानेष्वभिरतिः धर्मस्य स्थापने मतिः ।
समभूवन्नमुष्यास्या दोहदानि दिने दिने ।।

इत्यादि श्लोकामध्यें केलेलें जिजाबाईंच्या डोहाळ्याचें वर्णन अत्यंत सूचक व मार्मिक आहे. त्याचप्रमाणें —

अपारलावण्यमयं स्वर्णवर्णमनामयम् ।
कमनीयतमग्रीवमुन्नतस्कन्धमण्डलम् ।।
अलिकान्तर्लसत्कान्तकुन्तलाग्रविराजितम् ।
सरोजसुन्दरदृशं नवकिंशुकनासिकम् ।।
सहजस्मेरवदनं घनगम्भीरनिस्वनम् ।
महोरस्कं महाबाहुं सुषुवे साद्भुतं सुतम् ।।

इत्यादि श्लोकामध्यें केलेलं नवजात बालशिवाजीचें वर्णन, त्याचें रूप प्रत्यक्ष डोळ्यांपुढें उभें करील इतकें चांगलें आहे. याच अध्यायात आणखी एका एका ठिकाणीं कवीनें बालशिवाजीचें रूपवर्णन व जातकवर्णन केलेलें आहे. तें कोणत्याहि रसिकाला वारंवार वाचावेंसें वाटेल इतकें उत्तम आहे. सातव्या अध्यायातील शिवाजीचें वर्णन प्रस्तुत प्रकरणांत उल्लिखित न करणें दोषास्पद ठरेल इतकें तें सुंदर आहे.

य श्रान्त इव निद्राति मध्ये दुग्धमहोदधेः ।
जननीस्तन्यपानाय व्यतानीद् रुदितानि सः ।।
जानुभ्यां रिङ्गतस्तस्य पदाम्बुजतलत्विषा ।
पद्मरागश्रियं प्रापुः प्राङ्गणस्था शिलोपला ।।
स लीलातरलस्तत्र रिङ्गन् मणिमयेऽङ्गणे ।
स्वतात्मप्रतिबिम्बेन प्रास्पर्धत पदे पदे ।।

अपिबन् यत्प्रसादेन सुधां सर्वे सुधान्धसः ।
अहो सोऽपि मुदं प्रापदास्वाद्य मृदुलां मृदम् ॥
छलयन् यो बलिं लोकान् त्रीन् ललङ्घे त्रिविक्रमैः ।
बतोल्लङ्घे यत्नेन स देवो गेहदेहलीम् ॥
सप्तानामपि लोकानां योऽवलम्बः स्वयं प्रभुः ।
उदतिष्ठदहो धृत्वा सोऽपि धात्रीकराङ्गुलिम् ॥
अपाठयद् विधातारं निगमान् यः सलक्षणान् ।
सोऽपि धात्रीमुखात् तत्तत् नामधेयमपीपठत् ॥
अनादृत्य पितुस्तांस्तान् द्वीपान् दृप्तांस्तथा हयान् ।
प्रभुर्मन्तुममन्तुं च बहुमंस्त स मृण्मयान् ॥
दृष्टो हरति यस्तूर्णं जन्मिनां जननभ्रमम् ।
अभ्राम्यदहो दाढ्भ्रमरं स कदाचन ॥
भुङ्क्ष्वेत्युक्तोऽपि नाभुङ्क्त पिबेत्युक्तोऽपि नापिबत् ।
अनुनीय स धात्रीभिः शेष्वेत्युक्तोऽपि नास्वपत्

शिवाजीच्या बाललीलांचे हें वर्णन वाचून कोणत्याहि रसिकाचें अन्तःकरण वात्सल्यरसानें भरून आल्यावाचून राहणार नाही. सोळाव्या अध्यायांतील शिवराज व सुवर्णशर्मा ( सोनोपंत ) याचा राजनीतिविषयक संवाद अत्यंत उद्बोधक आहे. सतरा ते बावीस या सहा अध्यायांत अफझुलखानाच्या वधाचें प्रकरण सविस्तर वर्णिलेलें आहे. त्यातील २० व्या अध्यायात आलेलें तुळजा भवानीचें वर्णन वाचीत असताना भवानीची मूर्ति प्रत्यक्ष मनश्चक्षूपुढे उभी राहतें. तें वर्णन असें :—

कल्पवल्लीमिव नवां पुरस्तादथ तां स्थिताम् ।
सरलाभरणां शोणचरणां चम्पकप्रभाम् ॥
विलसन्नीलवसनां नीलधम्मिल्ल–शालिनीम् ।
अतीव–सुकुमाराङ्गीं कुमारीवेशधारिणीम् ॥
पूर्णेन्दुवन्द्यवदनामिन्दीवरविलोचनाम् ।
मन्दस्मितामभिनव–प्रवाल–तुलिताधराम् ॥
भ्राजिष्णुभालतिलकां रत्नरञ्जितकर्णिकाम् ।
मनोज्ञनासिकान्यस्त–चित्ररत्नमयूरिकाम् ॥
मृदुबाहुलतां पद्महस्तां सुललिताङ्गुलिम् ।
रत्नरश्मिकुलाकीर्णकङ्कणां शुभलक्षणाम् ॥
कण्ठसंसक्तगुच्छार्ध–गुच्छरत्नलसन्तिकाम् ।
सुवर्णसुमन.श्लिष्ट–नीलकञ्चुलिकावृताम् ॥

आनाभिविलसद्धारा रत्नकाञ्चीकृतश्रियम् ।
वरदा विश्वजननीमवनीपतिरैक्षत ॥

अफझुलखानाच्या वधासाठी निघालेल्या शिवाजीचें २१ व्या अध्यायातील पुढील वर्णन पहाः--

उष्णीषेणेव शुचिना व्यभादुत्तसधारिणा ।
काश्मीरज-पृषद्वर्ष-रञ्जितेनाङ्गिकेन च ॥
शिववर्मा भूदवल मवृत शिववर्मणा ॥
तस्य वज्रशरीरस्य किं कार्यं तेन वर्मणा ।
कृपाणपाणिनैकेन बिभ्राणोऽन्येन पट्टिशम् ।
स नन्दकगदाहस्तः साक्षाद् हरिरदृश्यत ॥

या वर्णनावरून त्या प्रसंगींची शिवाजीची प्रतिमा यथार्थपणे मनश्चक्षूपुढे उभी राहते. संपूर्ण शिवभारतात अशा प्रकारचीं अनेक हृदयंगम वर्णनें प्रत्येक अध्यायात वाचावयास मिळतात. तथापि शिवभारताचें खरें महत्त्व काव्यदृष्ट्या नसून ऐतिहासिक दृष्ट्या आहे. शिवचरित्राचा एक अत्यंत विश्वासार्ह पुरावा म्हणूनच या ग्रन्थाकडे पहावयास हवें !

* * *

## धर्मादर्शः

सनातनधर्मोज्जीवी सभेचे प्रतिष्ठापक व संचालक श्रीसंतोजी महाराज कुकुरमुंडेकर यानी प्रस्तुत धर्मादर्श नावाचा महान् ग्रंथ प्रकाशित केला या ग्रंथात सोप्या संस्कृत भाषेत अनेक विषयासंबंधीचा गूढार्थ विशद करण्याचा मोठा स्पृहणीय प्रयत्न केल्याबद्दल लेखक प. देवकृष्णशर्मा हे अत्यंत प्रशंसेस पात्र आहे. ज्या ज्या विषयात विद्वानाचे मतभेद संभवतात, त्या त्या ठिकाणीं तर्क व आप्तवाक्य यांच्या आधारे त्यानी आपलें मत प्रतिपादन अत्यंत निःसंदिग्धपणे केलेले आहे. त्यावरून प. देवकृष्णशर्मा यांच्या पांडित्याची उत्कृष्ट कल्पना येते. धर्मविषयाचा अभ्यास करणाऱ्या प्रत्येक जिज्ञासूला हा ग्रंथ अत्यंत उपयोगी आहे. संस्कृत वाङ्मयात असा एकहि ग्रंथ नाही की ज्यामध्ये नव्या व जुन्या सर्व विचाराचा सारस्याने परामर्श पाहावयास मिळेल. कित्येक वर्षांपूर्वी प्रथम श्रीसंतोजी महाराजानी एक धर्मविचारात्मक ग्रंथ तयार करविला. त्यावर देशांतील पंडितांचे अभिप्राय मागवून त्यांनी दुसरी आवृत्ति त्यानी काढली. त्या आवृत्तीसंबंधीं जीं अनेक मतें गोळा करण्यांत आलीं त्यांचा उपयोग करून हा प्रस्तुत ग्रंथ तयार करण्यात आला आहे.

---

*धर्मादर्श —प्राप्तिस्थान, श्री सन्तोजी महाराज, द्वारा ओंकारदास किशोरदास* चौपरी, बडोदा-पश्चिम खानदेश.

या ग्रंथाचे लेखक प. देवकृष्णशर्मा हे गादे विद्वान असून त्यांचे अध्ययन केवळ जुन्या धार्मिक ग्रंथाचेंच नसून अलीकडील अगदी नव्या साम्यवाद्यांच्या मतापर्यंतच्या सर्व मतप्रणालींची त्याना माहिती आहे. या ग्रंथात त्यानी अशा विविध मताचा परिचय देऊन खडन करण्याचाहि प्रयत्न केला आहे. श्रीमच्छंकराचार्यांच्या भाष्यात ज्याप्रमाणें पूर्वपक्ष म्हणून प्रतिवाद्याचीं मतें प्रथम देऊन त्याच्या खडनानु रोधानें सिद्धान्तपक्ष माडण्यात येतो, त्याचप्रमाणे या ग्रंथातहि प्रतिपक्षीयाचीं मत सविस्तर माडून त्याच्या खडनानतर स्वत ची सिद्धान्तभूत मत माडण्यात आलीं आहेत ग्रंथाची संस्कृत भाषा क्लिष्ट नाही. मात्र या ग्रंथात अनेक ग्रंथातील उतारे जसेच्या तसे आधारार्थ दिले असल्याने, त्या उताऱ्यातील भाषेच्या काठिण्याबद्दल पंडित देवकृष्णशर्मा हे जबाबदार नाहीत.

## प्रमाणप्रतिबिंब

या ग्रंथात प्रमाणप्रतिबिंब, नीतिप्रतिबिंब, चातुर्वर्ण्यप्रतिबिंब आणि विवाह-प्रतिबिंब असे चार मुख्य भाग आहेत त्यातील पहिल्या प्रमाणप्रतिबिंबात प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शाब्द अशीं चार प्रमाण मानावींत कीं त्याहून काही कमीजास्त मानावींत याचा ऊहापोह करण असून, धर्मविषयात मुख्यत श्रुति आणि स्मृति याच प्रामाण्य मानलें पाहिजे यावर भर आहे. वेदाचे प्रामाण्य स्थापित करताना वेदाच अपौरुषेयत्व स्थापन करण ओघानेंच प्राप्त झालें आहे. त्यात अलौकिकार्थप्रतिपादनासाठी शब्दप्रामाण्य मानावेंच लागतें, असा निष्कर्ष पंडितजींनी काढला आहे. अशाच प्रकारच्या अनेक वादाचें खडनमडन यात असून त्यानी प्रमाणचतुष्टय सिद्ध केलें आहे. त्या प्रमाणाचा बलाबल विचार करून त्यात आचार, स्मृति, श्रुति असा एकाहून एक श्रेष्ठत्वाचा क्रम सागितला आहे. परतु कोणताहि सिद्धात निरपवाद नसतो. सिद्धान्ताला अनेक अपवाद पुढे येतात. साधारणत बलिष्ठ प्रमाणाने दुर्बल प्रमाण बाधित होतें हें खरें असलें तरी सौत्रामणी यज्ञात सुराग्रहण श्रुतीने सागितलें असलें तरी कलियुगात सुरापान वर्ज्य सागितलें असल्याने 'कलि-वर्ज्य' वचनाने श्रुतीचा आदेशहि त्यागावा लागतो. याच निमित्ताने 'कलिवर्ज्य' हृ प्रकरण कार्य काय आहे व त का मानावें लागते याचा ऊहापोह करून स्थूलधर्म व सूक्ष्मधर्म असे धर्माचे दोन भेद मानून सामान्य माणसाचा बुद्धिभेद होऊ नये म्हणून कित्येक विहित कर्मेंहि कलिवर्ज्यांत घातलीं आहेत.

## नीतिप्रतिबिंब

नीतिप्रतिबिंब हा भाग सर्वांत मोठा आहे कारण यातच धर्माधर्म, नीति, अनीति, कार्याकार्य इत्यादि महत्त्वाच्या विषयाचा ऊहापोह केलेला आहे. या विभागाला नीतिप्रतिबिंब हृ नाव असले तरी अर्थशास्त्र, वार्ताद्धति, नाण्याचा उपयोग

व परिणाम, अर्थशास्त्रमूलक समाजरचना, विविध शासनपद्धति, यंत्रवृद्धीचे दुष्परिणाम, क्रांतिकारकांचे विचार, अराजकाचे दुष्परिणाम, मालकी हक्काच्या कल्पनेची उत्पत्ति व वाद, व्यक्तीची मालकी, समाजाची मालकी, राष्ट्राची मालकी, कार्ल मार्क्सची विचारसरणी, धनोत्पादक धंदे, नाझिझम, फॅसिझम्, नॅशनल् सोशॅलिझम्, गिल्ड सोशॅलिझम्, तज्ज्ञशासनवाद इत्यादि सर्व नव्याजुन्या कल्पनांचा ऊहापोह यांत आहे. *या सगळ्या वादांचा निष्कर्ष काढून त्यावरून धर्माच्या बंधनाची समाजाला* आवश्यकता कशी आहे हे दाखविलें आहे.

*नीतिप्रतिबिंबानंतर चातुर्वर्ण्यप्रतिबिंब आणि विवाहप्रतिबिंब अशीं दोन प्रकरणें* पुढें आलीं आहेत. चातुर्वर्ण्यप्रतिबिंबांत विश्वकुटुम्बवाद, जातिवादावरील आक्षेप व त्यांचा निरास, जातिपरिवर्तन, अर्थशास्त्रदृष्ट्या जातिभेदाचा सुपरिणाम, दैववादविचार, पौरुषवाद इत्यादि विषयांची चर्चा आहे. विवाहप्रतिबिंबांत विवाहाचें प्रयोजन, विवाहाची आवश्यकता, सुप्रजाजनन, प्रीतिविवाह, धर्ममूलक विवाह, विवाहाच्या वयाची *मर्यादा, गोत्रप्रवरविचार, पुनर्विवाहाची इष्टानिष्टता इत्यादि विविध विषय आले* आहेत.

*अशाप्रकारें हा ग्रंथ म्हणजे धर्म, अर्थ आणि काम या त्रिवर्गमूलक समाज*-शास्त्रातील मूलभूत कल्पनांचा एक सदर्भग्रंथ आहे असें म्हटल्यास चालेल. या ग्रंथाला सदर्भग्रंथ असें आम्ही हेतुपूर्वक म्हणतो, कारण यांत नव्या जुन्या सर्वच समाजशास्त्र-विषयक कल्पनांचा कोठेना कोठे तरी उल्लेख आला असून त्या त्या कल्पनांना ज्या ज्या वचनांचा आधार आहे तीं वचनें यांत उद्धृत केलीं आहेत. सिद्धान्तपक्षाच्या *दृढीकरणार्थ जशीं श्रुतिस्मृतिपुराणादिकांतून आधारभूत वचनें नमूद केलीं आहेत तशींच* पूर्वपक्षाला आधारभूत असलेलीं वचनेंहि उद्धृत केलीं आहेत, त्यांत पक्षपात केला नाही. किंबहुना प्रतिपक्षाचें म्हणणें विस्तारपूर्वक मांडलें असून स्वतःचें सिद्धान्तमत सारांशरूपानेंच मांडलें आहे. शेवटीं ग्रन्थकारानें स्वकृत 'नीतिसुधा' नामक पद्यावली विस्तारपूर्वक दिली आहे.

## नीतिसुधा

या नीतिसुधेचे २४५ श्लोक असून त्यांनी या पुस्तकाचीं १७ पानें व्यापिलीं आहेत. हे सगळे श्लोक मननपूर्वक वाचण्यासारखे आहेत. त्यांत मौज ही कीं या नीतिसुधेंत चातुर्वर्ण्याची उपयुक्तता गुणकर्मानुसार वर्णिली आहे. हे विचार आपल्या प्रस्तुतच्या ग्रन्थप्रणालीला विरोधक होतात, असें वाटल्यावरून ग्रन्थकारानें नीति-सुधेच्या शेवटीं अशी टीप जोडली आहे कीं त्यांतील चातुर्वर्ण्य गुणकर्मानुरोधी असें वर्णिलें असलें तरी जन्मसिद्ध चातुर्वर्ण्याचें तें खण्डन आहे असें मानूं नये. समाजा-तील विविध कार्यें उत्तम रीतीनें पार पाडण्यास उत्तम गुणांचीच अपेक्षा असते, जन्म-

सिद्ध जातीची अपेक्षा तेथे धरली जात नाही. जन्मसिद्ध जातीचा अभिमान समाजात थोकाळू लागला तर जातीयतेच्या विषाने समाजाची सगळी घडी विस्कटून जाईल यास्तव समाजकार्यात जातीला मान न देता गुणकर्मालाच मान द्यावा असे नीतिसुधेत सांगितले आहे. परंतु याचा अर्थ हाच समजावा की उत्तम कार्यकर्त्यांचे गुण आपल्या अंगी आणण्यास प्रत्येकाने झटावे. मात्र हा गुणोत्कर्ष जात्युत्कर्षाने साधावा. तो जात्युत्कर्ष परमेश्वराच्या आराधनेने कसा साधता येतो ते चातुर्वर्ण्य प्रकरणात दर्शविले आहे.

प्रास्ताविक निवेदनात ग्रंथकार लिहितात की, प्रथम सनातनधर्मदीप ग्रंथ लिहिण्याचे ठरले, त्या वेळी म. म. श्रीधरशास्त्री पाठक यांनी असे मत प्रकट केले की हा ग्रंथ सर्व सग्राहक व्हावा व त्यात सर्व देशकालपरिस्थितीचा विचार प्रदर्शित व्हावा. हे मत मान्य न झाल्याने संतोजी महाराजांनी प. देवकृष्णशर्मा यांना पाचारण केले व त्यांचे मत घेतले. त्यावेळी प. देवकृष्णशर्मा यांनी असा अभिप्राय दिला की, आपणास जर सनातन धर्माच्या स्वरूपाचे विवेचन करावयाचे आहे तर काशीस्थ पंडिताचे यात साहाय्य घ्यावे. या योजनेनुसार प. लक्ष्मणशास्त्री द्रविड यांना पाचारण करण्यात आले आणि त्यांच्या सल्ल्यानुसार प. देवकृष्णशर्मा यांच्याकडेही कामगिरी सोपविण्यात आली ही पूर्वपीठिका लक्षात घेतल्यास या ग्रन्थात केवळ परम्परागत रूढीनुसार सनातन धर्माच्या स्वरूपाचे विवेचन करण्याच्या उद्देशानेच प. देवकृष्णशर्मा या कार्याला प्रवृत्त झाले. हा निश्चय ठरल्यावर त्यांनी कार्ल मार्क्सपासून आतापर्यंतच्या काळातील सुधारणावादी लेखकांचे लेख अभ्यासिले. अशा रीतीने आधुनिकांच्या मताचे खण्डन करण्याची तयारी करून नंतरच प. देवकृष्ण शर्मा यांनी हा ग्रंथ लिहिला. ग्रन्थकाराने आपल्या मताच्या पुष्ट्यर्थ भरपूर आधार दिले आहेत. विशेषतः मनुस्मृति आणि महाभारत या दोन ग्रन्थांवर त्यांचा अधिक भर आहे. 'यन्मनुरब्रवीत् तद्भेषजम्' हे वचन त्यांनी अक्षरशः शिरोधार्य मानले आहे. महाभारतातील धर्ममूलक नीति वचनेंहि ग्रन्थकारास मान्य आहेत; तथापि महाभारतातील उपदेश राजाला व क्षत्रिय वर्णाला अनुलक्षून आहे असे म्हणून त्याला प्रसंगविशेषी गौणत्व दिले आहे. द्रोणाचार्यांचा वध होण्यासाठी धर्मराजाने 'नरो वा कुञ्जरो वा' असे म्हणून असत्य भाषण केले. तरी सत्पक्षाचा नाश टाळण्यासाठी ते भाषण धर्म्यच होय असे म्हणून 'यस्मिन् यथा वर्तते यो मनुष्य.' असा तत्समर्थनार्थ आधारहि दिला आहे. दण्डनीतिशिवाय समाज सुव्यवस्थित चालणार नाही, यास्तव शासनयंत्रणेची आवश्यकता मान्य केली आहे. राजाला आवश्यक असे कायदे करण्याचा अधिकार आहे आणि त्याने तो अधिकार चालविणे हा त्याचा धर्मच आहे असे म्हटले आहे. या ग्रन्थात सनातनी मतानुयायी पक्षाला आधारोपयुक्त भरपूर वचनें एकत्रित केलेली आढळतात, त्याचप्रमाणे ग्रंथकाराने आधारहि भरपूर

आढळतात. उच्च न्यायालयातील कित्येक खटल्यातील न्यायमूर्तींच्या वचनांचे आधार कित्येक ठिकाणी उद्धृत केलेले आहेत. पंडितजींची संस्कृत भाषाशैली उत्तम आहे आणि वादविवादकौशल्यहि असाधारण आहे, त्यामुळे हा ग्रन्थ मननीय झाला आहे. परंतु एवढ्या मोठ्या ग्रन्थांतून आपल्या समाजाच्या सद्यःकालीन अवनतीवर नवा तोडगा करून पाहण्यासारखा सुधारणेचा मार्ग आढळत नाही, असा प्रतिकूल अभिप्राय प्रस्तुत ग्रन्थासंबंधी के. ज. स. करंदीकर यांनी दि. ९-११-६० च्या केसरीत व्यक्त केला आहे.

* * *

## संस्कृतसाहित्यविमर्शः

आधुनिक शिक्षणपद्धतींत बहुधा सर्व शास्त्रांचा व दर्शनांचा अभ्यास त्यांच्या इतिहासाच्या अनुरोधाने करण्यात येतो. अशा प्रकारे इतिहासाच्या अनुरोधाने शास्त्रांचा अभ्यास करीत असताना त्यांचा विकास किंवा विरोप कोणत्या क्रमाने झाला याची कल्पना येते. इतिहासक्रमाच्या ज्ञानाभावीं शास्त्रांचें ज्ञान एका दृष्टीने अपूर्ण किंवा सदोष राहते. प्राचीन शास्त्रकारांनी इतिहासग्रन्थांचें हें महत्त्व ओळखूनच इतिहासाला मोहावरणाचा नाश करणाऱ्या प्रदीपाची उपमा दिली आहे.

आधुनिक शास्त्रांचा ऐतिहासिक क्रमानुसार अभ्यास करण्यासाठी संस्कृत वाङ्मयाचें अध्ययन अत्यंत आवश्यक असतें. कारण तीं सर्व शास्त्रें मुळात संस्कृतातच आढळतात. आधुनिक आरोग्यशास्त्राचा मूलग्राही अभ्यास करावयाचा असल्यास संस्कृतातल्या आयुर्वेदाचें अध्ययन केलेंच पाहिजे. तें न केलें तर आधुनिक आरोग्यशास्त्राचें अध्ययन अपूर्ण राहील. जी गोष्ट आरोग्यशास्त्राची तीच शिल्पशास्त्र, वास्तुशास्त्र, राजनीति, मनोविज्ञान, समाजशास्त्र इत्यादि सर्व शास्त्रांच्या बाबतींत खरी आहे. त्या त्या शास्त्राचे मौलिक संस्कृत ग्रंथ हेच 'अनेकसंशयोच्छेदि' व 'परोक्षार्थाचे दर्शक' आहेत.

पण आश्चर्याची गोष्ट ही की प्रत्यक्ष संस्कृत साहित्याचें ऐतिहासिक क्रमाच्या अनुरोधाने अध्ययन करावयाचें झाल्यास यूरोपीय भाषांतील ग्रंथांकडे वळावें लागतें. देशी भाषांत संपूर्ण संस्कृत साहित्याचा विमर्श करणारे किंवा परामर्श करणारे ग्रंथ फारच थोडे आहेत व प्रत्यक्ष संस्कृत भाषेत तर या स्वरूपाच्या ग्रंथांचीं नावेंसुद्धा लोकांना ठाऊक नाहीत. या विषयावर जे दोन चार ग्रंथ आजवर संस्कृतांत प्रकाशित झाले त्यामध्ये वृन्दावन गुरुकुल विश्वविद्यालयाचे भूतपूर्व कुलपति आचार्य द्विजेन्द्रनाथ शास्त्री यांनी लिहिलेला 'संस्कृतसाहित्यविमर्श.' हा ग्रंथ अग्रगण्य आहे. या ग्रंथाला उपराष्ट्रपति डॉ. सर्वपल्ली राधाकृष्णन् यांची प्रस्तावना असून त्याच्या मुद्रणाकरिता स्वर्गीय श्री. मणीलाल टी. शहा यांचे सत्पुत्र श्री.

सनत्कुमार यानी सर्व खर्च दिला. ग्रथाच्या प्रारभीं खुर्जा संस्कृत महाविद्यालयाचे प्रधान आचार्य श्री. कुबेरदत्त शास्त्री यानी ग्रथकाराचा सविस्तर परिचय करून दिला असून पुढे प. गिरिधर शर्मा चतुर्वेदी, श्री. महादेव पाण्डेय, श्री. नारायण शास्त्री खिस्ते, श्री. वासुदेवशरण अगरवाल, डॉ. सुब्रह्मण्य अय्यर इत्यादि विद्वानानी लिहिलेले प्रस्तुत ग्रथाचे प्रशसालेख उद्धृत केलेले आहेत. प्रास्ताविक लेखामध्ये संस्कृताचे विश्वभाषात्व व व्यावहारिकत्व अनेक प्रमाणानी प्रतिपादन केलेले आहे. प्रस्तुत ग्रथलेखनाचे प्रयोजन सागताना ते म्हणतात, "क्रैस्त १९४७ तमेऽब्दे यदाह वृन्दावनगुरुकुलविश्वविद्यालयस्य कुलपतिपदाधिष्ठित आसम् उच्चश्रेणीस्थैः छात्रैः अन्ते वासिभिः पृष्टम् यत् संस्कृतसाहित्यस्य इतिवृत्तम् नैवास्ति किम्? न खल्विदानीं यावन्मे दृष्टिपथं गतम् इति उत्तरम् ददानस्य मे हृदि कोऽप्युद्गात् महियान् व्याक्षोभः। चिरकालाध्ययनाध्यापनप्रसगे मैक्समुल्लर-विल्सन-विंटरनीझ-कीथ-मेक्डानल-प्रभृतीना पाश्चात्यविदुषाम् आङ्ग्लभाषालङ्कृताना संस्कृतसाहित्येतिवृत्तग्रथाना परिशीलनम् संस्कृतभाषाया च तादृशग्रथाना सर्वथाऽभाव हृदयेशयशङ्कुरिव मुहुश्च व्याकुलमकार्षीत मदीय मन पटलम्।" अशा प्रकारे संस्कृत भाषेचे वैगुण्य निवारण्यासाठी बद्धपरिकर झालेल्या आचार्य द्विजेन्द्रनाथजींनी अनेक ग्रथाचे सागोपाग आलोडन करून ५ वर्षांच्या आत प्रस्तुत ग्रथ लिहून तयार केला. वयाची पनाशी उलटल्यानतर एवढा मोठा सकल्प क्रियान्वित करणाऱ्या लेखकाचा उत्साह खरोखरच प्रशसनीय म्हटला पाहिजे. या ग्रथाचे २ भाग असून त्यातील पूर्वार्धाच्या ३३५ पृष्ठामध्ये वेदप्रकरणम्, वैदिकप्रकरणम्, षड्दर्शनप्रकरणम्, साम्प्रदायिकदर्शनम्, नास्तिकदर्शनम् पुराणागमदर्शनम् असे ६ परिच्छेद असून उत्तरार्धामध्ये लौकिक साहित्यासबधीचे ६ परिच्छेद आहेत. ७ व्या परिच्छेदात वाल्मीकि, व्यास याचा परामर्श, ८ व्या परिच्छेदात भास, कालिदास, अश्वघोष याच्या साहित्याचा विमर्श, ९ व्या परिच्छेदात भर्तृमेण्ठ भारवि, भट्टी, माघ इत्यादि ४० पेक्षा अधिक महाकवींच्या साहित्याचा विमर्श, १० व्या परिच्छेदात दण्डी, बाण, सुबन्धु इत्यादि गद्यलेखकाचा विमर्श, ११ व्या परिच्छेदात नाट्यवाङ्मयाचा परिचय व शेवटच्या १२ व्या परिच्छेदात चम्पूसाहित्य, कथासाहित्य, अलकारशास्त्र, सगीतशास्त्र, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, कामशास्त्र, स्तोत्रसाहित्य इत्यादि विविध प्रकारच्या साहित्याचा प्रकरणश परिचय देण्यात आलेला आहे. विषयाच्या विविधतेमुळे व विपुलतेमुळे हा ग्रथ आकाराने मोठा झालेला आहे. बहुधा सर्वच परिच्छेदामध्ये सदर्भानुरोधाने मूळ ग्रथातील वचने भरपूर प्रमाणात उद्धृत केलेली असल्यामुळे सदर्भग्रथ म्हणून या ग्रथाची उपयुक्तता वाढलेली आहे.

---

● प्राप्तिस्थान—मुन्शीराम मनोहरलाल अन्ड सॉ, नई सडक, दिल्ली, मूल्य १६ रुपये.

प्रकरण ३१ वें

# उपसंहार

## प्रादेशिक व संस्कृत साहित्य

संस्कृत साहित्याच्या इतिहासग्रंथात १७ व्या शतकानंतरच्या साहित्याचा उल्लेख प्राय. सर्व लेखकांनी टाळल्यामुळे १७ ते २० व्या शतकापर्यंतच्या कालखंडात संस्कृतात साहित्यनिर्मिति झालीच नाही व झाली असल्यास ती सर्वथा नगण्य स्वरूपाची असावी असा समज सुशिक्षित समाजात सुद्धा रूढ झाला असल्यास काही नवल नाही. हा समज दूर करणे व संस्कृत भाषेच्या सजीवत्वासंबंधीचा प्रत्यय निर्माण करणे या द्विविध आकांक्षेनेच आम्ही प्रस्तुत प्रबंध लिहिला. १७ व्या शतकानंतरहि संस्कृत साहित्याची स्रोतस्विनी आपल्या प्राचीन वैशिष्ट्यासह व नवीन वैचित्र्यासह स्वाभाविक गतीने कशी प्रवाहित होत होती याची कल्पना आतापर्यंत आलेल्या प्रकरणातून वाचकांना आली असेलच.

मुसलमानांच्या शासनकाळात यावनी भाषेला व १७ व्या शतकातील शिवाजी महाराजांच्या उत्थानानंतर महाराष्ट्र व इतरत्र स्वतंत्र झालेल्या देशी राज्यात प्रादेशिक भाषांना राजभाषेचे स्थान मिळाले तरी संस्कृत भाषा व संस्कृत विद्या यांची प्रतिष्ठा ओसरली नव्हती. इंग्रजी शिक्षणाच्या आरंभापूर्वी (इ. स. १८५७ पूर्वी) व त्यानंतरहि काही कालपर्यंत या देशात शिक्षण याचा अर्थच संस्कृत भाषा व विद्या यांचे आकलन हाच होता. आजहि जुन्या पिढीचा प्रत्येक सुशिक्षित अल्पस्वल्प प्रमाणात का होईना संस्कृतज्ञ असल्याचा आढळून येतं.

## प्रादेशिक भाषांचा उदय

तथापि या अर्वाचीन काळात भारतात सर्वत्र प्रादेशिक भाषा वेगाने विकास पावत होत्या. भारतातील तामीळ व्यतिरिक्त सर्व प्रादेशिक भाषांचा उदयकाळ सामान्यतः १० ते १५ या शतकात मानण्यात येतो. तेलगूचा प्रथम कवि नन्नय याचा काळ ११ वे शतक. कानडीचा उपलब्ध आद्य ग्रन्थ 'कविराजमार्ग', हा राष्ट्रकूट घराण्याचा राजा नृप तुंग याने लिहिला; त्याचा काळ इ. स. ८१४ ते ८७७ म्हणजे ९ वें शतक हा निश्चित आहे. मल्याळी भाषेचा आद्य ग्रन्थ 'रामचरितम्'

हा १३ व्या शतकातील मानण्यात येतो. गुजराथीचा आद्यग्रन्थ शालिभद्र भारतेश्वर विरचित 'बाहुबलिरास' हा असून त्याचा काळ इ. स. ११८५ हा आहे. मराठीचा सर्वमान्य आद्य ग्रन्थ ज्ञानेश्वरी हाहि १२ व्या शतकातलाच आहे. बंगालीचीं आरमीचीं चर्यागीतें १० ते १२ व्या शतकात लिहिली गेलीं. आसामीतील 'प्रल्हाद चरित' व 'हरगौरीसंवाद' या आरमीच्या श्रेष्ठ ग्रन्थाचा लेखक हेम सरस्वती हा १३ व्या शतकात होऊन गेला. उडिया भाषेचा श्रेष्ठ आद्य लेखक सारळादास १४ व्या शतकात झाला. पंजाबी व हिंदी साहित्याचा प्रारंभ काळ ११ वें शतक हा मानण्यात येतो.

## प्रादेशिक साहित्यांतील आरंभीचे विषय

अशा प्रकारे प्रस्तुत प्रबंधात संस्कृत साहित्याचा जो अर्वाचीन काळ गृहीत धरला आहे तोच इतर भारतीय भाषांतील साहित्याचा (थोड्या सैल अर्थानें) मध्यकाळ ठरतो. या काळातील संस्कृत साहित्यामागे जशी रामायण–भारत–भागवत यासारखे प्रभावी उपजीव्य ग्रन्थ व कालिदास, भवभूति, बाण, माघ, हर्ष, भारवि यासारख्या प्रतिभासम्पन्न युगप्रवर्तक साहित्यिकांनी प्रवर्तित केलेले वैशिष्ट्यपूर्ण साहित्यसम्प्रदाय, यांची पार्श्वभूमि आहे, तीच पार्श्वभूमि या प्रादेशिक साहित्याच्या मागे आहे. संस्कृत साहित्याव्यतिरिक्त दुसरी कोणतीहि प्रभावी साहित्यपरम्परा आरंभीच्या प्रादेशिक साहित्याच्या मागे नाही.

बहुतेक प्रादेशिक वाङ्मयात प्रथमतः नाथ–साहित्याची प्रवृत्ति झाली असें डॉ. नगेन्द्र यांचें म्हणणं आहे.[1] पंजाबी साहित्याचे इतिहासकार तर गोरखनाथ व चर्पटनाथ यानाच आपले आरंभीचे लेखक मानतात. याच आरंभीच्या काळात बहुतेक प्रादेशिक भाषामध्ये राज–स्तुतिपर किंवा वीरस्तुतिपर साहित्य निर्माण झालं असें दिसतें. तें असें :—

**तामिळमध्यें**—'पोरुन राष्ट्रप्पदई' (सेनापतीच्या गोष्टी). या ग्रन्थाचा विषय करिकलच्या चोलवंशातील राजाचें गुणवर्णन हा आहे. 'पेरुम्पनात्रुप्पदई' या ग्रन्थात कांचीच्या राजपुत्राचें गुणगान आहे. 'पदिट्रुप्पात्त' या ग्रन्थात निरनिराळ्या कवींनी केलेली चेर राजवंशातील श्रेष्ठ पुरुषांची स्तुति संकलित करण्यात आली आहे. 'सिलप्पदिकारम्' या प्रसिद्ध महाकाव्याचा विषयहि याच स्वरूपाचा असून चेर वंशातील एका सम्राट्पुत्राने त्याची रचना केली. (हा राजपुत्र पुढे तपस्वी झाला.)

---

१ भारतीय वाङ्मय—सं डॉ नगेन्द्र, पृ १

**तेलगुमधील** श्रीनाथरचित 'पल्नाटिवीरचरित्रम्' या काव्याचा विषय वीरस्तुतिपर असून त्यात पल्नाडु (गुंटूर) येथील योद्धयांच्या साहसी कथा रंगविल्या आहेत.

**मल्याळी** भाषेच्या 'पडय पाट्टुकळ' या आदिकाव्यात अनेक वीरांचीं चरितें ओजस्वी भाषेत गाइलीं आहेत.

**मराठी** साहित्यांत आरंभाच्या काळात वीरांचे पोवाडे आढळतात. पण त्या वीरकाव्यांनी महाकाव्याचें स्वरूप धारण केलेलें दिसत नाही.

**गुजरार्थीत** श्रीधरकृत 'रणमल्लछंद' व पद्मनाभकृत 'कान्हडदे प्रबन्ध' यासारखीं वीरचरित्रपर श्रेष्ठ महाकाव्यें आरंभींच्या काळात निर्माण झालीं.

**पंजाबींतील** वीररसपूर्ण स्तुतिकाव्यांची अवस्था मराठींतील आरंभींच्या पोवाड्यासारखीच आहे.

**हिन्दीच्या** आरंभकाळाला तर इतिहासकारांनी वीरगाथाकाळ हेंच नाव दिलेलें आहे. पृथ्वीराज रासो व आल्हा खंड यासारखीं आरंभींचीं व त्यानंतरचीं काव्यें वीरस्तुतिपरच आहेत.

## संतसाहित्य

प्रादेशिक साहित्याच्या आरंभकाळात प्रामुख्याने आढळणारी दुसरी वैशिष्ट्य पूर्ण परंपरा संतकाव्याची आहे. तामिळमध्ये अटारहसिद्धर; तेलगुमध्ये वेमन वीरब्रह्मम्; कानडींत सर्वज्ञ, मराठींत ज्ञानेश्वर नामदेव प्रभृति वारकरी व इतर संतमंडळी, गुजरार्थीत अखो, सहजानन्द, प्रीतमदास हे व इतर वल्लभ-सम्प्रदाय-विरोधी वैष्णव संत, बंगालींत बाउल गीत रचणारे संतकवि, पंजाबींत गुरुनानक व त्यांच्या सम्प्रदायांतील संत आणि हिंदींत कबीर, दादूदयाल, सुंदरदास, तुलसीदास, सूरदास, इत्यादि असंख्य संतांनी भारतांतील सर्व प्रादेशिक वाङ्मयाचा प्रवाह आपल्या भक्तिप्रचुर काव्यांनी फारच परिपुष्ट केला आहे.

## वैष्णवसाहित्य

संस्कृतांतील रामायण व भागवत या उपजीव्य ग्रन्थांच्या प्रभावाने सर्वच प्रादेशिक भाषांत आरंभकाळीं फार मोठें वैष्णव साहित्य निर्माण झालेलें दिसून येत. संतकाव्याच्या व या काव्याचा फार विशेष भिन्न नाही.

*तामिळ भाषेत प्राचीन काळीं बारा आल्वार कवींनी* '*नालायिरप्रबन्धम्*' नामक फार मोठ्या काव्याचा संग्रह निर्माण केला. या ग्रन्थात एकूण ४ हजार छंद आहेत. त्यांमध्ये तिरुमंगै आल्वार, नम्माळवार व आंडाळ ही कवयित्री यांचीं काव्यें अधिक प्रमाणात आहेत. मध्यन्तरींच्या कालखंडात पिल्लै तेरुमाळ अय्यंगार हे प्रसिद्ध वैष्णव कवि होऊन गेले. त्यांनी 'अष्टप्रबन्धम्' हें प्रख्यात वैष्णवी काव्य निर्माण केलं.

तेलगूत 'रंगनाथरामायण' (१३ वें शतक) 'भास्कररामायण', कुम्मरि मोल्लकृत रामायण, बम्मेर पोतनकृत 'भागवतम्', तिम्मनकृत 'पारिजातापहरणम्' मुद्दुपलणी या कवयित्रीचें 'राधिकासान्त्वनम्' यासारखे रामायण-भागवतावर आधारित उत्कृष्ट व लोकप्रिय वैष्णवीय काव्यग्रंथ निर्माण झाले. विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट ही की भारतातल्या इतर प्रदेशापेक्षा आन्ध्रात प्रभु रामचंद्रासंबंधी काव्यरचना फार मोठ्या प्रमाणात झाल्याचें दिसून येतें.

कानडी भाषेंत राम व कृष्ण यांच्या जीवनावर तेलगूप्रमाणें मोठमोठीं काव्यं स्वतन्त्रपणे निर्माण झालीं. पण त्याना वैष्णव सम्प्रदायी काव्यांत महत्त्वाचं स्थान देत नाहीत. तथापि साम्प्रदायिकामध्ये मान्यता पावलेलीं स्फुट वैष्णव काव्यें कानडींत कमी प्रमाणात झालीं नाहीत. रामायण व भागवताचीं उत्कृष्ट भाषान्तरें कानडींत झालीं आहेत.

मल्याळी भाषेत 'कृष्णगाथा' (१५ वें शतक) 'भाषाभागवतम्', 'हरिनामकीर्तनम्', 'कृष्णनाट्टम्' (ही अट्टकथा) 'कण्णश्श रामायणम्', एळुत्तच्छन कृत 'अध्यात्मरामायण', 'रामनाट्टम्' (ही अट्टकथा) 'रामायणचम्पू', हीं वैष्णवकाव्यें सर्वमान्य आहेत.

मराठींत एकनाथ महाराजांचे 'भागवत' व 'भावार्थ रामायण' हे दोन मोठे ग्रन्थ व त्याव्यतिरिक्त समर्थांचे रामायण व कृष्णदयार्णवाची 'हरिवरदा' ही भागवतावरील व्याख्या, वैष्णवी साहित्यात उल्लेखनीय आहे. नामदेव, तुकाराम यांचे महाराष्ट्रात सर्वतोमुखी असलेले कृष्णभक्तिपर अभंग वैष्णवकाव्यातच अन्तर्भूत होतील. पण त्यांचे स्वरूप पुष्कळ आहे.

गुजराथींत नरसी मेहता, भालणनाकर, विष्णुदास, प्रेमानन्द यांचीं कृष्णभक्तिपर वैष्णवी काव्य अप्रतिम समजण्यात येतात. रामभक्तिपर काव्य जरी तेलगूत भरपूर आहेत, तरी गुजराथींत कृष्णभक्तिपर काव्य आहेत.

बंगालींत, चैतन्य महाप्रभु व चण्डीदास यानी प्रवर्तित केलेला वैष्णवी काव्य सम्प्रदाय मुरारिगुप्त, नरहरि सरकार, वासुदेव घोष, रामानन्द बसु, ज्ञानदास, गोविंददास, लोचनदास, बलरामदास, रायशेखर यासारख्या अनेक थोर कवींनी समृद्ध केला. या कवींनी गीतिकाव्य व चरितकाव्य या दोन्ही स्वरूपाचीं काव्य इतक्या भरपूर प्रमाणात निर्माण केलीं की त्याचा प्रभाव आसामी व उडीया साहित्यावरहि झाला. रामभक्तिपर वैष्णवी साहित्यात कृत्तिवास ओझा यांचें रामायण उत्तरेंतल्या तुलसीरामायणाइतकेंच बंगालांत मान्यता पावलें आहे.

आसामी भाषेंत, माधव कन्दलीचे 'रामायण' व 'देवजित' हें कृष्णभक्तिनिष्ठ काव्य, शंकरदेवाची 'कीर्तनघोषा', व त्याचा शिष्य माधवदेव यानी

'सहस्रकीर्तन-घोषा' याना फार मान आहे. सहस्रकीर्तनघोषेला 'बडगीत' ही लोकप्रिय संज्ञा आहे.

उडीया भाषेतील वैष्णवी साहित्यावर चैतन्य सम्प्रदायाचा फार मोठा प्रभाव पडला आहे. दीनकृष्णदास, अभिमन्यु, सामन्तसिंहर, कविसूर्य, बलदेव, भक्तचरण गोपाळकृष्ण या कवींनी भगवान कृष्णाच्या जीवनातील अनेक प्रसंगावर उत्कृष्ट काव्ये लिहिलीं. बलरामदासाचें रामायण हें उडीया भाषेतील उत्कृष्ट रामायण समजण्यात येतें.

या वैष्णवी साहित्याचा ठसा उर्दूवर मुद्धा उमटला आहे. काही हिंदु कवींनी व नजीर अकबराबादीसारख्या मुसल्मान कवीने कृष्णभक्तिपर काव्ये उर्दूत लिहिलीं. पण तीं उर्दूच्या प्रकृतीशीं विसदृश वाटतात; असें तज्ज्ञांचें यासंबंधी मत आहे.[२]

हिंदी भाषेंत तर वैष्णवी साहित्याचें सर्वांत अधिक प्रमाण उपलब्ध होतें. याचें कारण वैष्णवसाम्प्रदायिकांचीं केन्द्रस्थानें अयोध्या व मथुरा हिंदीभाषी प्रदेशाच्या हृदयस्थानीं आहेत. वल्लभ, निंबार्क, माध्व, हितहरिवंशाचा राधावल्लभ व गौडीय यासारख्या सर्व वैष्णव सम्प्रदायाच्या साधूंनी हिंदींत भरपूर साम्प्रदायिक साहित्य निर्माण केलें. त्याच्या साहित्याचा हिंदी साहित्यावर दीर्घ कालपर्यंत सखोल प्रभाव उमटलेला दिसतो.

## रामायण-भारताचा प्रभाव

तात्पर्य, सर्व प्रादेशिक साहित्याच्या इतिहासात मध्ययुगीन समजल्या जाणाऱ्या सम्पूर्ण साहित्यावर आध्यात्मिक दृष्ट्या साहित्यिकांच्या अंतःकरणातील राम-कृष्णाच्या भक्तीचा किंवा वाङ्मयीन दृष्ट्या संस्कृतातील रामायण व भागवत *या महनीय ग्रंथाचा फार मोठा ठसा उमटलेला दिसतो एकट्या वाल्मीकि रामा*यणाच्या प्रभावानें एकट्या तामीळमध्यें **कम्ब रामायण**, तेलुगुमध्यें **रंगनाथ-रामायण व भास्कररामायण**, कानडींत **पम्परामायण**, मल्याळी भाषेत एज्जुत्त्च्चनचें **अध्यात्मरामायण**, मराठींत एकनाथाचें **भावार्थरामायण** व मोरोपंताचीं *अष्टोत्तरशत रामायणें*,[३] *बंगालींत* **कृत्तिवासाचें रामायण**, *आसामांत* **माधव**

---

२ "यह कविता उर्दूकी आत्मासे मेल नही खाती"—डॉ नगेन्द्र (भारतीय वाङ्मय, प्रस्तावना, पृ १६)

३ मोरोपंताचा संस्कृत काव्यसंभार त्याच्या मराठी काव्य संभाराच्या तुलनेंत लहान असला तरी तो अनेक अर्वाचीन संस्कृत कवींच्या काव्यापेक्षा कितीतरी मोठा व सरस आहे रामचरित्रविषयक अर्वाचीन संस्कृत कवींत मोरोपंताचें स्थान फार श्रेष्ठ आहे

कन्दलीचें **रामायण,** उडीया भाषेत सारळादासाचें **विलंका रामायण** व मराठीमध्ये वरदरामदासाचें रामायण आणि हिन्दीत तुलसीदासाचें **तुलसीरामायण** किंवा रामचरितमानस, हे सर्वश्रेष्ठ ग्रन्थ विविध प्रादेशिक साहित्यात निर्माण झाले. आजहि या रामायणाइतका दुसऱ्या कोणत्याहि ग्रन्थाचा प्रभाव, त्या त्या प्रदेशातील समाजाच्या अन्त करणावर पडलेला दिसत नाही.

महर्षि वाल्मीकीच्या रामायणाप्रमाणेच भगवान् व्यासांच्या महाभारताच्या प्रभावाने तेलगूत नन्नय, तिक्कन व एर्रन; कानडीत पम्प व कुमारव्यास; मल्याळीत एजुत्तच्चन ( यांचे महाभारत त्यांच्या रामायणापेक्षाहि लोकप्रिय आहे, असे म्हणतात. ), मराठीत श्रीधर ( पाण्डवप्रतापकार ), मुक्तेश्वर व मोरोपंत, बंगालीत काशीरामदास, आसामीत रामसरस्वती ( याने महाभारतावर आधारित अनेक वधकाव्यें लिहिली. ) उडीया भाषेत सारळादास ( याला महाभारतामुळे 'उत्कल-व्यास' ही उपाधि प्राप्त झाली ), पंजाबीत कृष्णलाल व हिंदीत गोकुलनाथ, सबलसिंह चौहान व मैथिलीशरण गुप्त या श्रेष्ठ व मान्यवर साहित्यिकांनी लिहिलेली विविध स्वरूपाची महाभारतें त्या त्या साहित्याची आभूषण मानण्यात येतात.

प्रादेशिक भाषांच्या साहित्यात राम व कृष्ण यांच्या भक्तीमुळे जसें वैष्णवी स्वरूपाचे साहित्य निर्माण झालें तसें शिवभक्तिनिष्ठ शैवसाहित्य मात्र फारसें निर्माण झाल्याचे दिसत नाही. परंतु अर्वाचीन संस्कृत साहित्याच्या आरंभीं, प्राचीन परंपरे-नुसार व समकालीन प्रादेशिक साहित्याशीं अनुरूप असें वैष्णवी साहित्य जसे भरपूर प्रमाणात आपल्या वैशिष्ट्यानुसार निर्माण झालेलें दिसत, तसेच शैवसाहित्यहि दिसून येतें. समकालीन प्रादेशिक साहित्यातलें हें व्यङ्ग संस्कृत साहित्यात नाही ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. त्याचप्रमाणे महाभारतातील आख्यानो-पाख्यानावर आधारलेली अनेक काव्य-नाटकें जशी या कालखंडातील संस्कृत साहित्यात भरपूर प्रमाणात दिसतात, तशीं प्रादेशिक साहित्यात दिसत नाहीत. समकालीन राजपुरुषांची काव्यात्मक चरितें लिहिण्याच्या कामीं संस्कृत साहित्यिक फारसे जागरूक नाहीत, पण प्रादेशिक साहित्यिक तितकेहि जागृत दिसत नाहीत.

तात्पर्य अर्वाचीन कालखंडातील संस्कृत साहित्यिकांनी जे विषय आरंभीं हाताळले, त्याच विषयावर प्रादेशिक साहित्यिकहि लिहीत होते. विषयाच्या दृष्टीने दोघेहि समान भूमिकेवर होते. प्रकाराच्या दृष्टीने संस्कृत साहित्यिकांनी चम्पू, विविध रूपकें, शतक इत्यादि विविध प्रकार हाताळले प्रादेशिक साहित्यात हे वैविध्य नाही. हा भेद लक्षात ठेवण्यासारखा आहे.

## भारतीय साहित्यांतील नवयुग

इ. स. १८५७ मध्ये इंग्रजांविरोधी स्वातंत्र्ययुद्धाची पहिली उठावणी झाली. त्यानंतर या देशात सांस्कृतिक आक्रमणाच्या द्वारा आपलें राजकीय वर्चस्व सुस्थिर

करण्याचा प्रयोग फार मोठ्या प्रमाणांत इंग्रजांनी आरंभिला. त्याचा परिणाम भारतीय जीवनाच्या इतर सर्व अंगोपांगाप्रमाणे साहित्यावरहि झाला. पण त्याचबरोबर या नव्यानं परकीय राजसत्तेविरुद्ध स्वातंत्र्याकांक्षेचा रौद्र हुंकार साहित्यांतून निर्माण झालेला दिसतो. गेल्या शंभर वर्षांत अखिल भारतात जें नवीन स्वरूपाचें साहित्य निर्माण झालें, त्याचे साधारणतया ४ विभाग पाडण्यात येतात. ते असे—(१) नवजागरण, (२) राष्ट्रीय–सांस्कृतिक भावनेचा उद्रेक, (३) पाश्चात्य सौंदर्यदृष्टि व (४) साम्यवादी विचारसरणीचा प्रभाव. हे चार विभाग साहित्यांत निर्माण होण्यास देशभर जीं कारणें घडलीं, तीं सुद्धा समान आहेत.

इंग्रजांनी राज्य हातीं येतांच ख्रिस्तधर्म-प्रचारकांच्या द्वारा देशभर मोठमोठ्या शिक्षणसंस्था स्थापन करवून त्यांतून आपली भाषा व तदन्तर्गत ज्ञान–विज्ञान याचा फार प्रचंड प्रमाणांत प्रचार आरंभिला. शासनकर्त्यांच्या प्रयत्नांतून जो वैचारिक संघर्ष निर्माण झाला, त्यांतून वरील चार प्रकारचें साहित्य आकारास आलें असें म्हणतां येईल. साहित्याचे हे आधुनिक प्रकार १८५७ पूर्वीच्या साहित्यात देशभर कोठेहि आढळत नाहीत. (हे नवीन प्रकारहि आता स्वातंत्र्योत्तर काळांत जुने ठरत असून याहून वेगळ्या स्वरूपाचें साहित्य या नव्यानं स्वातंत्र्यामुळे निर्माण केलेल्या परिस्थितीच्या प्रभावानें निर्माण होईल असें साहित्य समीक्षकांना वाटू लागलें आहे.)

वर उल्लेखिलेल्या चतुर्विध नवजागरणात्मक साहित्याची निर्मिति करणाऱ्या अनेक प्रांतिक साहित्यिकांची नावें सर्वत्र प्रसिद्धच आहेत. त्यांपैकी कांही श्रेष्ठ साहित्यिकांची नावें पुढीलप्रमाणे आहेत :—

**तामिळ**—रामलिंग स्वामिगळ, सुब्रह्मण्यभारती, चिदंबर पिळ्ळे, व्ही. वी. एस्. अय्यर, भारतीदासन् इत्यादि.

**तेलगु**—गुरजाड अप्पाराव, रायप्रोलु सुब्बाराव, श्रीरंगम् श्रीनिवासराव, दाशरथि इत्यादि.

**कानडी**—श्रीकंठय्या, गोविंद पै, बेन्द्रे, शंकरभट्ट, पुटप्पा गोकाक, कृष्णराव, करन्त, निरंजन.

**मल्याळी**—केरळवर्मा, येनमणि, राजराजवर्मा, वळ्ळत्तोळ, शंकर कुरुप, कृष्णपिळ्ळे, ए. बाळकृष्ण पिळ्ळे, एम. पी. पाल, एन. व्ही. कृष्णवारियर, आक्किताम्, पयन्नार रामवर्मा, ओलप्पमन्न, ओ. एन. व्ही. कुरुप, पी. भास्करन्, अनुजन्, इत्यादि.

**मराठी**—बाळशास्त्री जांभेकर, कृष्णशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक, शिवराम परांजपे, हरिभाऊ आपटे, महात्मा फुले, कीर्तिकर, केशवसुत, गोविंदाग्रज (गडकरी), कवि गोविंद, स्वातंत्र्यवीर सावरकर, बी., बालकवि, मर्ढेकर, इत्यादि.

**गुजराथी**—नर्मद, नान्हालाल, प्रा. ठाकोर, काका कालेलकर, आनंदशंकर ध्रुव, उमाशंकर सुन्दरम्, कन्हैयालाल मुन्शी, राजेन्द्रशाह, इत्यादि.

**बंगाली**—राममोहन राय, ईश्वरचंद्र विद्यासागर, महर्षि देवेन्द्रनाथ ठाकुर, ईश्वरगुप्त, मधुसूदन दत्त, बंकिमचंद्र, शरच्चंद्र, रवीन्द्रनाथ ठाकुर, सुभाष मुखोपाध्याय, माणिक बन्दोपाध्याय, विष्णु डे, इत्यादि.

**आसामी**—आनंदराम फुकन, कमलाकान्त भट्टाचार्य, हेमचंद्र बरुआ, चंद्रकुमार अग्रवाल, लक्ष्मीनाथ बेजबरुआ, हेमचंद्र गोस्वामी, इत्यादि.

**उडीया**—फकीर मोहन सेनापति, राधानाथ मधुसूदन, गोपबन्धुदास, वैकुण्ठ पट्टनायक, कालिन्दीचरण पाणिग्राही, शची राउतराय, विनोद राउतराय, विनोद नायक, इत्यादि.

**पंजाबी**—सर अतरसिंह, गुरुमुखसिंह मुसाफिर, हीरासिंह दर्द, भाई वीरसिंह, पूरनसिंह, मीतमसिंह सफीर, इत्यादि.

**हिन्दी**—भारतेन्दु, राजा शिवप्रसाद (सितारे हिन्द), मैथिलीशरण गुप्त, माखनलाल चतुर्वेदी, सियारामशरण गुप्त, दिनकर, प्रसाद, निराला, सुमित्रानन्दन पंत, महादेवी वर्मा, इत्यादि.[४]

वर उल्लेखिलेल्या प्रख्यात साहित्यिकांनी व त्यांचे अनुसरण करणाऱ्या इतर शेकडो साहित्यिकांनी आधुनिक प्रादेशिक साहित्यात शतकानुशतकांच्या परंपरागत साहित्यिक प्रवाहापेक्षा सर्वथा नवीन स्वरूपाचे प्रवाह निर्माण केले आहेत.

## संस्कृत साहित्यांत क्रांति

१८५७ नंतरच्या कालखंडात भारतातल्या प्रादेशिक साहित्यात जें परिवर्तन घडून आलें, त्याचें प्रतिबिंब आधुनिक संस्कृत साहित्यात स्पष्टपणे पडलेले दिसून येतें. या काळातल्या अनेक संस्कृत लेखकांनी इतर प्रादेशिक साहित्यिकांप्रमाणेच पाश्चात्य साहित्याचे अध्ययन केलें असल्याने, पाश्चात्य साहित्याच्या तुलनेत आपल्या प्रिय संस्कृत भाषेमध्ये जें न्यून त्यांना ठळकपणे जाणवले ते भरून काढण्याच्या उद्योगास हे लोक लागलेले दिसतात. त्या दृष्टीने विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे या काळात झालेले संस्कृतातील अनुवादात्मक ग्रन्थ. शतकानुशतक भारतातील नव्हे तर जगातील अन्य भाषीय विद्वानांनी संस्कृत ग्रंथांचे अनुवाद करून आपले साहित्य पुष्ट केलें. १९ व्या शतकाच्या आरंभापर्यंत ही प्रक्रिया एकांगीच चालू होती. तोपर्यंत संस्कृत साहित्यिकांना त्यांच्या प्रादेशिक भाषेतील ग्रथरत्नांना संस्कृतानुवाद

४ आधुनिक प्रादेशिक साहित्यिकांची ही नामावलि अत्यंत संक्षेपत दिलेली आहे. यामध्ये त्या त्या प्रदेशात सर्वतोमुखी असलेली वेचक नावे आहेत

करण्याची आवश्यकता वाटली नाही, हें आश्चर्य आहे. ज्ञानेश्वरी, दासबोध, गुरुचरित्र यासारख्या मराठींतील श्रेष्ठ ग्रंथांचे संस्कृतानुवाद करण्याची कल्पना एकाहि वारकरी, रामदासी किंवा दत्तसम्प्रदायी संस्कृतज्ञाला १९ व्या शतकापूर्वी सुचली नाही. भाषांतरित साहित्यविषयक प्रस्तुत ग्रंथांतील (२२ व्या) प्रकरणामध्यें ज्या विविध अनुवादित ग्रंथांचा आम्ही उल्लेख केला आहे, त्यांतील अनेक ग्रंथ कांहीं शतकांपूर्वी लिहिले गेले आहेत. त्यांच्या समकालीन संस्कृत पंडितांनी ते वाचलेच नसतील असें कसें म्हणतां येईल ? पण त्यांना संस्कृत भाषेत त्यांचे भाषांतर करण्याइतकें त्यांचे महत्त्व कधी वाटल्याचें दिसत नाही. संस्कृत ग्रंथांचे प्रादेशिक भाषांतून अनुवाद करण्याचें कार्य पूर्वीप्रमाणेच आजहि चालू आहेच. आधुनिक संस्कृतज्ञांनी मात्र त्यांच्या पूर्वजांनी कधी न केलेलें कार्य या काळांत आरंभिलें, ही एका अर्थानें संस्कृत साहित्यांत झालेली क्रान्तीच म्हटली पाहिजे.

## प्रादेशिक साहित्याचा प्रभाव

. १९ व्या शतकापासून पाश्चात्य पद्धतीचें साहित्य संस्कृतांत निर्माण होण्याचें दुसरें कारण म्हणजे १९ व्या शतकापर्यंत प्रादेशिक भाषांतील (१० ते १५ व्या शतकापासून उदयास आलेल्या) साहित्य भरपूर समृद्ध झालें. विशेष म्हणजे त्यानें बहुसंख्य जनतेच्या अन्तःकरणाची घट्ट पकड घेतली. ज्ञानेश्वर, तुकाराम, मोरोपंत, तुलसीदास, सूरदास, कबीर, तिरुवल्लुवर, नम्माळवार, रंगनाथ, भास्कर, एळुत्तच्चन, नरसी मेहता, विष्णुदास, चैतन्यप्रभु, चण्डीदास, माधव कन्दली, शंकरदेव, दीन कृष्णदास, बलदेव, सारळादास यासारख्या सर्वमान्य प्रादेशिक कवींचीं काव्यें महापण्डितांपासून दीनमजुरांपर्यंत यच्चयावत् रसिकांच्या जिव्हाग्रीं नाचूं लागलीं होतीं. त्यांच्या संस्कारानें व प्रभावानें सर्व प्रादेशिक भाषांतून प्रचण्ड प्रमाणांत साहित्यनिर्मिति होत होती. शिक्षणसंस्कारासाठी प्रामुख्यानें संस्कृतचाच अभ्यास होत असला तरी त्या संस्कृतज्ञांना या लोकप्रिय साहित्यांत अवगाहन करावंच होतें. देशभर पसरलेली संस्कृतज्ञांची संख्या संस्कृतला राष्ट्रभाषा करण्याइतकी मोठी असली तरी लौकिक सर्वच व्यवहार ठिकठिकाणच्या प्रादेशिक भाषेंतच चालत. त्यामुळें संस्कृत साहित्यिकांचा मन:पिण्ड प्रादेशिक भाषेच्या साहित्यिकसंस्कारानें बनत होता. यात्यतिरिक्त प्रादेशिक साहित्यिकांच्या अभिनव रचनांमुळें त्यांना नवीन रसिक-वर्गात जी मान्यता प्राप्त होई त्याचाहि प्रभाव संस्कृत साहित्यिकांच्या अन्तःकरणावर होत असल्यानें प्राचीन साहित्यिकांचे पाळ्यांत संप्रदाय त्यांना कितीहि प्रिय असले तरी, थोडे नवीन प्रकार हाताळण्याचा मोह त्यांना होणें अगदी स्वाभाविक होतें. त्यानंतर या नवीन पद्धतीनें लिहिणे आमच्या सनातन देववाणीला, प्रादेशिक भाषांतील लिखाणाइतकेंच प्रभावी रीतीनें करतां येतें, हें

सिद्ध करून दाखविण्याची ईर्षा संस्कृत लेखकांना नवीन पद्धतीचें अनुकरण करण्याची प्रेरणा देत होती असें दिसतें. आधुनिक संस्कृतातील संपूर्ण गेय काव्य, हास्यरसात्मक व राष्ट्रीय साहित्य[१] हें याचें उदाहरण आहे. भट्ट मथुरानाथ शास्त्री यांनी या संबंधींच आव्हान स्वीकारूनच गेयकाव्यरचना केली, हे मागे (पृ. १११ व १९७) सांगितले आहे.

आधुनिक पद्धतीचें साहित्य संस्कृतात निर्माण होऊं लागलें याचें आणखी एक कारण म्हणजे, प्राचीन लेखकांच्या प्रौढ-प्रगल्भ लेखनशैलीचें अनुकरण करण्याची कित्येकांची अक्षमता ! प्राचीन संस्कृत साहित्याचा भरपूर अभ्यास केला तरी प्राचीन लेखकांची शैली किंवा क्षमता सर्वांना आत्मसात् होणे कठीण. त्यातहि संस्कृतापेक्षा प्रादेशिक व इंग्रजी वाङ्मयाचा संबंध अधिक प्रमाणात घडत असल्याने, आधुनिकांच्या शैलीचाच संस्कार संस्कृत लेखकावर प्रामुख्याने होतो व म्हणून स्वतःचे विचार किंवा भावना अभिव्यक्त करण्याचा प्रसंग येतांना ते प्रामुख्याने आत्मसात् झालेल्या आधुनिक शैलींत प्रकट होतात. या परिस्थितीतून लेखनशैलीच्या दृष्टीने आधुनिक स्वरूपाचें संस्कृत साहित्य निर्माण झाले असे आम्हांस वाटतें. बाणभट्टासारख्या समासभूयिष्ठ पण हृद्य गद्य लिहिण्याच्या अक्षमतेतूनच अनेकांचें सुबोध गद्य अवतरलं आहे असें म्हटलं तर, सुबोध लिखाण करणाऱ्या कोणावरहि अन्याय होणार नाही. लेखनशैली हा व्यासंगाचा परिपाक आहे. ज्यांना बाणभट्टी पद्धतीचें ओजस्वी गद्य लिहिण्याचा अभ्यास झाला असेल त्यांना वृत्तपत्रकारासारखें सरळ सुबोध लिहिता येणार नाही व आलें तरी त्याला तें बरेंच जड जाईल हें उघड आहे. नेहमी इंग्रजींतून सर्व लिखाण करणाऱ्याला स्वतःच्या अज्ञ नातलगाला सोप्या मातृभाषेत साधें पत्रसुद्धा लिहिता येत नाही, हा अनेकांचा अनुभव आहे.

आरंभीच्या प्रादेशिक व संस्कृत साहित्यांत जशी विषयाची समानता आढळते तशीच साहित्यप्रकारांचीहि समानता आढळून येते. महाकाव्य, खंडकाव्य, मुक्तक, कथा, आख्यायिका, चंपू व नाटक हे ललित वाङ्मयप्रकार अतिप्राचीन काळीं भारतांत उत्पन्न झाले व त्याच स्वरूपांत आजवर सर्व भारतीय साहित्यांत थोड्या फार भेदानिशीं तसेच चालू आहेत. पुढे १९ व्या शतकांत ज्या नवीन वाङ्मयप्रकारांना वेगाने चालना मिळाली ते प्रादेशिक साहित्यिकांप्रमाणेंच संस्कृत साहित्यिकांनी आत्मसात् केले असले तरी महाकाव्यादि आपले परंपरागत प्रकार त्यांनी उपेक्षिले नाहीत. किंबहुना ते प्रकार संस्कृत अभिरुचीच्या साहित्यिकांना इतके प्रिय आहेत की तसल्या प्रकारचे निर्माण आपल्या हातून न घडेल तर त्यांना कृतकृत्यता वाटत नाही. पाश्चात्य साहित्याच्या प्रभावाने संबोधगीतें (odes), शोकगीत (एलिजी), चतुर्दशपदी सुनीत (सॉनेट), मुक्तच्छन्द, गद्यगीतें यासारख्या

१ पूर्वार्ध, प्रकरण २०, २६ व २७ पाहा

वाङ्मयप्रकारांचा प्रचार सर्व प्रादेशिक भाषांत झाला आहे. तथाकथित मुक्तछन्दाचा प्रभाव तर आज इतका पडला आहे की सुश्लिष्ट छन्दोबद्ध रचना करण्याची क्षमता प्रादेशिक साहित्यिकांतून नष्ट झाली की काय असें वाटूं लागतें. वृत्तपत्रांतून लिखाण करणारे संस्कृत साहित्यिक या नवीन वाङ्मयप्रकारांचा अवलंब करतांना तुरळक आढळतात. पण हे सारे प्रकार संस्कृतच्या दृष्टीनें काहीसे विसदृश वाटतात. कृष्णभक्तिपर उर्दू काव्यासंबंधी डॉ. नगेन्द्र यांचे जें मत वर उद्धृत केलें आहे तेंच मत, संस्कृतांत शिरत असलेल्या या मुक्तच्छन्दादि प्रकाराविषयी आम्हास व्यक्त करावेसें वाटतें. जी गोष्ट नवीन वाङ्मयप्रकाराची तीच विषयांची. आधुनिक प्रादेशिक साहित्यांत साम्यवादी विचारसरणीचा सूर प्रगतिवादाच्या नावाखाली मोठ्या प्रमाणांत निर्माण होत होता त्यावेळीं साम्यवादाविषयी ममत्व असलेले कांही लोक त्या साहित्याची प्रशंसा करीत असत. वस्तुनिष्ठ पद्धतीने त्याचे रसग्रहण केलें तर त्या साहित्यात कांही मौलिक सौंदर्यहि आढळेल. तथापि त्याचे आधुनिक रूक्ष विषय एकूण भारतीय साहित्याच्या रसनिष्ठ प्रकृतीशीं फारच विसदृश वाटतात. पाश्चात्य वेषांतला नटरदेव पाहिला म्हणजे (तो नावीडोळी कितीहि नीटस असला तरी) बरा दिसत नाही किंवा क्वचित् बरा दिसला तरी त्याकडे पाहून बरें वाटत नाही. नवीनतेच्या आहारीं जाऊन आमचे साहित्यिक आपलें स्वत्वच गमावून बसतील की काय अशी चिंता वाटूं लागते. नवीनता यावी, पण ती स्वत्वाचा घात करील इतक्या प्रमाणांत येतां कामा नये. पाहुणे यावेत, त्यांचें आतिथ्यहि भरपूर व्हावें, पण त्यांच्यामुळे घरच्यांचीच कुचंबणा होऊं नये !

## नवीन शब्दनिर्मिति

प्रादेशिक साहित्यिक हे आजवर बहुधा संस्कृतज्ञच असत. त्यामुळे त्यांना हवे असलेले शब्द ते संस्कृतांतून घेत. आजचे साहित्यिक बहुधा संस्कृतानभिज्ञ असतात. त्यांच्या अध्ययनाचें व चिंतनाचे माध्यम बहुधा इंग्रजीच असतें. त्यांना सहज शब्द सुचतात ते मुख्यतः इंग्रजीच. त्या इंग्रजी शब्दांचे पर्याय शब्द ते स्वच्छंदपणे संस्कृतच्या आधारें निर्माण करीत असतात. भिन्न भाषांच्या साहित्यिकांनी एकाच इंग्रजी शब्दाचे आपापल्या प्रादेशिक भाषेत वेगवेगळे संस्कृतमूलक पर्याय रूढ करून ठेवले आहेत. नवे संस्कृत साहित्यिक तेच शब्द आधुनिक विषयांवरील लेखनांत सर्रास संस्कृत शब्द म्हणूनच वापरतात. पण ते शब्द संस्कृतमूलक असले तरी त्यांच्यावर प्रादेशिकतेची छाप राहतेच. हिंदी प्रदेशांतला नवीन संस्कृत लेखक ज्या अर्थाने 'उपन्यास' शब्दाचा वापर करील त्याच अर्थी महाराष्ट्रातील संस्कृत लेखक 'कादंबरी' हा शब्द वापरील. महाराष्ट्रांतला संस्कृत लेखक लघुकथा म्हणेल तर उत्तरेकडचा 'क्षुद्रकथा' हा शब्दप्रयोग करील. आधुनिक संस्कृत लिखाणांत हा प्रकार सर्रास आढळतो. विचारांचें संस्कृतीकरण हा तर संस्कृत लेखकांचा

छेदच दिसतो.' त्यामुळे संस्कृतच्या प्रवृत्तीशी निगडश असलेली विशेषनामे वापरण्यांत येत नसली तरी अर्थाचा अनर्थ होतो. 'जॉर्ज' शब्दाचे 'जारज' हें संस्कृत रूपांतर कोणत्या जॉर्ज नांवाच्या इंग्रजी माणसाला आवडेल? आपल्या देशी नांवांची इंग्रजानी केलेली अशी विकृत इंग्रजी रूपान्तरें आपणासहि आवडत नाहीत. विशेषनामाच्या संस्कृतीकरणाप्रमाणेच एकाच मूळ इंग्रजी शब्दाचे भिन्न भिन्न संस्कृत पर्याय ही एक गमतीची समस्या आहे. तथापि संस्कृत भाषेला तिचा उपसर्ग पोचणार नाही. एका शब्दाचे अनेक अर्थ जसे संस्कृतांत भरपूर प्रमाणांत आढळतात, तसेच एका अर्थाचे अनेक शब्द (व तेहि सर्वत्र प्रचलित स्वरूपात) संस्कृत भाषेत आढळतात. त्यांमध्ये या नवीन शब्दाची भर पडत आहे. हिंदीमध्ये 'उपन्यास' ऐवजी 'कादम्बरी' हा शब्द वापरला तर व मराठीत लघुकथा ऐवजी 'क्षुद्रकथा' हा शब्द वापरला तर एका परीने चूकच मानण्यांत येईल. 'मालंच' हा बगाली शब्द पुष्पगुच्छ या अर्थी मराठींत रूढ होऊन त्याला मराठीपण यावयाला फार काळ लागेल. संस्कृतांत तसा प्रश्न उपस्थित होणार नाही. शब्दाची व्युत्पत्ति संस्कृत व्याकरणानुरूप असली म्हणजे तो संस्कृत. मग तो ओग्लन्डून येवो की बंगालातून येवो."

## प्रादेशिक साहित्यांतील 'वाद' व संस्कृत साहित्य

प्रादेशिक साहित्याच्या बरोबरीने आधुनिक संस्कृत साहित्याचा परामर्श घेतांना प्रादेशिक भाषातील साहित्यिकांत ज्याची आजकाल विशेष चर्चा होते, अशा विविध साहित्यिक वादाची आठवण होणे स्वाभाविक आहे. आजचे प्रादेशिक साहित्यिक इंग्रजी साहित्याशी विशेष परिचित असल्याने त्वत्समकालीन इंग्रजी साहित्यिकांनी आपल्या साहित्यात जे संकेतवाद (सिम्बालिझम्), सौन्दर्यवाद, भावप्रतिमावाद (इमेजिझम्), अतियथार्थवाद (सररियालिझम्) इत्यादि नवीन 'वाद' आपल्या काव्यकर्तींनी निर्माण केले, त्यांच्या आधारे ते आपल्या साहित्याचें मूल्यमापन करीत असतात. याच प्रकारचे विविध साहित्यिक वाद भारतांतील निरनिराळ्या प्रादेशिक साहित्यांत प्रचलित झाले आहेत. याचे मुख्य किंवा एकमात्र कारण म्हणजे इंग्रजी साहित्याचा अतिरिक्त प्रभाव. भारतीय साहित्यात (नव्हे संपूर्ण जीवनातच) अकस्मात् बळावलेली सारी आधुनिकता पाश्चात्यांच्या निर्बुद्ध

६ पूर्वार्ध, पृष्ठें २६४ ते २६७ पाहा.

७. नागपूरचे श्री स. ना. कुळकर्णी यानी लिहिलेल्या व्यवहारकोशाच्या द्वितीय भागात चाय, गिरणी, छुट्टि, बब, तोफ, यासारख्या प्रचलित शब्दाचे संस्कृतत्व सिद्ध केले असून त्याचा संस्कृतज्ञानी लेखवादि व्यवहारात उपयोग करावा असे सुचविले आहे स. व्य. को, प्रस्तावना, पृ. १४ पाहा.

अनुकरणातून अंकुरित झाली आहे, यात कोणाचाहि मतभेद नाही. पौंड्स्, इलियट, ओवेन, हॉपकिन्स, ऑडेन, डेलिविस, स्टिफन स्पेंडर, आन्द्रे ब्रेटन इत्यादि नवीन पाश्चात्य कवींपैकी एकाच्याचा प्रभाव ज्याच्यावर पडला नाही असा आधुनिक कवि आढळण सहसा अशक्य. किंबहुना त्यांच्या साहित्याने प्रभावित न होता केवळ स्वभाषीय साहित्याच्या व्यासंगाने प्रेरणा मिळून जो साहित्यनिर्मितीस प्रवृत्त झाला त्याला 'आधुनिक' हे विशेषण कोणी लावीतच नाही. तो जुनाट! 'आधुनिक' तोच की जो कोणत्या तरी पाश्चात्य साहित्यिकाची री ओढतो. मग तो त्याचा सूर स्वभाषीय किंवा स्वराष्ट्रीय साहित्याच्या सुराशीं मिळतीहि विसंवादी असेना का!

भारतातल्या अखिल प्रादेशिक साहित्यातील नवीन वादाच्या मुळाशीं केवळ पाश्चात्य साहित्याचा प्रभाव आहे हे उघड आहे व म्हणूनच निरनिराळ्या प्रादेशिक साहित्याचा परस्परांशीं विशेष संबंध नसताहि पाश्चात्य साहित्यातील सारे वाद सर्व प्रादेशिक साहित्यात सारख्याच स्वरूपात आढळतात. भारतीय साहित्यात हे आधुनिक वाद कसे प्रविष्ट झाले व वाढीस लागत याची कल्पना कोणत्याहि एका प्रादेशिक भाषेच्या साहित्याच्या संक्षिप्त पर्यालोचन केले असता येऊ शकेल. उदाहरणार्थ नव-भारताची राज्यभाषा किंवा राष्ट्रभाषा म्हणून जिला विशेष प्रकारचे स्थान प्राप्त झाले त्या हिंदी साहित्यातील 'वाद' पाहा.

आधुनिक हिंदी कवितेचा प्रारंभ भारतेन्दूच्या उदयापासून मानण्यात येतो. भारतेन्दु बाबू हरिश्चन्द्र यांच्यापूर्वीची हिंदी कविता रीतिकालीन परंपरेचे म्हणजे संस्कृतनिष्ठ काव्याचे अनुकरण करीत होती. त्या काव्याची मूलभूत भावना प्रामुख्याने शृंगारिक होती. स्त्रीपुरुषाच्या शृंगारचेष्टा, त्यांचे यौवनविलास, नायक-नायिकांचे संयोग-वियोग हे या काळातील काव्याचे विषय होते. हा त्यांचा शृंगार अश्लील तेच्या घरात शिरला होता. राधाकृष्णादिकांचा शृंगार रंगविण्याच्या नावाखाली नागडी अश्लीलता साहित्यात विपुलसमत झाली होती. हिंदीतल्या अशा या रीतिकालीन काव्यात किंचित् नवीनता उत्पन्न केली ती १७ व्या शतकातल्या भूषण कवीने. मात्र ही नवीनता कोणाच्याहि अनुकरणांतून उद्भवली नव्हती. परम्परागत काव्याच्या मर्यादेत राहून भूषण कवीने हिंदी कवितेत मौलिकता उत्पन्न केली. छत्रपति शिवाजीमहाराज्या समकालीन पुरुषोत्तमाचें शौर्य-धैर्य-औदार्य हे आपल्या कवितेचे विषय करून भूषण कवीने एका अर्थी हिंदीत राष्ट्रीय कवितेला जन्म दिला. 'शिवराजभूषण' या अलंकारशास्त्रीय काव्यातहि भूषणाने विषयांची नवीनता निर्माण केली. पण भूषणाच्या या नवीनतेतून संप्रदाय निर्माण झाला नाही.

इ. स. १८५७ नंतर भारतात जी अस्फुट राष्ट्रजीवनात निर्माण झाली, तिच्या प्रेरणेमुळे भारतेन्दूच्या काव्यात प्रथम 'यथार्थवाद' निर्माण झाला. या यथार्थवादी काव्यात नवागत इंग्रजी राज्याचे काही गुण पाहून संतोष व अनेक दोष

पाहून असंतोष निर्माण झालेला दिसतो. त्याचबरोबर स्त्रीशिक्षण, बालविवाह–तिरस्कार विधवाविवाह–पुरस्कार अस्पृश्यता–निवारण यासारखे आधुनिक विषय भारतेन्दु, प्रेमघन यासारख्या यथार्थवादी हिंदी कवींच्या काव्यात व्यक्त झाले आहेत. मराठीत केशवसुत, गुजराथीत नर्मदाशंकर, बंगालीत ईश्वरचन्द्र, रंगलाल बॅनर्जी, मधुसूदन दत्त यासारख्या नामवंत कवींची गणना याच यथार्थवादी कवींत करता येईल.

भारतेन्दूंच्या यथार्थवादानंतर महावीरप्रसाद द्विवेदींचा 'आदर्शवाद' हिंदी साहित्यात उदयास आला. इ. स. १९०० ते १९२० पर्यंत संपूर्ण भारतातच नव्हे तर जगात ज्या विलक्षण घटना सतत घडत गेल्या, त्यांच्या प्रभावाने हिंदी साहित्यात हें 'आदर्शवादी' साहित्याचें युग अवतरलें, असें हिंदी साहित्याचे पर्यालोचक मानतात. समाजाच्या उद्धारासाठी काव्यातून नीति, सदाचार, बन्धुत्व-भावना इत्यादिकांचा पुरस्कार आदर्शवादी साहित्यिकांनी केला. या आदर्शवादी कवींचा गौरव करण्यासाठी त्यांना मानवतावादी, (Humanitarian, Idealist) असेंहि विशेषण लावण्यात येतें. आदर्शवादानें हिंदी साहित्यात श्रीधर पाठकाचा स्वच्छन्दतावाद (Romanticism) जन्म पावला असे मानण्यात येत. इंग्रजी साहित्यात वर्डस्वर्थ आणि कोलरिज हे रोमॅन्टिसिझमचे प्रवर्तक मानण्यात येतात. यूरोपात फ्रेंच राज्यक्रांति, रूसो, कॅन्ट, हेगेल यांचे नवे सिद्धांत आणि पुनर्जागरण व सुधारणा (Renaissance and reformation) यांच्या चळवळी इत्यादि कारणामुळे रोमॅन्टिसिझम उर्फ स्वच्छन्दतावाद निर्माण झाला तसा भारतातहि राजकीय, धार्मिक व सामाजिक जीवनातील विशिष्ट परिस्थितीमुळे उत्पन्न झाला असें सिद्ध करण्याचा प्रयत्न प्रा. विनयमोहन शर्मा यांनी केला आहे.[८] या स्वच्छन्दतावादी काव्यात निसर्गाचें आध्यात्मिक किंवा दैवी चित्रण आणि समाजजीवनामध्ये तथाकथित मानवतावादाचा पुरस्कार करण्याचा प्रयत्न आढळतो.

यानंतरचा हिंदी साहित्यातला वाद म्हणजे 'छायावाद'. हा छायावाद म्हणजे श्रीधर पाठकाच्या स्वच्छन्दतावादाच विकसित किंवा परिवर्तित रूप होय. छायावादी काव्यात आत्माभिव्यञ्जना (Subjectivity), नवीन छंद व विशेषत मुक्तछन्द, निसर्गाचें मानवीकरण, प्रतीकात्मकता किंवा लाक्षणिकता, व्यन्जनागर्भ शब्दप्रयोग आणि मानवतावादाचा उद्घोष हीं लक्षणं प्रमुख मानतात. या नवोदित छायावादाच्या मुळाशीं, तरुण साहित्यिकांत वाढलेले वर्डस्वर्थ, शेले, कीट्स, कॉलरिज या इंग्रजीतील रोमॅन्टिक (स्वच्छन्दतावादी) कवींच्या काव्याचें सखोल संस्कार आणि भारताचे श्रेष्ठ कवि रवीन्द्रनाथ टागोर यांच्या साहित्याचा

---

८ पाहा—स्वरूपभारती Dr. Laxman Sarup Memorial Volume, पृ. ११९.

प्रभाव ही कारणें सुद्धा मानण्यात येतात. आचार्य रामचन्द्र शुक्ल ह्यांनी आपल्या हिंदी साहित्याच्या इतिहासात हिंदीतील छायावादाचें मूळ सांगितलें ते असें की "ईसाई संतों के छायाभास (Phantasmata) तथा योरोपीय काव्यक्षेत्रमें प्रवर्तित आध्यात्मिक प्रतीकवाद (Symbolism) के अनुकरणपर रची जाने के कारण बगाल मे ऐसी कविताएँ 'छायावाद' कही जाने लगीं" (पृ. ६५१). तात्पर्य, इग्रजीद्वारा बगालींत व बगालीद्वारा हिंदींत हा छायावाद उत्पन्न झाला. पंत, निराला, महादेवी वर्मा हे थोर कवि 'छायावादी' कवि म्हणून हिंदी साहित्यिकात ख्याति पावले. रहस्यवाद, प्रतीकवाद, हालावाद, इत्यादि अवान्तर छायावादाच्या शाखा-प्रशाखा मानण्यात येतात. छायावाद व रहस्यवाद एकच की त्यात काही भेद आहे, यासबंधी विद्वानांत वाद आहे. उमरखय्यामच्या रुबायांनी 'हालावाद' नावाचा आणखी एक वाद निर्माण केला आहे. प्रख्यात कवि बच्चन यांना हालावादाचे प्रवर्तक मानण्यात येतें.

यापुढची पायरी म्हणजे मार्क्सवादाच्या प्रभावातून उद्भवलेला तथाकथित 'प्रगतिवाद'. आजपर्यंतच्या वादांनी हाताळलेले सर्व विषय त्याज्य मानून भांडवलशाहीविरुद्ध आक्रोश, सामाजिक विषमतेचा तिरस्कार, वर्तमान राजनीति, विद्रोहक्रान्ति, साम्राज्यशाहीचा धिक्कार, ग्रामीण जीवनाचें वर्णन, हातोडा, कोयता, लाल बावटा, गिरणीमजूर व त्यांचीं सुखदुःखें, गिरणीचा भोंगा यासारखे विषय या प्रगतिवादाने पुरस्कारले. वस्तुत हा तथाकथित प्रगतिवाद यथार्थवादाची नवी बाजारू आवृत्ति होती. ज्या दलित, पीडित, शोषित समाजासाठी स्वतःला प्रगतिवादी म्हणविणारे कवी नवीन काव्यरचना करीत होते किंवा आहेत त्यांच्या हृदयाची पकड घेण्यास मात्र तें काव्य आजवर सर्वथा असमर्थ ठरलं आहे. विषयाची नीरसता हेंच या प्रगतिवादाचें खरें वैशिष्ट्य. कोमल भावना व उदात्त उत्तुंग कल्पना यांना प्रगतिवादाच्या दृष्टीने काही महत्त्व नाही.

छायावादाची आत्यंतिक भावुकता व तथाकथित प्रगतिवादाची शुष्क बौद्धिकता याच्या प्रतिक्रियेतून नवा 'प्रयोगवाद' हिंदींत उदय पावला आहे. नवी शैली, नवीं प्रतीकें, नवा कल्पना, नवे छद यांना आविष्कार करण्यांतहि हे प्रयोगवादी म्हणविणारे कवि धडपडत आहेत. वास्तविक याच्या पूर्वीच्या वादाचे प्रवर्तक व त्यांचे सारे अनुयायी प्रयोगवादीच होते. त्याच्या परिस्थितींत योग्य वाटले ते प्रयोग त्यांनी केले, कारण त्यांना वर्चस्वतत्त्व स्थापावयाचा होता. रशियाच्या साम्यवादाचे प्रचारक बनलेल्या तथाकथित प्रगतिवाद्यांनी जे रोखठोक काव्यात निर्माण केला तो हटविण्यासाठी नवीन प्रयोगवाद उदयास येणे आवश्यकच होतें.

आधुनिक सर्व प्रादेशिक साहित्यांत मोठ्या वेगाने उदयास पावलेल्या विविध वादांची कल्पना येण्याच्या दृष्टीने एक उदाहरण म्हणून आम्ही हिंदी साहित्यांतील

वादाचा संक्षेपाने आढावा येथे घेतला आहे. हेच वाद थोड्या फार कालभेदाने आणि सहाभेदाने भारतातील सर्व प्रादेशिक साहित्यात आढळतील. सर्व भाषांतील आधुनिक वादाचा आढावा घेणें आमचें उद्दिष्ट नाही. स्थालीपुलाकन्यायाने नवीन साहित्याच्या स्वरूपाची कल्पना या हिंदी साहित्यातील वादाचा आढावा वाचून येईल. हे सारे वाद इंग्रजी साहित्याच्या संपर्कानेच निर्माण झाले याबद्दल विद्वानात मतभेद नाही. इंग्रजी साहित्यात सुद्धा नवीन 'वाद' क्रमाक्रमाने येतात. गेल्या दहापंधरा वर्षांपासून इंग्रजी साहित्यात बाह्यांगवाद (Formalism) बळावला आहे. बाह्यांगवादी कवींचा भर शैली, छंद, भाषा या बाह्यांगावर विशेष आहे.

इंग्लंडातील आजचे साहित्यसमीक्षक या वादाची अल्पजीविता पाहून त्यांना विशेष महत्त्व देत नाहीत. काव्य कोणत्याहि वादामध्ये अंतर्भूत होवो त्यामधून जर परतत्त्वाला स्पर्श होत असेल व जीवनातील शाश्वत सत्य सौंदर्याचा साक्षात्कार सहृदयाना होत असेल, तर ते चिरस्थायी झाल्यावाचून राहणार नाही. मग ते स्तुतिपर असो, भक्तिपर असो, रीतिनिष्ठ असो, की यथार्थवादी, आदर्शवादी, छायावादी, रहस्यवादी, हालावादी, किंबहुना रूक्ष प्रगतिवादी असो!

## अर्वाचीन साहित्याचे कालखण्ड

अर्वाचीन प्रादेशिक साहित्याप्रमाणेच संस्कृत साहित्याचेहि आंग्ल शिक्षणपूर्व आणि आंग्ल शिक्षणोत्तर असे दोन खंड स्पष्ट दिसतात. गेल्या तीन चार शतकातील भारतातल्या कोणत्याहि भाषेतील साहित्याचे पर्यालोचन केल्यास हे दोन खंड स्पष्ट दिसतात. हिंदीचा नवीन कालखंड भारतेन्दुपासून, मराठीचा केशवसुतापासून, गुजराथीचा ठाकोरपासून किंवा कानडीचा श्रीकंठय्यापासून सुरू झाला असे मानण्यात येते. एकट्या बंगाली समाजाचा पाश्चात्य संस्कृतीशी घनिष्ठ संबंध १७५७ पासून (प्लासीच्या लढाईपासून) म्हणजे इतरापेक्षा शंभर वर्षे आधी आला त्यामुळे तेव्हापासूनच, चैतन्यमहाप्रभूपासून प्रवर्तित झालेली धर्म भक्तिप्रधान 'मंगलकाव्या'ची परंपरा बंगालात ओसरू लागली. भारतचंद्र, ईश्वरचन्द्र गुप्त, मधुसूदन दत्त, बिहारीलाल इत्यादि १९ व्या शतकातील कवींनी जुन्या बंगाली काव्याला कलाटणी दिली. देशप्रेम, सृष्टिप्रेम यासारख्या नवीन भावनाचे उद्दीपन त्यांच्या कवितातून झालेले दिसते. त्याचबरोबर पाश्चात्य काव्याचे विषय, त्यातील भाव, विचार, त्यांची शैली, इत्यादींचेहि विशेष आकर्षण बंगालातील या नवोदित किंवा नवयुगप्रवर्तक कवींच्या लिखाणातून दिसते. पाश्चात्य साहित्याचा इतका प्रभाव पडला तरी बंगाली साहित्यिकांचे परंपरागत वैष्णवी साहित्याविषयीचे आकर्षण कमी झाले नव्हते. बहुतेक नवीन कवींनी कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपात प्राचीन वैष्णव पद्धतीचे काव्य केलेले आहे. या नवीन वैष्णवी काव्याची शैली

मात्र बोजडपणा, समासप्राचुर्य, अलंकारबाहुल्य, नीतिज्ञता या जुन्या कवींच्या दोषांतून मुक्त झाली होती.

अर्वाचीन काव्याचे सर्वत्र दोन, तर बंगालमध्ये तीन खण्ड मानण्यात येतात. त्यांतील पहिला भारतचन्द्रापासून बिहारीलालपर्यंतचा. बिहारीलाल हे रवीन्द्रनाथ टागोरांचे वाङ्मयीन गुरु. बिहारीलालांच्या काव्याचा स्वत वरील प्रभाव प्रत्यक्ष रवीन्द्रनाथांनीच मान्य केला आहे. पण रवीन्द्रनाथ हे *बंगाली साहित्याचे सर्व दर्शनी* युगप्रवर्तक कवि आहेत. त्यांच्या काव्यांत जुन्या रामानुजप्रवर्तित वैष्णव वेदान्ताचा, कबीर तुलसीदासादि अन्यप्रान्तीय संतांच्या कवित्वाचा आणि आधुनिक कवींच्या काव्यांतील रहस्यवाद, स्वच्छन्दतावाद, मानवतावाद व राष्ट्रवाद इत्यादि वादांचा परिपाक दृष्टीस पडतो. गद्यानुप्रासात्मक नवीन मुक्तच्छन्द, संगीताचा सुरेलपणा इत्यादि नावीन्य त्यांनी रचनेत निर्माण केले. प्रकृति, प्रीति आणि आध्यात्मिकता या तीन दिशांनी त्यांचे साहित्य प्रवाहित झाले आहे. त्यांतले वैशिष्ट्य हें की त्या सर्वांतून उदात्त भारतीय भावना आणि भारतीय विचार यांचा सूर सुस्पष्टपणे प्रत्ययास येतो. केवळ बंगाली साहित्यावरच नव्हे तर भारतातील अन्यभाषीय साहित्यावरहि रवीन्द्रांच्या व्यक्तिमत्त्वेची छाया पडलेली आहे. बंगालमधल्या संस्कृत लेखकांनी तर जवळजवळ संपूर्ण रवीन्द्रसाहित्य संस्कृतात भाषान्तरित करून आणलेले आहे. या भाषान्तरकारांत धीरेन्द्रनाथ मुखर्जी (काव्य व्याकरणतीर्थ), उडाली सुब्रह्मण्यशास्त्री, क्षितीशचन्द्र चट्टोपाध्याय, परिमलदास, दुर्गादास गोस्वामी इत्यादि लेखक प्रमुख आहेत. त्यांचे हे सारे भाषान्तरित लिखाण 'मञ्जूषा' प्रभृति संस्कृत नियतकालिकांत विखुरलेले आहे.

## संस्कृत साहित्यिकांची ध्येयनिष्ठा

आतापर्यंत प्रस्तुत प्रबन्धासाठी गृहीत धरलेल्या अर्वाचीन कालखंडातील विविध प्रादेशिक साहित्यांचे सिंहावलोकन किञ्चित् सविस्तरपणे एवढ्याच साठी केले की अर्वाचीन संस्कृत साहित्य या वातावरणात निर्माण होत होते. या काळातील देशी विदेशी साहित्यांत हे सर्व संस्कृत लेखक यथेच्छ अवगाहन करीत होते. त्याचबरोबर संस्कृत भाषेविषयी पराकाष्ठेची भक्ति अन्तःकरणात असल्याने हे सारे नावीन्य आपल्या प्रिय संस्कृत भारतीत यावे अशी तीव्र प्रेरणा उदित होऊन ते संस्कृतात यथाशक्ति *नवीनता-आधुनिकता उत्पन्न करण्याच्या प्रयत्नास लागलेले दिसतात.* प्रादेशिक साहित्यिकांनी जुने छंद, जुनी शैली, जुने काव्यप्रकार, जुनी उपमाने, जुने अभिनिवेश, जुने विषय या सर्वांचा त्याग करण्याचा जणु विडाच उचलला होता. त्यांनी आपल्या प्रादेशिक भाषांचे जुने स्वरूप सुद्धा पार पालटून टाकले. समकालीन सर्व साहित्यिक दलके नवीनतेच्या मागे लागले असतां सर्वांनी 'जुनाट'

**'क्लिष्ट' किंबहुना लौकिक व्यवहाराच्या अभावीं 'मृत' ठरविलेल्या संस्कृत भाषेचें माध्यम आत्माविष्कारासाठी बुद्धिपुरस्सर स्वीकारण्यांत अर्वाचीन संस्कृत साहित्यिकांनी फार मोठी ध्येयनिष्ठा प्रकट केली असें आमचें स्पष्ट मत आहे.** त्यानी जें कांही संस्कृतांत लिहिले त्याऐवजीं आपल्या प्रादेशिक भाषेत लिहिलें असतें तर त्याना प्रादेशिक साहित्यिकांत मोठी मानमान्यता प्राप्त झाली असती. अव्वल इंग्रजीच्या काळात इंग्रजी भाषेत चांगलें लेखन करून अखिल भारतीय किंवा जागतिक प्रतिष्ठा प्राप्त होण्याची शक्यता असतांहि केवळ मातृभाषेची सेवा घडावी, इंग्रजी न जाणणाऱ्या आपल्या बांधवांना आपले विचार कळावेत या ध्येयनिष्ठेने प्रेरित होऊन अनेक मोटमोठ्या विद्वानानी आपलें वाङ्मय-कार्य मातृभाषेतूनच करण्यामध्ये जी ध्येयनिष्ठा व्यक्त केली तीच ध्येयनिष्ठा संस्कृत भाषेच्या प्रतिकूल काळांत संस्कृतातून लेखन करणाऱ्या लेखकांमध्ये आम्हांला दिसते. ज्ञानेश्वर, तुलसीदास, चैतन्य महाप्रभु, हे संतकवि मोठे संस्कृतपण्डित होते. संस्कृतांत उत्कृष्ट छन्दोबद्ध रचनाहि ते करूं शकत होते हें *ज्ञानेश्वरांच्या अमृतानुभवांतील*—

यदक्षरमनाख्येयमानन्दमयकेवलम् ।
श्रीमन्निवृत्तिनामेतिख्यातं दैवतमाश्रये ॥१॥

गुरुरित्याख्यया लोके विद्या साक्षाद्धि शांकरी ।
जयत्याज्ञा नमस्तस्यै दयार्द्रायै निरन्तरम् ॥२॥

सार्धं केन च कस्यार्धं शिवयोः समरूपिणोः ।
ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः ॥३॥

अद्वैतमात्मनस्तत्त्वं दर्शयन्ती मियस्तराम् ।
तौ वन्दे जगतामाद्यौ तयोस्तत्त्वाभिपत्तये ॥४॥

मूलायाग्रायमध्याय मूलमध्याग्रमूर्तये ।
क्षीणाग्रमूलमध्याय नमः पूर्णाय शम्भवे ॥५॥

या आरंभींच्या मंगलाचरणावरून; किंवा तुलसीरामायणांतील प्रत्येक सोपानाच्या आरंभीं येणाऱ्या—

यन्मायावशवर्ति विश्वमखिलं ब्रह्मादिदेवासुरा
यत्सत्त्वादमृषेव भाति सकलं रज्जौ यथाऽहेर्भ्रमः ।
यत्पादप्लव एक एव हि भवाम्भोधेस्तितीर्षावतां
वन्देऽहं तमशेषकारणपरं रामाख्यमीशं हरिम् ॥ १-६

प्रसन्नतां या न गताभिषेकतस्तथा न मम्ले वनवासदुःखतः ।
मुखाम्बुजश्री रघुनन्दनस्य सा सदाऽस्तु मे मञ्जुलमङ्गलप्रदा ॥ २-२

मूलं धर्मतरोर्विवेकजलधेः पूर्णेन्दुमानन्ददं
वैराग्याम्बुजभास्करं ह्यघघनध्वान्तापहं तापहम् ।
मोहाम्भोधरपूगपाटनविधौ श्वासं भवं शंकरं
वन्दे ब्रह्मकुलं कलङ्कशमनं श्रीरामभूपप्रियम् ॥ ३-१ ॥

ब्रह्माम्भोधिसमुद्भवं कलिमलप्रध्वंसनं चाव्ययं
श्रीमच्छम्भुमुखेन्दुसुन्दरवरे संशोभितं सर्वदा ।
संसारामयभेषजं सुखकरं, श्रीजानकीजीवनं
धन्यास्ते कृतिनः पिबन्ति सततं श्रीरामनामामृतम् ॥४-२॥

नान्या स्पृहा रघुपते हृदयेऽस्मदीये
सत्यं वदामि च भवानखिलान्तरात्मा ।
भक्तिं प्रयच्छ रघुपुङ्गव निर्भरां मे
कामादि-दोषरहितं कुरु मानसं च ॥ ५-२ ॥

इत्यादि मंगल श्लोकांवरून; किंवा श्रीचैतन्यदेवांच्या श्रीमुखांतून सहज उद्‌गीर्ण झालेल्या —

चेतोदर्पणमार्जनं भवमहादावाग्नि-निर्वापणं
श्रेयःकैरवचन्द्रिकावितरणं विद्यावधूजीवनम् ।
आनन्दाम्बुधिवर्धनं प्रतिपदं पूर्णामृतास्वादनं
सर्वात्मस्नपनं परं विजयते श्रीकृष्णसंकीर्तनम् ॥
( श्रीपद्यावली २२ )

नाम्नामकारि बहुधा, निजसर्वशक्तिः
तत्रार्पिता, नियमितः स्मरणे न कालः ।
एतादृशी तव कृपा भगवन् ! ममापि
दुर्दैवमीदृशमिहाजनि नानुरागः ॥ ( श्रीपद्यावली ३१ )

न धनं न जनं न यौवन कवितां वा जगदीश कामये ।
मम जन्मनि जन्मनीश्वरे भवताद् भक्तिरहैतुकी त्वयि ॥
( श्रीपद्यावली ९४ )

युगायितं निमेषेण चक्षुषा प्रावृषायितम् ।
शून्यायितं जगत् सर्वं गोविन्दविरहेण मे ॥ ( श्रीपद्यावली ३२४ )

दधिमथननिनादैस्त्यक्तनिद्रः प्रभाते
निभृतपदमगारं वल्लवीनां प्रविष्टः ।
मुखकमलसमीरैराशु निर्वाप्य दीपम्
कवलितनवनीतः पातु मां बालकृष्णः ॥ (श्रीपद्यावली १४२)

इत्यादि भक्तिसान्द्र श्लोकांतून उत्कृष्ट प्रकारें व्यक्त होत. तथापि **प्रादेशिक भाषांच्या उदयकाळीं संस्कृतात लिहिणे सहज शक्य असूनहि या महा पुरुषांनी बुद्धिपुरस्सर प्रादेशिक भाषातून लेखन करण्यात जशी श्लाघ्य ध्येयनिष्ठा किंवा जागरूकता व्यक्त केली** (जिचे महत्त्व आज प्रादेशिक भाषांचे अभिमानी मोठ्या भक्तीने किंवा अभिमानाने वर्णन करतात) **तशीच ध्येयनिष्ठा किंवा जागरूकता या अर्वाचीन काळातील संस्कृत भाषेच्या उपासकांनी केलेली आहे, असें आमचें स्पष्ट मत आहे.**

संस्कृत भाषा ही, देवभाषा, राष्ट्रभाषा, सर्व भारतीय भाषांची जननी, भारतीय संस्कृतीचा कोष, जगातली सर्वश्रेष्ठ भाषा इत्यादि उत्तमोत्तम विशेषणांनी तिची तोंडभर स्तुति करणे वेगळे आणि प्रादेशिक भाषेतून वाङ्मयसेवा केल्यास सहज प्राप्त होणारा धनमानादि लाभ झिडकारून संस्कृत भाषेची सेवा घडावी म्हणूनच संस्कृत भाषेतून उत्तमोत्तम कलाकृति निर्माण करणे वेगळें. पहिल्यात गुणग्राहकता आहे, तर दुसऱ्यात ज्वलंत ध्येयनिष्ठा व निष्काम भक्ति आहे !

## राष्ट्रीय एकात्मता व संस्कृत

वर सांगितल्याप्रमाणे सारेच प्रादेशिक साहित्यिक पाश्चात्य साहित्याच्या प्रभावामुळे म्हणा किंवा समकालीन राष्ट्रीय, सामाजिक, आर्थिक परिस्थितीच्या प्रभावा मुळे म्हणा, नव्या युगाला अनुरूप मार्गदर्शन करणारी, किंवा नव्या युगाच्या उष:कालाची 'तुतारी' फुंकणारी नवीनता काव्यात निर्माण करण्यात मग्न असलेले पाहून, या काळातले (इ. स. १८५७ च्या कालीनंतरचे) संस्कृत लेखकहि संस्कृतात तशीच नवीनता निर्माण करण्यास झटू लागलेले दिसतात. त्यातहि नव्या संस्कृत साहित्याचें वैशिष्ट्य काहीसं आगळ आहे; तें असें की आजभाषांसह संस्कृत भाषेचे व साहित्याचे स्वरूप अखिलभारतीय होत तसेच तें आजहि आहे. सर्व प्रादेशिक भाषांतला उत्कृष्ट अंश आत्मसात् करून हिंदीचा विकास व्हावा व तिने नवभारताच्या राष्ट्रभाषेचें कार्य करावे अशी मोठमोठ्या राष्ट्रधुरंधरांची हिंदीकडून अपेक्षा आहे. त्यासाठी केन्द्रीय व प्रांतिक सरकारें आपापल्या परीने व्यवस्थित आर्थिक साहाय्यहि देत आहेत. काही काळानंतर नेतृवर्गाची हिंदीसंबंधीची ही अपेक्षा कदाचित् फलद्रूपहि होईल. पण तें कार्य संस्कृत साहित्यिकांकडून, कसल्याहि प्रकारचे सरकारी साहाय्य नसतांना, त्यामागे कोणतीहि योजना नसतांना किंबहुना परिस्थिति केवळ प्रतिकूल असतांना, स्वयंप्रेरणेने आजवर घडून आले आहे. भिन्नभाषीय शब्दांचा एकत्र समन्वय करण्याचे कार्य संस्कृत लेखकांकडून कसें होत आहे व संस्कृत भाषेच्या द्वारा तें कसें सहज शक्य आहे, याची किंचित् कल्पना यान प्रकरणात वर दिलेली आहे. त्याचबरोबर सर्व भाषांतील उत्कृष्ट साहित्याचे संस्कार आत्मसात् करून त्यांना

कल्पना देण्याचें अत्यावश्यक राष्ट्रीय कार्य आजच्या संस्कृत लेखकांकडून अभावित पणें सस्कृत भाषेच्या अखिलभारतीयत्वामुळें सहजासहजीं घडून येत आहे. पाश्चात्य साहित्याच्या सम्पर्कानें किंवा संस्कारानें सर्वच प्रादेशिक साहित्यांत परिवर्तन घडून आलें. या परिवर्तनांत एक अर्थी एकरूपता किंवा तुल्यरूपता असली तरी त्यांत प्रादेशिक साहित्याच्या परम्परागत वैशिष्ट्यांची विविधता दिसतेच. त्या विविधतेतून पुनश्च एकात्मता निर्माण झाल्याचें केवळ अर्वाचीन संस्कृत साहित्यातच दिसून येतें. याच कारण हिंदी, बंगाली, मराठी इत्यादिकांप्रमाणें प्रादेशिक नाही. तो सापेक्षतः अल्प असला तरी अखिलभारतीय आहे. त्यामुळें प्राचीन व अर्वाचीन संस्कृत साहित्याचा पर्यालोचन करताना एका प्रदेशापुरती दृष्टि संकुचित ठेवून चालत नाही. **संस्कृत साहित्याचें पर्यालोचन म्हणजे एकाच भाषेत निर्माण झालेल्या अखिलभारतीय साहित्याचें पर्यालोचन होय !**

## प्राचीन साहित्याचें समर्थन

आधुनिक साहित्यांत रुळावलेल्या उपरिनिर्दिष्ट विविध वाङ्मयीन दृष्टिकोणांतून संस्कृत साहित्याकडे पाहत असता संस्कृत साहित्यिकांना त्यामध्ये काही उणीवा जाणवू लागल्या. त्यांचें निवारण करून संस्कृत साहित्याला तथाकथित प्रगतिशील नवसाहित्याच्या प्रभावळीत आणण्यासाठी अनेकांचे प्रयत्न चालू असता, प्राचीन साहित्यांतच परिपूर्णता पाहणारे काही साहित्यिक असें सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत होते की आधुनिक पाश्चात्य साहित्यांत ज्या प्रगतिशीलता किंवा आधुनिकता म्हणतात ती *आमच्या प्राचीन महाकवींच्या काव्यांतहि होती.* हिंदु विश्वविद्यालयाचे विद्वान प्राध्यापक श्रीबलदेव उपाध्याय यांनी ' संस्कृतकाव्येषु प्रगतिशीलत्वम् ' या विषयावर एक लेख लिहून[९] या पक्षाचें उत्तम प्रकारें प्रतिपादन केलें आहे. प्रा. उपाध्याय त्या लेखांत म्हणतात :—

" केचन आधुनिका आलोचनविदो वदन्ति यत् विद्यते संस्कृतनिबद्धेषु काव्येषु प्रगतिशीलत्वं नाम । प्रगतिशीलत्वस्य स्वरूपनिर्णयावसरे ते इत्थं मीमांसन्ते यत् समाजस्य–निम्नश्रेणीगतानां दारिद्र्यपङ्कमग्नानां जनानां यत्सत्यमौल्यति सामाजिकदृष्ट्या सर्वतो गर्हणीयं जीवितं तस्य यथार्थतश्चित्रणं काव्येषु, सत्यादितत्त्वयोजनया यनिरूपणं नाटकेषु, तदेव काव्यस्य प्रगतिशीलत्वस्य जीवातु । साम्प्रतं रूसदेशस्थसाहित्यस्य वैशिष्ट्यमिदमेव सर्वतो जागर्ति यन्निम्नतराणां परिश्रमोपजीविनां जनानां यथार्थरूपम् अनुसृत्य जीवनचित्रणं नाम । इमे आलोचकम्मन्या अनभिज्ञाः संस्कृतकाव्यरूपाणां केवलं दोषैकदर्शिनः परप्रत्ययनेयबुद्धयो हन्त यत् सद्भिरन्ति तत् तु नितान्तं भ्रान्तिपूर्णत्वात् सुतरां नास्त्यनवद्यमिति विदाङ्कुर्वन्तु विवेचनचणाः । "

---

९ मधुरवाणी, मे १९५७ ।

" प्राचीनभारतेऽस्मिन् धनाढ्यानां मान्यानां महीभुजाम् अन्येषां वा लक्ष्मीपुत्राणां सदनं वैदुषीमण्डितानां पण्डितानां प्रतिभाजुषां कवीनां वा कृते सत्यमेवावर्तत आकर्षणकेन्द्रमिति के खलु न जानन्ति । राज्ञामाश्रयस्तेषां विधाय भोजनादिव्यवस्थां चिन्ताया ह्रासकोऽभवदिति तु अकिञ्चित्करी धारणा साम्प्रतिकानाम् आलोचकानाम् । कवीनां प्रतिभाप्रसारणाय पण्डितानां पाण्डित्योद्बोधनाय च समृद्धानाम् आश्रयस्य उपयोग आसीत् प्राचीने युगे । दैहिक-चिन्तायाः शतगुणी विद्यते मानसिकचिन्ताया निवृत्तिः इति हेतोः विद्वांसो भूपालानाम् आश्रयकल्पतरूणाम् आश्रयणं सर्वथा चक्रुः । न तेन कापि हानिरभूत् । कवीनां स्वाश्रयप्रदातॄणां नृपाणां कीर्तिकीर्तनं नाम न खलु तेषाम् आवश्यकं कार्यम् अभवत् । अवान्तरकालीनाः केचन कवयः स्तुवन्तु कृपाप्रदर्शनकारिणः कांश्चन महीपालान्, परन्तु प्राचीनानां नेयम् आसीत् पद्धतिः अथवा, नायम् आसीत् क्षुद्रजनक्षुण्णो मार्गः । स्वाच्छन्द्यप्रिया हि निरङ्कुशाः कवयः सकलहिताय कुर्वन्तः कविकर्म नो कदापि समाजस्थपुरुषान् हीनान् वा अहीनान् वा, उच्चान् वा नीचान् वा विसस्मरुः । तेषां भारती सर्वेषां वर्णानां कल्याणाय प्रवर्तमानैव स्वीयां कृतार्थतां भेजे । उदाहरणप्रदर्शनमुखेन प्रदर्श्यते देववाणीरचनाचणानां पण्डितानाम् एतद्विषयिका काचन काव्यचातुरी ।"

अशा प्रकारें साहित्यांतील प्रगतिवादाविषयी आपलें मत प्रदर्शित करून त्याच्या समर्थनार्थ,

प्रहरकमपनीय स्वं निदिद्रासतोच्चैः प्रतिपदमुपहूतः केचिज्जागृहीति ।
मुहुरविशदवर्णां निद्रया शून्यशून्यां ददद्पि गिरमन्तर्बुध्यते नो मनुष्यः ॥
( शिशुपालवधे ११।४ )

स व्रीहिणां यावदुपासितुं गताः शुकान् मृगैस्तावदुपद्रुतस्त्रियाम् ।
कैवारिकाणामभितः समाकुलाः सहासमालोकयति स्म गोपिकाः ॥
( शिशुपालवधे १२।४२ )

गतान् पशूनां सह जन्मबन्धुतां गृहाश्रयं प्रेम वनेषु बिभ्रतः ।
ददर्श गोपानुपधेनु पाण्डवः कृतानुकारानिव गोभिरार्जवे ॥
( किरातार्जुनीये ४।१३ )

सा संन्यस्ताभरणमबला पेशलं धारयन्ती
शय्योत्सङ्गे निहितमसकृद् दुःखदुःखेन गात्रम् ।
त्वामप्यस्रं नवजलमयं मोचयिष्यत्यवश्यं
प्रायः सर्वो भवति करुणावृत्तिरार्द्रान्तरात्मा ॥
( उत्तरमेघे ३० )

हीं प्रसिद्ध काव्यांतलीं उदाहरणें प्रा. उपाध्यायांनी दिलीं आहेत. महाकवि माघाच्या प्रगतिशीलत्वाचें समर्थन करतांना ते म्हणतात :— " राजप्रसादच्छद्मिरपि माघो

दरिद्राणाम् उटजेषु स्या दृष्टिं निक्षिपत्येव।...... कवेः सहानुभूतिः न केवल मानवेषु एव सीमबद्धा वर्तते, प्रत्युत स खलु कवि निरक्षा पश्चा च व्यवहारस्य अवलोकने नितान्तरत दक्षश्च वर्तते। .. .. स्वमहाकाव्यस्य द्वादशे सर्गे जनपदनिवासिनाम् अनेकान् ग्रामीणाचारान् सरल्या दृशा निरीक्ष्य कोमल्या संस्कृतगिरा साधु वर्णितवान्। लज्जावनतमुख्यो नार्यो ग्रामीणा· श्रीकृष्ण यात्रिकोपरोधसमर्थाना धूनीना नितरमध्ये नैव साश्वाल्पु र्वन्ति। गोणीभारावनतपृष्ठाः श्रमेल्का इतस्ततो धावन्तो भारम् अवहमाना राजमार्गेषु निस्तृतेषु अपि जनसमूह समर्द भीययन्ति बालान् तन्मातृश्च। ग्रामाणा सीमान्तरेषु पानगोष्ठीमध्यगता गायका मधुपानम् आस्वदन्तः कमपि आनन्दम् आवहन्तीति वर्णयन् कविरिय सामान्यजनताया दु.खसुखयो निरपेक्षभावम् - आधत्ते। तस्मात् पूर्वोक्ता अभियुक्ताना गिरो नितान्तम् उपेक्ष्या एव।"

## संस्कृत साहित्यातील नवीनता

प्रा. बलदेव उपाध्यायाच्या शब्दात वर सांगितल्याप्रमाण संस्कृतज्ञाचा एक वर्ग प्राचीन साहित्यावरील आक्षेपाच निरसन करण्याचा प्रयत्न करीत होता. त्याच बरोबर आधुनिक पाश्चात्य व प्रादेशिक साहित्याच्या प्रभावाने संस्कृतात नियतकालिक व भाषान्तरित साहित्यावरोबर लघुकथा, खण्डकाव्ये, गेयकाव्ये, कादबरी किंवा उपन्यास, समालोचनात्मक, चर्चात्मक व वैज्ञानिक निबंध, बृहत्ग्रन्थ, वाङ्मयसमीक्षा, इतिहास इत्यादि नवीन प्रकारच साहित्य निर्माण करण्याचे कार्य संस्कृत लेखकांनी हळूहळूने सुरू केल्याच दिसून येत. प. हृषीकेश भट्टाचार्य, आप्पाशास्त्री राशीवडेकर, आर. कृष्णम्माचारियर व आर. व्ही. कृष्णम्माचारियर (श्रीरगमच्या सहृदया पत्रिकेचे सपादक) इत्यादीच्या नियतकालिकातील आरभीच्या लेखनातून याबाबतची मोठी उत्कटता आणि जी आकाक्षा प्रत्ययास येते ती पुढे हळूहळू ओसरत गेलेली दिसून येते. उत्तरोत्तर संस्कृत लेखकाना निराशेने ग्रासल्याचेहि संस्कृत वृत्तपत्रातील अनेक लेखातून दिसून येते. शासकीय व आर्थिक साहाय्याच्या अभावी आपले संस्कृत लिखाण मुद्रणसंस्कार देखील पाहू शकत नाही, हे लक्षात येऊ लागल्याने संस्कृत माध्यमाचा त्याग करून मोठमोठे संस्कृतज्ञ, प्रादेशिक किंवा इग्रजी भाषेत लिखाण करू लागल्याचे पुढे पुढे दिसून येते. प्रारभी तशी निराशा दिसत नाही. विशेष म्हणजे आपापल्या मातृभाषेतील आणि इग्रजी भाषेतीलहि उत्तमोत्तम ग्रन्थाची सुबोध संस्कृत भाषान्तरे करून संस्कृत लेखकांनी आपला जिवतपणा इग्रजी राज्याच्या सुरुवातीला फार मोठ्या प्रमाणात व्यक्त केल्याचे दिसून येते. प्रस्तुत प्रबन्धातील 'भाषान्तरित संस्कृत साहित्य' हे २२ वे प्रकरण वाचल्यास आमच्या विधानातील यथार्थतेची कल्पना येईल. ज्या ज्या लेखकाला जे जे अन्यभाषीय ग्रन्थ संस्कृत अनुवादास योग्य वाटले, त्याचे अनुवाद त्यानी स्वयप्रेरणेने केले. त्यासाठी त्याना कोणीहि साहाय्य किंवा उत्तेजन दिले नाही. आज प्रादेशिक भाषातील उत्तम

भाषान्तराना अनुदानाच्या द्वारा प्रादेशिक सरकाराकडून किंवा केन्द्रीय सरकाराकडून जसे भरपूर उत्तेजन देण्यात येत त्यापेक्षा थोडे कमी उत्तेजन जरी संस्कृत भाषान्तराना मिळण्याची शक्यता निर्माण होऊ शकली, तर संस्कृत लेखक कोणाला हार जाणार नाहीत. पण दुर्दैवाने सर्व प्रांतिक सरकारें या बाबतीत अत्यंत संकुचित आणि भयंकर कृपण झाली आहेत.

प्रस्तुत प्रबन्धात 'परकीय राजस्तुति' या नावाचें एक प्रकरण (पृ. ५६ ते ६७) आम्ही दिलेलें असून त्यामध्ये मुसलमान व इंग्रज राज्यकर्त्यांचा गुणगौरव गाणारीं जीं विविध काव्यें अर्वाचीन कालखंडात निर्माण झालेलीं दिसतात त्यांचा क्वचित् संक्षिप्त व क्वचित् सविस्तर परिचय दिलेला आहे. हें सारे साहित्य राज्य कर्त्यांनी काही लेखकांना धनमान देऊन निर्माण करवून घेतले आहे, यात संदेह नाही. साहित्यिकांना वेठीस धरून हव त्या प्रकारचं साहित्य निर्माण करवून घेण्याचं कार्य जगातील सर्वच शासनकर्त्यांनी वेळोवेळीं केलेलं आहे व आजहि ते होत आहे. काही राष्ट्रात तर साहित्यिक सर्वस्वी शासनकर्त्यांचे स्तुतिपाठक किंवा समर्थक झालेले आहेत. त्यांना व्यक्तिस्वातंत्र्य किंवा विचारस्वातंत्र्य नाहीच. शासनकर्त्यांनी निर्माण केलेल्या प्रलोभनाने किंवा क्वचित् भयाने प्रेरित होऊन साहित्यनिर्मिति करणाऱ्यांचें वैयक्तिक दृष्ट्या नैतिक महत्त्व किती, हा स्वतंत्र प्रश्न आहे. तथापि या प्रकारच्या संस्कृत साहित्याबद्दल तटस्थपणें विचार करता एवढें निश्चित म्हणता येईल की या प्रकारच्या काव्यनाटकादिकांनी संस्कृत साहित्यात एक प्रकारें विषयाचें नावीन्य निर्माण केलें. मुसलमान व इंग्रज यांच्या कारकीर्दीच्या इतिहासाचीं काही साधनें या काव्यांनी भावी लेखकांसाठी निर्माण करून ठेवलीं आहेत. मौर्य, चालुक्य, परमार, वाकाटक, कलचुरी, भोसले इत्यादि प्राचीन राजवंशातील थोर नृपतींसंबंधीच्या काही प्राचीन स्तुति काव्यांना आज जे ऐतिहासिक महत्त्व आहे तेच या अर्वाचीन कालखंडातील परकीय राजस्तुतिवरील काव्यांना भावी काळात प्राप्त होण्याची शक्यता आहे, असें अनुमान फारसें चूक ठरणार नाही!

आधुनिक काळात ऐतिहासिक विषयावर महाकाव्यें, खण्डकाव्य, नाटकें, ऐतिहासिक वीरांचीं गद्यचरित्रें इत्यादि प्रकारचं लेखन करण्यास चालना मिळाल्याचें दिसून येतें.

**इतिहासदीपिका**–(मुद्रित) या पाच प्रकरणांच्या ग्रंथात टिपू सुलतान व मराठे यांच्यातील युद्धाचा वृत्तान्त लेखकानें निवेदन केला आहे. कलकत्त्याच्या संस्कृतसाहित्यपरिषदेनें इ. स. १९४८ ते ४९ च्या काळात 'भारतेतिहास' या शीर्षकाखाली प्रकाशित झालेल्या लेखमालेत सुबोध गद्य शैलीत भारताचा संपूर्ण इतिहास वर्णन करण्यात आला आहे. याच विषयास अनुसरून महामहोपाध्याय टी. गणपतिशास्त्री यांनी 'भारतवर्णनम्', रामावतार शर्मा यांनी 'भारतीयम्

**इतिवृत्तम्**' जयपूरचे लक्ष्मणशास्त्री यानी '**भारतसंग्रहः**' इत्यादि ग्रन्थ सरळ संस्कृतात लिहिले. कवि कृष्ण कौर यानी १६ सर्गांचे दन्यकाव्य" लिहिले. त्यात शिखांचा पूर्वेतिहास निवेदन केला. श्रीपादशास्त्री हसूरकराच्या भारतरत्नमालेतून ही अनेक ऐतिहासिक वीरांची चरित्रे प्रसिद्ध झाली त्यांचा सविस्तर परिचय पूर्वीच्या प्रकरणातून (पृ. ८,५१) आम्ही दिलेलाच आहे. श्रीरामच्या 'सहृदया' या मासिकात **गझनीमुहंमदचरितम्** हे पद्यकाव्य व चन्द्रगुप्त अशोक इत्यादि ऐतिहासिक वीरांची चरित्रे प्रकाशित झाली **गल्पकुसुमाञ्जलिः** या निबन्धसंग्रहात ऐतिहासिक विषयावरील विविध लेखांचे संकलन करण्यात आले आहे. निरनिराळ्या संस्कृत नियतकालिकांतून सतत कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपात ऐतिहासिक विषयावर आधुनिक पद्धतीनुसार विवेचन किंवा निवेदन करणारे लिखाण भरपूर प्रमाणात प्रसिद्ध झालेल्या सर्वांचे पद्धतशीर विषयानुसार संकलन कोणी तरी करण्याची आवश्यकता आहे.

ऐतिहासिक विषयावरील वृत्तपत्रीय लिखाणाव्यतिरिक्त ग्रन्थरूपाने प्रकाशित झालेल्या साहित्यात अंबिकादत्त व्यास याचा '**शिवराजविजय**' हा बाणाच्या शैलीत लिहिलेला गद्यकाव्यग्रन्थ सखारामशास्त्री भागवताचे **अहल्याचरितम्** हे पद्यात्मक महाकाव्य, ओरिसा प्रांतातील जयपूरचे निवासी श्रीरामनाथ नद यांचे **जयपुरराजवंशावली** हे काव्य" व मद्रासचे परवस्तु लक्ष्मीनरसिंह स्वामी यांचे '**चालुक्य चरितम्**'" हे ग्रन्थ उल्लेखनीय आहेत. या चालुक्य-चरितम् काव्यामध्ये चालुक्य वंशातील पुरुषांसंबंधी शिलालेख-ताम्रपटातून मिळणारा वृत्तान्त 'भारतरत्नानि' या शीर्षकाखाली काव्यात्मक शैलीत निवेदन केला आहे.

काशीतील विख्यात विद्वान् व अप्रतिम प्रवचनकार वेदान्तवाचस्पति कै भाऊशास्त्री वझे यानी लिहिलेला **काशीतिहास**" हा ग्रन्थ संस्कृतातील इतिहास-विषयक ग्रन्थात थोडा वैशिष्ट्यपूर्ण आहे. या ग्रन्थात वेदकालापासून इंग्रजांच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या आंदोलनापर्यंतचा काशीचा समग्र इतिहास साधार वर्णिलेला आहे. विशेष म्हणजे हा इतिहास केवळ काशी क्षेत्रापुरता मर्यादित नसून त्यात संपूर्ण उत्तर भारताचा इतिहास आला आहे. कारण काशीच्या राजकीय इतिहासाच्या अनुषंगाने लेखकाला उत्तरेतील प्राचीन राजवंशाचाहि परामर्श घ्यावा लागला.

---

१० १२३५ मध्ये लाहोर येथे प्रकाशित ११ इ १९३८ मध्ये
१२. मद्रास येथे इ स १९३८ मध्ये मुद्रित।

१३ प्राप्तिस्थान–प. रामचन्द्रशास्त्री वझे, के २१।१६ ब्रह्मघाट, वाराणसी, मूल्य १॥ रु.

ग्रन्थाच्या शेवटी तीन परिशिष्टे जोडली आहेत. त्यात पहिल्या परिशिष्टात प्राचीन भारतातील विद्यापीठाची माहिती देऊन वैदिक, बौद्ध, मुसलमान व इंग्रज यांच्या काळातील काशीच स्वरूप संक्षेपाने सांगितले आहे. दुसऱ्या परिशिष्टात काशीच्या राजकीय धार्मिक, वाङ्मयीन, आणि शैक्षणिक इतिहासाची जन्री दिली आहे. तिसऱ्या परिशिष्टात काशीच्या इतिहासाशी संबंधित अशा नद्या, देश, नगरें व गावें यांची अतिशय उपयुक्त माहिती दिली आहे. एकूण विवेचन ताम्रपट, शिलालेख यासारख्या ऐतिहासिक साधनांच्या आधारें केले आहे. काशी ही अतिप्राचीन काळापासून भारताची स्वयसिद्ध सांस्कृतिक राजधानी आहे. भारताच्या इतिहासात प्राचीन काळापासून जी राजकीय, धार्मिक आणि सामाजिक क्षेत्रात स्थित्यंतरें झाली त्या सर्वांच प्रतिबिंब काशीच्या इतिहासात जसें दिसतें तसें भारतातील कोणत्याहि दुसऱ्या नगराच्या इतिहासात दिसणार नाही. काशीच्या या महत्त्वामुळे श्री. भाऊ शास्त्री वझे यांच्या प्रस्तुत ग्रन्थास विशेष महत्त्व आहे.

## ऐतिहासिक कादंबऱ्या

अर्वाचीन काळात ऐतिहासिक विषयावर नवीन शैलींत कादंबऱ्या लिहिण्याची लाट सर्वच प्रादेशिक भाषात उसळली. संस्कृत लेखकांना हा गद्य वाङ्मयप्रकार तसा नवीन नव्हता. प्राचीन साहित्यिकांच्या 'आख्यायिकांना'[१४] नव्या युगाने कलाटणी मिळालेली त्यांना दिसून आली, त्यानंतर आपापल्या प्रादेशिक भाषामध्ये ऐतिहासिक काळातील कल्पित घटनावर प्रख्यात लेखकांनी लिहिलेल्या उत्तमोत्तम कादम्बऱ्यांची भाषान्तरें त्यांनी सुबोध संस्कृतात केल्याचें दिसून येत. काही प्रतिभासम्पन्न लेखकांनी ऐतिहासिक घटनावर स्वतन्त्र कादंबऱ्या, कथा, नाटक लिहून संस्कृतची सेवा आरंभिली. त्यामध्ये देवेन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांची 'वंगवीरप्रतापादित्य', इन्द्रनाथ बन्द्योपाध्याय यांची 'गौरचन्द्रः' आर. राममूर्ति यांची 'वीरलक्ष्मम् पारितोषिकम्' (चोलवंशाच्या इतिहासावर आधारित) इत्यादि ऐतिहासिक कादम्बऱ्यांचा उल्लेख करणे आवश्यक आहे. या प्रकारच्या अनेक ऐतिहासिक कादम्बऱ्या निरनिराळ्या संस्कृत नियतकालिकांतून क्रमशः व क्वचित् स्वतंत्र पुस्तकरूपाने प्रकाशित झाल्या. आजवर पद पडलेल्या संस्कृत नियतकालिकांतून क्रमशः प्रकाशित झालेल्या उत्तमोत्तम संस्कृत कादम्बऱ्यांच्या व्यवस्थित संकलन करून ग्रन्थरूपाने पुनर्मुद्रण करणे आज दुरंत झालेले आहे. ऐतिहासिक कादम्बऱ्याप्रमाणेच ऐतिहासिक विषयावर अनेक लघुकथा नियतकालिकांतून प्रकाशित झाल्या आहेत. त्यांच संकलनहि अद्याप झालेलें नाही. सरळ, सुबोध व रोचक संस्कृत साहित्याची, संस्कृतचा व्यासंग वाढवू इच्छिणाऱ्यांना भासणारी उणीव, अशा कथांचें संकलन प्रकाशित झाल्यास सहज भरून निघेल.

---

१४. 'आख्यायिकोपलब्धार्था' इत्यमर ।

डॉ. राघवन् यांनी "आपल्या आधुनिक संस्कृत साहित्यविषयक निबंधांत"[१५] वीरमती, अत्याचारिणः परिणामः, (मुसलमानी अत्याचारांवर आधारित), अशोक, हीर, विरसमेधयाजी यांसारख्या काही इतस्ततः विखुरलेल्या ऐतिहासिक कथांचा उल्लेख केला आहे. संस्कृत नियतकालिकांतील विविध विषयांची जी प्रदीर्घ सूची आम्ही प्रस्तुत ग्रन्थांत (पृ. २९० ते ३११) दिली आहे त्यांत ऐतिहासिक विषयावरील कित्येक कथा आढळतील.

## ऐतिहासिक नाटकें

नाटक हा वाङ्मयप्रकार भारतातील अन्यभाषीय साहित्यिकांपेक्षा संस्कृत-तज्ञांना सर्वांत अधिक परिचित. ज्या शतकांतील शतमानीन संस्कृत साहित्याचे पर्यालोचन प्रस्तुत प्रबंधात आम्ही केले आहे, त्यांतील इंग्रजी शिक्षणाचा आरंभ होण्यापूर्वीच्या प्रथम खंडांत सर्व प्रादेशिक भाषांतील साहित्याचे विषय आणि बरेचसे प्रकार, संस्कृतनिष्ठच होते. त्याला अपवाद म्हणजे तामिळमधील संगम साहित्य, तेलगूतील द्वयर्थीकाव्य व उदाहरण साहित्य, मल्याळीमधील किळिप्पाट्टु (कीरगीत व मणिप्रवाळम्), मराठीतील पोवाडे, लावण्या, अभंग, ओव्या, बंगालीमधील मंगलगान, आसामीतील बरगीत व बुरंजी साहित्य, हिंदीमधील रीतिकाव्य किंवा छायावाद यासारखे प्रादेशिक प्रकार होत. पण ते संस्कृत साहित्यात नसले तरी संस्कृत साहित्य त्यात होतें, कारण त्याचें पोषण संस्कृत वाङ्मयद्वारा झालें होतें. सर्व प्रादेशिक साहित्यिकांनी संस्कृत साहित्यातील उपेक्षिलेलें सर्वोत्तम वाङ्मय-प्रकार म्हणजे नाटक! १७ व्या शतकापासूनचा कोणत्याहि प्रादेशिक साहित्याचा इतिहास पाहिला तर त्यामध्ये १९ व्या शतकापर्यंत नाटकें आढळतच नाहीत. संस्कृतांत मात्र भास-कालिदासादिकांपासून प्रवर्तित झालेली नाटकसाहित्याची परम्परा कधीच कुण्ठित झाली नाही. त्याचबरोबर नाट्यशास्त्रकारांनी रूपक वाङ्मयाचे जितके प्रमुख आणि गौण प्रकार सांगितले तितके सर्व संस्कृत साहित्यिकांनी सतत हाताळलेले असल्याचेंहि आढळून येतें. प्रादेशिक साहित्यिकांना पाश्चात्य साहित्यानेंच नाट्यनिर्मितीस मुख्यतः प्रवृत्त केलें. त्यामुळे सुंदर सुंदर इंग्रजी नाटकांचे अनुवाद प्रादेशिक भाषांत प्रथम निर्माण झालेले दिसतात. संस्कृतात त्याप्रमाणे आधुनिक कालखंडांत प्रादेशिक भाषांतील उत्तमोत्तम ग्रथांचे अनुवाद करण्यापासून लेखकांनी नावीन्य निर्माण केलें. त्याचप्रमाणे प्रादेशिक भाषांत नाट्यसाहित्याच्या संबंधात झालेलें दिसून येतें. विषयांतराची प्रक्रिया कोणत्याहि भाषेतील साहित्यांत प्रायः सारखीच असणार!

---

१५. Contemporary Indian Literature, Sahitya Akademi, New Delhi 1057, p. 215.

मालतीमाधव ( १८६१ ), जानकीपरिणय ( १८६५ ), नागानन्द ( १८६५ ), मुद्राराक्षस ( १८६७ ), कर्पूरमञ्जरी ( प्राकृत सट्टक ) ( १८७७ ), मृच्छकटिक ( १८८१ ), रत्नावली ( १८८२) इत्यादि संस्कृतातील उत्तमोत्तम नाट्यकृतींची मराठी भाषांतरें महाराष्ट्रात आणली. या विद्वानांपैकी काहींनी तर स्वत: नाटकात कामे करून नवशिक्षितांचे लक्ष नाट्यवाङ्मयाकडे आकर्षित केले. निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी वेणीसंहार नाटकाच्या प्रयोगात धर्मराजाची व संस्कृत –इंग्रजी कोशकर्ते वामन शिवराम आपटे यांनी उत्तररामचरिताच्या प्रयोगात सीतेची भूमिका केली होती."

तात्पर्य अशा प्रकारें हिंदी–मराठी इत्यादि प्रादेशिक भाषातील नाट्य वाङ्मयाला ज्या काळात जेमतेम सुरुवात झाली, त्या काळापर्यंत संस्कृतची नाट्क परम्परा अतिप्राचीन काळापासून चालू होती, हें या प्रबंधातील नाट्यवाङ्मयविषयक प्रकरणातील संक्षिप्त परिचयावरून ध्यानात येईल. प्रादेशिक साहित्यिकानी आधुनिक युगात नाट्यवाङ्मयाला प्रथम प्रारंभ केला तो संस्कृत नाटकाच्या भाषान्तरापासून हें खरें, पण त्याच लक्ष लवकरच पाश्चात्यांच्या नाट्यवाङ्मयाकडे व त्यातील विविध प्रकाराकडे आकर्षित झाल्याने त्यानी नाटकाचे जे विविध प्रकार पुढे प्रादेशिक साहित्यात वाढविले ते सारे पाश्चात्यच होते. वास्तविक भारतीय नाट्यशास्त्र हे अत्यंत विकसित झालेले शास्त्र असून त्यातील अनेक प्रकार पाश्चा त्यानीहि अनुसरण्यासारखे आहेत. प्रादेशिक नाट्यसाहित्यात काही काही नवीन प्रकार पाश्चात्यानुसरणाने आले, ते मुळात भारतीय नाट्यशास्त्रात होते. पण भारतीय नाट्यशास्त्राचा पद्धतशीर अभ्यास करण्याचा प्रयत्न प्रादेशिक नाट्य-कारानी टाळल्यामुळे पाश्चात्यांच्या अनुसरणातून जो अभिनव नाट्यप्रकार म्हणून आपण घेत आहोत तो मुळात आपल्या राष्ट्रीय नाट्यशास्त्रातहि आहे, याची जाणीव त्याना असल्याचें दिसत नाही ही गोष्ट नाट्यप्रकारची तीच कवितेत पाश्चात्यानु सरणाने शिरलेल्या काही प्रकाराची आहे. उदाहरणार्थ, अन्त्ययमक–हीन कविता करण्यात आपण काही तरी नावीन्य काव्यात उत्पन्न करीत आहोत असे आधुनिक प्रादेशिक कवींना वाटले. पण संस्कृतात अन्त्ययमक–विहीनच काव्य सर्वत्र आढळत. मुक्तच्छंदादिक गद्यप्राय प्रकार पाश्चात्यांच्या अनुकरणातून प्रादेशिक साहित्यिकानी घेतले, पण विश्वनाथादिक संस्कृत साहित्यशास्त्रज्ञानी गद्याचे जे वृत्तक, उत्कलिकाप्राय, मुक्तक, वृत्तगन्धि, चूर्णिका, दण्डक, कौमगदण्डक, तूणक, भुजग, खड्ग यासारखे विविध प्रकार पूर्वीच सांगून ठेवले होते, तिकडे मात्र त्यांचे दुर्लक्ष होते. याच मुख्य कारण पाश्चात्यांचे अनुसरण करण्याच्या गर्दीत भारतीय साहित्य-शास्त्राच्या अभ्यासाकडे प्रादेशिक लेखकाच दुर्लक्ष झाले हेच होय. असो !

१६. मराठी रंगभूमि, पान ४२

पाश्चात्य साहित्याच्या सम्पर्काने मिळालेल्या प्रेरणेने व संस्कृत वाङ्मयातील उत्कृष्ट नाटकांच्या अनुवादांनी जें नाट्यवाङ्मय प्रादेशिक भाषात निर्माण होऊ लागले त्याच्याशीं संस्कृत साहित्यिक परिचित होतेच. आपापल्या प्रादेशिक भाषात अनुवादात्मक नाटकादि वाङ्मय करण्याचें कार्य करणारे लेखक वरच्या श्रेणीचे संस्कृत पण्डितच होते. त्यातील काही तर स्वयंप्रतिभेचे लेखक होते. त्यानी आपल्या प्रादेशिक भाषेत व संस्कृतातहि सारखेंच लिखाण केलें असे आढळून येतें.

प्रादेशिक नाट्यसाहित्यात संस्कृत नाटकांच्या अनुवादानानंतर जी ऐतिहासिक नाटकांची लाट उसळली, तिचे प्रतिबिंब आधुनिक संस्कृत साहित्यातहि दिसतें. संस्कृत वाङ्मयाला नाटक हा वाङ्मयप्रकार प्रादेशिक वाङ्मयाप्रमाणे नवखा नसला तरी, परिस्थित्यनुसार ऐतिहासिक कथानक हा प्रकार काहीसा नवीन होता. त्याचबरोबर नाटकांतील संगीताला लागलेलें वळण त्याना नवीन होते. पण एवढें नावीन्य त्यानी संस्कृत नाटकात उत्पन्न केलेलें दिसते. महामहोपाध्याय माथुरीप्रसाद दीक्षित यानी वीरप्रतापनाटकम्[१७] हें नाटक देशभक्तीचा उद्दीपन सामाजिकात व्हावं यासाठी लिहिलें. बडोद्याच्या संस्कृत कॉलेजचे प्राध्यापक प. मूळशंकर माणेकलाल याज्ञिक यांनी लिहिलेलीं प्रतापविजयम्, संयोगितास्वयंवरम् व छत्रपतिसाम्राज्यम् हीं तीन ऐतिहासिक नाटकें इंग्रजी भाषान्तरासह प्रकाशित झाली आहेत. श्री. मूळशंकर याज्ञिक हे चागले संगीतज्ञ असल्याने त्यानी आपल्या नाटकात संस्कृत गीताचा अन्तर्भाव केला आहे. प्रस्तुत प्रबन्धात (पृ. २०० व २०३) त्यातील काही गीताचा परिचय दिला आहे.

जगन्नाथपुरीच्या संस्कृत विद्यालयाचे अध्यापक प. सुदर्शनपति यानी उत्कलच्या ऐतिहासिक घटनावर **पादुकाविजयम्, सिंहलविजयम् व सत्यचरितम्** हीं नाटकं आधुनिक नाट्यतंत्राचा अवलंब करून लिहिलीं व त्याचे प्रयोगहि आपल्या विद्यालयात केले (हीं तीन्ही नाटकं प्रकाशित झालीं आहेत.) रजपुताच्या इतिहासावर पंचानन तर्क भट्टाचार्य यानीहि 'अमरमङ्गलम्' हें एक नाटक लिहिले आहे.[१८]

## चरित्रवाङ्मय

पाश्चात्य व प्रादेशिक साहित्याच्या दृढ संपर्काने आधुनिक संस्कृत साहित्यिकानी परम्परागत संस्कृत साहित्यात ऐतिहासिक विषयावर चरित्र, कादम्बऱ्या, कथा, नाटक लिहून विषयदृष्ट्या सर्व नवीन निर्माण केलें याची कल्पना वरील विवेचना वरून येऊ शकेल. सहज लक्षात येणारा दुसरा नवीन भाग म्हणजे थोर पुरुषांचीं चरित्रं! या प्रबन्धाच्या आरंभींच्या प्रकरणात राम, कृष्ण, शिव, विष्णु इत्यादि

१७ १९३७ मध्ये लाहोर मुद्रित
१८ इ १९३९ मध्ये वाराणसी येथे मुद्रित

देवताच्या चरित्रावर आधारलेल्या विविध काव्यांचा परिचय दिलेला आहे. त्यावरून आधुनिकतेची लाट येण्यापूर्वी संस्कृत साहित्यिकांनी चरित्रलेखनासाठी अव्याहतपणे जे ठराविक विषय व ठराविक वाङ्मयप्रकार हाताळले त्याची कल्पना येते. नवीन चरित्रलेखकांनी सरळ सुबोध भाषेत, अलंकारमय पाल्हाळिक वर्णन टाळून, चरित्रनायकाच्या जीवनातील घटनांवर व स्थळकाळाच्या निश्चितीवर भर देऊन चरित्रे लिहिली. पद्यबन्ध, चम्पू, व 'ओज समासभूयिष्ठ' बाणभट्टी गद्य यांची जागा सरळ सुबोध गद्याला मिळाली आणि पौराणिक देव-देवतांच्या ऐवजी साधुसंत, शास्त्रीपण्डित, राष्ट्रधुरन्धर यांची जीवने चरित्रग्रन्थांचा विषय झाली.

म्हैसूरच्या अलमेलम्मा या विदुषीने इ. १९२२ मध्ये लिहिलेले बुद्धचरितामृतम् कालीहरदास वसु यांनी संस्कृत साहित्य परिषेत (इ. १९२८-२९ मध्ये प्रकाशित केलेले) चैतन्यचरितम्; क्षमादेवी राव यांचीं ज्ञानेश्वर, रामदास, तुकाराम, मीरा या संतांची पद्यबद्ध चरित्रे; मद्रासचे राजवल्लभशास्त्री यांनी इ. १९३६ मध्ये लिहिलेले शृंगेरीच्या नरसिंहभारतींचे महाकाव्यात्मक चरित्र; श्री. अखिलानन्द शर्मा यांनी इ. १९१० मध्ये लिहिलेले व श्री. मेधाव्रत शास्त्री यांनी इ. १९३८ पूर्वी लिहिलेले दयानन्ददिग्विजय या नावाची स्वामी दयानन्द सरस्वतींची दोन महाकाव्यात्मक चरित्रे; प्रयागच्या गंगाप्रसाद उपाध्यायांनी इ. १९५२ मध्ये लिहिलेलें दयानन्दचरित्रविषयक आर्योदयकाव्यम्; पी. पंचपागेश शास्त्री यांनी इ. १९३७ मध्ये रामकृष्णपरमहंसचरितम् व बंगलोरच्या के. नागराजन् यांनी १९४७ मध्ये लिहिलेले विवेकानन्दचरितम्; कुम्भकोणमचे श्री. सुंदरेश शर्मा यांनी इ. १९३७ मध्ये लिहिलेले त्यागराज या विख्यात आधुनिक दाक्षिणात्य गायक संताचे चरित्र; इत्यादि आधुनिक चरित्रग्रन्थांचा उल्लेख व क्वचित् सविस्तर परिचय प्रस्तुत ग्रन्थात साधुपुरुषांची चरित्रे या प्रकरणात (पृ. ३९ ते ४७ आलाच आहे. त्यांतील काही लेखकांनी चरित्रांचे विषय म्हणून अर्वाचीन संतांची चरित्रे (त्यावर संस्कृतात पूर्वी लिखाण न झाल्याने) निवडली, तरी लेखनाचा प्रकार महाकाव्या सारख्या जुनाच ठेवलेला आहे. जुन्या पद्धतीने नवीन विषय व नवीन पद्धतीने जुना विषय लेखकांनी हाताळल्याची उदाहरणे सर्वच साहित्यात आढळतात. लोकमान्य टिळकांचा गीतारहस्य हा युगप्रवर्तक मराठी निबंधग्रन्थ नवीन पद्धतीने जुना विषय हाताळण्याचे उत्कृष्ट उदाहरण म्हणून सांगता येईल. याउलट जुन्या पद्धतीने नवीन विषय हाताळण्याचे मराठीतील प्रसिद्ध उदाहरण म्हणून संत दासगणू महाराजांनी लिहिलेल्या भक्तिलीलामृत (इ. १९०६), संतकथामृत (इ. १९०८), भक्तिसारामृत (इ. १९२५), गुरुचरितामृत (इ. १९३४), श्रीगजाननविजय, श्रीईश्वरावचरित्र इत्यादि चरित्रग्रन्थांचा उल्लेख करता येईल. या चरित्र ग्रन्थांतील नायक सर्व आधुनिक आहेत, पण त्यांची चरित्रे मात्र श्रीधर, मुक्तेश्वर महीपति इत्यादि जुन्या मराठी कवींच्या धाटणींत लिहिलेली आहेत.

साधुसंतांप्रमाणेच विद्वान् शास्त्रीपण्डितांविषयी विद्वानांच्या अन्तःकरणात श्रद्धा जागृत असल्याने त्यांची चरित्रेंहि आधुनिक काळात लिहिण्यात आली. हा विषयसुद्धा संस्कृत साहित्यिकांत आधुनिक काळातच प्रिय झाला व त्यायोगे संस्कृत साहित्यात विषयानुरोधाने आधुनिकतेची छाया उमटू लागली. श्री. चन्द्रभूषण शर्मा यानी लिहिलेले वाराणसीच्या संस्कृत विद्यालयाचे विद्वान् आचार्य प. बेचनराम यांचे 'जीवितवृत्तान्त.' हे चरित्र, वाराणसीचे श्री. नारायणशास्त्री खिस्ते यानी इ. १९२८ मध्ये लिहिलेले विद्वच्चरितपञ्चकम् हे चम्पूकाव्य[19]; म. म. यज्ञस्वामी यानी लिहिलेले 'त्यागराजविजयम्'[20] हे आपल्या आजोबाचे चरित्र, क्षमादेवी राव हिने लिहिलेलें शंकरजीवनाख्यानम्[21] हे आपल्या विद्वान् पित्याचे (शंकर पाण्डुरंग पण्डित याचे) पद्यात्मक चरित्र, बीजापूरचे विद्याधरशास्त्री यानी लिहिलेले 'हरनामामृत-काव्यम्' हे आपल्या विद्वान् पितामहाचे चरित्र; मुंबईचे विख्यात डॉक्टर न्य. मं. कैकिणी यानी लिहिलेले शिवकैवल्यचरितम् हे आपल्या पूर्वज सत्पुरुषाचे पद्यबद्ध चरित्र व मुंबईत पोष्टखात्यात अधिकारावर असलेले श्री. वि. भि. वेलणकर यानी लिहिलेले 'जीवनसागर.' हे म. म. पा वा. काणे यांचे विविध नूतन छंदात लिहिलेले चरित्र इत्यादि विद्वच्चरित्रात्मक ग्रन्थ संस्कृत साहित्याला विषयदृष्ट्या मिळालेल्या नव्या वळणाची उदाहरणें म्हणून उल्लेख करण्यासारखी आहेत. निरनिराळ्या संस्कृत नियतकालिकांतून अनेक विद्वानांच्या व राजकीय पुढाऱ्यांच्या जीवनाविषयी शेकडो लहान मोठे चरित्रात्मक लेख आजवर प्रकाशित झाले आहेत. त्यांचे प्रांतानुसार किंवा इतर कोणत्या तरी पद्धतीनुसार संकलन करून खण्डशः प्रकाशन करणे आज आवश्यक झालेले आहे. विख्यात वेदभाष्यकार ब्रह्मश्री कपालीशास्त्री यानी लिहिलेले 'वासिष्ठ-वैभवम्'[22] हे आपल्या गुरूचे (काव्यकण्ठ गणपतिशास्त्रींचे) आधुनिक चरित्रग्रन्थांच्या तन्त्रानुसार लिहिलेले गद्यात्मक चरित्र विशेष उल्लेखनीय आहे.

आधुनिक कालखण्डात झालेल्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या विविध चळवळींचा सर्व प्रादेशिक साहित्यावर परिणाम झालेला दिसतो. तसा तो संस्कृत साहित्यात दिसून येतो हे 'संस्कृत साहित्यातील राष्ट्रवाद' ह्या प्रस्तुत ग्रन्थातील २१ व प्रकरण वाचून लक्षात येईल. चरित्रात्मक साहित्यावर झालेला त्या चळवळीचा परिणाम म्हणजे आधुनिक देशभक्तांच्या तेजस्वी जीवनावर संस्कृतात जुन्या नव्या पद्धतीनुसार चरित्रग्रन्थ निर्माण होऊ लागले. स्वामी भगवदाचार्य कृत भारतपारिजात, पारिजातापहारः

---

१९ यामध्ये गंगाधरशास्त्री मानवल्ली, कैलासचन्द्र, दामोदरशास्त्री, शिव-कुमारशास्त्री व तात्याशास्त्री या पाच प्रख्यात महामहोपाध्यायांची चरित्रे आहेत.

२० १९०४ मध्ये तंजावर येथे प्रकाशित।

२१ इ १९३९ मध्ये मुंबईत प्रकाशित।

२२ नन्दिनी मुद्रणालय सिर्सी, उत्तर कॅनरा येथे इ १९४४ मध्ये प्रकाशित.

व **पारिजातसौरभः** या महात्मा गांधींच्या उदात्त जीवनावर आधारलेल्या काव्याचा उल्लेख पूर्वीच्या प्रकरणातून आलेला आहे. त्याव्यतिरिक्त टिळकशताब्दी *महोत्सवानिमित्त इ. १९५७ मध्ये प्रकाशित झालेली दोन टिळकचरित्रे—मुंबईचे* श्री. कृ. बा. चितळे याचे **लोकमान्य-टिळकचरितम्**[23] व सोलापूरचे वासुदेव शास्त्री बागेवाडीकर याचे श्रीतिलकचरितम्[24] याचा निर्देश करणे आवश्यक आहे.[25] कलकत्त्याच्या संस्कृत पत्रवाणी या नियतकालिकात श्री कालीपद यांनी **आशुतोषावदानम्** हे श्री. आशुतोष मुकर्जींचे चरित्र लिहिले आहे.

श्री. बागेवाडीकर यांची संस्कृत गद्यशैली फारच सुबोध व परिष्कृत आहे. त्यांनी प्रस्तुत टिळकचरित्राव्यतिरिक्त 'गांधिचरितम्' हे महात्मा गांधींचे चरित्र इ. १९५८ मध्ये प्रकाशित केले. कोल्हापूरचे लाटकरशास्त्री यांनी 'राष्ट्रपतिचरितम्' हे राष्ट्रपति राजेन्द्रप्रसादांचे चरित्र नुकतेच प्रकाशित केले आहे. कल्याणचे श्री. वि. के. छत्रे हे संस्कृत नियतकालिकांतून अनेक देशभक्तांची पद्यात्मक चरित्रे लिहीत असतात. त्यांनी देशगौरव सुभाषचन्द्र बोस याचे १६ सर्गांत चरित्र लिहिले असून ते प्रकाशनाच्या वाटेवर आहे.

## सामाजिक विषय

आधुनिक साहित्यातील ऐतिहासिक विषयावर लेखन करण्याची प्रवृत्ति लक्षात घेऊन संस्कृत साहित्यिकांनी तो नवीन विषय संस्कृत साहित्यात आणण्याचा प्रयत्न आधुनिक काळात कसा केला याची कल्पना वरील विवेचनावरून येईल. आधुनिक साहित्याचा आणखी एक विशेष म्हणजे त्यातील सामाजिक विषय! प्रादेशिक साहित्यात सामाजिक विषयावर कथा, कादम्बऱ्या, नाटके लिहिण्याची प्रवृत्ति *पाश्चात्य साहित्याच्या संपर्काने व समाजाचे वास्तव स्वरूप आविष्कृत करून त्यामध्ये* योग्य ते परिवर्तन घडवून आणण्याच्या प्रेरणेने उत्पन्न झाली असे दिसते. प्रादेशिक साहित्यिकांनी या दिशेने एकदम लेखन सुरू केल्याचे दिसत नाही. उदाहरणार्थ, मराठी कादम्बऱ्यांचा विकास पहा. हा विकास कोणत्या क्रमाने झाला ते सांगताना 'मराठी साहित्य समालोचन'कार श्री. वि. सी. सरवटे म्हणतात, "मराठी कादम्बऱ्यांचा विकास प्रथम भाषान्तरित, नंतर काल्पनिक, पुढे ऐतिहासिक व शेवटी सामाजिक या क्रमाने झाला. (पृ. ३५५) मराठीत इ. १८८५ च्या सुमारास हरिभाऊ आपटे

२३ प्राप्तिस्थान कृ. बा. चितळे, १ डागरवाग, भवानीशंकर रस्ता दादर, मुंबई २८।

२४ प्राप्तिस्थान वासुदेवशास्त्री बागेवाडीकर, ७९६ द कसबा, सोलापूर।

२५ लोकनायक बापूजी अणे हे लोकमान्यांचे पद्यबद्ध सविस्तर चरित्र लिहित आहेत.

यानी सामाजिक कादम्बऱ्या लिहिल्या, तेव्हापासून सामाजिक विषयावर लेखन करण्यास चालना मिळालेली दिसते. हिंदी साहित्यातहि बाबू प्रेमचन्दजींचा उदय होईपर्यंत मराठी कादम्बऱ्यांच्या क्रमानेच विकास झालेला दिसतो. प्रेमचन्दजींपासून हिंदींत सामाजिक कादम्बऱ्यांना चालना मिळाली.

आधुनिक संस्कृत साहित्यात कादम्बरी हा वाङ्मयप्रकार वर उल्लेखिलेल्या क्रमाने हाताळला गेला. त्यापैकी भाषान्तरित, काल्पनिक व ऐतिहासिक कादम्बऱ्यांचा परिचय अन्यत्र दिलेला आहे. कादम्बऱ्यांसाठी सामाजिक विषय संस्कृत लेखकांनी घेतल्याचे दिसत नाही. पण कादम्बऱ्यांसाठी सामाजिक विषय त्यांनी न घेतला तरी सामाजिक विषयाची त्यांनी सर्वस्वी उपेक्षा केल्याच दिसत नाही.

लघुकथा हा वाङ्मयप्रकार संस्कृत साहित्याला नवा नसला तरी आज ज्या पद्धतीने लघुकथा लिहिल्या जातात ती पद्धति सर्वस्वी पश्चिमेकडून आलेली आहे. संस्कृत साहित्यिकांनी ती पूर्णपणे आत्मसात् केली असून आजपर्यंत सहस्रावधि लघुकथा पौराणिक, ऐतिहासिक, काल्पनिक व विशेष म्हणजे सामाजिक विषयावर संस्कृतात लिहिल्या गेल्या.

## संस्कृत कथास्पर्धा

आधुनिक संस्कृत कथावाङ्मयाच्या दृष्टीने एक महत्त्वाचा उपक्रम कै. देवदास गांधी (महात्माजींचे सुपुत्र) यांनी व्यक्तिशः आमच्याकडून करवून घेतला. 'यूनेस्को'च्या वतीने जगातील निरनिराळ्या भाषांतील कथांची स्पर्धा त्या त्या भाषेच्या एखाद्या वृत्तपत्रातर्फे चालविण्यात येते. 'संस्कृत-भवितव्यम्' तर्फे अखिल भारतीय संस्कृत कथास्पर्धा आम्ही आयोजित करावी असे श्री. देवदास गांधींनी आम्हांस लिहिले व त्या स्पर्धेतील पारितोषिकासाठी १२०० रुपयांचा निधि त्यांनी स्वतः दिला. ही स्पर्धा प्रसिद्ध करताना व्यक्तिशः आम्हास तिच्या यशाविषयी मोठी शंका होती. पण आश्चर्य हे की या संस्कृत कथास्पर्धेसाठी दीडशेपेक्षा अधिक संस्कृत कथा भारताच्या सर्व प्रांतातून आल्या. त्यात काही लेखिकांनी सुद्धा भाग घेतला होता. भारताच्या वरिष्ठ न्यायालयाचे माजी न्यायाधीश श्री. पतञ्जलि शास्त्री व गुरुवर्य महामहोपाध्याय डॉ. वा. वि. मिराशी या स्पर्धेचे परीक्षक होते. कथास्पर्धेचा आयोजक म्हणून व्यक्तिशः आम्हाला देखील यांच्या परीक्षकाचे काम करावे लागले. या स्पर्धेत डेहरादूनच्या उत्तराखण्ड विद्यापीठाचे संचालक श्री. पुरुषोत्तमशास्त्री डोभाल यांच्या "आचार्यस्य व्यतिक्रमः" या अख्यायावर कथात्मानुसार लिहिलेल्या कथेस पाचशे रुपयांचे प्रथम पारितोषिक मिळाले, व तिचा इंग्रजी अनुवाद जागतिक कथास्पर्धेसाठी धाडण्यात आला. महाराष्ट्राचे अतिप्रिय कथालेखक व संस्कृत-कोपकार प. महादेवशास्त्री जोशी (पुणे) यांच्या 'पर्जन्यकुण्डम्' या कथेला दुसरे

चारशे रुपयांचें पारितोषिक मिळालें. उरलेल्या पारितोषिकाचा निधि श्री. वैद्यनाथ शर्मा (बहरपुर, ओरिसा) यांच्या 'भाग्यचक्रम्' या कथेला, श्री. चिदुमणि अय्यंगार (मद्रासी पत्रकार) यांच्या 'किमहं पतिता' या कथेला व नागपूरचे श्री. ना. गो. गर्दे यांच्या 'वृषस्य दित्वा सम्भूता' या कथेला वाटून देण्यात आला. या सर्व कथा पुस्तकरूपानें संस्कृत-भवितव्यम् तर्फे १९५४ सालीं प्रकाशित झाल्या आहेत.

कथालेखनाच्या तन्त्रात जी काही प्रगति झाली आहे ती या स्पर्धेसाठी आलेल्या सर्व संस्कृत कथामध्ये प्रतिबिंबित झालेली होती. साम्यवादी विचारसरणीचें प्रतिबिंब देखील काही कथामध्यें उमटलेलें स्पष्ट दिसत होतें.

इ. १९३३ मध्यें क्षमादेवी राव यांचा 'कथा-पञ्चकम्' पद्यात्मक कथा संग्रह प्रसिद्ध झाला इ. १९५४ मध्ये 'ग्रामज्योति' हा त्यांचा दुसरा पद्यात्मक कथा संग्रह प्रसिद्ध झाला त्यामध्यें रेवा, कटुविपाक व वीरभा या तीन सत्याग्रह चळवळीच्या काळांतील सत्यकथा आहेत. क्षमादेवींचा सर्वांत अधिक वैशिष्ट्यपूर्ण कथासंग्रह म्हणजे 'कथामुक्तावली'! विषय, आशय, तंत्र इत्यादि सर्व दृष्टींनी कथा मुक्तावलीतील कथा अगदी अग्रगण्य आहेत. प्रादेशिक भाषातील कोणत्याहि उत्कृष्ट कथालेखकाच्या कथांशीं क्षमादेवींच्या कथामुक्तावलींतील कथांची तुल्यता सहज दाखविता येईल. या तीनहि कथासंग्रहातील विषय सामाजिक स्वरूपाचे आहेत. क्षमादेवींच्या परिचयात (पूर्वार्ध पृ. ४१३ ते ४१६) तिच्या काही कथांचा अधिक परिचय दिलेला आहे.

संस्कृत नियतकालिकातून आरंभापासूनच सामाजिक विषयावर नवीन कथा-तन्त्रानुसार लिहिलेल्या कथा प्रकाशित होऊं लागल्या. सहृदया पत्रिकेंत के. श्रीनिवासन् यांनी 'साधुमणि' ही गंगेच्या तीरावरील एका गरीब मिठाई विकणाऱ्याची हृदयस्पर्शी कथा लिहिली होती. संस्कृतसाहित्यपरिषत्पत्रिकेतील काही सामाजिक कथांची माहिती डॉ. राघवन् यांनी Contemporary Indian literature या साहित्य अकादेमीच्या ग्रन्थातील लेखात पृ. २१३ वर दिली आहे. त्यामध्यें मन्मथ विद्यारत्न यांची 'लीला' (इ. १९२३-२४) तरणिकान्त चक्रवर्ति यांची 'पुष्पाञ्जलि' (इ. १९२४-२५), आर्. के. शंकरनारायण शास्त्री यांच्या 'ऐन्द्रजालिक' (मे १९३२), 'रसमयी' (इ. १९३३-३४), 'भामिन्या मदनलाप' (वृद्ध पतीची तरुण पत्नी या विषयावर) या तीन कथा, व्ही. व्ही. वरदराज यांची 'कस्यापराध' (दारिद्र्यमूलक गुन्हेगारी या विषयावर) या सामाजिक कथांचा मोठा गौरवपूर्ण निर्देश केला आहे.

सहृदया पत्रिकेंत इ. १९०९ ते १९४८ पर्यंतच्या काळात 'पश्यतोहर.' दुःखिनी बाला, अमरसाहसम्, अर्वाचीनसभ्यता, नीरक्षणय, सरला, साक्षी, आदर्शदम्पती, अयमेव प्रेमपरिपाक, करुणा, 'वरेप्सुवद्वसंवाद',

न्यायाधिकारी, धन्योऽयं परीक्षायुगः, यासारख्या सामाजिक विषयांवरील अनेक कथा सतत प्रकाशित झाल्या. त्याच विषयावर लिहिलेल्या प्रादेशिक भाषातील कथांपेक्षा त्या कोणत्याहि प्रकारे हीणकस ठरणार नाहीत. याव्यतिरिक्त सिंध-हैद्राबादच्या कौमुदी पत्रिकेतील ( इ. १९४४-४५ ) राम द्विवेदी यांच्या विशाला व प्रमोदगृहम् या कथा, विश्वेश्वर दयाळ यांची यौतकम् ( हुंडापद्धति हा विषय ) कलकत्त्याच्या मञ्जूषा पत्रिकेतील ( ऑक्टो. १९५३ ), क्षितीशचन्द्र चट्टोपाध्याय यांची 'मार्जारचरितम्' ( काळाबाजार हा विषय ) या सारख्या सामाजिक कथांचा उल्लेख डॉ. राघवन् यांनी केलेला आहे.

सामाजिक विषयांवरील कथांचे संकलनात्मक संग्रह, ज्या ज्या वृत्तपत्रात त्या कथा प्रकाशित झाल्या त्यांच्या त्यांच्या द्वारा प्रकाशित होण्याची फार आवश्यकता आहे. त्यायोगे सरळ, सोपें व प्रसन्न गद्य लिहिणाऱ्या नव्या संस्कृत वाचकांना उपलब्ध होऊन त्यांचा संस्कृतचा अभ्यास वाढू शकेल. पण संस्कृत वृत्तपत्रांना आर्थिक साहाय्याच्या अभावीं तें सर्वथा अशक्य आहे. त्यासाठी त्यांना आर्थिक सहाय्य देणें सरकारला काही अशक्य नाही. पण...!

## सामाजिक नाटकें

नाटक हा वाङ्मयप्रकार अखिल भारतीय भाषांमध्ये संस्कृत भाषेलाच चिरपरिचित असल्याने पाश्चात्य साहित्याच्या संपर्काने नाट्यसाहित्याची लाट प्रादेशिक साहित्यात उठताच संस्कृत साहित्यात ऐतिहासिक कथानकावर लिहिलेल्या व भाषान्तरित नाटकाच्या निर्मितीने त्या प्रकाराचें एक दुसरें नवस्वरूप प्रकट झाले. एकांकी नाटकें किंवा प्रहसनें संस्कृत नाट्यशास्त्राने पुरस्कारलेलीं होतींच. फार प्राचीन काळापासून संस्कृतात एकांकी नाटकें व प्रहसन लिहिण्यात आलीं असलीं तरी पाश्चात्य साहित्याच्या संपर्काने या दोन प्रकारांना विशेष वेगाची चालना मिळाली. शिक्षणसंस्थांच्या स्नेहसंमेलनासाठी उत्साही अध्यापकांनी अनेक एकांकी नाटकें व प्रहसनें संस्कृतात लिहिल्याचें दिसतें. आधुनिक रसिकांना आवडणारे किंवा प्रादेशिक साहित्यात विशेष प्रचलित झालेले विविध सामाजिक विषय लघुकथाप्रमाणे या लघुनाटकांच्या द्वारा संस्कृत लेखकांनी हाताळलेले दिसतात. सामाजिक विषयावरील असलीं लघुनाटकें नियतकालिकांतून सलग किंवा दोन चार अंकातून क्रमशः प्रकाशित करणे सोयीचें असल्याने त्यांना विशेष चालना मिळाली, असें आग्रहाने म्हणावेसें वाटतें. श्री. पी. व्ही. वरदराज शर्मा यांचें 'कथाहम्' या नांवाचें एकपात्री स्वगतभाषणात्मक नाटक प्रसिद्ध झाले.[26] यात एका आधुनिक नववधूचे हृद्गत व्यक्त केलें आहे. ए. आर. देवे यांनी 'मनोहरम् दिनम्'[27] या लघुनाटकांत गृहिणीसाठी धडपडणाऱ्या

---

२६. स. सा. प. प. १९३९. २७. स. सा. प. प, मार्च १९४१.

आधुनिक विद्यार्थ्यांच्या व्यथा दाखविल्या आहेत. सीतादेवी या लेखिकेने 'अरण्यरोदनम्'[२८] या एकांकिकेत स्त्रियांच्या घरगुती कष्टदायी चित्रण केलें आहे. के. तिरुवेंकटाचार्य यांच्या 'अमर्षमहिमा' नामक नाटकात[२९] सतावलेला अधिकारी आपल्या बायकोवर व कारकुनावर रागावतो. पुढे बायकोचा राग मोलकरणीवर व कारकुनाचा राग त्याच्या बायकोवर निघतो असे दाखविलें आहे. सुरेन्द्रमोहन पंचतीर्थ यांच्या 'वणिक्सुता' या नाटिकेत[३०] एका श्रीमंत विधवेवर प्रेम करणारे हिंदु व बौद्ध धर्ममार्तण्ड दाखविले असून शेवटी हिंदु धर्ममार्तण्ड यशस्वी झाल्याचं दाखविलें आहे. 'कटुविपाक'[३१] या नाटिकेत क्षमादेवी राव यांनी सत्याग्रह चळवळीच्या काळात चळवळींत सहभागी होणाऱ्या तरुणाच्या कुटुंबातील वातावरण चित्रित केलें आहे. 'महाश्मशानम्' या नाटिकेत[३२] देशविभाजनामुळे झालेली कलकत्त्यातील भीषण परिस्थिति व मृत्यूचे थैमान दाखविलेलें आहे. इलत्तूर सुंदरराज कवि यांनी १९ व्या शतकाच्या शेवटीं लिहिलेल्या 'स्नुषाविजयम्' या प्रहसनात[३३] आधुनिक कौटुंबिक जीवनाचं विनोदप्रचुर प्रतिबिंब पाहावयास मिळतें. मद्रासचे के. एल्. व्ही. शास्त्री यांनी 'लीलाविलासः'[३४] 'चामुण्डा'[३५] व 'निपुणिका' या तीन नाटकात आधुनिक समाजांतील समस्या रंगविल्या आहेत. पैकी लीलाविलासः या नाटिकेतील विवाहाची घटना बरीच विनोदी आहे. चामुण्डा या नाटिकेंत पुराणमतवाद्याचा नवीन सुधारणांना आरंभीं विरोध व पुढे त्यांचा अंगीकार दाखविला आहे. वायु. महालिंगशास्त्रींनी लिहिलेल्या 'कौण्डिन्यप्रहसनम्'[३६] मध्ये नित्य परान्नावर चैन करणाऱ्या कद्रू माणसाची फजीती दाखविलेली आहे. याच लेखकाच्या 'पत्नीशाला-प्रहसनम्'[३७] मध्ये, मुलाला शिक्षा करणाऱ्या शिक्षकाची हजेरी घेणाऱ्या धीट बाईचें पात्र रंगविलें आहे. सुरेन्द्रमोहन यांच्या 'काञ्चनमाला'[३८] नाटिकेंत दागिन्यासाठी तडफडणाऱ्या स्त्रीचं स्वभावदर्शन घडविलें आहे. सुन्दरेश शर्मा यांनी शृंगारशेखरभाणामध्ये, नवीन फॅशनच्या आहारीं गेलेल्या स्त्रिया, त्यांचा क्लब, नवी वेशभूषा, सिनेमा, नवे खेळ यांची योजना करून भाण या जुन्या नाट्यप्रकारांत भरपूर नवीनता उत्पन्न करण्याचा उद्योग केला आहे. श्री. के. आर. नायर यांनी 'अलब्ध-कर्मीयम्'[३९] या वेकारीविषयक नाटकात बेकारीनें हताश झालेला सत्कृत पण्डित

२८ मनोरमा वेङ्कटरामपूर येथे प्रकाशित पत्रिका। २९ अमृतवाणी बंगलोर इ. १९५१। ३० मञ्जूषा इ १९५५। ३१. मञ्जूषा, डिसेंबर १९५५। ३२ कौमुदी, सिंध हैद्राबाद, सप्टेंबर १९४४। ३३ मद्रास येथे मुद्रित। ३४ पालघाट येथे मुद्रित इ १९३१। ३५ मद्रास येथे मुद्रित ३६ इ १९३० मध्ये मद्रास येथे मुद्रित ३७ इ ११४२ मध्ये मुद्रित महाराजा संस्कृत कॉलेज मॅगझीन, म्हैसूर ३८ मञ्जूषा, नोव्हेंबर १९५५ ३९ इ १९४२ मध्ये त्रिवेन्द्रम येथे महाराजा संस्कृत कॉलेजतर्फे प्रकाशित.

सैन्यात भरती होण्याचा प्रयत्न करीत असता एका संस्कृत विद्यालयात त्याला पधरा रुपये पगाराची नोकरी मिळताच स्वीकार करतो असें दाखविले आहे. या नाटकात पात्राचीं नावें कवि (नायक), भावना (नायकाची पत्नी), गैर्वाणी (त्याची आई) अशीं लाक्षणिक स्वरूपाचीं आहेत.

आकाशवाणीतर्फे संस्कृत लघुनाटकाना स्थान मिळाल्यापासून फार मोठ्या प्रमाणात संस्कृतात इतर भाषाप्रमाणेच नाट्यकृतींची निर्मिति होऊ लागली आहे. सामाजिक विषयावर जीं शेकडों लहान मोठीं नाटकें आजवर संस्कृतात लिहिलीं गेलीं, त्यापैकीं बहुतेकाचे प्रयोग स्नेहसमेलनातून किंवा संस्कृत परिषदातून झाले आहेत. नाट्यवाङ्मयाची जुनी परम्परा व तीमधील सर्व वैशिष्ट्य आजवर जगवून[४०] शिवाय नवीन परिस्थितींतसुद्धा संस्कृत साहित्यिक मागे राहिलेले नाहीत, असें वरील उदाहरणावरून स्पष्ट दिसून येतें.

## राजकीय विषय

राजकीय घडामोडी हा सामाजिक जीवनाचा एक महत्त्वाचा भाग आहे. भारतीय साहित्यात, ज्याच्या प्रभावामुळे नवीन प्रकार व विचार प्रवाहित झाले त्या इग्रजीच्या उच्चाटनासाठी देशात सर्वत्र मोठमोठ्या चळवळी होत होत्या व त्याचें प्रतिबिंब सर्व साहित्यात पडत होतें. एकदर राजकीय चळवळींचा जनमनावर इतका मोठा परिणाम होत होता की त्या वेळीं सर्वसामान्य मनुष्य राजकारणाविषयी अधिकाधिक जागरूक व दृढ परिचित होऊ लागला. प्रतिभावत लेखकाना या चळवळींतून व चळवळीच्या पुढाऱ्याच्या जीवनातून साहित्यासाठी नवीन विषय डोळ्यापुढे दिसू लागले. पुराण–इतिहासातील विषयावर कल्पनेच्या बळावर केलेल्या लिखाणापेक्षा अशाच्या लिखाणांत एक प्रकारचा जिवतपणा असतो. निरनिराळ्या जुन्या नव्या संस्कृत वृत्तपत्रातून अनेक राजकीय विषयावर निबध, कविता, 'गीता' कथा, नाटिका सतत प्रकाशित झाल्या व होत आहेत. लोकमान्य टिळकाचा कारावास[४१], नामदार गोखले याचा मृत्यु[४२], कॉग्रेसचे थोर अध्यक्ष[४३], महात्मा गाधीच अभिनव सत्याग्रह, अनेक थोर पुढाऱ्याचीं स्तवनें, गोप हम्पा[४४] (मद्रास प्रातातील एक रेल्वे नोकर), गायधनी (नाशिकचा नागरिक), डॉ. श्यामाप्रसाद मुकर्जी, या सारख्यानी केलेलीं बलिदानें, आचार्य विनोबाजींचें भूदान[४५], नव्या भारतीयाचीं समारभप्रसगातून म्हणण्यासारखीं राष्ट्रगीत, राष्ट्रध्वज, स्वातन्त्र्यदिन यासारख्या

४० नाट्यवाङ्मयविषयक प्रकरण पाहा

४१ संस्कृत चन्द्रिका वर्ष ५ वे। ४२ 'सहृदया' वर्ष ९ अक १०। ४३ लक्ष्मीनारायण शानभागकृत राष्ट्रपतिगौरवम् काव्य इ १९३८ मध्ये मुबई येथे मुद्रित। ४४. अमृतवाणी इ १९४७। ४५ भारती इ १९५२।

विविध राजकारणाशी संबंध असलेल्या उदात्त विषयावर कितीतरी ध्येयवादी लेखकांनी संस्कृत वृत्तरचनांतून फुटकळ लिखाण केलेलें आहे. क्षमादेवींची सत्याग्रहगीता, उत्तर-सत्याग्रहगीता, श्री. पाण्डुरंगशास्त्री कृत सत्याग्रहकथा, डी. एस्. शर्मा कृत 'गांधीसूक्ति',[४६] डॉ. छात्रकृत 'स्वर्णबिन्दु', डॉ. सी. कुन्हन् राजाकृत 'भारत-राष्ट्रसंघटनम्'[४७] यासारखीं कित्येक स्वतंत्र पुस्तकेंहि राजकीय विषयावर प्रकाशित झालीं आहेत. निर्पाजे भीमभट्ट यांचे 'काश्मीरसन्धानसमुद्यमः'[४८] हें दोग्य अब्दुल्लाच्या कुटिल कारवायावरील नाटक अनेक दृष्टींनी प्रशंसनीय आहे. या नाटकाचा प्रयोग दक्षिण कर्नाटकांतील एका राजकीय परिषदेत झाला होता. महात्मा गान्धींच्या निधनावर अनेक स्फुटकाव्य संस्कृत नियतकालिकांत प्रकाशित झालीं. सर्वापेक्षा अधिक स्फुटकाव्ये संस्कृत भाषेच्या दयनीय दशेविषयी आरंभापासून प्रसिद्ध होत आहेत. संस्कृत भाषेचें पारतन्त्र्यपूर्व वैभव, तिचें सर्वांगीण महत्त्व, आजची तिची उपेक्षामूलक दुर्दशा या गोष्टींचें शल्य संस्कृतज्ञांना किती डाचत आहे याची कल्पना या काव्यांतून येते. दिल्लीचे प्रभुदत्तशास्त्री यांनी या विषयावर 'संस्कृतवाग्विजयः' नावाचें पांच अंकी नाटकच लिहिलें आहे.[४९] प्राकृतच्या ऐवजी हिंदी प्रभृति प्रादेशिक भाषांचा उपयोग हें नाटकाचें आणखी एक वैशिष्ट्य आहे.

## निबन्ध-वाङ्मय

पाश्चात्य व प्रादेशिक साहित्याच्या संपर्कानें प्रभावित होऊन नवीन वाङ्मयप्रकार आणि नवीन विषय संस्कृतांत आणू पाहणाऱ्या अनेक लेखकांनी निबंध हा गद्य वाङ्मयप्रकार संस्कृतांत वाढविला. हा लेखनप्रकार मुख्यतः नियतकालिकांच्या द्वारा अधिक प्रचलित झाल्याचें सर्वत्र आढळून येईल. प्रादेशिक साहित्यांत पाश्चात्य साहित्याचा संपर्क येण्यापूर्वी किंवा नियतकालिकांचा प्रचार वाढण्यापूर्वी हा प्रकार नव्हता म्हटलें तरी चालेल. हिंदीमध्ये खिस्ती धर्मोपदेशकांनी शाळकरी विद्यार्थ्यांसाठीं लिहविलेल्या पुस्तकांतून गद्य निबंध हा वाङ्मयप्रकार प्रचलित केला. त्याला नीट स्वरूप आलें तें प. महावीरप्रसाद द्विवेदीजींच्या प्रयत्नानें. त्यांनी आपल्या 'सरस्वती' पत्रिकेत स्वतः उत्तम निबंध लिहून अनेक नवीन लेखक निर्माण केले त्यांच्या प्रभावानेंच रामचन्द्र शुक्लप्रभृति आदर्श निबंध लेखक पुढें हिंदीला लाभले.

---

४६ महात्माजी हे नवागत वैदिक ऋषीच आहेत हें सूचित करण्यासाठी या पुस्तकांत वैदिक छंदाचा उपयोग केला आहे

४७ अड्यार लायब्ररी तर्फे इ. १९४८ मध्ये प्रकाशित

४८ प्रास्तिस्थान–नीर्पाजे भीमभट्ट, पो. कन्यान (Kanyana) जि. दक्षिण कॅनरा

४९ दिल्ली येथे इ. १९५२ मध्ये प्रकाशित.

मराठीत सुद्धा दादोबा पांडुरंगांच्या 'यशोदा-पांडुरंगी' (इ. १८६५) या मोरोपंतांच्या केकावलीवरील टीकाग्रन्थापासून निबंधाचा आरंभ मानण्यात येतो. त्यांच्यानंतर 'केकादर्श'कार परशुराम तात्या "नावल व नाटक यांविषयी निबंध" लिहिणारे मराठे हे निबंधकार झाले. पण मराठीचे खरे निबंधकार म्हणजे मालाकार विष्णुशास्त्री चिपळूणकर हेच होत. त्यांच्या प्रगल्भ निबंधापूर्वी मराठीत सुद्धा 'विज्ञोपकमाचा ग्रन्थ' (इ. १८७६), लघुनिबन्धमाला (इ. १८७६) व गद्य-रत्नमाला (इ. १८४५) यासारख्या शालेय निबंधसंग्रहानीच 'निबंध' या अभिनव वाङ्मयप्रकाराचा आरंभ झालेला दिसतो.

संस्कृतांत साहित्यशास्त्राचा विकास व विस्तार विपुल प्रमाणांत झाला होता हें सांगावयास नकोच. तथापि पाश्चात्य साहित्यविमर्शकारांच्या समीक्षात्मक अभिनव निबंधाचा परिचय झाल्यानंतर तो प्रकार संस्कृतात आणण्याचा प्रयत्न सर्वत्र सुरू झाला. साहित्यसमीक्षात्मक लेख संस्कृत नियतकालिकांतून मुख्यतः प्रसव होऊं लागले. आजहि जुन्या काव्यांचें समीक्षण किंवा रसग्रहण करणारे अनेक लेख संस्कृत नियतकालिकांतून येत असतात किंबहुना संस्कृत लेखकांचा तो एक आवडता विषय आहे. असल्या प्रकारचे निबंध स्वतंत्र पुस्तकरूपानेहि प्रकाशित झाले आहेत. त्यामध्ये सहृदया मासिकपत्रिकेचे कांही काळ संपादक असलेले श्री. आर. कृष्णमाचार्य यांचा 'रघुवंशसारः'[५०] व 'मेघसंदेशविमर्शः'[५१] तिरुचिरापल्ली येथील श्री. ए. व्ही. गोपालाचार्य याना 'संदेशद्वयसारास्वादिनी' हा मेघसंदेश व हंससंदेश याची तुलना करणारा निबंध, यासारखे निबंधग्रन्थ उल्लेखनीय आहेत. 'संस्कृत प्रबन्धमञ्जरी' 'लघुनिबंधमणिमाला' 'गद्यकुसुमाञ्जलिः' (ऐतिहासिक निबंधसंग्रह) यासारख्या छात्रोपयोगी निबंधसंग्रहाचा उल्लेख पूर्वार्धात आलेलाच आहे.

'प्रवासवर्णन' हा विषयहि एकूण भारतीय साहित्यांत नवीनच आहे. निबंध हा वाङ्मयप्रकार प्रवासवर्णनाला उपकारक असल्याने अनेक निबंधलेखकांनी प्रवासवर्णनपर निबंध वृत्तपत्रांतून लिहिले. 'संस्कृत-भवितव्यम्' मध्ये नागपूरचे प्रा. गोपाल गुप्त यानी आपल्या नागपूर ते अजिंठा सायकल प्रवासावर वर्णनात्मक उत्तम निबंध लिहिला होता. प्रवासवर्णनात्मक काही अन्यांचा उल्लेख पूर्वार्धात केला आहे. त्यांत एक चम्पूग्रन्थ (व्ही. एम्. रामस्वामीशास्त्रीकृत दिग्विजयचम्पू) आहे. वाङ्मयप्रकार जुना पण विषय मात्र नवीन असें दिसणारे अर्वाचीन संस्कृत साहित्यांत बरेंच निर्माण झालें. पण गेल्या तीस चाळीस वर्षापासून जुन्या वाङ्मय-प्रकारांचा वापर इतर प्रादेशिक साहित्याप्रमाणे संस्कृतातहि ओसरत आहे.

---

५०. श्रीरंगम् येथील 'काव्यगुणादर्श' या पुस्तकमालेतर्फे इ. १९०८ मध्ये प्रकाशित.

५१. इ. १९१५ मध्ये प्रकाशित.

आधुनिक पद्धतीच्या व आधुनिक विषयानुरोधाने लिहिण्यात आलेल्या निबंधग्रन्थामध्ये कोल्हापूरच्या राजाराम महाविद्यालयाचे संस्कृत प्राध्यापक श्री गणेश श्रीपाद हुपरीकर यांचा 'संस्कृतानुशीलनविवेक'[५२] हा निबंध ग्रन्थ अभ्यसनीय आहे. आठ प्रकरणांच्या प्रस्तुत निबंधात आधुनिक विद्यालयातून संस्कृतचे अध्ययन व अध्यापन कसे व्हावे या दृष्टीने मौलिक मार्गदर्शन प्रा. हुपरीकर यांनी केले आहे. हा संस्कृत निबंध त्यांनी त्याच विषयावरील The Problem of sanskrit Teaching या नावाच्या यापेक्षा मोठ्या इंग्रजी प्रबन्धासमवेत प्रकाशित केल्यामुळे त्याला काहीसे गौणत्व आल्यासारखे झाले आहे. तथापि शिक्षणशास्त्रविषयक एक उत्कृष्ट संस्कृत निबंध म्हणून या निबंधाचा उल्लेख अत्यंत आवश्यक आहे.

डॉ. रामजी उपाध्याय यांचा " भारतस्य सांस्कृतिको निधिः " हा भारतीय संस्कृतिविषयक निबन्धग्रन्थ आपल्या परीने एकमेव एक असल्याने उल्लेखनीय आहे.

## विज्ञानविषयक निबंध

नवीन पद्धतीने संस्कृत निबंध लिहिणाऱ्या लेखकांना, नवशिक्षणाने ज्यांचा प्रथमच परिचय झाला अशा विषयांचे आकर्षण निर्माण झाल्याने, विज्ञान व पाश्चात्य तत्त्वज्ञान या विषयांवर काही उत्तम निबंधग्रन्थ निर्माण झाले. पाश्चात्य विज्ञान व तत्त्वज्ञान यांविषयी मराठी अथवा इंग्रजी भाषेतून [illegible] संस्कृत पंडित मंडळींना सज्ञान करण्याची आकांक्षाही या नवीन विषयांवर निबंधलेखन करण्यामागे होती हे विसरता कामा नये ! आयुर्वेदाचा प्रबंध जीवनमरणाशीच संबंध येत असल्याने आयुर्वेदविषयक बरेच वैज्ञानिक ग्रन्थ नीट सुरक्षित व क्वचित् अभ्यासिले गेले. पण अन्यत्र अनेक वैज्ञानिक विषयांचा उदय व विकास भारतात झालेला असून, त्यासंबंधी संस्कृत ग्रन्थांचे अध्ययन पद्धतशीर रीत्या होणे दुर्मिळ होते. भारतात एकेक अद्भुत शिल्प व स्थापत्य कार्ये अतिप्राचीन काळीन निर्माण पावत होते. पण त्याविषयींच्या संस्कृत ग्रन्थांची नावेसुद्धा मोठमोठ्या संस्कृतज्ञांना माहीत नव्हती. हातात अवजारे घेऊन शिल्प-स्थापत्यकर्म करणाऱ्या कारागिरांना त्या ग्रन्थांची आवश्यकता कधीच भासली नाही. त्यामुळे शिल्प स्थापत्यकार्य परंपरागत पद्धतीने अव्याहत निर्माण होत राहिले. तरी त्याविषयींच्या वाङ्मयाचा मात्र लोप झाला होता.

## प्राचीन भारतीयांची वैज्ञानिक प्रगति

संस्कृत लेखकांनी त्यांची नवीन उमेदा केली दिसते अशा विज्ञानकर्मी विषय निरनिराळ्या त्यांविषयी पौर्वात्य पूर्वसंशोधन करण्याची आवश्यकता भासल्या. [illegible]

५२ प्राप्तिस्थान – भारत बुक स्टोअर, कोल्हापूर. मू. १२॥.

विषयक लेखनाची व संशोधनाची उपेक्षा का झाली हा स्वतंत्र व काहीसा विवाद्य विषय आहे; तथापि एवढे मात्र सर्वमान्य झाले आहे की प्राचीन काळी भारतीयांनी विज्ञानाच्या विविध शाखात आश्चर्यकारक प्रगति केली होती. आयुर्वेदविषयक चरक हा बुद्धपूर्वकालीन ( आचार्य प्रफुल्लचंद्र राय यांच्या मते ) ग्रंथ ज्यांनी वाचला असेल, त्यांना ही कल्पना असेलच की चरकाच्या पूर्वीच आयुर्वेदशास्त्र भारतात अत्यंत परिपक्व अवस्थेला पोचले होते. स्वत: चरकाने ज्यांना प्रमाणभूत मानले होते असे काही मोठमोठे संस्कृत ग्रंथ त्याकाळी निर्माण झाले होते. भारतीय आयुर्वेदाचा अभ्यास करण्यासाठी व तक्षशिला-नगरासारख्या ठिकाणी भरणाऱ्या आयुर्वेदाच्या सम्मेलनासाठी दूर देशीचे वैद्य लोक येत असत. शल्यतन्त्रामध्ये प्राचीनकाळी हिंदूंनी फार प्रगति केली होती. विद्यार्थ्यांना शरीर-रचनेच्या ज्ञानासाठी शवपरीक्षा आवश्यक होती. मूळव्याध, मूतखडा यांच्यावरील शस्त्रक्रिया करणारे, सुखप्रसूति अशक्य झाल्यास शस्त्रक्रिया करून गर्भवतीची मुक्तता करणारे शल्यतन्त्र विशारद भारतात ठिकठिकाणी होते. आजकाल अमेरिकेत जिचा विशेष प्रचार आहे ती 'प्लास्टीक सर्जरी' मूळ भारतीयांनीच शोधून काढली असे कलकत्त्याचे विख्यात डॉक्टर एस्. मुखर्जी, एम्. एस्., एफ्. आर. सी. एस्. ( लंडन ), एफ्. आर्. सी. एस्. ( एडिंबरो ) यांनी कलकत्त्याच्या 'अमृतबझारपत्रिका' या इंग्रजी वृत्तपत्राच्या इ. १९५३ च्या दुर्गापूजा विशेषांकात सविस्तर सिद्ध करून दाखविले आहे. या लेखात त्यांनी असे म्हटले आहे की—

इ. स ३-४ हजार वर्षांपूर्वीच आर्यांना शल्यचिकित्सेतील या विशिष्ट शास्त्राची माहिती होती. हिंदु शल्यचिकित्सक गालाच्या व कपाळाच्या त्वचेचा भाग काढून नाकाचा भाग तयार करीत. ऋग्वेदात व अथर्ववेदात उल्लेखिलेल्या कपाळाच्या त्वचेपासून नाक तयार करण्याची पद्धति भारतीय पद्धति म्हणून ओळखली जाते. 'ऱ्हाइनोप्लास्टी' (Rhino Plasty नाकाची घडण करण्याची पद्धति) म्हणून त्या पद्धतीला जगभर मान्यता मिळाली आहे. इतिहासाकडे पाहता या पद्धतीचा प्रथम अरबस्थानात व नंतर इजिप्तमध्ये प्रसार झाला. युरोपने तेंच ज्ञान इजिप्तमधून प्राप्त केलं. पुढे काही काळ युरोपमध्ये या पद्धतीचा लोप झाला. पण १८ व्या शतकाच्या शेवटापर्यंत भारतामध्ये या क्रियेचा प्रयोग चालू होता. इ. १७७४ मध्ये ईस्ट इंडिया कंपनीच्या शल्यचिकित्सकांनी पुण्याजवळ राहणाऱ्या एका महाराष्ट्रीय शल्यचिकित्सकापासून ऱ्हाईनोप्लास्टीचे ज्ञान मिळविलं, अशी इतिहासाची साक्ष आहे.

ऱ्हाईनोप्लास्टीची पद्धति आधुनिक युरोप भारतीयांजवळच शिकला. या डॉ. मुखर्जींच्या मताशी अनुकूल असेंच मत मॅक्डोनेल यांनीहि व्यक्त केलें आहे.

शल्यतन्त्रासाठी १२७ प्रकारच्या निरनिराळ्या उपकरणांचा उपयोग होई. त्यातील काही शस्त्रे तर उभा केस चिरू शकतील इतकीं संतेज असत, ग्रीक वैद्य जे रोग

सुधारू शकत नसत ते सुधारण्यासाठी अलेक्झँडरने भारतीय वैद्यांची नियुक्ति केली होती. हारूँ अल्रशीदने (इ. ७८६ ते ८०६) बगदादच्या रुग्णालयात हिंदु वैद्यास मुख्य अधिकारपदावर नियुक्त केले होते. युरोपातील चिकित्साशास्त्राचा प्रवर्तक हिप्पोक्रिटस् याने सुद्धा हिंदूंच्या पुस्तकावरून औषधिप्रयोगाचे ज्ञान प्राप्त केले होते. यासारखी आयुर्विज्ञानविषयक ऐतिहासिक माहिती, प्राचीन काळीं या शास्त्रात भारताची किती विलक्षण प्रगति झाली होती याची कल्पना देण्यास पुरेशी आहे.

ज्योतिषशास्त्रात पाश्चात्य शास्त्रज्ञांच्या नावे प्रसिद्ध असलेले अनेक शोध त्यांच्या कितीक शतकांपूर्वी भारतीय ज्योतिषशास्त्रज्ञांनी ग्रन्थात लिहून ठेवले होते. पृथ्वी स्वत भोंवती पश्चिमेकडून पूर्वेकडे फिरते व त्यामुळे दिवस व रात्र येतात, हें रहस्य युरोपियनांना सांगणाऱ्या कोपर्निकसच्या एकसहस्र वर्षे पूर्वी आर्यभट्टांनी सांगितले होतें—

"अनुलोमगतिर्नौस्थः पश्यत्यचलं विलोमगं यद्वत् ।
अचलानि भानि तद्वत् समपश्चिमगानि लङ्कायाम् ॥"

—पूर्वेकडे जाणाऱ्या नावेत बसलेल्या लोकांना नदीच्या तीरावरील अचल पदार्थ (वृक्षादिक) उलट दिशेला जाताना दिसतात, त्याप्रमाणे लंकेत (विषुववृत्तावरील प्रदेशात) स्थिर नक्षत्र पश्चिमेकडे जाताना दिसतात. या आर्यभट्टाच्या श्लोकात पृथ्वीच्या गतीचें रहस्य स्पष्टपणें सांगितलेलें आहे व तेंच रहस्य वर्षांनंतर कोपर्निकसने युरोपला शिकविलें.

यदि समा मुकुरोदरसन्निभा भगवती धरणी, तरणिः क्षिते ।
उपरि दूरगतोऽपि परिभ्रमन् किमु नरैरमरैरिव नेक्षते ॥

(पृथ्वी जर आरशाप्रमाणे सपाट असती तर पुष्कळ दूर आणि वर फिरणारा सूर्य जसा देवांना नेहमी फिरताना दिसतो तसा मानवांना दिसावयास नको काय ?)

यासारख्या श्लोकांतून भास्कराचार्यांनी पृथ्वीचें गोलाकारत्व पटवून दिलें आहे. आधुनिक पाश्चात्य ज्योतिषशास्त्रांनी पृथ्वीचा व्यास ७९१८ मैल सांगितला आहे. ब्रह्मगुप्त आणि भास्कराचार्य यांनी तो अनुक्रमे १५८१ व १५८१$\frac{1}{2}$ योजनें पृथ्वीचा व्यास असल्याचें पूर्वीच सांगून ठेवले आहे. (१ योजन = किती मैल, याबद्दल मतभेद आहेत. तथापि ५ योजन = १ मैल हें मत मान्य केलें तर ७९०५ मैल पृथ्वीचा व्यास सिद्ध होतो.)

पृथ्वीच्या भोवती सरासरी ५० मैलपर्यंत वातावरण आहे असे अर्वाचीन तज्ज्ञ मानतात; भास्कराचार्यांनी "भूमेर्बहिर्द्वादशयोजनानि" वातावरण आहे असें अनुमानाने म्हणले होते.

गुरुत्वाकर्षणाचा शोध न्यूटनने लावला अशी सर्वसाधारण लोकांची समजूत पाश्चात्य शिक्षणाने करून दिली आहे. पण न्यूटनच्या किती तरी वर्षे पूर्वी भास्करा-

चार्यांनी आपल्या सिद्धान्तशिरोमणीमध्ये गुरुत्वाकर्षणाची स्पष्ट कल्पना पुढील श्लोकात दिली आहे. तो श्लोक असा—

आकृष्टिशक्तिश्च मही तया यत्
स्वस्थं गुरु स्वाभिमुखं स्वशक्त्या ।
आकृष्यते तत् पततीव भाति
समे समन्तात् क्व पतत्विय खे ।।

— आकर्षणशक्तिसंपन्न पृथ्वी जेव्हा आकाशातील जड वस्तूला आपल्या शक्तीने आकर्षित करते, तेव्हा ती वस्तु पडत असल्याप्रमाणे भासते. (परंतु वास्तविक ती पडत नसून पृथ्वीच्या आकर्षणशक्तीमुळे पृथ्वीकडे ओढली जाते.— या श्लोकात चवथ्या ओळींत 'समे समन्तात् क्व पतत्विय खे'—सगळीकडून समान आकर्षणाने ओढली जाणारी पृथ्वी आकाशात कोठे पडणार ? या वाक्यात केवळ पृथ्वीच्याच नव्हे तर सर्व महाभूतांच्या ठिकाणी गुरुत्वाकर्षणशक्ति आहे हा सिद्धान्त भास्कराचार्यांनी सांगितलेला आहे.

म्हैसूरच्या रॅशनॅलिस्ट या इंग्रजी साप्ताहिकाचे संपादक श्री. जी. आर. जोशीयर् यांनी २८ जून १९५२ या दिवशी आंतरराष्ट्रीय संस्कृत संशोधन विद्यापीठ (International Akademi of Sanskrit Research) या नावाची संस्था स्थापन केली. (श्री. जोशीयर हे आंतरराष्ट्रीय कीर्तीचे विद्वान् आहेत. ब्रिटनची रॉयल सोसायटी ऑफ लिटरेचर व फ्रान्सची इन्स्टिट्यूट हिस्टारिक या संस्थेचे ते सदस्य आहेत. म्हैसूरच्या इतिहासावर इंग्रजी ग्रन्थ त्यांनी लिहिला असून दोन खण्डात यजुर्वेदाचे प्रकाशन त्यांच्या संपादकत्वाखाली झाले आहे. जोशीयर् घराणे इ. १८८० पासून संस्कृत संशोधन व प्रकाशनासाठी म्हैसूरात प्रसिद्ध आहे.) त्या संस्थेच्या द्वारा अप्रसिद्ध व दुर्मिळ अशा संस्कृत हस्तलिखिताचे प्रकाशन करण्याचे त्यांनी ठरविले आहे. या संस्थेतर्फे 'नारदशिल्पशास्त्रम्' व भारद्वाजकृत 'यन्त्रसर्वस्वम्' हे दोन शिल्पशास्त्र व यन्त्रविद्याविषयक ग्रन्थ प्रसिद्ध होणार असल्याचे वृत्तपत्रातून प्रसिद्ध झाले होते. 'नारदशिल्पशास्त्रम्' मध्ये शिल्पविषयक ८३ विषयांचा अन्तर्भाव झाला आहे. त्यात ग्रामाचे दहा, नगराचे चौदा, दुर्गाचे पाच व गृहाचे अनेक प्रकार सांगितले असून त्याव्यतिरिक्त प्रासाद, स्तंभ, देवालय, प्राकार, गोपुरे, गर्भागारे, मंडप, ध्वजस्तंभ, गवाक्षे इत्यादिकांचे शिल्पदृष्ट्या वर्णन आणि रचनाक्रम आला आहे.

भारद्वाजकृत 'यन्त्रसर्वस्वम्' ग्रन्थाला ४० प्रकरणे आहेत. त्यापैकी एक प्रकरण विमानविषयक आहे. त्याची पांचशे सूत्र असून त्यावर बोधानन्द यती यांची विस्तृत टीका आहे. त्यातील वर्णन पाहिले तर अनेक प्रकारची यन्त्र सामग्री असलेले विमान त्यात आढळते. शत्रूची विमान भोवताली आक्रमण करण्यास

आली असता त्यांच्यावर एक नळिकेतून अग्निवर्षाव करून त्यांना जाळणे किंवा वेग वाढवून त्याच्या वेढ्यातून निसटून जाणे यासारख्या कल्पना त्यात वर्णिलेल्या आहेत. विमानाच्या रचनेतील एकतीस अंगे यात दिली आहेत. विमानाचे शक्तिकेन्द्र मध्यमार्गी सांगितलेले असून निरनिराळ्या विभागांना चालना देणाऱ्या 'कीलि' म्हणजे किल्ल्या यात वर्णिल्या आहेत. परविमानातील बोलणे ऐकण्याचे यंत्र, परविमानाचे रूपाकर्षण करण्याचे म्हणजे छायाचित्र घेण्याचे यंत्र, इत्यादिकांचा यात निर्देश आहे.

या यंत्रसर्वस्व ग्रन्थाची केवळ चार सूत्रे आणि त्यावरील बोधानन्द यतीश्वराची टीका यांची एक प्रत बडोद्याच्या राज्यग्रंथसंग्रहात इ. १९१८ मध्ये बंगलोरचे वे. ब्रह्मर्षि सुब्राराय शास्त्री यांचेकडून आली होती. बडोद्यास आलेल्या नोटक चार सूत्रावरील टीकेसहित व भाषान्तरासहित एक पन्नास पानाचे पुस्तक प्रियरत्न आर्ष या आर्यसमाजी विद्वानाने इ. १९४३ मध्ये प्रसिद्ध केले. संपूर्ण ५०० सूत्राचे पुस्तक टीका व भाषान्तरासह प्रकाशित केल्यास पृष्ठसंख्या सहस्रापर्यंत जाईल."

भारतीय शिल्पशास्त्राचे संशोधन करण्याचे महान् कार्य कै. रा. ना. वझे यांनी यावज्जीव केले. भारतीय शिल्पशास्त्रात अन्तर्भूत होणारे विषय कोणते व त्यावरील प्राचीन ग्रन्थ कोणते याची थोडी माहिती दिली असता प्राचीन शास्त्रज्ञांनी वाढविलेल्या एकूण विज्ञानाची कशी घोर उपेक्षा शतकानुशतक झाली याची कल्पना येईल.

शिल्पशास्त्राचे धातुखण्ड, साधनखण्ड व वास्तुखण्ड असे तीन खण्ड व त्यांची एकूण ९ उपशास्त्र आहेत. त्यामध्ये ३२ विद्या व ६४ कलांचा अन्तर्भाव होतो. 'शिल्प' शब्दाची व्याख्या भृगुऋषींनी केली, ती अशी—

> नानाविधानां वस्तूनां यन्त्राणां कल्पसम्पदाम् ।
> धातूनां साधनानां च वास्तूनां शिल्पसंज्ञितम् ॥

(नाना प्रकारच्या वस्तु, यंत्रे, युक्त्या, धातु, साधने व घरे-नगरे यांना शिल्प ही संज्ञा आहे.)

या व्याख्येप्रमाणे शिल्पशास्त्राची वर सांगितलेली व्याप्ति योग्य आहे. शिल्पशास्त्राच्या संपूर्ण विस्ताराची कल्पना देण्याचे हे स्थळ नव्हे!

कै. रा. ना. वझे यांनी इ. १९२८ मध्ये शिल्पशास्त्रविषयक प्राचीन ग्रन्थांची एक सूची तयार करून ठेवली होती. ती यादी इतरत्र कोठे प्रसिद्ध झालेली नसल्याने

---

५३ नारदशिल्पम् व यन्त्रसर्वस्वम् या हस्तलिखितासंबंधीची प्रस्तुत माहिती श्री ग त्रि वैतवर यांच्या लेखातून (साप्ताहिक राष्ट्रशक्ति, नागपूर ऑक्टोबर १९५२) मिळाली आहे

व प्राचीन शिल्पशास्त्राची ग्रन्थदृष्ट्या व्याप्ति लक्षात येण्याच्या दृष्टीने ती महत्त्वाची असल्याने, त्या विषयाच्या शिक्षणानी तिचे प्रकाशन व तिच्या आधारे संशोधन करावयास हवे.[५४] कै. रा. न. वझे यानी परिश्रमपूर्वक संकलित केलेल्या शिल्पशास्त्र विषयक सूचीतील ग्रन्थाचा साराश सकलित होऊ शकला तरी भारताच्या प्राचीन शिल्पशास्त्राची व कलेची प्रगति किती झाली होती याची कल्पना येऊ शकेल.

मध्यतरी दीर्घकालपर्यंत संस्कृतज्ञाचा सारा व्यासग काव्य, तत्त्वज्ञान, वेद पुराण व व्याकरणादि शास्त्र यांच्यापुरता सीमित राहिला. आधुनिक परिभाषेत ज्याला 'विज्ञान' म्हणतात त्यासबधीच्या प्राचीन ग्रथाचे संशोधन नव्हे अध्ययनसुद्धा नद् झाल्यासारखेच होते. मग नवीन ग्रन्थनिर्मितीचे नामसुद्धा काढायची सोय नाही. परम्परागत विज्ञान परवापर्यंत जिवत होते. पण त्याविषयीचे वाङ्मय मात्र लुप्तप्राय झाले होते. पाश्चात्याच्या नवीन विज्ञानाच्या प्रभावाने सर्वसामान्य जनता चकित होऊन त्याच्या विशेष गुणवर्णन व त्याबरोबर परपरागत संस्कृत विद्येचे दोषदर्शन करू लागली. त्यामुळे समाजाचा स्वत्वाभिमान लुप्त होण्याची भीषण परिस्थिति निर्माण झालेली पाहून पाश्चात्य वैज्ञानिकानी लावलेल्या सशोधनाचे व राजनीति, अर्थशास्त्र इत्यादि त्याच्या शास्त्रातील अनेक सिद्धातांचे मूळ महाभारत, रामायण व पुराण इत्यादि प्राचीनतम ग्रन्थातून शोधून ते समाजाला दाखविण्याच्या कामी अनेक संस्कृतज्ञ विद्वान आधुनिक काळात व्यग्र झालेले दिसून येतात. डॉक्टर श्री. व्य. केतकर यानी आपल्या ज्ञानकोशात पाश्चात्याच्या अॅलोपॅथीचे मूळ आयुर्वेदातच असल्याचे पद्धतशीरपणे सिद्ध केले आहे. समीक्षाचक्रवर्ति प. मधुसूदन ओझा यानी आपले सपूर्ण आयुष्य वेदाची वैज्ञानिकता सिद्ध करणारे अनेक मोठमोठे संस्कृत ग्रन्थ निर्माण करण्यात व्यतीत केले. याप्रकारच्या उद्योगाना खरी चालना ऋषि दयानदानी दिली. त्याच्या आर्यसमाजाचे अनेक मातब्बर विद्वान सतत या दिशेने प्रयत्न करीत आले व आजहि करीत आहेत. 'हिंदु केमिस्ट्री' या ग्रथाच्या द्वारे आचार्य प्रफुल्लचन्द्र राय यानी भारतीय रसायनशास्त्राच्या प्राचीन काळातील सर्वांगीण विकासाचे प्रमाण उपलब्ध करून दिले. रावबहादुर वझे यानी शिल्पशास्त्रविषयक संशोधन करून त्या विषयावर संस्कृतात किती मोठी ग्रन्थसपत्ति आहे याची कल्पना प्रथम दिली.

तथापि या प्रकारचे प्रयत्न होत असनहि आपल्या अपूर्णतेची जाणीव सर्वच भारतीयाना सारखी डाचत होती. आजचे विकसित विज्ञान स्वभाषेतून शिकविण्यासाठी आपल्या जवळ पारिभाषिक शब्दसपदा दखील उपलब्ध नाही. या जाणिवेतून नवीन पारिभाषिक शब्दकोश निर्माण होऊ लागले. भारतीय लोकात स्वभाषेत

---

५४ नागपुरातले भारतील शिल्पशास्त्राचे व्यासगी श्री गो गो जोशी याच्या सग्रही श्री वझे यानी तयार केलेली सूची व याविषयीची अवातर माहिती आहे

वैज्ञानिक विषयावर लिखाण केले पाहिजे ही जाणीव १९ व्या शतकात प्रथम झालेली दिसेल. मराठीमध्ये विविध वैज्ञानिक विषयावर इ. १९१७ पर्यंत एकूण ५४२ पुस्तके लिहिली गेली होती, असे मुंबई सरकारच्या त्रैमासिक याद्यावरून दिसून येते. त्यानंतर १९२४ते १९३४ या दहा वर्षांत स्थापत्यविद्या, आरोग्यविद्या, भौतिकशास्त्र या विषयावर फक्त बारा पुस्तके ( यंत्रविज्ञान शून्य ) लिहिली गेल्याचा उल्लेख या याद्यामध्ये आहे इ. स. १८४० च्या सुमारास मराठीत नवीन वैज्ञानिक विषयावर भाषान्तरित पुस्तकापासून लिखाण सुरू झाले. आरंभीची पुस्तके कर्नल जर्विस, मि वेल् यासारख्या इंग्रजांनी शास्त्री मंडळीच्या साहाय्याने लिहिली. त्यातील ज्ञान इंग्रज साहेबाचे व केवळ भाषा शास्त्री मंडळींची आहे. संस्कृतात इ. स.१८२३ मध्ये 'क्षेत्रतत्त्वदीपिका' हे पहिले आधुनिक भूमितिशास्त्रविषयक पुस्तक इलातुर रामस्वामीशास्त्री यानी लिहिले इ. स. १९२८ मध्ये योगध्यानमिश्र याच त्याच नावाचे दुसरे पुस्तक प्रकाशित झाले. नवीन शिक्षणक्रमात गणित हा आवश्यक विषय होता. त्यामुळे त्या शास्त्रीय विषयावरच मराठीत प्रथम पुस्तके प्रकाशित झाली आहेत. कर्नल जर्विस याचे बीजगणित इ. १८४८ हून मराठीतील पहिले शास्त्रीय, पुस्तक समजण्यात येते. तत्पूर्वी ( इ.१८३० ) मि वेल याचे 'शिल्पविद्या' हे (नारायणशास्त्री जोशी यांच्या साहाय्याने लिहिलेले) एक यंत्रशास्त्रविषयक पुष्कळ चित्रांचे पुस्तक प्रकाशित झाले होते.

संस्कृत चंद्रिकेतून 'विज्ञानकुसुमानि' या शीर्षकाखाली आप्पाशास्त्री राशिवडेकरानी जुन्या संस्कृत ग्रन्थातील वैज्ञानिक माहिती द्यावयास आरंभ केला होता. 'सहृदया' पत्रिकेत 'पाश्चात्यशास्त्रसार' या सदराखाली आधुनिक शास्त्रीय विषयावर अनेक विद्वानांचे लेख येत होते. 'सनातनभौतिकविज्ञानम्'[55] या पुस्तकात म्हैसूरचे सी. सी. वकरमणाचार्य यानी प्राचीन विज्ञानविषयक वाङ्मयाचा आढावा घेतला आहे. आयुर्वेदविषयक काही शास्त्रीय ग्रंथांचा उल्लेख पूर्वी केलेलाच आहे. वैज्ञानिक विषयावर काही कविता व कथा संस्कृत नियतकालिकातून क्वचित् प्रकाशित होत असतात. डॉ. राघवन् यानी साहित्य अकादेमीच्या 'कॅन्टेम्पोररी इंडियन लिटरेचर' या ग्रंथातील संस्कृतसाहित्यविषयक लेखात[56] संस्कृतसाहित्य पत्रिकेतील 'प्रजापतीयम्'[57] हे रवीन्द्रकुमार शर्मा याचे १६० श्लोकांचे काव्य व अयोध्येच्या 'संस्कृतम्' या साप्ताहिकातील वरगोपालशास्त्री यांच्या 'चेतना कवाले'[58] व 'मुक्तलोकयात्रा'[59] या दोन कथांचा उल्लेख केला आहे.

---

५५ इ १९३९ मध्ये म्हैसूर येथे प्रकाशित ५६ पृ २०७ पहा
५७ इ १९४७ फेब्रुवारीचा अंक ५८ संस्कृतम् २०-३-५६ ।
५९ १७-४-५६ ।

'मानवप्रजापतीयम्' या खण्डकाव्यात एक बुद्धिवान् तरुण विज्ञानाचा सखोल अभ्यास करण्यासाठी जर्मनीत जातो. तेथील अभ्यास आटोपून परत आल्यावर नवीन विज्ञानाच्या बळावर आपल्या अपेक्षेनुसार एक सजीव स्त्रीदेह निर्माण करण्याचा प्रयोग तो करतो. या प्रयोगात प्रारंभी तो यशस्वी होतो, पण पुढे त्याला पश्चात्ताप होतो असे विज्ञानाचे वैयर्थ्य कवीने वर्णन केले आहे. 'चेतना क्वास्ते' या कथेत जीवाचे अधिष्ठान शोधण्याच्या कामी विज्ञानाची असमर्थता दाखविली आहे. वैज्ञानिक विषयावर संस्कृतात नवीन लेखन होईल तेव्हा होवो, तत्पूर्वी जुने वैज्ञानिक वाङ्मय प्रकाशात आणणे नितान्त आवश्यक आहे.

## नियतकालिक साहित्य

प्रस्तुत निबन्धाच्या पूर्वार्धात नियतकालिक साहित्याविषयी एक प्रदीर्घ प्रकरण लिहिले असून त्यात संस्कृत नियतकालिकासंबंधी शक्य तितकी अधिक माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. नियतकालिक हा वाङ्मयप्रकार जगातल्या सर्वच वाङ्मयाना नवा आहे. मराठीतले पहिले नियतकालिक 'दर्पण' व त्यानंतरची नेटिव्ह ओपिनियन व इंदुप्रकाश यांचे स्वरूप अर्धनारीनटेश्वरासारखे म्हणजे अर्धे मराठी व अर्धे इंग्रजी असे. नवीन इंग्रजी शिकलेला मराठी माणूस मराठीतून कोणतीही गोष्ट समजून घ्यावयास तयार नसे. राज्यकर्त्यांच्या कानावर कोणतीही गोष्ट घालण्यासाठी इंग्रजी माध्यम सोईचे असे. मराठी वृत्तपत्राना जाहिरातीच उत्पन्न नसल्याने ती अल्पायुषी ठरत. मराठीसारख्या उदयाभिमुख भाषतील नियतकालिकांची आरंभीची अवस्था जर अशी, तर संस्कृतसारख्या न्हासाभिमुख भाषेतील वृत्तपत्राची अवस्था किती कठीण झाली असेल याची कल्पना केलेली बरी. संस्कृत भाषेविषयी समाजातील आजची शोचनीय अवस्था पाहिली म्हणजे आरंभीच्या काळातील तिची अवस्था सापेक्षतः बरी होती असे म्हणायाची पाळी येते. त्या काळात संस्कृत वाचकांची संख्या बरीच मोठी होती. त्या वाचकांचे संस्कृत भाषेचे ज्ञान उत्तम होते. इतर भाषातील वृत्तपत्रांकांची संख्या अत्यल्प असल्यामुळे स्पर्धेचा प्रश्न नव्हता. नवीन ज्ञानाविषयी त्या काळात वाचकात विशेष उत्सुकता नव्हती. उत्तम उत्तम लेख, कथा, कविता, नमस्य प्रकाशित होणाऱ्या कादंबऱ्या, वैज्ञानिक माहिती, सामाजिक व राजकीय विषयावरील लेखाच मतप्रतिपादन यांचे वाचन करण्यासाठी त्या काळच्या वाचकवर्ग विशेष उत्सुक असे. वाचकाची ही उत्सुकता भागविणारे साहित्य पुरविण्याची कामगिरी संस्कृत वृत्तपत्रानी सतत केली व त्यातूनच 'आधुनिक' समजण्यात यणारे वाङ्मयप्रकार व विचार संस्कृत साहित्यात प्रविष्ट झाले. नवीन युगातील राष्ट्रीय विचाराना नियतकालिक साहित्यानेच जन्म दिला त्याच्याद्वारेच निबंध हा नवीन लेखनप्रकार प्रचारात आला व लोकप्रिय झाला. जुन्या आलंकारिक, शब्दबहुल पण अल्पार्थक व मद्याशय रहित लेखन

शैलीला नवीन वळण लावण्याचें काम नियतकालिक साहित्यानेंच केलें. तात्पर्य नियतकालिकांनी संस्कृतांत सर्वस्वी अभिनव गद्यलेखन शैलीला जन्म दिला. तिचें पोषण केलें व वाचकांच्या अभिरुचीनुसार लेखनशैलीला नवीन वळण लावलें. कित्येक नवीन लेखक निर्माण करण्याचें कार्य नियतकालिकांनीच केलें. संस्कृताप्रमाणेंच सर्व प्रादेशिक साहित्यावर नियतकालिक साहित्यानें फार मोठा संस्कार घडवून आणला. ज्या इंग्रजी साहित्याच्या सम्पर्कानें अखिल भारतीय साहित्यांत सर्वंकष स्वरूपाचें परिवर्तन घडून आल्याचें दिसतें, त्या इंग्रजी साहित्यांतहि नियतकालिकांनीच परिवर्तन घडवून आणलें होतें. १९ व्या शतकांतील इंग्रजी वाङ्मयाच्या इतिहासाचें पर्यालोचन करतांना सेंट्सबरी साहेब म्हणतात — "In the quality of miscellaneous writing, as well as in the facilities given to such writing by its (i.e. 19th century's) special growth some would say of its special fungus of the periodicals, it (i.e. the 19th century) rises to the first class" "The change of the style in prose is undoubtedly as much the leading *feature of the 19th century, as is in poetry* the change in thought and out-look." "It (i.e. the century) may be said to have been connected with the growth of the essay and the popularity of the periodicals." (483)

सेंट्सबरीनें १९ व्या शतकांतील इंग्रजी साहित्यासंबंधीं म्हटलें त्याप्रमाणें संस्कृतांतील नियतकालिकें हें अर्वाचीन संस्कृत साहित्याचें असाधारण लक्षण आहे, असें म्हणावेंसें वाटतें. संस्कृत साहित्यांत आलेली सारी आधुनिकता नियतकालिकांमुळेंच आली आहे. त्यांच्या कांहीं लिखाणाला ग्रन्थरूपानें नवा संस्कार मिळाला. परंतु बरेंचसें आधुनिक स्वरूपाचें संस्कृत लिखाण अद्यापि नियतकालिकांतच पडून आहे. अनेक उदयास पावलेलीं जुनीं नियतकालिकें आज शोधून देखील पहावयास मिळत नाहीत. आप्पाशास्त्री राशीवडेकरांसारख्या युगप्रवर्तक लेखकाच्या लेखांचा संग्रह देखील अद्यापि प्रकाशित होऊं शकला नाहीं. संस्कृत हस्तलिखितांचें मुद्रण हें जसें संस्कृत साहित्यक्षेत्रांतील निकडीचें काम आहे तितकेंच संस्कृत नियतकालिकांतील मुद्रित पण विखुरलेल्या लिखाणाचीं विषयानुरोधानें ग्रन्थरूप संस्करणें तयार करणें हें निकडीचें काम आहे. त्याचप्रमाणें इतर भाषांत ज्याप्रमाणें राजकारण, शिक्षण, तत्त्वज्ञान, विज्ञान, साहित्य, उद्योगधंदे, संगीत इत्यादि विविध विषयांना वाहिलेलीं स्वतंत्र नियतकालिकें

आज निर्माण झाली आहेत. तशीच अल्प पृष्टसंख्येचीं का होईना संस्कृतात निघू शकतील अशी परिस्थिति स्वतंत्र भारताच्या शासनाने निर्माण करावयास हवी. संस्कृतज्ञांनी आजपर्यंत सर्वतोपरी त्यागतपस्या करून सर्वानुमते महत्त्वाची अशी ही भारताची '**सांस्कृतिक राष्ट्रभाषा**' जागविली. तिला जगविण्यासाठी त्यांनी अक्षरशः आपले रक्त दिलें. यापुढची परिस्थिति अनेक कारणास्तव बिकट झाली आहे. तथापि संस्कृतची सेवा हीच राष्ट्रसेवा–धर्मसेवा–संस्कृतिसेवा समजून अनेक व्यक्ति व संस्था आजच्या परिस्थितीत विविध स्वरूपाचें कार्य करीत असल्याने सर्वस्वी हताश होण्याचे कारण नाही. प्रत्येक संस्कृतज्ञ व संस्कृताभिमानी व्यक्तीला आज ही स्पष्ट जाणीव झालेली आहे की पौरस्त्य व पाश्चात्य विद्वानांनी गायिलेलीं संस्कृत भाषेचीं स्तुतिस्तोत्रें आपण गायिल्याने आजच्या धकाधकीच्या युगात संस्कृत-भाषा आजवर राहिली तशी जीव धरून राहणार नाही. वर्तमान जगातली एक व्यवहारक्षम भाषा म्हणून तिला नवें स्वरूप दिलें पाहिजे. प्राचीन व अर्वाचीन दोन्ही स्वरूपाचें साहित्य संस्कृतातून निर्माण केलें पाहिजे. सभासंमेलनातून अभिव्यक्तीचें माध्यम म्हणून इतर भाषाप्रमाणे तिचा वापर झाला पाहिजे. निरनिराळ्या संस्कृत संबंधी संस्था निर्माण करून त्यांचीं संमेलनें जनजागृतीसाठी केलीं पाहिजेत. संस्कृत शिकविण्याची नवीन सुगम पद्धति प्रवर्तित केली पाहिजे व या पद्धतीला उपयोगी पडतील अशीं बालोपयोगी व शालोपयोगी नवीन पुस्तकें तयार केलीं पाहिजेत. उत्कृष्ट संस्कृत ग्रन्थांचीं भाषान्तरें करून किंवा कालिदासादि महान् संस्कृत साहित्यिकांच्या किंवा शंकराचार्यादि अद्वितीय दार्शनिकांच्या ग्रन्थावर व्याख्यानें देऊन संस्कृत भाषेची महती संस्कृत ज्ञानाच्या अभावीं अर्धशिक्षित राहिलेल्या नव्या पिढीला समजावून दिली पाहिजे. नव्या युगाला आवश्यक व अखिल भारताला समान अशी शब्दसंपत्ति निर्माण करून देण्याचें सामर्थ्य संस्कृत भाषेतच असल्याने नवीन सुंदर शब्द निर्माण करून ते प्रादेशिक भाषांच्या शुद्धीसाठी व त्यामध्ये एकरूपता स्थापन करण्यासाठी, व्यवहारात आणले पाहिजेत. जुन्या श्रेष्ठ नाटककारांनी लिहिलेल्या शाकुन्तल, मृच्छकटिक, वेणीसंहार इत्यादि जगन्मान्य नाटकांचे सार्वजनिक प्रयोग अत्र्यावत् नाट्यतन्त्रानुसार रंगभूमीवर करून दाखविले पाहिजेत. जुन्या हस्तलिखिताच संरक्षण, संशोधन व प्रकाशन करून गूढ विज्ञापन सर्वांना दिलें पाहिजे. अशा विविध प्रकारची जाणीव आज संस्कृतच्या भवितव्याचा विचार करणाऱ्या कार्यकर्त्यांना झाली आहे. या दिशेने प्रयत्न करणाऱ्या उत्तमोत्तम संस्था आज वेगाने आपले कार्य चालवीत आहेत. अशा प्रकारें कार्य करणाऱ्या भारतातील कांही प्रातिनिधिक संस्थांचा परिचय येथे देणं अप्रस्तुत होणार नाही.

**भारतीय विद्याभवन**—या संस्थेतर्फे संस्कृताध्यापनासाठी इ. १९३९ मध्ये मुंबादेवी संस्कृत महाविद्यालयाची स्थापना झाली. इ. स. १९४६ पासून या महाविद्या

त्यानें कार्य विशेष वेगानेच चालू आहे. मवदा शास्त्राच्या शास्त्री आचार्य यासारख्या परीक्षासाठी अध्ययनाची व्यवस्था या महाविद्यालयातर्फे करण्यात आली आहे. या उच्च परीक्षाना काही विश्वविद्यालयानी मान्यता दिली आहे. गेल्या दहा वर्षांत बराबरी अडीचशे 'आचार्य' व तितकेच 'शास्त्री' या विद्यालयातून उत्तीर्ण झाले. इ. १९३९ मध्येच 'मुगालाल गोयनका संशोधन मंदिर' भारतीय विद्याभवनातर्फे सुरू झालें. महाराष्ट्रातील एक प्रसिद्ध संशोधन संस्था म्हणून हें मु. गो. संशोधन मंदिर ओळखलें जातें. आजपावेतो २४ ग्रन्थांचें संशोधन व प्रकाशन या मंदिरानें केलें. 'भारतीय विद्या' या नावाची विद्वन्मान्य संशोधन पत्रिका भा. वि. भवनातर्फे नियमित प्रकाशित होत असते. तीमध्ये संस्कृत हस्तलिखित ग्रंथ क्रमशः प्रकाशित होत असतात. ऋग्वेदाच्या सातव्या मंडलाचें समालोचन व संक्षिप्त व्याख्येसहित इंग्रजी भाषान्तर, पृथ्वीचंद्रकृत 'व्यवहारप्रकाशः' हा न्यायशास्त्रविषयक ग्रंथ लवकरच संस्थेतर्फे प्रकाशित होईल. भा. वि. भवनाच्या गीतामंदिर या संस्थेतर्फे परीक्षा व व्याख्याने यांच्या द्वारा गीतेचा प्रचार करण्याचें कार्य सतत होत असत. संस्कृत विश्वपरिषदेच व तिच्या प्राथमिक परीक्षाचें सञ्चालन भा. वि. भवनातर्फेच होत असते. परिषदेच्या परीक्षाची शक्टों केन्द्रे देशभर स्थापन झाली आहेत. परीक्षोपयोगी बालबोध पुस्तकें भवनातर्फे प्रकाशित झाली आहेत. भारतीय विद्याभवन हें श्री. कन्हैयालाल मुन्शी यांच्या संस्कृतनिष्ठेचें उत्तम निदर्शन आहे. राजकारणाचा व्याप सांभाळून त्यांनी जसें हें सांस्कृतिक कार्य उभारलें तसें भारतातील इतर राजकीय पुढाऱ्यानी केल्याचें दिसत नाही.

**स्वाध्याय मण्डल** (किल्ला पारडी)—वेदवेदांगाचें मौलिक संशोधन करून संस्कृतांत समीक्षणात्मक ग्रन्थलेखन करणारे अद्वितीय लेखक म्हणून प. मधुसूदनजी ओझा याचा परिचय आम्ही प्रस्तुत ग्रन्थात (पृ. ३९० ते ३९७) दिला आहे. स्वाध्याय मंडळाचे संस्थापक व संचालक वेदमूर्ति पण्डित श्री. दा. सातवळेकर यांचें वेदविषयक कार्य सुद्धा फार मोठें आहे. *त्यांचा स्वतंत्र परिचय या* या ग्रन्थात न देण्याचें कारण त्यांनी लेखन संस्कृतनिष्ठ असलें तरी संस्कृतांत नाही. (संस्कृतनिष्ठ अन्यभाषीय वाङ्मय व त्याचें लेखक हा स्वतंत्र ग्रंथाचा विषय आहे.) उत्कृष्ट चित्रकार, हिंदी लेखनाबद्दल महात्मा गांधी पारितोषिकाचे मानकरी, तेजस्वी वक्ते, आदर्श धार्मिक व सांस्कृतिक कार्यकर्ते, गीतेवरील 'पुरुषार्थबोधिनी' या अभिनव टीकेचे लेखक, चारहि वेदांची '*दैवत संहिता*' *प्रथित करणारे* '*आधुनिक वेदव्यास*' *इत्यादि अनेक* दृष्टींनी प. सातवळेकरांचें व्यक्तिगत जीवन हीच एक महान संस्था आहे. स्वाध्याय मंडळ ही संस्था त्यांनी संस्कृतभाषा व वैदिक धर्म-संस्कृतीच्या प्रचारासाठी उभारलेली उपन्ना आहे. समाजाच्या खाच्या पर्यंत संस्कृत प्रचाराचें लोण पोचविणारी एवढी मोठी संपन्ना भारतांत दुसरी नाही. स्वाध्याय मंडळातर्फे पुरुषार्थ (मराठी)

तीरावरील रामघाटावर स्थापन झालें. त्यांच्या पश्चात् सर्वतन्त्रस्वतंत्र, शास्त्ररत्नाकर, पण्डितराज श्रीराजेश्वरशास्त्री द्राविड यांच्या संचालकत्वाखाली या अद्वितीय विद्यालयाची यथोचित प्रगति होत आहे. यांच सांगवेदविद्यालयाच्या सञ्चालकत्वाखाली इ. १९२८ मध्ये विशुद्ध संस्कृत विश्वविद्यापीठाची स्थापना झाली. आधुनिक पाश्चात्य पद्धतीच्या विश्वविद्यालयांचें, अध्यापन करणाऱ्या गुरुकुलाचें, किंवा गृहपाठशालांचें पुनरुज्जीवन करून ह्यांच्याद्वारा भारतीय विद्या व कलाचें संरक्षण संवर्धन करणे हें या विश्वविद्यालयाचें ध्येय आहे. प्राचीन पद्धतीनुसार श्रेष्ठ विद्वानांकडून विद्यार्थ्यांची अतिकठीण 'शलाकापरीक्षा' या विश्वविद्यालयातर्फे घेण्यांत येते. त्यांत उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्याला यावज्जीव पन्नास रुपयांचें 'विक्रम वर्षासन' देण्यांत येतें. आजपर्यंत २५-३० विद्यार्थ्यांना या वर्षासनाचा बहुमान मिळाला. या विद्यालयांतून उत्तीर्ण झालेला प्रत्येक विद्यार्थी आजवर आपापल्या शास्त्रांत निरपवाद विद्वन्मान्य ठरला आहे. वाराणसीच्या राजकीय संस्कृत महाविद्यालयानें कार्यहि (स्थापना इ. १७९१) असेंच महत्त्वाचें पण थोड्या निराळ्या स्वरूपाचें आहे. नुकतेच या महाविद्यालयाचें आता संस्कृत विश्वविद्यालयात रूपान्तर झालें आहे. हिन्दु विश्वविद्यालय व मद्रास विश्वविद्यालय यांनी आजवर केलेलें संस्कृतविद्यारक्षणाचें कार्य स्पृहणीय आहे. मद्रास विश्वविद्यालयानें गेल्या संपूर्ण शतकांत संस्कृत क्षेत्रांत जे विपुल कार्य केलें त्याचा उत्कृष्ट आढावा डॉ. राघवन् यांनी मद्रास वि. वि. च्या शताब्दी ग्रन्थांतील लेखांत घेतला आहे. या संस्थांशी संबंधित व असंबंधित अशा शेकडों श्रेष्ठ विद्वानांनी संस्कृत सेवा हेंच आपलें जीवनकार्य मानलें होतें. त्यांपैकी कांहींनी संस्कृतांत ग्रन्थलेखन केलें व अनेकांनी तें केलें नाही. पण त्यांनी श्रेष्ठ श्रेणीचे विद्वान शिष्य निर्माण तयार केले. संस्कृत भाषा व विद्या याविषयीं समाजात आस्था निर्माण केली. ज्यांचें व्यक्तित्व हेंच संस्कृत पाण्डित्याचें प्रतीक होतें असे वे. मिश्र दीक्षित लेले, पं. विनायक भट्ट डोंगरे (काशी), न यन्यायाचार्य पं. राजारामशास्त्री, पं. बालसरस्वती, पं. लक्ष्मणशास्त्री द्राविडांचे गुरु, म. म. कैलासचन्द्र शिरोमणि, वेदान्ताचार्य म. म. केशवशास्त्री मराठे, पं. रामसुब्रह्मण्यशास्त्री, कर्मकाण्डविशेषज्ञ पं. जगन्नाथपाठक सप्तर्षि, प. सीताराम शास्त्री नैयायिक, ज्योतिषशास्त्रज्ञ पं. विनायकशास्त्री वेताळ, आत्मपुराणाचे टीकाकार पं. कालारामशास्त्री, धर्मशास्त्रज्ञ म. म. पं. भागवताचार्य, सामवेद पारंगत पं. सूर्यनारायण त्रिपाठी, गणेशरामजी व श्रीहरिस्वामी, म. म. रागपालदास, न्यायरत्न पं. रामनाथजी ज्योतिषी, म. म. पं. शिवकुमारशास्त्री, परिभाषेन्दुशेखरावरील 'भूति' टीकेचे लेखक म. म. पं. तात्याशास्त्री, म. म. गंगाधरशास्त्री मानवल्ली (सी. आय्. ई.), म. म. वेयाकरण दामोदरशास्त्री भारद्वाज, गणितज्योतिषशास्त्रज्ञ म. म. पं. बापूदेवशास्त्री (सी. आय. ई.), अद्भुत गणितशास्त्रज्ञ म. म. पं. सुधाकरजी द्विवेदी, रामानुजवेदान्ती म. म. स्वामी रामनिश्रशास्त्री, मन्त्रशास्त्रज्ञ भारताचार्य प. रमानाथ स्वामी, षड्दर्शनाचार्य म. म.

रामसुब्रह्मण्यशास्त्री, पं. नित्यानंदजी मीमांसक, भागवतमर्मज्ञ पं. पुरुषोत्तम भट्टजी, मीमांसामर्मज्ञ स्वामी चिद्धनानंद सरस्वती, शतावधानी भरतमार्तण्ड पं. गट्टूलाल शास्त्री, व्याकरण व न्यायशास्त्रावरील अनेक ग्रन्थांचे टीकाकार म. म. पं. जयदेव मिश्र, ज्योतिषशास्त्रमार्तण्ड पं. चन्द्रदेवजी पण्ड्या, पं. जनार्दनमिश्र, पं. केशवभट्ट गोळे, पं गौरीनाथ दीक्षित, म. म. पं. वामाचरण भट्टाचार्य, म. म. प्रभुदत्तशास्त्री म. म. नित्यानंद पर्वतीय, पं. विद्यानाथ व्यास, सर्वतन्त्रस्वतंत्र पं. रच्चा झा, अथर्ववेदज्ञ जयदेवाश्रम स्वामी, म. म. कामाख्यानाथ तर्कवागीश, पं. वेंकटसुब्बाशास्त्री व त्याच महान शिष्य अनन्तकृष्णशास्त्री, पं. बाळंभट्ट गोडबोले, सर्वतंत्रस्वतंत्र पञ्चानन तर्करत्न, पं. चण्डीप्रसादजी, म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, महावैयाकरण पं. देवनारायण त्रिपाठी, वैद्यरत्न त्र्यंबकशास्त्री, पं. सीतारामशास्त्री केळकर ही कांहीं नामांकित एकट्या वाराणसीतल्या मान्यवर विद्वानांची आहेत. त्यांच्या श्रेणीचे श्री. नारायणशास्त्री मराठे, पं. लक्ष्मणशास्त्री मुरगुटकर, म. म. श्रीधरशास्त्री पाठक, पं. रामचन्द्रशास्त्री, गङ्गाधरशास्त्री घाटे, चारित्र्यकोशकार सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, कुण्डार्कप्रभा, दत्तकनिर्णयामृतम् इ. मीमांसा-धर्मशास्त्रविषयक ग्रंथ लिहिणारे म. म. श्रीधरशास्त्री वारे आणि आमचे पूज्य गुरु श्री. हनुमतशास्त्री केळे इत्यादि अवश्य विद्वान् कठोर निष्ठेनें आजवर संस्कृत भाषा व विद्या यांचे यावच्छक्य संरक्षण करीत आले आहेत.

या मंडळींची निष्ठा किती प्रखर व अव्यभिचारी होती याची कल्पना येण्यासाठी केवळ एक उदाहरण दिले तरी पुरे होईल काशीमध्ये वेदवेदांगाच्या अध्ययनाचा क्रमशः ऱ्हास होत असलेला पाहून व्यथित झालेले काही विद्वान् पं लक्ष्मणशास्त्री द्राविडांकडे जाऊन म्हणाले, "यदि पेट भरने मात्र को चावल और नमक भी मिल सके तो हम लोग सानन्द वेदाभ्यास कर सकें और अपने बालकों को भी प्रवृत्त करें"[60] या निष्ठावंत विद्वानांच्या या उद्गारांनी द्रवित झालेल्या द्रविडांनी निर्वेद अवस्थेत सांगवेदविद्यालयाची स्थापना केली. संस्कृतभाषा व विद्या यांच्या रक्षणासाठी अशाप्रकारे अनेक खाजगी संस्थांच्या व व्यक्तींच्या द्वारा महत्त्वाचे कार्य झाले व आजहि होत आहे.

सर्वांत महत्त्वाची संस्था म्हणजे शासनसंस्था! स्वराज्यप्राप्तीनंतर तिच्या तर्फे संस्कृतोद्धारासाठी जे काही विशेष कार्य होऊं लागले आहे तेंहि लक्षांत घेणें आवश्यक आहे.

## सरकार आणि संस्कृत

राष्ट्रपति डॉ. राजेन्द्रप्रसाद यांच्या संस्कृतनिष्ठतेमुळें शासन संस्थेतर्फे संस्कृतसाठी कांही तरी प्रोत्साहक कार्य सुरू झालेलें दिसतें. केंद्रीय व प्रादेशिक शासन-

६० सांगवेद विद्यालय रजतजयन्तीमहोत्सव ग्रन्थ पृ ७

वैदिकधर्म (हिंदी) व वेदसन्देश (गुजराथी) अशी तीन मासिकें चालू आहेत. त्याशिवाय वेदपरिचय, वेदप्रवेश, वेदप्राज्ञ, वेदविशारद, वेदपारगत इत्यादि वेद विषयक स्वतन्त्र परीक्षा स्वाध्याय मंडळातर्फे चालतात. चारहि वेदांचे सटीक व सानुवाद मुद्रण करून अत्यल्प मूल्यात त्याचा सार्वजनिक प्रचार करण्याचा मंडळाचा उद्योग अभूतपूर्व आहे. '**संस्कृत स्वयंशिक्षक**' या नावाची २४ छात्रोपयोगी उत्कृष्ट नमिक पुस्तकें स्वतः पंडितजींनी लिहिली आहेत. आजपर्यंत या पुस्तकमालेच्या २५ वेळा आवृत्ति निघाल्या. यावरून त्याची उपयुक्तता लक्षात येईल. त्याच्या आधारे एकूण बाराशें केन्द्रांतून विद्यार्थी संस्कृत शिकत असतात. आजपावेतो स्वाध्याय मंडळाच्या परीक्षांना बसलेल्या ४० सहस्रांपेक्षा अधिक विद्यार्थ्यांना या मालेचा उपयोग झाला. शालोपयोगी व नालोपयोगी संस्कृत पुस्तकाची निर्मिति सान्या देशभर गेल्या ५०–६० वर्षांत फार प्रचण्ड प्रमाणात झाली. त्या सर्वांचा परिचय देणे आवश्यकतारेर आहे. याच प्रयत्नातून संस्कृतातलें बालवाङ्मय निर्माण झाले आहे. सरळ सुबोध शब्दात व्याकरणाचे नियम, रामायण भारतादि ग्रन्थातील सोप्या कथा, सुबोधसुभाषितें, क्वचित् संवाद हें या बालवाङ्मयाचे स्वरूप आहे. सचित्र बालवाङ्मय संस्कृतात क्वचितच आढळतें.

**भाण्डारकर रिसर्च इन्स्टिटयूट पुणें**— ही संस्था महाभारताच्या पाठभेदासहित प्रकाशन कार्यामुळे अखिल भारतात प्रसिद्ध आहे. श्री. आर्. डी. करमरकरांनीं संपादन केलेले आश्वमेधिक पर्व व वल्लभदेवाची सुभाषितावली हे दोन ग्रंथ आणि या संस्थेचे प्रमुख कार्यकर्ते डॉ. रा. ना. दाण्डेकर यांनी संपादन केलेले शल्यपर्व हे तीन ग्रन्थ या संस्थेतर्फे नुकतेच प्रकाशित झाले आहेत. पुण्याच्या डेक्कन कॉलेजतर्फे संशोधन कार्याव्यतिरिक्त संस्कृत कोशाचे महान् कार्य चालू आहे. त्यासाठी संस्कृतातील विविध विषयावरील सरासरी ५ शें महत्त्वाच्या ग्रन्थांचे आलोडन कोषविभागानें केलें. चान्द्रव्याकरण व वाक्यपदीयम् या दोन व्याकरणशास्त्र विषयक ग्रन्थांचे मुद्रण करण्याचे कार्य डेक्कन कॉलेजतर्फे चालू आहे.

**विश्वेश्वरानन्द वैदिक संशोधन संस्था** (होशियारपूर)—या संस्थेने आजपर्यंत वैदिक पदकोश व अथर्ववेदाच्या प्रथम भागावरील सायण भाष्य. याच प्रकाशन केलें. ऋग्वेदावरील माधवस्कन्दवर्म, उद्गीथ व मुद्गल यांच्या टीका, अथर्ववेदाच्या द्वितीय भागावरील सायणभाष्य, निघण्टुनिर्वचन, कल्हणाची राजतरंगिणी (जोनराज, श्रीवर व शुक यांच्या टीकेसहित.) हे ग्रन्थ संस्थेतर्फे प्रकाशित होण्याच्या मार्गावर आहेत. अध्यापनाचे कार्यहि संस्थेतर्फे चालू असतें.

**प्राच्यविद्यामंदिर** (बडोदा)—महत्त्वाच्या अप्रकाशित हस्तलिखितांचे संशोधन व प्रकाशन हें या संस्थेचें प्रमुख कार्य आहे. हें प्रकाशन निरनिराळ्या ग्रन्थमाले (तून होत असते. आजपर्यंत या 'माला'तून एकूण १३५ ग्रन्थ प्रकाशित झाले. इ. स.

१९६०–६१ या काळांत वाल्मीकि रामायण–पादानुक्रम, भाग १ (संपादक प्रा. जी. एच्. भट्ट), सोमेश्वरकृत 'उल्लाघराघव' (सं. मुनि पुण्यविजय व श्री. मोतीलाल खांडेसरा); 'संगीतोपनिषत्सारोद्धारः—(सं. प्रा. यू. पी. शाह), संस्कृत व्याकरण-कोश—(सं. प्रा. के. पी. अभ्यंकर) हे महत्त्वाचे ग्रन्थ मंदिरातर्फे प्रकाशित झाले. या व्यतिरिक्त वैशेषिक सूत्रम् (चन्द्रानन्दवृत्तिसहित), धूर्तस्वामिभाष्यम् (द्वितीय भाग), विष्णुधर्मोत्तरपुराणम् (द्वितीय भाग), मानमेयोदयः (तृतीय भाग) या ग्रन्थांचे मुद्रण संस्थेतर्फे होत आहे. वाल्मीकिरामायणाचे विविध पाठभेदासह प्रकाशन करण्याचे महत्त्वाचे कार्य या संस्थेतर्फे चालू आहे.

अशा प्रकारे संस्कृत भाषा व विद्या यांच्या संरक्षणासाठी निरनिराळ्या दिशेने कार्य करणाऱ्या, गुर्जरराज्य संस्कृत सम्मेलनम्, भोलाभाई जेसिंगभाई विद्यासंस्था (अहमदाबाद); अ. भा. संस्कृत परिषद, (लखनऊ) संस्कृत विद्वत्सभा (बडोदा), मिथिला इन्स्टिट्यूट (दरभंगा), श्रीद्वारिकाधारदापीठ, (द्वारका), रॉयल एशियाटिक सोसायटी (कलकत्ता), राजस्थान प्राच्यविद्या संशोधन संस्था (जोधपूर), सिन्धिया प्राच्यविद्यालय (उज्जयिनी), श्रीरामकृष्ण मिशन शारदापीठ, (बेलूर), संस्कृत विद्यासमिति (म्हैसूर), भारतीय विद्या संस्था (दिल्ली) वङ्गीय ब्राह्मणसभाविद्यालय (कलकत्ता), अखिल भारतीय संस्कृत साहित्य सम्मेलन (दिल्ली), गुरुकुल कांगडी विश्वविद्यालय, (हरिद्वार), ब्राह्मण सभा (मुंबई), कुप्पुस्वामी शास्त्री संशोधन संस्था (मद्रास), गुरुकुल विद्यापीठ (वृंदावन), संस्कृत शिक्षण समिति (मद्रास), संस्कृतभाषा प्रचारिणी सभा (नागपूर), भोसला वेदशास्त्र महाविद्यालय (नागपूर), इ. इ. छोट्या मोठ्या संस्था क्रियेक वर्षापासून कार्य करीत आहेत. साहित्य अकादमी व आकाशवाणी यांच्या द्वारा केन्द्रीयशासन व कवि-सम्मेलन, संस्कृत नाट्यसम्मेलन या प्रसंगी निमित्त उत्पाद्या द्वारा प्रांतिक शासने अल्प प्रमाणांत का होईना संस्कृत भाषेस उत्तेजन देण्यासाठी यथाशक्ति साहाय्य देत आहेत.

या ज्या मोठ्या संस्कृतसंबंधी संस्थांचा उल्लेख केला त्या प्रकारच्या संस्थाहून अगदी वेगळ्या पद्धतीने व विशिष्ट ध्येयाने प्रेरित होऊन नैष्ठिक कार्य करणारी संस्कृत शिक्षण संस्था म्हणजे वाराणसीचें '**वल्लभराम शालिग्राम सांगवेद विद्यालय** होय. वाराणसी नगरी ही अतिप्राचीन काळापासून संस्कृत विद्येची राजधानी आहे. परंपरागत प्राचीन परंपरेनुसार शिक्षण प्रगाढ पण्डित या नगरीत तयार झाले. त्यांतील अनेकांच्या प्रखर पाण्डित्याने अखिल भारताची कीर्तिध्वजा फडकलेली आहे. प्राचीन पद्धतीनुसार सांग वेदांचें अध्यापन करण्याच्या उद्देशाने इ. १८९९ मध्ये धर्मप्राण प. लक्ष्मणशास्त्री द्राविड या सनातनधर्म विद्वानांच्या प्रेरणेने त्यांच्याच चालकत्वाखाली हे विद्यालय वाराणसीला गंगा-

संस्था संस्कृतविषयीं आतां सर्वस्वी उदासीन राहिली नाही असे त्यांनी गेल्या १०–१२ वर्षांत जें अल्पस्वल्प कार्य केले त्यावरून दिसून येईल.

केन्द्रीय सरकारने डॉ. सुनीतिकुमार चॅटर्जींच्या अध्यक्षतेखाली एका संस्कृत आयोगाची ( कमिशन ) नियुक्ति केली. या आयोगाच्या सदस्यांनी देशभर प्रवास करून संस्कृतची सर्वांगीण दशा सर्वत्र अवलोकन केली व शेवटी सरकारला संस्कृतोद्धारासाठी काही मार्गदर्शन केले. त्या मार्गदर्शनानुसार वरिष्ठ न्यायालयाचे माजी न्यायाधीश श्री. पतञ्जलिशास्त्री यांच्या कुशल मार्गदर्शनाखाली नऊ सदस्यांची एक केन्द्रीय संस्कृत समिति स्थापन केली. या समितीच्या मार्गदर्शनानुसार कार्य चालविण्यासाठी केन्द्रीय शिक्षण खात्यांत एका विशिष्ट अधिकाऱ्याची नेमणूक सरकारने केली आहे. या समितीने केन्द्रीय सरकारकडून संस्कृत वृत्तपत्रे, शिक्षणसंस्था इत्यादींना आर्थिक साहाय्य देवविण्यास आरंभ केला आहे. अखिलभारतीय स्वरूपाचा संस्कृतचा पाठ्यक्रम, संस्कृतज्ञांची नामसूची अखिल भारतीय स्वरूपाची संस्कृत वक्तृत्व स्पर्धा व दक्षिणेत तिरुपति येथे केन्द्रीय संस्कृतानुसन्धानासाठी प्रशिक्षण संस्थेची उभारणी हें कार्य या समितीच्या प्रेरणेनेच झाले आहे. केन्द्रीय सरकारच्या अनुदानाचा निधि क्रमशः वाढविण्यांत येत आहे. तृतीय पञ्चवार्षिक योजनेत ७५ लक्ष रुपये संस्कृतासाठी खर्ची होतील अशी योजना आहे.

राष्ट्रपतितर्फे प्रतिवर्षी काही संस्कृतज्ञांना ' पद्मश्री ' ' पद्मभूषण ' या सारख्या सन्मान्य पदव्या व कांही विद्वानांना आमरण १५०० रु. चे मानधन देण्यात येत आहे.

उत्तरप्रदेशांत डॉ. संपूर्णानंदांच्या कारकीर्दीत वाराणसीमध्ये संस्कृत विश्वविद्यालयाची स्थापना करण्यात आली. बिहारमध्ये स्वर्गीय श्रीकृष्णसिंह आणि दरभंगानरेश श्रीकामेश्वरसिंह यांच्या प्रयत्नांनी दरभंगा येथे श्रीकामेश्वरसिंह संस्कृत विश्वविद्यालयाची स्थापना झाली. मध्यप्रदेशाचे मुख्यमन्त्री डॉ. कैलासनाथ काटजू हे तर संस्कृत हीच भारताची राष्ट्रभाषा होण्यास योग्य आहे या मताचे. त्यांनी आपल्या राज्यामध्ये माध्यमिक शिक्षणक्रमात संस्कृताध्ययन आवश्यक केले. बंगालमध्येहि वाङ्मयीन शिक्षण घेणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांसाठी संस्कृताध्ययन आवश्यक करण्यात आले आहे. मद्रास व केरळ प्रांतात सरकारतर्फे नवीन कांही योजना हाती घेण्यांत आल्या नसल्या तरी जुन्या योजनांना धक्का लावण्यात आलेला नाही. आसाममध्ये बिमलप्रसाद चलिहा यांच्या प्रेरणेने नवीन संस्कृत महाविद्यालये स्थापन करण्यात आली असून, आजवर संस्कृत पाठशाळांना देण्यात येणाऱ्या अनुदानांत वाढ करण्यात आली आहे. आसामराज्य संस्कृत मण्डळाची स्थापना करण्यात आली असून त्याच्या कार्यवाहाचें काम श्रीशिवनाथशास्त्री यांच्याकडे सोपविण्यात आले आहे. ओरीसामध्ये छत्तीस संस्कृत पाठशाळा अद्यापि चालू आहेत. त्यांची पाहणी व सुधारणा करण्याची

